# आवडत्या गोष्टी

[ एकसष्ट कथालेखकांच्या गोष्टींचा एकत्र संग्रह ]



संपादक :

यशवंत गोपाळ जोशी



प्रथमावृत्ति आक्टोबर १९३५



किंमत [illegible] रुपये

# प्रस्तावना



गोष्टी ऐकणें किंवा वाचणें आवडत नाहीं असें कोणी मनुष्य असेल का ? "काका, आम्हांला गोष्ट सांगा", "मास्तर आम्हांला गोष्ट सांगा", "बाई, आम्हांला गोष्ट सांगा" असा आग्रह करणाऱ्या लहान मुलांमुलींना गोष्टींचें वेड असतें. परंतु गोष्टींच्या बाबतींत, लहानथोर, श्रीमंतगरीब, विद्वान्-अविद्वान् असा भेद करतां येणार नाहीं. गोष्टी ऐकण्याचा नाद सर्वांना सारखाच असतो. म्हणून तर जगाच्या आरंभापासून गोष्टी सांगण्याची प्रथा चालू आहे, आणि जगाच्या अंतापर्यंत ती तशीच अव्याहत चालू राहील अशी खात्री वाटते.

राजकारणांत किंवा सामाजिक बाबतींत—इतकेंच काय, पण वाङ्मयांत सुद्धां—निरनिराळे संप्रदाय सुरू होतात आणि नाश पावतात. गोष्टींच्या संप्रदायाला मात्र कधींही खण्ड पडलेला नाहीं. निव्वळ करमणुकीकरितां लिहिलेल्या गोष्टी, देवादिकांच्या गोष्टी, उपनिषदांतील गोष्टी, विद्यार्जन सुलभ व्हावें आणि नीतितत्त्वांचा मनावर चिरकालिक परिणाम व्हावा म्हणून सांगितलेल्या हितोपदेशांतील गोष्टी, सुप्रसिद्ध धर्मसंस्थापकांनीं सांगितलेल्या गोष्टी, युद्धाच्या गोष्टी, घरगुती कहाण्या, लोककथा, अद्भुतकथा, सत्यकथा इत्यादि, गोष्टींचे अनेक पर्याय आहेत. किंबहुना जगांत असा कोणताच व्यवहार नाहीं, कीं ज्याची आपण गोष्ट करीत नाहीं.

गोष्टी सांगण्याची प्रथा सर्वत्र प्रचलित असल्यामुळें जगांतील निरनिराळ्या देशांत वर सांगितलेल्या गोष्टींचे नमुने आपल्याला पाहायला सांपडतात. परस्पर दळणवळण सुरू झालें म्हणजे एका देशांतील गोष्टी दुसऱ्या देशांत जातात. स्थलांतर झालें म्हणजे त्यांचें वेषांतर होतें. तथापि स्वभावतःच

असलेलें दोन गोष्टींतील साम्य लक्षांत यायला वेळ लागत नाहीं. अर्थात् ही मुद्रणकलेचा शोध लागण्यापूर्वीची स्थिति. वाहतुकीचीं साधनें त्या वेळीं मर्यादित असत. तरीसुद्धां एका देशांतील वाङ्मयाचा परिणाम दुसऱ्या देशांतील वाङ्मयावर होतच असे. विशेषतः गोष्टींची आवड सर्वांना सारखीच असल्यामुळें इतर वाङ्मयाच्या प्रकारांपेक्षां गोष्टींना पूर्वेकडून पश्चिमेकडे आणि पश्चिमेकडून पूर्वेकडे प्रवास करणें सुलभ होत असे. मुद्रणकलेचा शोध आणि वाहतुकीच्या साधनांत झालेली विलक्षण वाढ, यांमुळें आजकाल साऱ्या जगाचें एक कुटुम्ब बनलें आहे. सामान्य वाचकालासुद्धां जगांतील सुप्रसिद्ध लघुकथालेखकांची ओळख व्हायला वेळ लागत नाहीं. *टॉलस्टॉय, गॉर्की, मोपासाँ, पो, किपलिंग, कथारिन म्यान्सफील्ड, डब्ल्यू. डब्ल्यू. जेकब्झ् यांच्या गोष्टी आपण वाचतोच, परंतु गतवर्षींच नोबेल पारितोषिक मिळविणाऱ्या पिरांदेल्लोच्या गोष्टींचीं भाषांतरें आपल्याला उपलब्ध होऊं लागलीं आहेत.

असो. देश निराळा, भाषा निराळी, हवामान निराळें, आर्थिक जीवन निराळें, यांमुळें इंग्लंड, अमेरिका, हिंदुस्थान, रशा, फ्रान्स, जर्मनी वगैरे देशांतील गोष्टींत कांहीं बाबतींत फरक दिसून येतो. तथापि मानवी हृदय सर्वत्र एकरूपच असतें. आईची आपल्या मुलावरील प्रेम करण्याची एक तऱ्हा हिंदुस्थानांत आणि इंग्लंड किंवा फ्रान्समध्यें कांहीं दुसरीच तऱ्हा, बन्धुभगिनींच्या अथवा पतिपत्नींच्या प्रेमाचा एक प्रकार हिंदुस्थानांत तर जर्मनी किंवा इटलीमध्यें दुसराच प्रकार, असें कोणाला म्हणतां येणार नाहीं. राग, द्वेष, मोह, मद, मत्सर इत्यादि मनोविकार सगळीकडे सारखाच धुडगूस घालीत असतात. पृथ्वीच्या पाठीवर आपण कोठेंही गेलों तरी थोड्याफार फरकानें मानवी संसाराचीं तींच तींच दृश्यें आपल्याला दिसतील.

दृश्यें तींच असलीं आणि आपण तीं पाहिलीं असलीं तरी पुनः पुनः पाहावींशीं वाटतात. मनुजसंसार ही अशी चीज आहे कीं, ती परिचित असली तरी अपरिचित अशी वाटते, जुनी असली तरी नित्य नवें रूप

---

*Tolstoy, Gorky, Maupassant, Poe, Kipling, Katherine Mansfield, W. W. Jacobs, Pirandello.

धारण करते. तात्पर्य काय, गोष्टी कोणत्याही देशांतील असोत; त्यांत सर्व-साधारण मानवी जीविताचें प्रतिबिम्ब पडलेलें आपल्याला दिसतें आणि म्हणूनच गोष्टी वाचायचा कोणाला कधीं कंटाळा येत नाहीं.

गोष्टींत पडलेलें मनुजजीविताचें प्रतिबिम्ब पाहिलें म्हणजे वाचकाला आनन्द होतो. जणूं काय आरशांत पडलेली स्वतःची प्रतिमाच आपण पाहात आहों असें त्याला वाटतें, कारण व्यक्तींचें जीवन आणि अखिल मनुजजातींचें जीवन यांत वस्तुतः फारसा फरक नसतो. व्यक्तीच्या ज्या आशानिराशा त्याच अखिल मनुजजातीच्या आशानिराशा. व्यक्तीला जरा-मरणाची भीति वाटते त्याप्रमाणेंच जगांतील इतर स्त्रीपुरुषांनाही ती वाटते, व्यक्तीची स्वार्थबुद्धि किंवा परोपकारबुद्धि तशीच सृष्टींतील इतर लोकांची. तेव्हां गोष्टींत पडलेली मनुजजीविताची प्रतिकृति पाहून वाचकाला आनन्द होणें—अशा प्रकारच्या वाङ्मयाबद्दल आत्मीयता वाटणे—साहजिक नव्हे काय ? जें गोष्टींसंबंधीं आतां म्हटलें तेंच काव्य, नाटक, कादम्बरी यांच्यासंबंधींही म्हणतां येईल.

उत्कृष्ट वाङ्मय म्हणजे लेखकानें निर्माण केलेला आरसा होय. कालिदास, शेक्सपिअर, इब्सन वगैरे नामांकित लेखकांच्या ग्रन्थांत मनुजसंसाराचें चित्र हुबेहुब रेखाटलेलें असतें. म्हणूनच त्यांच्या ग्रन्थांना नेहमीं आरशाची उपमा देतात.

पृथ्वीच्या पाठीवर आपण कोठेंही गेलों तरी मनुजसंसाराचें एकच दृश्य दिसतें; कारण *माणसे म्हटलीं म्हणजे इथूनतिथून सारखीं. आपल्या या अस्थिर जगांत सारखे फेरबदल होत असतात. मनुजस्वभाव मात्र स्थिर आणि अचल आहे. केशभूषा आणि वेशभूषा या बाबतींत होणाऱ्या फरकांची गणतीही करतां येणार नाहीं. परंतु राजकीय आणि सामाजिक बाबतींत-सुद्धां आजच्या पिढीला संमत असलेले आचार, विचार आणि कल्पना उद्यांची पिढी दूर झुगारून देते. स्थूल दृष्टीनें पाहिलें तर एखाद्याची अशी समजूत होईल कीं, कांहींतरी उलथापालथ केल्याशिवाय या जगाला चैन पडत नाहीं. तथापि हे सर्व फेरबदल वरकांती होत. आकाशांत काळ्या

---

*Human nature is the same the world over.

— Galsworthy.

नाहींतर पांढऱ्या ढगांची हालचाल सुरू असते, तथापि ढगांच्या पलीकडचें आकाश अचल आणि स्थिर असतें. समुद्राच्या पृष्ठावर वादळानें कितीही थैमान घातलें तरी अन्तर्यामीं समुद्र शान्त असतो. मनुष्यस्वभावाचें तसेंच आहे.

जगाच्या बाह्यस्वरूपांत कितीही फरक झाला असला तरी मनुष्याच्या अन्तरंगांत म्हणण्यासारखी क्रान्ति झालेली नाहीं. विजेच्या गाड्या, विमानें, विद्युद्दीप, आकाशवाणी, इत्यादि अनेक आश्चर्यकारक गोष्टींमुळें सध्यांचें जग म्हणजे मनुष्यानें आपल्या अफाट बुद्धिसामर्थ्यानें आणि कर्तबगारीनें निर्माण केलेली मयनगरीच होय असें वाटतें. परंतु मनुष्याच्या बुद्धीची विलक्षण वाढ झाली असली तरी त्या मानानें त्याच्या सत्प्रवृत्ति बळावल्या आहेत असें म्हणतां येणार नाहीं. मनुष्यप्राणी सैतानाइतका कमालीचा दुष्ट आणि निर्घृण नाहीं आणि देवासारखा सर्व दोषांपासून अलिप्त, सर्वगुण-संपन्न असाही नाहीं. त्याच्या मनांतील श्रेष्ठ, उदात्त भावनांइतकें त्याचें चारित्र्य श्रेष्ठ आणि उदात्त असत नाहीं. उलटपक्षीं त्याच्या मनांत येणाऱ्या अमंगळ विचारांइतका तो नीचही नाहीं. अर्धवट चांगला, अर्धवट वाईट असा जो त्याचा स्वभाव, त्यांत जगाच्या आरंभापासून आतांपर्यंत म्हणण्या-सारखा फरक पडलेला नाहीं.

अचल, अव्याभिचारी मनुष्यस्वभाव हा जगाच्या वाङ्मयांतील उत्तम गोष्टींचा पाया होय. या भरभक्कम पायावर त्यांची उभारणी केलेली असते आणि मनुजसंसाराचें चित्र पण अशा गोष्टींत यथातथ्य रेखाटलेलें असतें. मनुष्यस्वभाव मुळांत एकरूप असला तरी वेगळाल्या परिस्थितींत त्याचीं अनंत रूपें दिसून येतात आणि मनुजसंसार सगळीकडे सारखा असला तरी त्यांत देखील गम्भीर आणि विनोदी, परिचित आणि अपरिचित वगैरे अनेक प्रकारांचा समावेश होतो. लौकिक जगांत माणसें सर्वत्र सारखीं दिसतात तथापि प्रत्येकाचा तोंडवळा निराळा. गोष्टींच्या जगांत हीच स्थिति आढळून येते.

उत्तम गोष्टीची मनुष्यस्वभावावर उभारणी केलेली असते हें तिचें एक लक्षण आणि मनुजसंसाराची प्रतिकृति तिच्यांत स्पष्ट उमटलेली असते हें दुसरें. हीं दोन लक्षणें असलीं म्हणजे झालें. गोष्ट नवी का जुनी, ती पूर्वे-कडील का पश्चिमेकडील वगैरे मुद्दे गौण होत. पूर्वीच्या काळीं लिहिलेल्या

गोष्टींत मनुष्यस्वभावाचें उत्कृष्ट आविष्करण झालें असेल तर नवयुगांतील वाचकही ती गोष्ट आनन्दानें वाचील. त्याप्रमाणेंच मनुजसंसाराची प्रतिकृति गोष्टींत स्पष्ट उमटली असली म्हणजे वाचक कोणच्याही देशांतला असला तरी त्याला ती गोष्ट आवडेल. तात्पर्य काय, अशा गोष्टींना देशकालादि निर्बन्ध बाधा करूं शकत नाहींत. पुनः पुनः वाचल्या तरी आणखी त्या वाचाव्याशा वाटतात, कारण त्यांचें माधुर्य अवीट असतें. कितीही काळ लोटला तरी त्यांच्या सौन्दर्याचा लोप होत नाहीं.

गोष्टच काय, पण काव्य, नाटक आणि कादम्बरी यांची उभारणी मनुजस्वभावावर झाली असेल तर त्यांनाही चिरस्थायी यश लाभेल. कालिदास, शेक्सपिअर, टॉलस्टॉय वगैरे जगन्मान्य लेखकांनीं मनुष्यस्वभावाचें रहस्य आत्मसात् करून घेतलें होतें. शाश्वत मनुष्यस्वभाव हाच त्यांच्या ग्रन्थांचा पाया. जगाच्या वाङ्मयांत त्यांना जें अढळ पद मिळालें आहे तें यामुळेंच.

पूर्वीच्या काळीं लिहिलेल्या गोष्टी आणि अर्वाचीन गोष्टी यांत फरक इतकाच कीं, पूर्वीं लेखक गोष्टी लिहीत त्या वेळीं गोष्ट लिहिणें म्हणजे एक कला आहे याची त्यांना जाणीव नसे. काव्य किंवा नाटक लिहायला ते बसले म्हणजे काव्याचे किंवा नाटकाचे नियम त्यांच्या डोळयांपुढें असत-निदान अशा नियमांची त्यांना अंधुक कल्पना तरी असे. अलीकडील ४०-५० वर्षांत ही स्थिति पालटून काव्य, नाटक, कादम्बरी याप्रमाणें गोष्ट लिहितांनासुद्धां कलादृष्टि ठेवणे आवश्यक होय ही समजूत दृढमूल झाली. गोष्टीची व्याख्या काय, तिचीं लक्षणें काय, तिचें तन्त्र कांय इत्यादि चर्चा सुरू झाली. अर्वाचीन गोष्टींचें एक शास्त्र बनलें.

अमेरिकन लेखकांनीं गोष्टीच्या तन्त्राची छाननी केली. *एका प्रसिद्ध अमेरिकन ग्रन्थकारानें अर्वाचीन गोष्टींचें तन्त्र कसें असतें तें सांगितलें, इतकेंच नव्हे तर त्या तन्त्राचे सर्व नियम संभाळून आदर्शभूत गोष्टी लिहून दाखविल्या. इंग्लिश ग्रन्थकार अमेरिकन ग्रन्थकारांच्या फारसे पाठीमागें नाहींत. अमेरिकन ग्रन्थकारांनीं अर्वाचीन गोष्टींत जसें विपुल यश संपादन केलें आहे, जवळजवळ तितकेंच यश इंग्लिश लेखकांनींही मिळविलें आहे.

---

* Edgar Allan Poe.

फ्रान्स, रशा, इटली वगैरे देशांसंबंधीं थोड्याफार फरकानें हेंच विधान करतां येईल. या सर्व देशांत प्राचीन आणि अर्वाचीन गोष्टी हा भेद दिसून येतो.

कलात्मक दृष्टि आणि तंत्र यांबरोबर प्राचीन आणि अर्वाचीन गोष्टीं-मधील विषयांतही फरक पडला. धर्म, नीति वगैरे विषयांवरून आधींच उडा-लेली लेखकांची दृष्टि मानवी संसाराचें यथातथ्य चित्र रेखाटण्याकडे वळली. अद्भुतरम्य आणि काल्पनिक गोष्टी लिहून वाचकाचें मनोरंजन करण्यांत काय हंशील ? त्यापेक्षां जगांतील निरनिराळे प्रसंग आणि अनुभव—त्यांत कल्पनेचे रंग न भरतां— आपल्याला दिसतात त्या स्वरूपांतच वाचकापुढें मांडून त्याच्या विचाराला, बुद्धीला चालना देणें हें लेखकाचें कर्तव्य होऊन बसलें. राजे लोक आणि त्यांचे सरदार, लावण्यवती आणि कुलवती स्त्रिया, विलक्षण धाडसी आणि पराक्रमी पुरुष इत्यादि मानवी समाजाच्या उच्च श्रेणींकडे पाठ फिरवून, मध्यम स्थितींतील वर्गाचें आणि विशेषतः सामान्य मनुष्याचें— शेतकरी, कामकरी वगैरे लोकांचें जीवन गोष्टींत रेखाट-ण्याचा संप्रदाय सुरू झाला. यापुढची पायरी म्हणजे बाह्य जगतांतील प्रसंगावर भर न देतां मानवी मनांतील चाललेल्या असंख्य घडामोडींचें वर्णन करण्यांत लेखकांना आनंद वाटूं लागला. मनोविश्लेषणांत गर्क होणारे गोष्टींचे लेखक सध्यां वाढत्या प्रमाणावर आहेत.

मराठी वाङ्मयांतील गोष्टींचा इतिहास म्हणजे वर दिलेल्या पाश्चात्य वाङ्मयांतील गोष्टींच्या इतिहासाची छोटीशी आवृत्ती होय. मराठींतही पूर्वी मनोरंजन आणि उपदेश हे दोन हेतु असत. धर्म आणि नीति यांचें शिक्षण देण्याकरितां गोष्टी लिहीत. याशिवाय मनोरंजनाचें कार्य करणाऱ्या अद्भुतरम्य कथांचा तिसरा प्रकार असे. लेखक बहुधा उच्च वर्णांतील असल्यामुळें उच्चवर्णीयांच्या जीवनाचें चित्र या गोष्टींत पाहायला सांपडे. श्री. हरिभाऊ आपटे आणि त्यांचे अनुयायी यांनीं मध्यम वर्गाच्या सुख-दुःखांकडे लक्ष पोंचाविलें. अलीकडे पांच-दहा वर्षांत लिहिलेल्या गोष्टींना मात्र अर्वाचीन गोष्टी म्हणणें योग्य होईल. मुख्यतः इंग्रजी आणि अमेरिकन कथालेखकांचा दृढ परिचय हें याचें कारण. छोटी गोष्ट ( किंवा लघुकथा म्हणावें पाहिजे तर ) या वाङ्मयप्रकाराचा बी. ए.च्या अभ्यासक्रमांत समावेश करून मुंबई विश्वविद्यालयानें लघुकथेच्या शास्त्रीय परिशीलनाला

हातभार लावला. श्री. फडके, खांडेकर, वरेरकर, सौ. कमलाबाई टिळक, श्री. कृष्णाबाई, श्री. विभावरी शिरूरकर, सौ. कुसुमावती देशपांडे आणि इतर कितीतरी लेखकांनीं आपल्या गोष्टींत कलात्मक दृष्टि ठेवून लघुकथेचें तंत्र कांटेकोरपणानें पाळलें आहे.

अर्वाचीन गोष्टींतील विषयाची निवड करतांनाच लेखक गोष्टीच्या विषयाची कलाकृति बनवितां येईल का नाहीं याचा विचार करतो. एखादा सुटसुटीत प्रसंग किंवा त्या प्रसंगामुळें उठलेलें मनांतील काहूर, व्यक्तीचा परिस्थितीशीं चाललेला झगडा, ढळढळीत सामाजिक किंवा राजकीय अन्याय—विषय कोणचा का असेना—गोष्टीच्या विषयांत लेखकाच्या दृष्टीनें स्वयंपूर्णता पाहिजे. आरंभ, मध्य, शेवट अशा तऱ्हेनें त्याला विषयाची रचना करतां आली पाहिजे.

विषय निवडल्यानंतर त्याची मांडणी कशी करायची हा विचार. निरनिराळ्या प्रसंगांची जुळवाजुळव करीत असतां गोष्टींतील मूलभूत कल्पने-ची संगति सोडली नाहीं म्हणजे गोष्टींत एकसूत्रीपणा येतो. गोष्ट वाचल्या-नंतर वाचकाच्या मनावर एकच एक परिणाम होतो. अशा प्रकारच्या एक-मेव परिणामाला पोषक नसलेले प्रसंग, विचार, कल्पना, वर्णनें यांची गोष्टींतून हाकालपट्टी केली पाहिजे. किंबहुना असा एकही वायफळ शब्द वापरतां कामा नये कीं, ज्याचा गोष्टीच्या आवश्यक अंगोपांगांशीं संबंध येत नाहीं. आधुनिक गोष्टीच्या तन्त्रांतील हा एक मुख्य विशेष होय.

चतुर कथालेखक पहिल्या वाक्यांत गोष्टीचा शेवट कसा होणार तें सुचवून ठेवतो. आरंभींच्या सूक्ष्म बीजांत पुढें फोंफावणाऱ्या वृक्षाचें दृश्य वाचकांच्या डोळ्यांपुढें उभें राहातें. आरंभ आकर्षक असेल तर सुरुवातीलाच वाचकाचें लक्ष गोष्टीकडे वळतें आणि तें तसें तिथें खिळून राहायचें असेल तर आरंभ जसा आकर्षक तसा मध्य आणि शेवट हीं दोन्ही अंगें आकर्षक करणें इष्ट होय. कथावस्तूतील कोणचा भाग महत्त्वाचा, कोणचा गौण, कोणचा प्रसंग विस्तरशः सांगायचा, कोणच्या प्रसंगाचें संक्षेपानें वर्णन करायचें वगैरे बाबतींत काळजी घेतली म्हणजे कथानकाचा आरंभ, मध्य, आणि शेवट या तिन्ही भागांचा योग्य प्रमाणांत परिपोष होतो. गोष्टीचें स्वरूप सुश्लिष्ट आणि सुबक होतें. उत्तम प्रतीची गोष्ट म्हणजे एक छोटासा ताजमहालच होय. तिच्यांत रचनेचा रेखीवपणा असतो. कथावस्तूचा

प्रत्येक घटक जागच्या जागीं प्रमाणशीर आणि शास्त्रशुद्ध रीतीनें बसविला असल्यामुळें गोष्टींत सर्वत्र नियमानुकूलता दिसून येते. अशा गोष्टीचा नीटसपणा, आटोपशीरपणा पाहून मन प्रसन्न होतें.

आधुनिक गोष्टीच्या तन्त्रांतील दुसरा एक विशेष म्हणजे कथानकाशीं संबंध असलेल्या व्यक्तींचें स्वभावदर्शन. महाकाव्यांत, कादम्बरींत आणि नाटकांत व्यक्तींच्या स्वभावपरिपोषाला पुष्कळ वाव मिळतो. गोष्टींतील व्यक्तींचें स्वभावदर्शन मर्यादित स्वरूपांत असतें. लेखकानें निर्माण केलेल्या व्यक्तींच्या स्वभाववैशिष्ट्यामुळें गोष्टींतील प्रसंग कसा उद्भवला, किंवा उलटपक्षीं गोष्टींतील प्रसंगानें व्यक्तीच्या स्वभावाचे कोणचे गुणावगुण प्रकट झाले–व्यक्तींचा आणि प्रसंगांचा परस्परांवर झालेला परिणाम–इतक्यापुरतेंच गोष्टींतील स्वभावरेखनाचें कार्य. तथापि प्रतिभावान् लेखक ही मर्यादा संभाळून आपलें स्वभावदर्शनाचें कार्य पार पाडतो. छोट्या गोष्टींत पात्रांची गर्दी असणें शक्य नाहीं. पण कथानकाला आवश्यक अशीं जीं थोडीं पात्रें लेखकाला निर्माण करावीं लागतात त्या पात्रांना तो आपल्या बुद्धि-बलानें जिवंतपणा आणतो. विकार, विचार, इच्छाशक्ति इत्यादि सर्व बाबतींत हीं पात्रें सजीव सृष्टींतील माणसांची बरोबरी करतात. लौकिक जगांत स्वच्छन्दपणें वागणाऱ्या, वाचकाला परिचित असणाऱ्या अनेक व्यक्तींप्रमाणें गोष्टींतील हीं पात्रें त्याला प्रिय वाटतात, नाहींतर तो त्यांचा तिरस्कार करतो. एकदां या पात्रांची वाचकाच्या मनावर छाप बसली म्हणजे ती कायमची. वाचकाच्या मनांत तीं निरन्तरची वस्ती करून राहातात.

गोष्टींतील संवाद हा अर्वाचीन गोष्टीचा तिसरा विशेष होय. व्यक्तींचा जिवंतपणा त्यांच्या संभाषणांत दिसून येतो. हीं संभाषणें साहजिक, सुटसुटीत आणि चटकदार असलीं पाहिजेत. या बाबतींत लेखकाचें पहिलें कर्तव्य म्हणजे प्रत्येक पात्राला अनुरूप अशी भाषा त्याच्या तोंडीं घालणें हें होय. दासीनें राणीसारखें आणि हुजऱ्यानें राजासारखें बोलतां कामा नये. अशा प्रकारची विसंगति अगदीं निर्बुद्ध वाचकाच्याही चटकन् ध्यानांत येते. व्यक्तींच्याबरोबर प्रसंगाचें औचित्य संभाळायला पाहिजे. प्रसंग गंभीर असेल तर बाष्कळ कोट्या आणि शुष्क विनोद यांना थारा देऊं नये.

कथानकांतील पात्रांच्या संभाषणांनीं व्यक्तिदर्शनाचें कार्य होतें. प्रत्येक

पात्राच्या संभाषणावरून आपल्याला त्या पात्राच्या स्वभावाचें मर्म ओळखतां येतें. याशिवाय जेव्हां हीं पात्रें परस्परांशीं बोलत असतात तेव्हां इतर पात्रांविषयींचीं त्यांचीं मतें तीं प्रांजलपणें व्यक्त करतात. कथानकांतील पात्रांच्या स्वभावांचें परिपूर्ण ज्ञान व्हायला या अभिप्रायांची पुष्कळच मदत होते.

कथानकांतील संवादांचा आणखी एक फायदा म्हणजे या संवादांमुळें कथानकांतील घडामोडींची माहिती होते. कथानक कुठच्या बाजूनें पुढें सरकतें आहे तें कळतें. अर्थात् नाटकांत किंवा कादम्बरींत संवादाला जितका अवसर मिळतो तितका गोष्टींत मिळणें शक्य नाहीं. तरीही मार्मिक, चटकदार, प्रसंगानुरूप संवाद हें अर्वाचीन गोष्टीचें महत्त्वाचें अंग होय.

विषयानुरूप वातावरण हा अर्वाचीन गोष्टीचा चवथा विशेष होय. या वातावरणाचे इष्टानिष्ट स्वरूप गोष्टींतील मध्यवर्ती कल्पनेवर अवलंबून असतें. ही मध्यवर्ती कल्पना जशी असेल—विनोदी, आनंदी, शोकमय—त्याप्रमाणें गोष्टीचें वातावरण विनोदी, आनंदी, शोकमय बनतें. अशा प्रकारचें वातावरण निर्माण करतांना लेखक गोष्टींतील मध्यवर्ती कल्पनेचा वाचकाला विसर पडूं देत नाहीं. प्रसंगांच्या आणि पात्रांच्या वर्णनांत, त्याचप्रमाणें गोष्टींतील संभाषणांत दरपावलागणिक तो प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें वाचकाला गोष्टीच्या मध्यवर्ती कल्पनेची आठवण करून देतो. मध्यवर्ती कल्पना म्हणण्यापेक्षां मध्यवर्ती भावना म्हणणें रास्त होईल, कारण *वातावरणाची ही इमारत भावनेच्या पायावर उभारलेली असते. वातावरण म्हणजे गोष्टीच्या शरीराभोंवतीं लपेटलेलें वस्त्र होय. आनंदी वातावरणांत सर्वत्र आनंदाचा सूर ऐकूं येतो. दुःखमय वातावरण असेल तर गोष्टीवर दुःखाची दाट छाया पसरलेली दिसेल.

गोष्टीला योग्य असें वातावरण निर्माण करीत असतां लेखकाला निसर्गाचें साहाय्य घेतां येतें. उदाहरणार्थ, गोष्टींतील प्रसंग आनंदाचा असला म्हणजे लेखक निसर्गातील आनंदाचें वर्णन करतो—जिकडे तिकडे उमललेलीं फुलें, उंच उंच ताना घेणारे पक्षी वगैरे चित्र रंगवितो. जणूं काय, गोष्टींतील आनन्दाचा निसर्ग वांटेकरी आहे. पण गोष्टींतील प्रसंग दुःखदायक असला तर तो निसर्गातील दुःखाचें वर्णन करतो—जिकडे तिकडे

*Atmosphere is fundamentally a matter of feeling.

अंधार, सोसाट्याचा वारा, उन्मळून पडलेले वृक्ष आणि लता वगैरे वगैरे निसर्गाचें दुःखमय दृश्य दाखवितो. निसर्गातील देखाव्यांचा अशा तऱ्हेनें पार्श्वभूमि म्हणून उपयोग केला म्हणजे कथानकांतील मूळचा आनन्दाचा किंवा दुःखाचा प्रसंग खुलून दिसतो.

वातावरणनिर्मिति एवढाच कांहीं गोष्टींचा हेतु असतो. अशा गोष्टींत प्रसंगांना आणि पात्रांना महत्त्व नाहीं. एखाद्या प्रदेशाचें जें विशिष्ट उदास किंवा भयानक वातावरण असेल त्याची वाचकाला हुबेहूब कल्पना यावी म्हणून लेखक आपल्या वर्णनकौशल्याची शिकस्त करतो. मराठी वाङ्मयांत अशा गोष्टी कोणीं लिहिल्या आहेत का नाहींत मला माहीत नाहीं. इंग्लिश आणि अमेरिकन वाङ्मयांत मात्र निव्वळ वातावरणनिर्मिति हेंच ज्या गोष्टींचें ध्येय आहे, *अशा गोष्टींचे नमुने सांपडतात.

अर्वाचीन गोष्टींत निव्वळ वर्णनाला महत्त्व नाहीं. कथानकांतील व्यक्तींचें, भावनांचें, प्रसंगांचें, निसर्गातील देखाव्यांचें वर्णन करावें लागणारच. पण तें कथानकाच्या ओघांत येईल तसें. वर्णनानें कथानकाची गति थांबली तर तें वर्णन, अप्रस्तुत आणि अप्रयोजक होईल. नुसत्या वनश्रीचें लांबच लांब वर्णन, किंवा कथानकांतील पात्रांच्या गुणावगुणांचें लेखकानें स्वतःच केलेलें पाल्हाळिक वर्णन– अशा प्रकारचीं वर्णनें अप्रस्तुत आणि अप्रयोजक होत.

याशिवाय व्यक्तींच्या, वस्तूंच्या, प्रसंगांच्या वर्णनांत यथार्थता हा गुण असणें अवश्य होय. लेखकानें केलेल्या वर्णनांत त्याच्या स्वतःच्या अनुभवाचा जिवंतपणा असला म्हणजे तें वर्णन वाचकाला तात्काळ पटतें. याच्या उलट ऐकींव किंवा सांकेतिक वर्णनें. या दुसऱ्या प्रकारच्या वर्णनांत वाचकाला आपल्या अनुभवाचा प्रत्यय येत नाहीं. कागदाच्या फुलांप्रमाणें तीं त्याला कृत्रिम आणि निर्जीव वाटतात. बोलाचीच कढी। बोलाचाच भात। जेवुनीयां तृप्त। कोण झाला॥ कथानकांतील प्रसंगांचें वर्णन किंवा कथानकांतील पात्रांचें वर्णन हीं दोन्ही वाचकाच्या नित्याच्या अनुभवांशीं, त्याला परिचित असलेल्या लौकिक व्यवहारांतील सत्याशीं सुसंगत असलीं

*Stevenson's Merry Men, Poe's Fall of the House of Usher.

म्हणजे रसहानि होत नाहीं, वाचकाच्या मनाला धक्का बसत नाहीं. कलावन्त लेखक प्रसंगाचें वर्णन करीत असतां अतिशयोक्ति करीत नाहीं. गोष्टींतील आपल्या स्वभावरेखनांत परस्परविरुद्ध, असंबद्ध, असें कांहीं येऊं देत नाहीं. आज ज्यानें अघोर, अनन्वित कृत्यें केलीं त्याला उद्यांच सन्तजनांच्या मार्गावर आणून ठेवीत नाहीं. चुटकीसरशीं होणारीं अशीं विचारपरिवर्तनें जगांत क्वचितच घडून येतात हें त्याला माहीत असतें.

स्थलकालाच्या दृष्टीनेंसुद्धां गोष्टींतील वर्णनांत यथार्थता असणें इष्ट होय. वेदकालीन गोष्टींत—वेद रचले गेले त्या वेळचे—आचार, विचार, वेष, भाषा यांचें वर्णन येईल. नवयुगांतील गोष्टींत अर्वाचीन चालीरीति, वेष, भाषा यांचेंच वर्णन करणें योग्य होईल. गोष्टीचा जो काल असेल तत्कालीन सामाजिक परिस्थितीचें प्रतिबिम्ब गोष्टींत पडलें पाहिजे. जुन्या नव्या चालीरीतींची सरमिसळ होतां कामा नये. तसेच पूर्वेकडील गोष्टींत पौर्वात्य आचार-विचार, राहणी, वाक्प्रचार यांचें वर्णन करणें हेंच लेखकाचें कर्तव्य. याच्याविरुद्ध पश्चिमेकडील गोष्टींत पाश्चिमात्य चालीरीति, आचारविचार यांचें चित्र रेखाटणें उचित होईल. पूर्व आणि पश्चिम यांचें विद्रूप मिश्रण होऊं नये म्हणून मात्र लेखकानें दक्षता बाळगली पाहिजे. स्थलकालाच्या दृष्टीनें योग्य असे चालीरीतीचे, वाक्प्रचाराचे रंग कथानकांत भरले म्हणजे कथानक उठावदार दिसतें. अर्वाचीन गोष्टीचा हाही एक विशेष होय. याला *इंग्लिशमध्यें वातावरणच्छटा म्हणतात. 'आवडत्या गोष्टीं'तील दिवाकर कृष्णांची 'दण्डकारण्यांतील प्रणयिनी' ही गोष्ट वातावरणच्छटेचा उत्तम नमुना म्हणून देतां येईल.

अर्वाचीन गोष्टीची भाषा विषयाशीं तद्रूप झालेली असते. ध्वनि आणि प्रतिध्वनि यांच्यांत जसा फरक करतां येत नाहीं, त्याप्रमाणेंच अर्वाचीन गोष्टींतील विषय आणि भाषा यांचेंही रूप वेगळें करून दाखवितां येणार नाहीं. घरगुती विषयाची घरगुती भाषा, गंभीर विषयाची भाषाही गंभीर. गोष्टींत रागाचा आविष्कार झाला म्हणजे भाषाही उग्र आणि तापट होते. गोष्टींत तिरस्कार आणि मत्सर असेल तर भाषाही सर्पासारखी फूत्कार करायला लागेल. अर्वाचीन गोष्टींतील शब्द, वाक्यरचना, अलंकार,

*Local Colour.

सुभाषितें, विनोदी कोट्या या सर्वांचें विषयाशीं तादात्म्य झालेलें असतें. फूल आणि फुलाचा वास, साखर आणि साखरेची गोडी हीं जशीं एकजीव असतात तसाच अर्वाचीन गोष्टींत विषय आणि भाषा यांचा एकजीव झालेला असतो.

आतांपर्यंत अर्वाचीन गोष्टीच्या तंत्राचा विचार केला. विषयाची निवड, रचनासौन्दर्य, व्यक्तिदर्शन, संवाद, वातावरण, वर्णन, भाषा इत्यादि या तन्त्राचीं अंगोपागें होत. कलात्मक दृष्टि ठेवून आणि तन्त्र संभाळून गोष्ट लिहिणाऱ्या लेखकाला आपण काय करतों आहों याची जाणीव असते. ज्या क्षणीं गोष्टीच्या विषयाची निवड केली त्या क्षणीं जें संपूर्ण गोष्टीचें चित्र त्याच्या मनश्चक्षूंपुढें उभें राहतें, त्या चित्राबरहुकूम गोष्टीची कलाकृति झाली का नाहीं हें तो तावून सुलाखून पाहतो. स्वतःच्या गोष्टीचा स्वतःच टीकाकार बनतो. सूक्ष्म दृष्टीनें गोष्टीच्या प्रत्येक भागाची छाननी करून कुठें व्यंग दिसलें कीं तें दूर करण्याचा कसोशीनें प्रयत्न करतो. गोष्ट सर्वांगसुंदर कशी करतां येईल याचाच त्याला ध्यास. रात्रीच्या रात्री तो जागून काढील पण आपलें ध्येय पूर्ण करील.

आपण कलावन्त आहों ही जाणीव जशी उपकारक तशी कांहीं प्रसंगीं ती मारकही होते. कारण आपण चतुर, कलावन्त कारागीर आहोंत या जाणिवेनें लिहिलेल्या गोष्टी नेहमीं उत्तम निपजतात असें नव्हे. जाणिवेची मदिरा प्यालेला लेखक कलेचा दास बनतो. उठल्या सुटल्या त्याचें कलेचें संकीर्तन चाललेलें असतें. कला आणि सौन्दर्य यांची पायरी वरची, जीवन आणि नीति यांचें महत्त्व कमी, अशी त्याची समजूत झाल्या-मुळें त्याच्या लिखाणांत विषमता उत्पन्न होते, तें एकांगी व्हायला लागतें. सौन्दर्यनिर्मितीच्या नांवाखालीं हा लेखक आपली गोष्ट उत्तमोत्तम शब्दांनीं आणि अलंकारांनीं मढवून काढतो. अशा कलावन्ताला पाहिलें कीं, पांचही बोटांवर पांच अंगठ्यांचें प्रदर्शन करणाऱ्या लक्ष्मीपुत्राची आठवण होते. खरें म्हटलें तर कला, सौन्दर्यनिर्मिति, जीवन आणि नीति यांना अलग अलग ठेवतां येणार नाहीं. कला, नीति, जीवन, आणि सौन्दर्य यांच्यांत परस्पर विरोध आहे, त्यांचें एकमेकांशीं पटत नाहीं, एकाची पायरी वरची आणि दुसऱ्याची खालची ही समजूतच मुळांत खोटी. जलपृष्ठावर उठणाऱ्या लहरी जशा एकमेकांत विरून जातात त्याप्रमाणेंच कला, जीवन,

नीति आणि सौन्दर्य यांची उत्कृष्ट वाङ्मयांत अभेद्य स्थिति असते. सुन्दर शब्दांची आणि अलंकारांची नुसती गर्दी उसळून दिल्यानें सौन्दर्यनिर्मिति होणार नाहीं. औचित्य हाच वाङ्मयाचा आत्मा. सुन्दर शब्दांनीं आणि अलंकारांनीं औचित्याची पायमल्ली केली तर त्या सुन्दर शब्दांना आणि अलंकारांना कसलेंच महत्त्व नाहीं. तात्पर्य काय, कलेच्या जाणिवेनें लिहिणाऱ्या लेखकानें कलेच्या आहारीं जाऊं नये. नाहींतर 'जेणें माक्षिका भक्षिली जाणिवेची । तया भोजनाची रुचि प्राप्त कैंची ॥' या वचनाचा त्याला प्रत्यय येईल. 'विनायकं प्रकुर्वाणः रचयामास वानरम्' अशी त्याची केंविलवाणी दशा होईल.

विसाव्या शतकांतील बरेच लेखक—विशेषतः महायुद्धानंतरचे लघुकथांचे लेखक–गोष्टीच्या तन्त्राकडे दुर्लक्ष करतात. मानवी जीवनांतील एखादा तुटक प्रसंग घेऊन त्याची गोष्ट बनवतात. गोष्टीच्या विषयांत स्वयंपूर्णता आहे का नाहीं याची त्यांना क्षिति नसते. तुटक प्रसंगाला आरंभ, मध्य, शेवट कल्पून व्यवस्थितपणा आणण्याचा ते प्रयत्न करीत नाहींत. गोष्टींत जगाचें वास्तवरूप दिसलें म्हणजे झालें. कथानकाची त्यांना जरूर लागत नाहीं. स्वभावरेखन, वातावरण, नाहींतर मनोविश्लेषण, यांपैकीं कोणतें तरी एक अङ्ग घेऊन ते आपलें कथालेखनाचें कार्य पार पाडतात. मनोविश्लेषणावर त्यांचा मुख्य भर. आयुष्यांतील एखाद्या प्रसंगाची मनावर झालेली प्रतिक्रिया आणि तिचे परिणाम–मनांतल्या मनांत चाललेल्या घडामोडी–यांचें वर्णन करण्यांत सध्यांचे लघुकथालेखक आपलें कौशल्यसर्वस्व खर्चे करतात.

पूर्वींच्या काळच्या लेखकांना गोष्टीच्या तन्त्राची जाणीव नसे. गोष्टीच्या विषयांतच त्यांचें तन्त्र सामावलेलें असे. कलात्मक दृष्टि त्यांना नव्हती. कलाविकासाचा हेतु मनांत धरून ते गोष्टी लिहीत नसत. पण त्यांचें मानवी संसाराचें अवलोकन सूक्ष्म असून, मानवी स्वभावाचें रहस्य त्यांनीं ओळखलें होतें. यामुळें पूर्वींच्या काळच्या कितीतरी गोष्टी अजूनसुद्धां आपण वाचतों आणि भविष्य काळींही या गोष्टी वाचकाला आकर्षक वाटतील.

प्राचीन काळीं लिहिलेल्या गोष्टींत–उदाहरणार्थ उपनिषदांतील गोष्टींत किंवा पञ्चतन्त्रांतील गोष्टींत–गोष्टीच्या तन्त्राला स्वतन्त्र अस्तित्व नसे. गोष्टींतील विषयाच्या विकासाबरोबरच तन्त्राचा विकास होत असे. या गोष्टी

वाचल्या म्हणजे † 'विषय ही वाङ्मयांत एकच महत्त्वाची बाब' असें जें एका विख्यात रसिकाचें मत आहे तें ग्राह्य वाटूं लागतें. विषय निवडला म्हणजे झालें. तन्त्र, भाषा वगैरे विषयाच्या पाठोपाठ आपोआप येतात. एखादें फूल उमलण्यापूर्वी आपल्याला त्याच्या सुवासाची कल्पना नसते. विषयाचा विकास होण्यापूर्वी त्यांत असलेल्या माधुर्याची वाचकाला कल्पना नसते. परंतु कळीचें फुलांत रूपांतर होतें, आणि फूल उमलल्यानंतर त्याच्या परिमलानें दाही दिशा दरवळून जातात. तसेंच गोष्टींतील प्रसंगाचा आणि स्वभावरेखनाचा विकास झाला, म्हणजे वाचकाला विषयाच्या सौन्दर्याची, माधुरीची आणि मोहकतेची जाणीव होते. विषयाच्या विकासाबरोबरच गोष्टींची मोहकता वाढते, विषयांत अन्तर्भूत असलेलें तन्त्र स्पष्ट दिसूं लागतें. सध्याच्या काळीं-सुद्धां गोष्टीच्या विषयांत ज्यांना गोष्टीचे तन्त्र सांपडतें असे लघुकथालेखक आहेत. प्रस्तुत कथासंग्रहाचे संपादक त्यांपैकींच होत. गोष्टीच्या तन्त्राचा विचार न करतां ते गोष्टी लिहितात आणि वाचकांना त्यांच्या गोष्टी आवडतात. याचाच अर्थ हा कीं, गोष्टीच्या विषयांत त्यांच्या गोष्टींचें तन्त्र त्यांना सांपडतें.

हें जरी खरें असलें, गोष्टी लिहायची ईश्वरदत्त देणगी असली, तरी गोष्टीच्या तन्त्राचा अभ्यास त्यांनीं–आणि त्यांच्यासारख्या इतर लेखकांनीं–करूं नये असें कोणी म्हणणार नाहीं. 'अधिकस्याधिकं फलम्' या न्यायानें ईश्वरदत्त देणगीला विद्वत्तेची जोड मिळाली तर 'मधुरं हि पयः स्वभावतो ननु कीदृक् सितशर्करान्वितम्' असेंच म्हणावें लागेल.

अर्वाचीन कलात्मक गोष्टींना लघुकथा म्हणतात. लघुकथा हें नांव विशेष अन्वर्थक नसलें तरी प्राचीन आणि अर्वाचीन गोष्टींतील फरक थोडक्यांत आणि आटोपशीर रीतीनें दाखविणारें एखादें नवें अभिधान पाहिजेच. या दृष्टीनें लघुकथा हें नांव सोयीचें आहे. जिचा आकार लहान ती लघुकथा असा दण्डक घालणें मात्र योग्य होणार नाहीं. गोष्ट एकाच बैठकींत वाचून संपवितां आली म्हणजे तिला लघुकथा म्हणावें * अशी एक लघुकथेची व्याख्या

---

† "All depends upon the subject." —Arnold

*A short story must be of such length that it may be read at a sitting. —Poe

आहे. †दुसऱ्या एका व्याख्येप्रमाणें जी गोष्ट वाचायला १५ मिनिटांपासून ५० मिनिटें लागतात तिला लघुकथा म्हणावें. परंतु पुष्कळ चांगल्या ‡लघु-कथा एका बैठकींत संपवितां येणार नाहींत आणि पुष्कळांना १५ ते ५० मिनिटांपर्यंतची कालमर्यादा पुरणार नाहीं.

लघुकथेचा चिमुकला आकार हें तिच्यावर बाहेरून लादलेलें कृत्रिम बंधन नव्हे, किंवा हा आकार म्हणजे एखादी यांत्रिक मूस नव्हे, कीं जिच्यांतून एकाच ठराविक साच्याच्या लघुकथा भराभर बाहेर काढतां येतील. लघुकथेचा विषय, तन्त्र आणि आकार यांचें एकमेकांशीं जिव्हाळ्याचें नातें आहे. विषय आणि तन्त्र यांतूनच लघुकथेच्या आकाराची निर्मिति होते. विषयाचा जसजसा विकास होतो तसतसें––लघुकथेच्या तन्त्राला सर्वस्वीं अनुकूल असें––तिच्या आकाराला मूर्तस्वरूप येते. लघुकथेंत विषय, तन्त्र आणि आकार या तिहींची एकात्मता झाली नाहीं तर तिला लघुकथा म्हणतां येणार नाहीं.

मागें सांगितल्याप्रमाणें जगांतील एखादा चटका लावणारा प्रसंग किंवा जिव्हाळ्याचा अनुभव, मानवी प्रपंचाचें घरगुती दृश्य किंवा विशिष्ट परिस्थितीत चटकन् लक्षांत येणारें मानवी स्वभावाचें रहस्य, तत्त्वप्रतिपादन–– म्हणजे तत्त्वप्रतिपादनाकरितां रंगविलेलें मनुजसंसृतीचें दृश्य– आयुष्यांतील विलक्षण आनन्दाचा, भीतीचा, किंवा चमत्कृतिजनक एखादा संस्मरणीय *क्षण––हे आणि अशा प्रकारचे लघुकथांचे विषय. विषयाची निवड केल्यानंतर, त्याची मांडणी करतांना वाचकाच्या मनावर एकच एक परिणाम व्हावा हें लघुकथालेखकाचें ध्येय. तें साध्य करतांना त्याला प्रसंग आणि पात्रें, संवाद आणि वर्णनें वगैरे बाबतींत काटकसर करावी लागते. दोन प्रसंगांच्या ऐवजीं एका प्रसंगानेच तो आपलें काम भागवितो. एका पात्रा-

---

†A fiction that may be read in something under an hour–from 15 to 50 minutes.—Wells

‡Dr. Jekyll and Mr. Hyde—Stevenson

*An illuminated and illuminating moment of beauty or of terror, or of sheer surprise.—Bullett

कडून दोन पात्रांचें काम करून घेतो. काटकसर करणें म्हणजे वाटेल तिथें कात्री लावायची असें नव्हे. शक्य तितक्या थोड्या उपायांनीं, अगदीं वेंचक, मोजक्या शब्दांनीं लघुकथा बनवितां आली तरच लघुकथालेखकाचें ध्येय साध्य झालें असें म्हणतां येईल. संक्षेप, संकलन, आटोपशीरपणा हे गुण लघुकथालेखकाच्या अंगीं असायला पाहिजेत, म्हणजे लघुकथेचा इष्ट परिणाम त्याला घडवून आणतां येईल. मुख्यतः लघुकथालेखकाला संयमाची देणगी हवी, कारण लघुकथेंत व्यक्तार्थापेक्षां अव्यक्तार्थावर भर दिलेला असतो. पांच शब्दांचें कार्य एका शब्दानें साधतां आलें पाहिजे. लघुकथा ही ध्वन्यर्थाची कला. तिच्या छोट्याशा आकारांत अलोट संपत्ति सांठविलेली असते.

आत्मसंयमन, रचनाकौशल्य, आटोपशीरपणा, थोडक्या शब्दांनीं विपुल अर्थ व्यक्त करण्याची हातोटी, हे लघुकथालेखकाचे गुण फारसे कुठें आढळून येत नाहींत. आपल्याकडे काय आणि इतरत्र काय लघुकथालेखकाचा भरणा पुष्कळ. उठतो तो लघुकथा लिहितो. दुसरें कांहीं आलें नाहीं तरी लघुकथा लिहून आपण यशोधनाचा संचय करूं असें ज्याला त्याला वाटतें. पण लेखकांच्या संख्येच्या मानानें उत्कृष्ट लघुकथांची निपज विशेषशी समाधानकारक नाहीं. आधुनिक मराठी काव्य आणि मराठी लघुकथा वाचतांना "आयातेषु विहंगमेषु मशको नायान् पुरो वार्यते" या वचनाची आठवण होते. उत्कृष्ट लघुकथालेखकाची प्रतिभा त्याला उपजतच प्राप्त झालेली असते. अभ्यासानें, वाचनाने, लघुकथेच्या शास्त्राच्या परिशीलनानें, मूळच्या लेखकाच्या प्रतिभेला उजळा मिळेल. पण निसर्गदत्त देणगीच्या अभावीं, निव्वळ अभ्यासानें उत्कृष्ट लघुकथा लिहितां येणार नाहीं. उत्कृष्ट कवि जसा एखादाच, तसा उत्कृष्ट लघुकथालेखक दुर्मिळच. मोपासाँ, पो, किपलिंग, स्टिव्हनसन, क्याथरिन म्यान्सफील्ड यांच्यासारखे लघुकथालेखक क्वचित् काळीं जन्मास येतात.

लघुकथालेखकाचे समग्र गुण नसूनसुद्धां लेखकाला कीर्ति मिळते, धन संपादन करतां येतें, वाचकाला त्याच्या गोष्टी आवडतात. संपूर्ण प्रतिभा नसली म्हणून काय झालें ? प्रतिभेचा थोडाफार अंश असला तरी लेखकाचें काम भागते. कोणाला कथानकाची देणगी असते तर कोणाला विनोदाची, एखाद्याला स्वभावरेखन साधतें तर दुसरा एखादा लेखक आपल्या भाषेच्या

इन्द्रजालानें वाचकाला मोहून टाकतो. लघुकथालेखनाला आवश्यक अशा गुणांपैकीं एक गुण जरी लेखकांत असला तरी त्याला लोकप्रियता मिळवितां येते.

लघुकथा आणि भावगीत यांच्यांत प्रथमदर्शनीं बरेंच साम्य दिसतें. दोहोंचा आकार लहान, रचनेचा रेखीवपणा आणि एकसूत्रीपणा याही बाबतींत लघुकथा आणि भावगीत दोन्ही सारखींच. संयमाला जसें लघुकथेंत महत्त्वाचें स्थान तसेंच भावगीतांत. परंतु कवीच्या स्वतःच्या भावना, कल्पना, विचार एवढेच भावगीताचे विषय. प्रातिनिधिक भावगीतें कोणी लिहीत नाहींत असे नाहीं, पण एकंदरींत त्यांची संख्या थोडी. लघुकथालेखक ज्या गोष्टी लिहितो त्यांत स्वतःच्या अनुभवांचें आणि भावनांचेंच वर्णन करीत नाहीं. तो जसा अन्तर्मुख तसा बहिर्मुखही असतो. आपल्या लघुकथांचे विषय तो वाटेल तिथून निवडून आणतो. त्याच्या विश्वाला वैयक्तिक अनुभवांच्या मर्यादा नसतात. लघुकथेचा आविष्कार गद्यांत, तर भावगीत नेहमीं काव्यरूप असतें. काव्याची भरारी फार मोठी. तेजोमंडलांत जाऊन पोंचायला त्याला वेळ लागत नाहीं. काव्यांतील भावना तीव्र, आणि कल्पना उज्ज्वल असतात. काव्याचें अलौकिक आणि दिव्य रूप पाहून वाचकाची दृष्टि दिपून जाते. याच्या उलट, लघुकथा कधीं पृथ्वीमातेची पाठ सोडीत नाहीं. तिचें लौकिक रूप सर्वांच्या परिचयाचें असतें. आपल्यांत मिळूनमिसळून वागणारी आपली एक बहीण या दृष्टीनें वाचक तिच्याकडे पाहतो म्हणूनच ती सर्वांना प्रिय होते.

कादंबरीला संक्षेप दिला, तिची छोटीशी आवृत्ति काढली, कीं झाली लघुकथा, ही समजूत भ्रामक होय. लघुकथेच्या मानानें कादंबरीचें क्षेत्र फार मोठें. नानाविध प्रसंगानी, पात्रांनीं आणि चित्रविचित्र दृश्यानीं गजबजलेल्या कादंबरीची चित्रपटाशीं तुलना करतां येईल. पण एकमेव परिणाम हें जिचें ध्येय, विचार केल्याशिवाय जी एक पाऊल पुढें टाकीत नाहीं का शब्द उच्चारीत नाहीं अशा लघुकथेला आणि कादंबरीला एका पंक्तींत बसवितां येणार नाहीं.

लघुकथेंत आणि नाटकांतही थोडेंसें सादृश्य आहे. तथापि द्वन्द्व, झगडा, कलह हा नाटकाचा आत्मा. लघुकथेंत द्वंद्वाला वाव नाहीं असें नाहीं, पण लघुकथेंतील विषयाचें तें एक अङ्ग होऊं शकेल, यापेक्षां लघुकथेंत

द्वन्द्वाला महत्त्व नाहीं. ज्या गोष्टींत कथानकाचा उत्तरोत्तर उत्कर्ष होऊन तें कळसास पोंचतें अशा—एखाद्या गुप्त पोलिसाच्या चातुर्याच्या—गोष्टींत मात्र लघुकथा आणि नाटक यांतील साम्य विशेष ठळकपणें लक्षांत येतें.

शब्दचित्र, स्वभावचित्र, प्रासंगिक चुटका यांच्यांत लघुकथेची कलापूर्णता नसल्यामुळें लघुकथेचें आणि त्यांचें नातें जोडतां येणार नाहीं. दीर्घकथा आणि लघुकथा सारख्या दिसतात खऱ्या, तथापि दीर्घकथेचे रूप ओबडधोबड असतें. लघुकथा दिसायला नीटस आणि संयमशील. दीर्घकथेच्या विस्कळितपणाचा लघुकथेत मागमूसही सांपडणार नाहीं. दीर्घकथेचें कथानकाचें लांबलेलें गुऱ्हाळ आणि लघुकथेचें व्यवस्थित कथानक यांचें कधींच जमायचें नाहीं. तेव्हां या दोघींना अलग अलग ठेवणेंच योग्य.

सारांश काय, लघुकथेचे विषय स्वतन्त्र आणि ध्येय स्वतन्त्र. ध्येय गांठण्याचे तिचे मार्ग निराळे. कादम्बरी, दीर्घकथा, नाटक, चुटका यांचें आणि लघुकथेचे कांहीं बाबतींत जुळत असले तरी लघुकथेचें स्वतन्त्र अस्तित्व कोणाला अमान्य करतां येणार नाहीं. लघुकथा हा एक स्वायत्त, स्वयंपूर्ण वाङ्मयाचा प्रकार होय. कलात्मक लघुकथालेखनाला सुरवात झाली तेव्हांपासून वाङ्मयाच्या इतिहासांत एका नवीन युगाचा आरंभ झाला हें निर्विवाद होय.

प्रस्तुत कथासंग्रहांत मानवी संसारांतील अनेकविध दृश्यें आपल्या दृष्टीस पडतील. 'आवडत्या गोष्टी' हा एक विश्वाचें वैचित्र्य दाखविणारा छोटा आरसा होय. सर्व प्रकारच्या गोष्टींचे हें संमेलन भरवून श्री. जोशी यांनीं भिन्न भिन्न रुचींच्या वाचकांची सोय केली आहे.

जगांतील बऱ्याच वाचकांना अद्भुत कथानकाची आवड असते. या वाचकांना पाहिजे तें त्यांचें आवडतें कथानक त्यांना 'सिन्धु देशाची राजकन्या', 'समाधान', 'कविहृदय' या गोष्टींत सांपडेल.

सुशिक्षित वाचकांना रहस्यमय, चमत्कृतिपूर्ण कथानक हवें. पण त्यांच्या मतें कथानकांतील कोडें हळूहळू, गोष्टींतील चमत्कृतिपूर्ण वातावरण बिघडूं न देतां, उकललें गेलें पाहिजे. अशा वाचकांना भडक वर्णनांचा कंटाळा. वर्णनांत त्यांना अतिशयोक्ति खपत नाहीं. श्री. केळकरांची 'अलीगड किल्ल्यांतील एक रहस्य' ही गोष्ट या वाचकांचें कोड पुरवील. केळकरांच्या गोष्टीचा कारुण्यपूर्ण, हृदयद्रावक शेवट वाचून हळहळणार नाहीं

असा वाचक विरळा. गोष्टीचा आरंभ मात्र एका साध्या संभाषणानें केला आहे. आरंभ साधा असल्यामुळेंच शेवट इतका परिणामकारक वाटतो. मध्यंतरीं अलीगड किल्ल्यावर गेल्यापासून हरप्रसादाची सुटका होईपर्यंत वाचकाचें मन गोष्टीवर टिकून राहतें. दरपावलागणिक त्याची उत्कंठा वाढत जाते. गोष्टींतील स्वभावदर्शन आणि संवाद यांतही कांहीं उणीव दिसून येत नाहीं, आणि गोष्टींतील तात्पर्य तर इतकें स्पष्ट आहे कीं, एखादा निर्बुद्ध वाचकही तें सांगूं शकेल.

श्री. वामनराव जोशी यांच्या गोष्टींतील रहस्यमय, चमत्कृतिपूर्ण कथानक वेल्सच्या *'अदृश्य पुरुष' या कादम्बरीवरून सुचलें असावें. अशा प्रकारची शास्त्रीय अद्भुतता मराठी वाङ्मयांत अगदींच अपरिचित, म्हणून वामनरावांच्या गोष्टीचें जास्त कौतुक करावेंसें वाटतें. गोष्टीच्या अभिनव कथानकांत वामनरावांच्या विनोदाची भर पडल्यामुळें सुशिक्षित वाचकांना ही गोष्ट विशेष प्रिय होईल.

अलीकडील बहुसंख्य वाचकांना अद्भुतरम्य गोष्टींत मजा वाटत नाहीं. सत्यसृष्टींतील प्रसंगांत कल्पनेचे रंग भरूं नका, माणसें आहेत त्या स्वरूपांत दाखवा. एकटा, कोसलसेनेची धूळदाण उडविणारा वीरसिंह आम्हांला नको, आणि अत्यन्त मोहक, लावण्यवती मणिमाला पण नको–ही या वाचकांची ओरड. वास्तववादाच्या या पुरस्कर्त्यांनीं श्री. घाटे यांची 'एक कारकून' ही गोष्ट वाचावी. एका दृष्टीनें लघुकथा कशी लिहावी याचा ही गोष्ट नमुना होय असें म्हणणें वावगें होणार नाहीं. 'कारकून' या गोष्टींत एक पात्र आहे. गोष्टीचा वाचकाच्या मनावर एकमेव परिणाम होतो. गोष्टींतील वर्णनानें कारकुनाच्या रूक्ष आणि एकाकी जीवनाची हुबेहुब कल्पना येते. या रूक्ष जीवनाला ज्या एका सुन्दर स्त्रीच्या फोटोचा आधार होता त्या फोटोचा कारकुनाच्या मरणानंतर सहजगत्या उल्लेख करून लेखकानें गोष्टीला चमत्कृतिपूर्ण कलाटणी दिली आहे. चोहोंकडे अन्धकार असतां एकदम वीज चमकावी, तसेंच हें.

वीरसिंहाचें अद्भुतरम्य जीवन एका टोंकाला आणि कारकुनाचें नीरस

---

*The Invisible Man —H. G. Wells.

–जवळ जवळ हिडीस–जीवन दुसऱ्या टोंकाला. याच्याही खालची पायरी मोलमजुरी करून पोट भरणाऱ्या लोकांची. या निकृष्ट वर्गाच्या कर्जबाजारी, यातनामय जीविताचें एक कारुण्यपूर्ण दृश्य श्री. गोखले यांच्या 'लक्ष्मी' नांवाच्या गोष्टींत पाहायला सांपडतें. नेहमींप्रमाणें या गोष्टींत कायद्याचें साहाय्य श्रीमंतांना होतें. गरीब बिचारा श्रीपति कायद्याला बळी पडतो. पण गोखल्यांच्या गोष्टींत तत्त्वप्रतिपादन नाहीं. श्री. काळे यांनीं मात्र तत्त्वप्रतिपादनाचा हेतु मनांत धरूनच 'तिचा भाऊ' ही गोष्ट लिहिली असावी. या लघुकथेंतील नायक तुरुंगांत जाऊन आला आहे. पण एकदां तुरुंगांतून जाऊन आलेल्या मनुष्याला समाज जवळ करीत नाहीं. लोक त्याला अस्पृश्याहूनही अस्पृश्य समजतात. वास्तविक समाजांतील विषमतेमुळेंच गुन्हेगार निर्माण होतात आणि समाजाला मान्य असलेल्या कायद्यांनी गुन्हेगाराला शिक्षा होते. तथापि कायद्यांनीं गुन्हेगारी नष्ट करणें शक्य नाहीं. गुन्हेगारीचें मूळ जी सामाजिक विषमता ती काढून टाकली पाहिजे. हे तत्त्व गोष्टीच्या रूपानें श्री. काळे यांनीं लोकांपुढे मांडलें आहे.

वास्तववादाचा पुरस्कार करणारे वाचक या दोन्ही गोष्टी आनन्दानें वाचतील. समाजांतील अन्याय, जुलूम, समाजांत जे कांहीं अमंगळ–ओंगळ असेल तें लेखकानें उघड करून दाखवावें. समाजाचीं व्यंगें वाचकापासून लपवून ठेवतां कामा नये हें त्यांचें मत.

निकृष्ट वर्गाच्या दुःखांची कहाणी सांगणाऱ्या चारदोन गोष्टी वगळल्या तर प्रस्तुत कथासंग्रहांतील बऱ्याचशा गोष्टींत मध्यमवर्ग आणि मध्यमवर्गांतील काबाडकष्ट करणाऱ्या स्त्रीपुरुषांच्या जीवनाचें प्रतिबिम्ब पडलेलें दिसेल. 'गरिबीचा संसार', 'चन्द्रिका-विहार', 'कलिकेचे अश्रू', 'चांदीचें ताट','अदृष्ट अरुण','झबलें', 'देवदत्त', 'अदलाबदल' या सर्व गोष्टींतील प्रसंग आणि स्वभावदर्शन हीं दोन्ही वस्तुस्थितीला धरून आहेत. मध्यमवर्गाविषयींच्या या गोष्टींत साम्य असलें तरी एका गोष्टीची प्रतिमा दुसरी असें म्हणतां येणार नाहीं.

श्री. खांडेकर यांच्या गोष्टींतील कलाविलास कोणत्याही दर्जाच्या वाचकाला आवडेल. 'झबल्यांतील' मोतीतलाव हा खांडेकरांच्या गोष्टीचें एक महत्त्वाचें अङ्ग होय. कथानकाची पार्श्वभूमि म्हणून या मोतीतलावाचा

लेखकानें फार कुशलतेनें उपयोग केला आहे. सूर्यप्रकाशांत चमचमणाऱ्या मोतीतलावांतील पाण्यानें सर्व कथानकाला उजळा दिला आहे.

श्री. सरदेसाई यांच्या गोष्टीची वाखाणणी करावी तेवढी थोडी. या गोष्टींतील इकडे आड, तिकडे विहीर असा प्रसंग निवडण्यांतच लेखकाचे चातुर्य दिसून येतें. मुलानें आपलें देवदत्त हें नांव सांगतांच मास्तरांनीं देवदत्त नांव एखाद्या बाटग्या ख्रिश्चनाचें असलें पाहिजे अशी त्या नांवाची थट्टा उडविली. त्यामुळे मुलाला संताप आला. घरीं आल्यावर तो आपल्या आईला त्या नांवाचा उच्चार करूं देईना. एरव्हीं नांव बदललें असतें; पण मुलाच्या जन्माच्या वेळीं ज्या ख्रिश्चन डॉक्टराच्या कुशल शस्त्रक्रियेनें एवढें एक मूल हातीं लागले त्या उपकारकर्त्या डॉक्टरानें सुचविलेले हे नांव. बदलावे तर कृतघ्नपणा पदरीं येतो, न बदलावें तर आपल्या मानी मुलाचा संताप कोणत्या थरावर जाईल त्याचा नेम नाहीं. धरलें तर डसतें, सोडलें तर पळतें, अशा नाट्यात्मक द्वन्द्वाचा, कलहाचा, कथानकांत आविर्भाव होतो. यामुळे कथानक जास्त आकर्षक होतें. या आकर्षक कथानकाची मांडणी करतांना श्री. सरदेसाई यांनीं आपल्याला लघुकथेच्या तन्त्राचा विसर पडूं दिला नाहीं. गोष्टीला जे नीटस, संयमशील स्वरूप आलें आहे त्याचे हेंच कारण. सरदेसायांच्या गोष्टीत वर्णनाचा विस्तार नाहीं, बालस्वभावाचें दर्शन पाहिजे तेवढेंच केलें आहे, आणि परिस्थितीमुळें असहाय झालेल्या मातेच्या मनांतील परस्परविरुद्ध विकारांचें थैमान दाखवून, सरदेसायांनीं कथेचा प्रश्नचिन्हानें शेवट केला आहे. नांव बदललें का नाहीं, पुढें काय झालें, ते वाचकांनींच ठरवावें. व्यंग्यार्थानुकूल अशा या कथेच्या शेवटच्या भागामुळें कथेच्या सौन्दर्यांत भर पडते.

जगांत एखाद्या अनपेक्षित प्रसंगानें सद्वर्तनी, उपकारशील आणि आपल्या धंद्याच्या कामांत वाकबगार अशा माणसावर नसतें किटाळ येतें. जन्मभर त्याच्या चारित्र्याला कलंक लागतो. दैवाचा हा निष्ठुर विनोद म्हणायचा ! श्री. दौण्डकर यांची 'अदृष्ट अरुण' ही लघुकथा दैवाच्या विचित्र लीलेचें निदर्शक असें सुन्दर संसारचित्र होय.

वास्तवदर्शनांत श्री. बरवे यांचा हातखंडा आहे. त्यांच्या 'अदलाबदल' गोष्टींतील कथानक, व्यक्तिदर्शन, संवाद, भाषा यांत एखाद्या कठोर मनाच्या रसिकालासुद्धां कांहीं खोड काढतां येणार नाहीं. गोष्टीचा शेवट

गोड करायच्याऐवजीं कडू केला असता तर ही गोष्ट कदाचित् जास्त परिणामकारक झाली असती. तरीसुद्धां श्री. बरव्यांची 'अदलाबदल' ही 'आवडत्या गोष्टी'तील एक अत्युत्कृष्ट गोष्ट आहे यांत शङ्का नाहीं.

या आपल्या लौकिक जगांत आणि नित्याच्या स्त्रीपुरुषांच्या व्यवहारांत आपल्याला अनेक वेळां अलौकिकाचा, अद्भुततेचा अनुभव येतो. अशा वेळीं आपण भांबावून जातों. तर्कानें, शास्त्रीय ज्ञानानें आपल्या अलौकिक, चमत्कारिक, अनुभवाची संगति लागत नाहीं. अशाच एका लोकविलक्षण अनुभवाच्या पायावर श्री. जोशी यांच्या 'कर्ज फिटलें, पण सावकार गमावला' या गोष्टीची उभारणी केलेली आहे. लघुकथेच्या तन्त्राची जोशांना खातरजमा नाहीं. आणि तशी ती नसली तरी त्यांच्या गोष्टीच्या सौन्दर्यांत बिघाड होत नाहीं, कारण त्यांच्या गोष्टीच्या विषयांतून गोष्टीचें तन्त्र उद्भवतें. गोष्टीच्या विषयाशीं ते इतके समरस झालेले असतात कीं, गोष्टीची रचना, स्वभावरेखन, संवाद, वातावरण वगैरे बाबींचा पृथक् पृथक् विचार करायचें त्यांना भान रहात नाहीं. विषयाशीं समरस व्हायला विषयाची तशी योग्यता असावी लागते: परंतु योग्य विषय नेहमीं सुचतात असें नाहीं. विषयाशीं तन्मय होणे ही गोष्ट लेखकाच्या हातची नाहीं. अशा वेळीं तन्त्राच्या अभ्यासानें, भाषेवरील प्रभुत्वानें, लघुकथालेखकाला फार साहाय्य होतें.

श्री. जोशांनाच काय, पण इतर पुष्कळ लेखकांना या जगांतील अद्भुततेचा प्रत्यय येतो हे श्री. य. बा. शास्त्री आणि नातू यांच्या लघुकथा आणि दिवाकरांची नाट्यच्छटा यांवरून दिसून येईल.

अद्भुतरम्य कथा, वस्तुस्थितीचें यथातथ्य वर्णन करणाऱ्या कथा, यानंतरचा तिसरा लघुकथांचा वर्ग. या वर्गांत तत्त्वप्रतिपादनाकरितां लिहिलेल्या गोष्टींचा आणि विशिष्ट ध्येय मनांत धरून लिहिलेल्या गोष्टींचा समावेश होतो. वाचकाचें मनोरंजन करण्यापेक्षां त्याच्या विचाराला चालना देण्याच्या हेतु या गोष्टींच्या मुळाशीं असतो. ध्येयात्मक गोष्टींनाही थोडेथोडके वाचक मिळत नाहींत. श्री. काळे यांच्या गोष्टीचा वर उल्लेख केला आहे. श्री. देशपांडे यांच्या 'तपश्चर्ये'ची ध्येयात्मक गोष्टींतच गणना केली पाहिजे. 'दिलरुबा'ही उत्कृष्ट कलाकृति आहे; पण श्री. माडखोलकरांच्या लघुकथेंत एक उदात्त ध्येय गोंवलें आहे असें मला वाटतें.

मनोविश्लेषणाच्या गोष्टींचा चवथा वर्ग. सामान्य वाचकांना या गोष्टी

विशेष आवडत नाहींत, परंतु ज्याचें वाचन विस्तृत आणि दृष्टि सूक्ष्म आहे अशा रसिक वाचकांना मनोविश्लेषणाच्या गोष्टी अत्यन्त प्रिय असतात. 'आवडत्या गोष्टी'तील श्री. आंबेकरांची 'आक्काचा मृत्यु' ही लघुकथा मनोविश्लेषणात्मक गोष्टीचें उत्कृष्ट निदर्शन म्हणून सांगतां येईल. श्री. केळकरांची 'मानवी मन' ही गोष्टही मनोविश्लेषणात्मकच आहे. मनोव्यापारांचें पृथक्करण हा श्री. आम्बेकर यांच्या लघुकथेंतील प्रधान हेतु. तो पार पाडीत असतां मनोविश्लेषणाची पार्श्वभूमि जें कथानक त्याची त्यांनीं हेळसांड केली नाहीं. विषयानुरूप पार्श्वभूमीची योजना करण्यांत आणि ती रंगविण्यांत लेखकाचें कौशल्य दिसून येतें. श्री. आम्बेकरांची ही सर्वांगसुन्दर लघुकथा मनोविश्लेषणाच्या भक्ताप्रमाणें सामान्य वाचकांनाही प्रिय होईल.

विनोदी गोष्टींचा शेवटचा वर्ग. सामान्यतः बोलायचें म्हणजे विनोदी गोष्टींच्या बाबतींत रसिक, अरसिक हा भेद नाहीं. विनोद सर्वांना सारखाच प्रिय असतो. हंसणें हें मनुष्यत्वाचें लक्षण गणलें जातें. विपरीत, असंबद्ध, असें कांहीं पाहून ज्याला हंसूं येत नाहीं तो मनुष्य कसला! कारुण्यपूर्ण, ध्येयात्मक, मनोविश्लेषणात्मक गोष्टी वाचून आलेला मानसिक शीण श्री. अत्रे यांची 'बाळूची बायको' ही गोष्ट वाचून घालवितां येईल. श्री. अत्र्यांची मनोरचना विनोदी असल्यामुळे आपल्याशी हंसतां हंसतां ते वाचकाला हंसवितात. 'त्यानें मांजर कां पाळलें' ही श्री. देवभक्त यांची लघुकथा कलात्मक विनोदी गोष्टीचा सुन्दर नमुना होय. 'भा. श्री. जो.' हें श्री. आपटे यांच्या गोष्टीचें नांव विनोदी. गोष्टींतील प्रसंग, पात्रें आणि त्यांचीं संभाषणें विनोदी. लेखकाची भाषा—वाक्यरचनाही—विनोदी. सर्वत्र विनोदाचें वातावरण. गोष्ट वाचायला आरंभ केला, कीं ती संपेतोंपर्यंत पुस्तक खालीं ठेववत नाहीं. श्री. शं. बा. शास्त्री यांची 'जांभळें लुगडें' ही गोष्ट, श्री. बोकिलांची 'धंदेवाईक मंडळी', श्री. गुर्जरांचा 'कानफाट्या', श्री. काळे यांची 'शान्तीची गोष्ट' या सर्व विनोदी गोष्टी लेखकांच्या विनोदी वृत्तींचीं उदाहरणें होत. आपापल्या परीनें या गोष्टी वाचकाचें मन रिझवतील यांत शङ्का नाहीं. 'बचीची तयारी' या श्री. कोल्हटकरांच्या गोष्टींत वाचकाला विनोदापेक्षां कारुण्याचाच जास्त प्रत्यय येतो.

विनोदांतही उच्च आणि नीच प्रकार आहेतच, परंतु वर उल्लेख केलेल्या विनोदी गोष्टींसंबंधीं हा प्रश्न उपस्थित होत नाहीं.

'आवडत्या गोष्टीं'त जशीं मानवी संसाराचीं अनेकविध दृश्यें दृष्टीस पडतात, तशाच मानवी स्वभावाच्या विविध छटाही त्यांत प्रतिबिम्बित झाल्या आहेत. प्रसंग आला म्हणजे स्त्रीपुरुषांचे गुणावगुण प्रगट होतात, याचें एक सुरेख प्रत्यंतर श्री. बावडेकर यांची 'कलावंताचें हृदय' ही गोष्ट. गुरु-शिष्यांची स्पर्धा हा या गोष्टीचा विषय असा आहे की, त्यामुळें गुरुशिष्यांचे गुणावगुण प्रगट व्हायला चांगली संधि मिळते. अखेर गुरूच्या सद्भावनेनें स्वतःच्या आणि शिष्याच्याही असद्भावनेवर जय मिळविला. इतकेंच काय, पण या सद्‌भावनेमुळें गुरूला शिष्याच्या अप्रतिम गायनकौशल्याचा पाडाव करतां आला. अन्तर्यामींच्या विशुद्ध भावनेचें तेज त्याच्या गायनांत प्रकट होतें. हें गायन मनुष्याचें नव्हे, यांत दैवी सामर्थ्य आहे, असें सर्वांना वाटायला लागतें. गोष्ट वाचीत असतांना वाचकालाही असें वाटतें कीं, या गोष्टीचें कलाकौशल्य थोर खरें, तथापि लेखकाची विषयाशीं इतकी एकतानता झाली आहे, कीं त्याला आपल्या कलाकुसरीची जाणीवही नाहीं आणि वाच-कालासुद्धां ती जाणीव अळेंबळेंच आणावी लागते. श्री. बावडेकरांची गोष्ट वाचतांना एखाद्या संथपणे वाहणाऱ्या नदीची आठवण होते. प्रोफेसर लक्ष्मणराव सरदेसाई यांच्या गोष्टींत हा संथपणा नाहीं. गोष्टीचें नांव 'चांडाळ' म्हणजे एक जळती ज्योतच. या गोष्टींतील यथातथ्य प्रादेशिक वर्ण-नानें वाचकाला भुलावण पडते, परंतु गोष्टींतील दुष्ट, हीन मानवी वृत्तींचें आविष्करण त्याहून कितीतरी पटींनीं मोहक आहे! ओंवळला अनीतीचा मार्ग दाखवितांना वसंत आपल्या नीचपणावर सद्विचारांचें पांघरूण घालतो. ओंवळला आपण रसिकतेचें, उपभोगाचें नवें जग दाखवून दिलें, आपला हेतु केवळ स्वार्थी नाहीं, अशी तो आपल्या मनाची समजूत करून घेतो. सद्धेतूंना पुढें करून लोक नरकाच्या वाटेनें जातात अशी एक इंग्रजींत म्हण आहे त्याचें हें उत्कृष्ट निदर्शन. याच प्रकरणीं 'काकूंचे देव,' 'विमला' 'निष्प्रेम आयुष्य', 'एक दिवस', 'नूरजा,' 'औट घटकेचा देशभक्त,' 'सासरा आणि जावई', 'आत्महत्या', 'काशी–विश्वनाथ' वगैरे गोष्टींचा उल्लेख करणें योग्य होईल.

'आवडत्या गोष्टीं'चें असें हें सर्वसंग्राहक स्वरूप आहे. यानंतर संपादकाची दृष्टि एकांगी नाहीं हें निराळें सांगायला नको. श्री. जोशी यांनीं आपल्या कथासंग्रहांत हरतऱ्हेच्या गोष्टींचे नमुने एकत्र आणले आहेत.

'दंडकारण्यांतील प्रणयिनी' ही श्री. दिवाकर कृष्ण यांची गोष्ट त्यांना आवडते, तितकाच प्रेमादर त्यांना श्री. करंदीकरांच्या लोककथेविषयींही असला पाहिजे, कारण त्यांनीं या आदर्श लोककथेचा आपल्या "आवडत्या गोष्टींत" समावेश केला आहे.

प्रस्तुत कथासंग्रह म्हणजे मराठींतील गोष्टी–वाङ्मयाचा छोटा इतिहास होय. "आवडत्या गोष्टींत" श्री. जोशी यांनीं हरिभाऊ आपटे, परांजपे, कोल्हटकर यांच्यासारख्या जुन्या पिढींतील लेखकांच्या गोष्टी, श्री. गुर्जर वगैरे मधल्या पिढींतील लेखकांच्या गोष्टी आणि अलीकडच्या श्री. खांडेकर, दौण्डकर इत्यादि लेखकांच्या लघुकथा यांचा एका ठिकाणीं संग्रह केला आहे. ज्या कोणाला तीन पिढ्यांतील मराठी गोष्टींचें बदलतें रूप विहंगमदृष्टया पाहायचें असेल त्याला या संग्रहाचें बिनमोल साहाय्य होईल.

सहा वर्षांपूर्वी–१९२९ सालीं–मीं इंग्लिश भाषेंत लिहिलेल्या पौर्वात्य आणि पाश्चिमात्य गोष्टींचा एक *कथासंग्रह प्रसिद्ध केला. त्या कथासंग्रहाला जोडलेल्या इंग्रजी उपोद्घाताचा प्रस्तुत प्रस्तावना लिहितेवेळीं मला उपयोग झाला. प्रस्तावनेचा आरंभींचा भाग आणि लघुकथेच्या तन्त्राची माहिती वरील उपोद्घातावरून घेतली आहे. मीं इंग्रजींत उपोद्घात लिहिला त्या वेळीं–म्हणजे १९२९ सालीं– ज्या थोर ग्रन्थकारांचें ऋण मीं घेतलें तें अजून कायम आहे.

पुणें २,
ता. ७–१०–३५.

रामचन्द्र कृष्ण लागू

---

*Modern Stories from East and West.

# आवडत्या गोष्टी

—पहिल्या प्रथम माझी इच्छा असूनहि ज्या अनेक लेखकांच्या गोष्टी मला या संग्रहांत घेतां आल्या नाहींत त्यांची अंतःकरणपूर्वक क्षमा मागतों.

—वळवांचे पाऊस व पुनर्भेट भाग २, हीं दोन पुस्तकें प्रसिद्ध केल्यानंतर सहज माझ्या चार-सहा मित्रांच्या गोष्टींचा एकत्र संग्रह प्रसिद्ध करण्याचें ठरलें त्याप्रमाणें गोष्टीहि गोळा केल्या व मग हा तो करता करतां दहा-वीस गोष्टी जमल्या मग वीसच गोष्टींचा संग्रह काढण्यापेक्षां साधारणतः प्राति-निधिक स्वरूपाचा संग्रह काढा अशी माझ्या कांहीं मित्रांनीं सूचना केली व अशाच कल्पनांतून जे पुस्तक तयार झाले तेंच "आवडत्या गोष्टी" हें पुस्तक होय.

—यांत ज्यांच्या गोष्टी अवश्य यायला पाहिजे होत्या असे कमींत कमी आठ-दहा तरी लेखक राहिलेले आहेत व त्यांत जीं एक-दोन ठळक नावें आहेत त्यांनीं आपल्या गोष्टी छापण्याबद्दल परवानगी देण्याचेच नाकारलें आहे व मी धनवान प्रकाशक नसल्यामुळें मला त्यांच्या गोष्टी घेतां आल्या नाहींत. पण त्याची प्रतिभाच इतकी बलवत्तर आहे, कीं ते या संग्रहांत असल्यापेक्षां नसल्यानेंहि जास्त तळपतील !

"आवडत्या गोष्टी" हें पुस्तक निघालें आहे यापेक्षां अनेक पटींनीं चांगलें निघायला पाहिजे होतें; पण अनेक कारणांमुळें मला तें शक्य झाले नाहीं. स्त्रियांच्या गोष्टी यांत मुद्दामच गाळल्या आहेत. कारण "आवडत्या गोष्टी" याच नांवाखालीं फक्त स्त्रियांच्या निवडक कथांचा संग्रह मी प्रसिद्ध करणार आहें व हे दोन प्रयत्न यशस्वी झाल्यास "आवडत्या गोष्टी" याच नांवाखालीं १९३६ पासून दरवर्षी प्रसिद्ध होणाऱ्या गोष्टींतील निवडक गोष्टींचा संग्रह दरवर्षी प्रसिद्ध करण्याचा मानस आहे.

या पुस्तकात गोष्टी गुणानुक्रमानें वा कालानुक्रमानें न छापतां गोष्टीं-च्या वर्णानुक्रमानें छापल्या आहेत. कारण—मला तेंच सोयीचें वाटलें.

" आवडत्या गोष्टी " हें जरी पुस्तकाचें नांव असलें तरी सर्वच गोष्टी माझ्या आवडत्या आहेत असें नव्हे, तर कित्येक लेखकांच्या आवडत्या आहेत, कित्येक वाचकांच्या आहेत आणि राहिलेल्या माझ्या आहेत. कांहीं लेखकांच्या घेतल्या आहेत यापेक्षांहि सरस गोष्टी आहेत पण पृष्ठसंख्या व इतर कांहीं बंधनें मला पाळावयाचीं होतीं म्हणून घेतल्या आहेत त्याच " आवडत्या गोष्टी " ठरविल्या आहेत.

**आवडत्या गोष्टी** या पुस्तकांत संग्रहित केलेल्या गोष्टी, यशवंत, रत्नाकर, चित्रमय जगत्, किर्लोस्कर, मनोरंजन, पारिजात, अरुण, विविधवृत्त, नवाकाळ इत्यादि नियत कालिकांतून पूर्वी प्रसिद्ध झालेल्या आहेत. तेव्हां त्यांचाहि उल्लेख प्रामुख्यानें करणें जरूर आहे.

सदर संग्रहास प्रो. रामचंद्र कृष्ण लागू, एम्. ए. यांनीं अनेक तऱ्हेचे व्याप मागें असून सुद्धां प्रस्तावना लिहून दिली याबद्दल मी त्यांचा कायमचा ऋणी आहें.

या संग्रहांत ज्यांच्या गोष्टी संग्रहित केल्या आहेत त्या माझ्या लेखक-मित्रांनीं आपआपल्या गोष्टी मला " विनामूल्य " छापण्यास परवानगी देऊन ऋणी केलेलें आहे व कल्पना नसतांनाहि त्यांचें तें ऋण अंशतः फेडण्याचा योग या पुस्तकाचे प्रकाशनापूर्वीच मला ईश्वरकृपेनें आला. या योगायोगा-चेंहि कौतुक वाटतें. परचुरे पुराणिक मंडळीचे एक मालक श्री. **बळवंतराव परचुरे** यांचें आकस्मिक सहाय मला लाभलें व त्यामुळेंच मला तें शक्य झालें. तसेंच पुस्तकाचे मुद्रक श्री. **बापूराव राजगुरु** यांनींहि सर्व तऱ्हेच्या आपुल-कीनें पुस्तकाचें काम केलें याबद्दल त्यांचे आभार मानणें जरूर आहे.

—अनेक लेखक-मित्रांनीं या पुस्तकाचे बाबतींत मला साह्य केलें आहे. स्नेह्यासोबत्यांच्या व वाचकांच्या कृपाछत्राखालीं आज माझें हें सहावें प्रकाशन बाहेर पडत आहे.

पुणें,<br>विजयादशमी,<br>शके १८५७.

यशवंत गोपाळ जोशी

## भाग पहिला







## भाग दुसरा







# आवडत्या गोष्टी

## अदलाबदल : : १

दुधाचा तांब्या घेऊन यमू आज अगदीं उजाडतांच गोठ्यांत गेली. सारीं कामें घाईघाईनें उरकून आज तिला कुठंवरं जायचें असावें? हां, बरोबर-- आधींच आश्विनांतील नवरात्राचे दिवस, त्यांत आज तर मंगळवार. झालंच—! तिचा बेत, आज— नक्की नक्की— गांवच्या देवीला--विंध्यवासिनीला--जाण्याचा असावा!

तिनें गोठ्यांत गेल्यावर पावड्यानें शेणसडा दूर केला. डाव्या हातीं दुधाचा तांब्या घेऊन, म्हशीच्या पाठीवर थाप देत देत ती अलगच खालीं बसली. लुगड्याच्या ओचांची बसत बसत तिनें आवराआवर केली.

तांब्यांतील पाण्यानें आचळ धुतल्यावर "कण् कण्" दूध काढूं लागली. दूध काढतांना— आपली पाडशी म्हैस आज उद्यां जाणार! तिच्या जागीं नव्यानेंच व्यायलेली तान्ही म्हैस येणार! दोहोंच्या किंमतींत पडणारी तफावत काय स्वरूपाची असेल कोण जाणे! तान्ही म्हैस किती तरी दूध देईल, दूध काढतांना आपली कश्शी एकतानता होईल, लपलप करीत लुचणारें रेडकूं बाजूला करतां करतां कसे नाकीं नऊ येतील, फेसानें भरलेला तांब्या—तांब्या कां? चांगली चरवी— दुभत्याच्या फडताळाकडे नेतांना आपल्याला कित्ती कित्ती आनंद होईल— हे विचार घोळवणाऱ्या यमूचें, धार काढण्याचें कामहि तितक्यांत संपलें. दुधाचा

तांब्या डचमळवीत निघणाऱ्या यमूकडे, ती पाठमोरी जात असतां पाडशी म्हैस 'वांग्' करीत कौतुकानें पाहत होती. जणूं यमू हें तिचें पाडसच! समोरच येणाऱ्या आईच्या हातीं तांब्या देत देत यमू म्हणाली—

"मला झट्पट् न्हाऊन घेऊं दे."

तांब्यांतील दुधाकडे पाहत पाहत यमूची आई म्हणाली—

"भारीच बाई आटली म्हैस!"

"पण अशी म्हैस कांहीं मिळायची नाहीं दुसरी."

इतक्यांत यमूचे बाबाहि आले. पाय धुवावयाला गरम पाणी देऊन यमू आपल्या स्नानाच्या तयारीला लागली.

गरिबीचाच पण ठाकठिकीनें संसार करणारें तें कुटुंब होतें. यमू ही त्यांची वडील मुलगी. चौदा पंधरा वर्षांची. तिच्या पाठीवर चार पांच भावंडें लहानगीं असून घरांतल्या कित्येक जबाबदारीच्या कृत्यांकडे तिला फार फार पाहावें लागे. दूध काढण्यासारखीं कामें तर तिला मनापासून आवडत. शहरवजा खेडेगांवांत राहणाऱ्या मुली जशा गृहकृत्यांत निष्णात व सांसारिक व्यवहारांत चुरचुरीत असतात तशाच त्या लाघवी व भावना-प्रधानहि असतात. आपलीं माणसें व घरदार; घराजवळचा झाडझडोरा व गुरेंढोरें; रोजरोज भेटणारीं गडीमाणसें व आयाबाया; याच घरगुती पसाऱ्यांत त्यांच्या अवघ्या उज्ज्वल भावना गुंतून राहिलेल्या असतात. त्यांच्या भावनेला विशेष प्रकारचा अंकुर फुटायचा तर तो सणावारीं! गांवच्या देवीला जायचें हाहि एक त्यापैकींच विशेष उत्साहाचा भाग असतो.

यमूच्या गांवच्या कित्येक स्त्रिया, मुलेंबाळें, आज त्याच तयारींत होतीं. थोडासा नीटनेटकेपणा करून यमू खास निघण्याच्या तयारीनें अंगणा पलीकडच्या रस्त्याकडे पाहत होती.

मुलींबाळींचे घोळके तिला दिसूं लागले. हातीं फराळाचे डबे, कांकड्या, चिबूड घेऊन जाणाऱ्या कित्येक स्त्रिया तिच्या अवलोकनांत येऊं लागल्या.

उलट दिशेनें पाडसेंवाल्या तान्ह्या म्हशीहि कित्येक लोक नेत असतांना तिला दिसल्या. म्हशींची ने-आण याच दिवसांत होत असते. म्हशींचा व्यापार करणारे गोपाल, हेड्ये, अगर अहीर यांचाहि सुळसुळाट याच दिवसांत होतो हेंहि यमूला माहाती होतें.

रेडकांच्या मागें अधीर वात्सल्यानें धांवणाऱ्या म्हशींकडे पाहून, यमूला फार फार आनंद होई. झुंबराप्रमाणें डुलडुलणाऱ्या ओट्या व आंचळ पाहून तिला समाधान वाटे. जन्माला येऊन ८।१० दिवसच झालेल्या रेडकांना खांद्यावरून उचलून नेणाऱ्या कुळंब्यांमागून " वांय वांय " करीत अधीऱ्या चालणाऱ्या म्हैसढोराचें लाघव हा मातृहृदयाच्या निःसीम प्रेमाचा भाग आहे हेंहि यमूच्या ध्यानांत आल्यावांचून राहत नसे. क्वचित् रस्त्यानें जाणाऱ्या पाडशा म्हशीहि यमूच्या दृष्टीस पडत; त्या बिचाऱ्यांना दोऱ्यांनीं बांधून नेणें भाग पडे!

या साऱ्या ने-आणीकडे पाहून यमूच्या अप्रगल्भ मनांत, लेकीसुनांच्या सासरमाघारपणाचे विचार आल्याशिवाय कसे राहतील? तिच्या साध्या-भोळ्या मनांत आपले तेच विचार घोळले. आपणासहि सासरीं जाण्याचा खेद व माहेरीं येण्याचा आनंद उपभोगायला मिळणार--!

—पण इतक्यांत तिचीं भावंडेंहि जाण्याच्या तयारीनें हुदडत आल्या-मुळें यमू त्यांच्यासह घराबाहेर " विंध्यवासिनीच्या " रस्त्यानें निघाली. हीं सर्वजणें रस्त्याला लागायला व एक म्हशी विकणारा, हेड्या यमूच्या अंगणांत शिरायला एकच गांठ पडली.

" आम्हांला पुष्कळ दूध देणारी म्हैस दे अं?" असें त्याच्याजवळ सस्मितपणानें बोलून यमू पुढें झाली. तिचीं भावंडेंहि मागून पळत निघालीं.

तो हेड्याही मान हालवीत अंगणांत गेला.

— २ —

यमूचे वडील त्याला ओटीवरच भेटले.

" चांगली म्हैस हाय दादा! घ्यांतव काय?" तो हेडया म्हणाला.

" म्हैस तर हवीच आहे. पण तुझ्या किंमती--"

" अंदु किंमती लय उतरल्याति—"

" आधीं म्हैस तर पाहूं."

" दावतां आणूनशान " असें म्हणून तो हेडया रस्त्यावर गेला. रस्त्यानजीक एका झाडाखालीं त्यानें ५-६ म्हशी उभ्या करून ठेवल्या होत्या.

" ओ ओ ओ ओ इस्मेल?" हेडयानें मोठ्यानें ओरडून साद घातली.

त्या म्हशीजवळ उभ्या असणाऱ्या इस्मेलनें उत्तर दिलें--

" व अ अ अ अ अ अ ."

" न्हयती चांदी म्हैस घेऊनशान य अ अ अ बेगिन." असें सांगून तो हेड्या परत ओटीवर आला. बैठक मारून त्यानें पानहि नखलायला सुरुवात केली.

" काय दादा अंदु धंदाच नाय ! चांगल्या दुमत्या जनावराला चामड्याचीचि किंमत येत नाय."

" अरे पैसाच महाग झालाय् मुळीं ! तोंवर म्हशीला कुठलें मोल ? "

" तांपिन खरांच. तुमची पाडशी हाय ना ? "

" तर ? पाडशी घेतलीस तर आम्ही तान्ही घेऊं तुझी बघ."

" असां म्हनतांव ! हाय काय वाड्यांत ? नंदर टाकुनशान येतांबरी–"

असें म्हणत तो हेड्या मागीलदारच्या गोठ्याकडे गेला. गोठ्यांतल्या पाडशा म्हशीकडे त्यानें " नंदर " तर टाकलीच. ती पाडशी म्हैस मात्र चरायचें सोडून त्याच्याकडे केंविलवाण्या चेहऱ्यानें पाहूं लागली. तिच्या तोंडांतून गवताचे अर्धवट चावलेले तण तसेच बाहेर लोंबत राहिले. हा आपल्याला न्यायला आलेला काळपुरुष आहे हें त्या मुक्या जनावराच्या झटकन् ध्यानांत आलें. या वेळीं आपलें संरक्षण करायला यमू धांवत आली तर किती बहार होईल हेंहि विचार त्या मूक प्राण्याच्या माथार्डीत खास खास आले असतील.

तो हेड्या परतून आला, पण ती पाडशी म्हैस मात्र त्याच ठाणांतून त्याच हावभावानें पाहत राहिली, तिचें खाणेंहि बंद झालें !

यमूचे वडील त्या तान्ह्या म्हशीला गोंजरीत न्याहाळीत होते. ती पुढील दारच्या अंगणांत उभी होती. इस्मेलहि पण होताच ! तिच्या शेपटीचा गोंडा चघळीत तिचें रेडकूंहि जवळच होतें.

" हो किती दूध देते ?"

" फेंसासकट सात शेर नि म्हनतांव काय ? " हेड्यानें चटकन् सांगून टाकलें.

" बरं, किंमत ? "

" साठ रुपये व्हतील बघा."

" बरं, माझ्या पाडशीची काय किंमत केलीस ? "

" रुपये तीस. एक पैसा कम् नाय् आन् जास नाय."

" म्हणजे अदलाबदल करायची तर रुपये तीस तुला मोजले पाहिजेत ?"

" अव रुपये तीस म्हंजी हाय काय भुस्काट ! " तो हेड्या अगदीं 'वर-पक्षा'च्या ऐटीनें बोलला.

" अरे बाबा, मी कुटुंबवत्सल आहे. तीस रुपये तुला भुस्कट वाटले तरी मला ते भारीच वाटतात. असें कर, माझ्या पाडशीची किंमत धर रुपये पस्तीस नी तुझ्या तान्हीची किंमत धर रुपये पंचावन, अदलाबदल कर नी रुपये वीस घेऊन जा." असें म्हणत यमूचे वडील अंगणांतून ओटीवर आले. या त्यांच्या हालचालींत करारीपणाचा भाव स्पष्टपणें व्यक्त झाला; तरी पण नंतर खूपशी घासाघीस झालीच !

अखेर हो ना करतां करतां रुपये एकवीस देऊन अदलाबदल कायम ठरली; तान्ही म्हैस गोठ्यांत नेऊन पाडशीच्या जागीं बांधण्यांत आली !

मात्र पाडशी म्हैस कांहीं केल्या गोठ्यांतून बाहेरच पडेना.

मरणाच्या द्वारीं असणाऱ्या वयोवृद्धालाहि हें जग सोडतांना ज्या यातना होत असतात त्याच यातना— त्याच मानसिक यातना— त्या पाडशा म्हशीच्या चर्येवर स्पष्टपणें दिसूं लागल्या.

अखेर लाठीच्या एकदोन तडाक्याखालीं नरमवून तिला चालूं केली.

यमूच्या त्या घराजवळून जातां जाता व्याकुळ नजरेनें घरांत—आंत कुठेंतरी—ती पाहूं लागली. तिची चालहि मंदावली. त्याबरोबर मागच्या माणसानें एक फटकारा लगावला, तर दोरी धरून चालणाऱ्यानें दोरीला जोराचा हिसका मारला; त्या पाडशा जनावराचे हे हाल चालत असतां तो हेडया ओटीवर खण् खण् रुपये मोजून घेत होता !

साऱ्या आशा खुंटल्याचें समजतांच ती पाडशी म्हैस खालीं मान घालून रस्त्यानें पावलांकडे पाहत पाहत संथपणें चालूं लागली. गरीब बिचारी मुकी जात !

यमूच्या आईनें आंबोणाचें घमेलें नेऊन नव्या म्हशीच्या पुढ्यांत ठेवलें. दूर उभी राहून समाधानानें त्या दुधाळ म्हशीकडे ती पाहूं लागली.

भरपूर दुभत्याचा आनंद ! चारदोन कच्चींबच्चीं असणाऱ्या घरगुती मातेचा गांवठी आनंद ! शहरच्या मोजदादींत तो कस्पटाप्रमाणें असला

तरी गांवांतल्या गांवांत गदगद हालवणारा असतो हें आपल्याला सहज अनुभवतां येईल.

यमूची आई त्याच आनंदांत गर्क होती. तो आनंद जास्त उत्कृष्ट व्हावा म्हणूनच तिनें त्या नव्या म्हशीपुढें आंबोण– रोजच्यापेक्षांहि जास्त लज्जतदार असें नेऊन ठेवलें. नंतर झपझप पावलें टाकीत ती घरांत आली.

" छानच म्हैस आहे हं. किती दूध देईल म्हणाला तो.? "

" चांगलें फेंसासकट सात शेर ! निदान सहा शेर तर खरं ! " यमूचे वडील आपल्या पत्नीला सांगत होते.

— ३ —

तें पाडशी ढोर हताश होऊन मार्ग आक्रमीत होतें.

कुठें नेणारे नेतील तिथें जायचें !

त्याच रस्त्यानें समोरून—यमू व तिचीं भावंडें येत होतीं. विंध्यवासिनीचें दर्शन आटोपून तीं घराकडे निघालीं होतीं. आश्विनांतील नव्या सृष्टीचा आनंद, हिरव्याचार गवताची रमणीयता, पिकल्या भातशेतांचा उन्मादक हेलावा, डोंगरांतून चुन्याच्या रेघांप्रमाणें दिसणारे दूरदूरचे पऱ्हे, या अखिल सौंदर्याचा बेहोषपणा त्या सर्व मुलांच्या चेहऱ्यांवर स्पष्ट दिसत होता. यमूनें तर आपल्या हातांत रानफुलांचा भला मोठा तुरा घेतला होता. तीं सारींजणं आनंदनिर्भरानें कीं उन्हामुळें लालबुंडलीं होतीं हें सांगणें कोणाहि चतुराला कठीण झालें असतें. भरल्या हुरुपानें येतां येतां यमूनें समोरून येणारी आपली पाडशी म्हैस ताबडतोब ओळखली.

क्षणांत तिचा चेहरा पार काळवंडून गेला.

त्या पाडशा जनावरानेंहि आपल्या आवडत्या यमूला तात्काळ ओळखलें. तिच्या निराशेला क्षणार्धांत अंकुर फुटला. सारें बळ एकवटून, तिनें जोराचा हंबरडा मारून, दोरीसह आपली सोडवणूक करून घेऊन, ती चौखूर मागें धावूं लागली.

तिच्या मागून धांवणाऱ्यांनाहि तिला पकडणें अशक्य झालें.

ती नेमकी यमूच्या घरामागील गोठ्यांत येऊन उभी राहिली.

धापा टाकतां टाकतां तिचें सर्वांग लाटेप्रमाणें हालत, हेलावत होतें.

थोडा दम गेल्यावर तान्ह्या म्हशीपुढील अंबोणांत तिनें तोंड घातलें. त्याबरोबर एखाद्या वरचढ मालकिणीप्रमाणें त्या नव्या म्हशीनें तिला जोराची धाड मारली. त्या धाडांना भिऊन तें पाडशी जनावर बाजूला झालें.

त्या नव्या तान्ह्या म्हैशीचा पाठराखेपणा करण्याकरतांच कीं काय, तो हेड्या व त्याचे दुसरे असामीहि वहाणा करकरवीत गोठ्यांत शिरले. त्यांच्या मागोमाग यमूहि घाईघाईनें गेली.

" + + मारि लयच येरां जनावरा " म्हणत हेड्यानें भलें मोठें लोढणें अडकावलें त्या पाडशीच्या गळ्यांत.

दुसरे असामी दोरी घेऊन ओढूं लागले. त्या जनावरानें दोरीला उलटी खेंच मारली. पाहणाऱ्याला 'रस्सीखेंच' चालत असल्याचा भास झाला असता ! गोठ्यांतून ढोर हालत नाहीं हें पाहून हेड्यानें दणके देण्यास सुरवात केली.

धब् ! धब् ! !

यमूकडे पाहत त्या ढोरानें जबडा पसरून जीभ बाहेर काढली.

यमूच्या अंगभर रोमांच उभे राहिले. तिच्यानें तें पाहवेना.

" सोडा बरं तिला. खबरदार ओढाल तर ! " यमू झपकन् म्हशीजवळ गेली. नवऱ्याच्या हालजाचानें बेजार झालेली एखादी बहीण चांगल्या स्थितींत असणाऱ्या आपल्या दुसऱ्या बहिणीला प्रथम भेटींतच जशी उत्कंठतेनें स्फुंदत स्फुंदत मिठी मारील तशीच यमूनें त्या म्हशीच्या गळ्याला मिठी मारली.

तात्काळ म्हशीच्या चेहऱ्यावरहि उमेदपणा वावरूं लागला.

" जा तुम्ही येथून ! "

" हां काय ? म्हैस न्याया नुको ? "

" नको. जा जाऊन बाबांना सांगा ! "

" म्हंजे ब्येस ! ! सौदापरि सौदा गेला–! चला र "

ते सर्वजण पुढीलदारीं आले.

व्यवहाराची प्रतिष्ठा ठेवतां ठेवतां वृद्ध होऊं पाहणाऱ्या हरएकाच्या भावना मरून जात असतात. यमूच्या बाबांचेंहि तसेंच झालें होतें. गोठयांत जाऊन यमूची प्रथम त्यांनीं मनधरणी केली, कानउघडणीहि केली,

व्यवहाराची जाणीव दिली, इतकेंच काय पण पुढें दपटशाही देऊन यमूला घरांत चालती केली.

अगदीं अस्फुटपणानें, कां तें कोण जाणे, आपली अगर आपल्यासारख्या आडगांवी कुमारिकांची त्या पाडशा म्हशीशीं ती मनांतल्या मनात तुलना करूं लागली. अजाणतेपणानें कां होईना आपलीहि अशीच गत व्हायची हेंहि तिच्या मनांत पुसट पुसट रीतीनें वावरूं लागलें.

माजघराच्या दारापाशीं हुंदके देत देत यमू उभी राहिली.

आणि गोठयांत फिरून रस्सीखेंच सुरू झाली.

धबा, धबा आवाज होत होते.

यमूच्या अंतःचक्षूंसमोर उकललेला जबडा व जीभ दिसूं लागली. यमूचें अंगहि शहारलें. अखेरीस ती म्हैस बाहेर आणलीच त्यांनीं!

पडवीच्या गजाकडे तोंड करून त्या जनावरानें अत्यंत केंविलवाणा 'वां...आ...आ...आ...आंय! वां...आ...आ...आ—आंय—' असा आवाज केला. त्याबरोबर यमूच्या हृदयाचें पाणीच झालें. ती ताडकन् बाहेर आली.

"कांहीं झालें तरी मी म्हैस नेऊं द्यायची नाहीं" किन्हेच्या आवाजानें तिनें सर्वांना बजावलें.

सर्वजण उभे राहिले.

"बाबा, तुम्हाला दुधाची काळजी नको. आम्ही सारींजणें दुधाशिवाय राहूं. माझें रतन देईलच मुळीं दूध! बघा देईल कीं नाहीं तें! पहा तर खरं!"

"वेडी कुठली!" तिची आई म्हणाली.

"आचरट नाहीं तर" तिचे वडील म्हणाले.

त्यांच्याकडे लक्षच न देतां यमू तडक गोठयांत गेली व तान्ही म्हैस सोडून त्या जागीं ती पाडशीला बांधूं लागली.

"तें कांहीं नाहीं! जा आपली म्हैस घेऊन. काढ रुपये! टंगळ मंगळ नाहीं चालायची!"

तिच्या करारी मुद्रेमुळें म्हणा अगर कशामुळेंहि म्हणा, त्या हेडयानें सर्व रुपये यमूच्या समोर टाकून तान्ह्या म्हशीसह पाय काढला तिथून!

यमूचे आईबाप या संसारिक बखेडयामुळें अगदीं नाखूष झाले. यमू

मात्र त्या दिवसापासून गोठ्यांत दिवसांतून पंचवीस वेळां जाऊं लागली. म्हशीची निगा पूर्वीपेक्षांहि अधिक मायेनें होऊं लागली.

पाहिजे तर त्याचा परिणाम म्हणून म्हणा, पाहिजे तर मुकें जनावरहि मायेमुळें सज्ञान झालें म्हणून म्हणा, पाहिजे तर जनावरालाहि मायेचा अर्थ कळतो म्हणून म्हणा; पण तें पाडसें जनावर पूर्वीपेक्षां जास्त— जवळ जवळ दुप्पट दूध देऊं लागलें.

घरांत यमू असेपर्यंत पाडसेपणीं वा तान्हेपणीं त्या जनावराचें दूध केव्हांच कसें आटलें नाहीं या गोष्टीचा अद्यापहि सर्व गांवाला अचंबा वाटत आहे !



# अदृष्ट अरुण : : २

अशोकाच्या जन्मदिवशीं ज्यानें आम्हांला मनमुराद आनंद उपभोगावयास लावलें त्याच डॉक्टर अरुणाची आतां आठवण झाली, कीं ऊर कसा अगदीं भरून येतो! डॉ. अरुणाच्या शस्त्रक्रियेंतील अप्रतिम नैपुण्यानेंच अशोकाची आई त्या दिवशीं माझ्या हातीं लागली. तिच्या सुरक्षित सुटकेमुळें आणि पुत्रजन्मामुळें माझ्या आनंदाला तेव्हां पारावार नव्हता. पण अशोकाचा जन्मदिवस जरी आनंदांत गेला तरी त्याचा वाढदिवस म्हणजे आयुष्यांतील शोकाचा स्मृति-दिन आहे. त्याच्या जन्मदिवशीं अरुणाची आणि माझी ओळख झाली आणि त्याच्या पहिल्याच वाढदिवशीं आमची शेवटची भेट झाली.

अशोकाचा वाढदिवस म्हटला कीं, अरुणाची आठवण होते, आणि अरुणाची आठवण झाली, कीं काळजाचें पाणी पाणी होतें. दिवसामागून दिवस जातात, वर्षांमागून वर्षें जातात, पण त्या पहिल्या वाढदिवसाची आठवण अजून बुजतच नाहीं.

अशोकाचा पहिला वाढदिवस! नको ती आठवण. पण नको म्हणून ती कोठली बुजावयाला ? त्या दिवशीं कांहीं तरी सुनेंसुनेंच भासत होतें.

अरुणाच्या न येण्यानें आमचा सर्वस्वीं विरस झाला होता. त्या दिवसाच्या थट्टेंत कांहीं जीव नव्हता. थट्टा करावी एका अरुणानेंच, बाकीच्यांचा निव्वळ पोरकटपणा, नाहीं तर पांचटपणा. कोणाला न झोंबणारी थट्टा करून सात्त्विक आनंद लुटावयास लावणारी अरुणाशिवाय दुसरी व्यक्ति अजूनपर्यंत मला आढळीच नाहीं. त्याचा एकंदर स्वभावच मुळीं गोड होता. त्याची माझी सारी वर्षांची ओळख. पण जणूं काय जन्मापासून त्याची माझी गट्टी होती असेंच वाटतें. आठ दिवसांच्या आंतच आम्ही एकमेकांना "अरे तुरे" म्हणूं लागलों होतों. किती किती मोकळा होता तो ! त्याच्यामुळें आम्हां सगळयांना शोभा होती. तो होता म्हणूनच आमचा पोरकटपणा झांकावयाचा आणि तिऱ्हाइतांच्या नजरेला त्याच्याइतकेच आम्ही पोक्त दिसावयाचे. त्याचा दरारा कांहीं और होता. ज्याचा ज्याचा त्याच्याशीं संबंध येई त्याच्या त्याच्या चारित्र्यावर त्याच्या आदर्श वागणुकीचा अगदीं न कळत परिणाम होई. एवढा पांच वर्षें विलायतेला होता, पण तिथें असतांना सुद्धां स्वतःकरितां औषधाला म्हणून देखील तो कधीं दारूला शिवला नाहीं, कीं आपली सहज गम्मत आणि नित्यांत थोडा फेर म्हणून त्यानें कधीं सिगारेट तोंडीं लाविली नाहीं. पाण्यांत जाऊन कोरडें राहण्याची कला तो कोठें आणि कशी शिकला होता कोणाला ठाऊक !

सर्वांना अरुण अगदीं हवासा वाटे. पण त्या दिवशीं तोच नसल्यामुळें सगळी मौज अगदीं नीरस वाटत होती. जरा कोठें खुट् झालें, कीं आमचे डोळे दाराकडे वळावयाचे. दादरावर कोणाचा पाय वाजला, कीं वाटावयाचें अरुण आला; पण छे ! क्षणोक्षणीं त्याची आठवण करीत होतों तरी त्याचा आपला पत्ताच नव्हता. आमचा हिरमोड केल्याबद्दल एकतऱ्हेचा त्याचा मला राग देखील आला होता.

वास्तविक त्याच्याचकरितां त्या दिवसाचा सारा समारंभ आणि खटाटोप; पण तोच मुळीं नाहीं. छोटया अशोकाचा त्या दिवशीं पहिला वाढदिवस होता; पण तो नांवालाच. अरुणाच्या शस्त्रक्रियेंतील अप्रतिम नैपुण्यानें आणि जिवापाड मेहनतीनें अशोक आणि त्याची आई माझ्या हातीं सुरक्षित लागल्यामुळें तिच्याच विशेष आग्रहावरून अशोकाच्या वाढदिवसाच्या निमित्तानें अरुणाला रात्रीं मोठ्या थाटाची मेजवानी केली होती.

अशोकानेंहि आपल्या आईशीं संगनमत केलेलें दिसत होतें. उभ्या दिवसांत बेटा जरासुद्धां रडला नाहीं. अरुणाच्या उपकाराची त्याला देखील जाणीव होतीसें दिसतें. जागा झाला, कीं पाळण्यांतून तिची धांदल चालली होती तिकडे टक् टक् पाहावयाचा. जातां जातां तिनें झोका दिला, कीं खुदकन् हंसावयाचा आणि हळूहळू डोळे मिटावयाचा. अरुणाच्या निस्सीम मेहनतीची फेड आपल्या सुगरणपणानें करण्याचा 'हिचा' विचार होता. कमरेला खोंवलेल्या पदराला हात लावावयाला साऱ्या दिवसांत तिला फुरसत मिळाली नव्हती.

चांगली साडेदहा वाजेपर्यंत अरुणाची वाट पाहून दमल्यावर नाइला-जानें आम्हीं दोन घांस खाल्ले. जेवल्यानंतर गप्पागोष्टी आणि थट्टामस्करी चालली होती, पण ती सारी निर्जीव. आमचे आम्हीच कंटाळलों. जमलेल्या मंडळींतून एकेकानें हळूहळू पाय काढला आणि घरची वाट धरली. मित्रमंडळी गेल्यावर अरुणाची गैरहजेरी अधिकच जाणवूं लागली.

स्वयंपाकघरांत तिचा आरासारा चालला होता. दिवाणखान्यांत मी कोचावर कलंडलों होतो. अरुण कां आला नाहीं याचेच विचार माझ्या डोक्यांत घोळत होते. एवढें तीनतीनदां बजावून तो कां बरें आला नाहीं ? आपल्या गंमतीखातर वेळेवर न येतां आमची निराशा करण्याची कल्पना त्याच्या स्वभावाला साजेशी होती का ? असला विचार त्याच्याशिवाय दुसऱ्या कोणाच्याहि बाबतींत संभवनीय होता. पण अरुण घरीं तरी होता का ?

माझें चित्त कांहीं त्या दिवशीं स्वस्थ नव्हतें. घडींत कोचावर पडा-वयाचा तर घडींत आंत तिची आवराआवर चालली होती तिकडे जाव-याचा. मधूनच दिवाणखान्यांत इकडून तिकडे फेऱ्या घालावयाचा, तर मध्येंच हाताला कांहीं तरी चाळा म्हणून टांगलेला दिवा बारीक मोठा करावयाचा. कंटाळून शेवटीं मी खोलींत झोंपावयाला निघालों. तेवढ्यांत दादरावर पावलांचा झप्झप् आवाज ऐकूं आला. दारावर थाप बसली. या वेळीं अरुणानें यावें ना ? सारी झांकपाक झाल्यावर ? काय तरी माणूस बुवा !

दार उघडतांच त्याच्या तोंडावर आणि माझ्या डोक्यांत लख्ख प्रकाश पडला.

सकाळींच आमच्या येथून तो गेला होता. पण त्या हसऱ्या, आनंदी अरुणांत आणि या अरुणांत केवढा फरक होता !

कोणी मागें लागल्याप्रमाणें घाबऱ्या घाबऱ्या तो आला होता. चेहरा काळवंडला होता. डोळे लालबुंद झाले होते. त्याची चांगली हजेरी घ्यावयाचा माझा विचार त्याला पाहिल्याबरोबर जागच्या जागींच जिरला. एखाद्या केसमध्यें तर तो दिवसभर गुंतला नसेल ना? जागरणाशिवाय त्याचे डोळे कशानें लाल व्हावेत ?

अरुणाच्या हाताला अचूक गुण होता. त्याचा रोगी सहसा दगावायचा नाहीं. अपेशी प्रसंगाला तो बहुतेक पारखा होता. त्या दिवसापर्यंत दोनदांच त्याच्या हातानें त्याला दगा दिला होता. त्याचें अंतःकरण लोण्यासारखें मऊ होतें. स्वतःच्या मायेच्या माणसाइतकेंच त्याला त्या वेळीं दुःख झालें होतें. दोन्ही वेळां त्यानें एक पैहि घेतली नव्हती. पैशाची त्याला पर्वा नव्हती, प्राणांचीच त्याला किंमत होती. अपेशी केसमध्यें पैसा घेणें त्याला कसेंसेंच वाटे. त्या दोन्ही वेळां असाच सुजलेल्या डोळ्यांनीं परस्पर तो माझ्याकडे आला होता.

आंत येतांच आरामखुर्चीवर त्यानें अंग टाकलें. काय झालें म्हणून मीं विचारण्यापूर्वींच तो भराभर सांगूं लागलाः—

—घरून निघून मी इकडे येत होतों. मला शोधीत एक गृहस्थ आमच्या घरीं चालला होता. घराजवळच त्यानें मला गांठलें. पूर्वीं कधीं मीं त्याला पाहिलेलें नव्हतें. पुष्कळ लोकांप्रमाणें तोहि मला ओळखीत होता. आम्ही राहतों त्या जोगेश्वरीच्या बोळाच्या तोंडावरल्या वाड्यांत पांच महिन्यांपूर्वीं राहत असल्याचें त्यानें मला सांगितलें. कसेंहि करून आपल्याबरोबर तडक येण्यास तो मला गळ घालीत होता. जीवित आणि मरण यांच्या कात्रींत एक अबला सांपडलेली होती. अडलेली बाई त्याची बहीण होती.

—पुनः पुन्हा तो सांगावयाचा, " डॉक्टरसाहेब, आपल्यालाच आणावयाचा तिचा हट्ट आहे. सुटलीच तर आपल्याच हातून सुटेल अशी तिला आशा आहे. घडीचा विलंब झाला तर शारीरिक दुःखापेक्षां आशाभंगानेंच तिचा कारभार आटोपावयाचा. तिचें दुःख अगदीं असह्य झालें आहे; पण

तुमच्याच आशेवर ती तग धरून आहे. तुमच्याशिवाय दुसऱ्या कोणाचेंच ती नांव घेऊं देत नाहीं " काकुळतीला येऊन बिचारा सांगत होता.

—तिच्या भवितव्यतेपेक्षां कोठल्या तरी गूढ काळजीनेंच तो अधिक गांजलेला दिसत होता. नुसत्या तिच्यावरील प्रेमामुळेंच ती वांचावी अशी तळमळ त्याला लागलेली दिसत नव्हती. अगदीं त्रासून आणि कावून तो तिची हकीकत सांगत होता. तिच्याबद्दल त्याला एवढा वैताग कां ?

—चालतां चालतां अवश्य तेवढी मीं रोग्याची चौकशी केली. शस्त्रांची पेटी घेण्यापुरता मी घरीं गेलों. अजूनपर्यंत मी त्याच्याच येथें होतों. तेथून आलों तो हा येथें—

वेळेवर आला नाहीं म्हणून अकारण अरुणाचा राग आल्याबद्दल माझें मन मला खाऊं लागलें. अरुण पुढें सांगतच होता.

—टांग्यांत घालून शनवारवाड्याच्या मोठया दरवाजाकडल्या कसब्याच्या कोपऱ्यावर त्यानें मला नेलें. शस्त्रांची पेटी घेऊन बोळा-बोळानें तो जाऊं लागला. त्याच्या मागोमाग मी मुकाट्यानें चाललों होतों. हळूहळू घरांची हद्द संपून उकिरडा लागला. उकिरड्याशेजारीं विटांच्या भट्टया होत्या. त्यांना लागून पार टोंकाला एक पडका वाडा होता. वाड्याच्या मागल्या बाजूला नदी वाहत होती. खाटीक, कुंभार, मुसलमान असल्या लोकांचीच त्या भागांत वस्ती आहे. चांगल्या मध्यम स्थितींतल्या पांढरपेशा माणसानें त्या गलिच्छ बाजूला कां राहावें हेंच मला समजेना. त्यानें हा नसता तुरुंगवास कां बरें पतकरला होता ?

—आमचीच वाट पाहत असलेल्या एका वीसबावीस वर्षांच्या तरुणानें वाड्याचें दार उघडलें. तोंडावळयावरून माझ्याबरोबरच्या गृहस्थाचा तो भाऊ होता हें मीं तेव्हांच ताडलें. आंतल्या चौकाच्या पलीकडचा जिना चढून आम्ही माडीवर गेलों. एका खोलींतून दुसरींत, दुसरींतून तिसरींत, असे गेल्यावर एका मध्यवर्ति खोलीकडे त्यानें बोट दाखविलें.

—वाड्याबाहेर असतांना आंत कोणी माणूस राहत असेल अशी शंकासुद्धां येणें शक्य नव्हतें. त्या खोलीच्या दाराजवळ जाईपर्यंत आंतल्या विव्हळण्याचा मागमूसहि लागत नव्हता. तरी बरें, सगळ्या वाडयांत सामसूम होतें. दिसावयाला पडका, पण आंतून अगदीं प्रशस्त, अशीच त्या वाडयाची कांहीं अजब रचना होती. आपल्या या पुण्यांत काय काय निघेल

वांचवायच्या परोपकारी धंद्यामुळं– तुम्हांला मनाविरुद्ध वागावं लागतं. डॉक्टर, सगळेच पुरुष कांहीं वाईट नसतात असं मला आतां वाटायला लागलं आहे."

—सबंध पुरुषजातीबद्दल तिची कशानें बरें तशी कल्पना झाली होती ?

—" सोन्यासारखे दोन भाऊ असतांना याच्या आधीं तसें कां वाटत होतें तुम्हांला ? "

—माझ्या अज्ञानाबद्दल तिला कींव आलेली दिसत होती.

—" पापी जगांत फसलेल्या तुमच्या भोळ्या बहिणीला तुम्हीं छळलं असतं का ? "

—तिच्या त्या प्रश्नानें माझ्या हृदयांत कायमचें घर केलें आहे. तो प्रश्न मी जन्मोजन्मीं विसरणार नाहीं. पण त्या प्रश्नाचें उत्तर काय द्यावयाचें ?

—मला स्वस्थ पाहून ती म्हणाली. " पण तुम्हांला बहीण तरी आहे का ? नाहीं तर माझ्या विचारण्याचा काय उपयोग ? "

—ती स्वतः माझी बहीण नव्हती का ? मग तिनें असें कां विचारावें ?

—" आजपर्यंत एकच होती. पण आतांपासून दोन झाल्या. सखी आहे ती सासरीं आहे. दुःखी आहे ती समोर आहे. "

—तिच्या वेदना पार विसरून गेल्यासारखी ती दिसत होती. कोठल्या शक्तीमुळें तिला त्या यातना सहन करवत होत्या बरें ?

—" माझा गळा कापणाराचं नरडं दाबायला मिळावं म्हणून कुजकं बोलणं बोलून किती बरं दादानं छळायचं ? त्याचं कर्म त्याच्याबरोबर. आपला पाय चुकून घसरला तिथं दुसऱ्याला काय बोलायचं ? माझ्या तोंडाला काळं फासणाराचं नांव समजून घ्यायला काय करायचं बाकी ठेवलं आहे दादानं ? माझं वाटोळं केलं त्याला देव यापुढं सद्बुद्धीच देवो. "

—तिचा सत्यनाश करणारावर तिनें जरासुद्धां हात चोळले नाहींत.

—माझ्याकडे पाहून तिनें पुन्हा विचारलें, " सांगा, कुठवर छळलं असतं तुम्ही ? अगदीं जीव जाईपर्यंत ना ? एकच नाहीं, तर दोन जीव जाईपर्यंत ना ? सांगा, होय ना ? अस्संच ना डॉक्टर ? "

—माझ्या हृदयानें डोळ्यांतून बाहेर वाट काढली.

—एकाएकी कांहींतरी आठवून ती म्हणाली, " मी म्हणजे विझती वात आहें. माझं जाऊं द्या. पण माझं बाळ तरी सुरक्षित राहील का ? "

—मुलाची हमी घ्यावयाला मी तयार झालों. तिच्या डोळयांत कृतज्ञते-शिवाय दुसरें कांहीं दिसत नव्हतें. मला वाटायला लागलें, 'माझा जीव देऊन ती वांचत असती तर ! '

—" घ्याल का तुम्ही माझ्या बाळाची काळजी ?...नका, असें डोळयांला पाणी आणूं नका. माझा विचार कशाला करतां ?—"

—तेवढ्यांत माझ्यासमोरचें दार उघडलें. बराच वेळ तिचें विव्हळणें बंद झाल्यामुळें तिची सुटका झाली असावी असें समजून तिचे दोन्ही भाऊ काय झालें हें समजण्यासाठीं दारांतच उभे राहिलेले दिसले. त्या खोली-कडेच कुणीतरी येत असल्याचा माझा भास एकंदरींत असा खराच होता म्हणावयाचा.

—आजूबाजूला काय चाललें होतें तिकडे तिचें मात्र बिलकुल लक्ष नव्हतें. ती आपली बोलतच होती. " माझा विचार आतां कशाला करतां ? झालं तें झालं. सांभाळाल ना बाळाला ? टाकूं ना मग त्याला तुमच्या पदरांत ? नाहीं ना अंतर देणार त्याला ?...आतां एवढं तरी करा !... तुमचंच आहे बरें तें आतां ! !...मी तर चाललें........."

—त्यानंतर तिचे ओठ हलत होते, पण शब्द बाहेर फुटत नव्हता. तिची नजर माझ्याचकडे खिळलेली होती. डोळयाची पापणी अगदीं ताठ होती. सगळा जीव तिच्या डोळयांत उतरला होता. उशीवरून तिची मान माझ्या मांडीवर पडली. तेवढीच तिची शेवटची हालचाल !

—आज चिमटया-( forceps ) चा उपयोग करावयाची मला जरूर लागली नाहीं. माझ्या मदतीशिवाय तिची सुटका झाली होती—अगदीं कायमची सुटका ! तिची अखेरची इच्छा पुरी करण्याचें भाग्य या अभाग्या-च्या नशिबीं नव्हतें. तिचें रहस्य आणि मूल दोन्ही पोटांतल्या पोटांतच राहिलीं. माझ्या मांडीवरची त्या निष्पाप माउलीची मान मरेपर्यंत मीं दूर करूं नये असें मला वाटत होतें. पण दिलेला शब्द ज्याला खरा करतां येईना, त्यानें आपली मनीषा पुरी व्हावयाची आशा कां धरावी ?

—समोर दाराकडे माझें लक्ष गेलें तर मुद्देमालासकट पकडलेल्या

चोराकडे पाहावें तसें– अगदीं त्याप्रमाणें– दोन यमदूतच माझ्याकडे पाहात असलेले दिसले. त्या वेळीं मला पाहून आणि तिचे ते शब्द ऐकून दुसरें कोणीहि जें कांहीं समजलें असतें तेच तिचे दोघे भाऊहि समजले! पुष्कळ दिवस ध्यास लागलेली गोष्ट अचूक सांपडल्याचें त्यांना आसुरी समाधान झालेलें दिसत होतें. त्यांच्या डोळ्यांवर खून चढला होता. त्या वाड्यांतली देवता निघून गेली. सैतानाच्या साम्राज्यात मी सांपडलों होतों. एक क्षणभर देखील तेथें राहावयाची मला इच्छा नव्हती. बाहेर पडतां पडतां माझ्या कानांवर त्याचे शब्द आले, " बरा सांपडलास हरामखोरा...आतां कुठं लपून राहशील ? "

—त्या नरकांतून निघून हा मी येथें आलों आहें.

हें सगळे लिहावयाला जेवढा वेळ लागला त्याच्या शतांशहि अरुणाला तें सांगावयाला लागला नाहीं. किती झपाट्यानें सांगून टाकलें त्यानें... सांगून संपतांच त्यानें दार गाठले. वेड्यासारखा तो दिसूं लागला होता.

"कोठे चाललास रे अरुण ? "

भ्रमिष्टासारखे तो म्हणाला, " घरीं ! "

त्याला मी अडविणार तोंच तीरासारखा तो निघून देखील गेला. काळोखांत तो एकदम गडप झाला. तेव्हांपासून तो अदृष्ट झाला आहे तो अदृष्टच!!

त्या दिवसापासून अरुणाच्या निर्मल नांवाला निष्कारण बट्टा लागला आहे. धंद्याच्या धांदलींत त्याला घडीची फुरसत नसावयाची. लग्न करून धंद्यापायीं पत्नीची हेळसांड होईल म्हणून अविवाहित राहिला. त्या अरुणा-बद्दल लोकांनीं काय बोलावयाचें शिल्लक ठेविलें आहे ?

त्याला जाऊन आज इतकीं वर्षें झालीं आहेत तरी अजून देखील चांगल्या शिकल्यासवरलेल्यांच्या बाया अडल्या म्हणजे अडाणी लोकांचे गांवठी उपचार करावयाला एक वेळ तयार होतात, पण आपण होऊन एखाद्या नाणावलेल्या शस्त्रवैद्याचें कधीं नांव नाहीं काढीत. त्यांचें आपलें म्हणणें, " आपलंच काय बरं वाईट व्हायचं तें होऊं द्या; पण लेंकराबद्दल 'घरीं' तरी नको फुकट संशय यायला ! "

चारचौघे जमले म्हणजे चांगले शिष्ट शिष्ट देखील म्हणतात, " दिवसें-दिवस माणसाचा भरंवसा नाहीं राहिला मुळीं...गोंगलगाय अन् पोटांत

पाय. शिकूनसवरून चांगलं विलायतेहून येऊन असं राहत्या घराशेजारीं तरी शेण नव्हतं खायचं!"

कुठेंहि गेलें तरी आपलें हेंच ऐकावें, "अहो खाई, त्याला खवखवे. तोंड कुठं होतं त्याला फीचे पैसे मागायला? नाहीं तर घरीं आला कीं, लागला मोजून घ्यायला पैसे—कुठं ओवाळला आहे कोणाला ठाऊक... तीहि पण कच्चीच. शेवटपर्यंत झांकून ऐन मरतांना राहवेना तिला. सारखा त्याच्या नांवाचा पाठ चालविला होता..." इ. इ.

असें कांहीं ऐकले म्हणजे माझ्या जिवाची कशी लाही लाही होते आणि लोकांना खरें काय आहे तें तरी समजावें असें वाटतें. म्हणूनच इतके दिवस जें नुसतें वाटत होतें तेंच आज अशोकाच्या वाढदिवशीं लिहून काढलें आहे. निरपराध अरुणाच्या निष्कलंक चारित्र्यावर विश्वास ठेवणारे कांहीं सज्जन सांपडणार नाहींत का? माझ्या अरुणावरून सगळें जग ओवाळून टाकलें तरी थोडें आहे. पण कुटाळांना त्याचें काय? ...खरेंच, पण मी विसरलों होतों. अरुणाच्या फोटोफ्रेमला हार नाहीं घातला मीं. या लिहिण्याच्या धांदलींत आठवणच नाहीं राहिली. अशोकाच्या दर वाढदिवशीं मी अरुणाच्या फोटोला हार घालतों. पण माझ्या हृदयांतला अरुण नेमानें रोज माझ्याच गळ्याभोंवतीं अश्रुहार गुंफीत असतो!

अशोकाचा वाढदिवस!–पण आज अशोकाचा वाढदिवस समजावयाचा का अरुणाचें वर्षश्राद्ध समजावयाचें, हेंच मला कळत नाहीं. आज काय आहे हें कोणीतरी मला सांगेल का?



# अप्रकाश-किरणांचा दिव्य प्रकाश :: ३

प्रो० जगदीशचंद्र बोस यांनीं वनस्पतिशास्त्रांत जे अपूर्व शोध लावले आहेत त्यांची थोडीबहुत माहिती आतां बऱ्याच लोकांना झालेली आहे; पण त्यांच्याच तालमींत तयार झालेल्या व संशोधनाचें वेड लागलेल्या बाबू प्रफुल्लकुमुद मुकर्जी यांच्या विलक्षण शोधांची व त्यांच्या घोर परिणामांची माहिती अद्यापि अप्रकाशित आहे!

बाबू प्रफुल्लकुमुद हे एक चांगले श्रीमंत असे जमीनदार होते, व त्यांची बुद्धिमत्ता आणि कल्पकता तीव्र होती. ते श्रीमंत असूनहि त्यांच्यामध्यें ज्ञानलालसा बरीच होती. त्यांचा स्वभाव फारच सुशील व परोपकारी होता. बी. ए. झाल्यानंतर ते प्रो. जगदीशचंद्र बोस यांच्या प्रेमळ व स्फूर्तिदायक सहवासाचा आणि शिक्षणाचा अनुभव घेऊं लागले. कांहीं वर्षे या निरुपम सात्त्विक सुखाचा आस्वाद घेतल्यानंतर प्रफुल्लकुमुद यांच्या मनानें घेतलें कीं, आपण आपल्या गुरुप्रमाणें विशिष्ट शोध लावण्याच्या कामीं आपलें धनसर्वस्व, बुद्धिसर्वस्व व आयुःसर्वस्व खर्च करावें. प्रो. बोस यांना आपल्या शोधाच्या कामीं प्रफुल्लकुमुद यांची बरीच मदत होत होती व म्हणून त्यांनीं 'माझ्याकरितां तरी आणखी कांहीं वर्षे मजजवळ रहावें' असें म्हटलें, व प्रफुल्लकुमुद यांनीं तें कबूलहि केलें, कारण कोणाचेंहि मन मोडणें हें त्यांच्या जिवावर येत असे.

परंतु कांहीं दिवसांनीं त्यांच्या सुपीक डोक्यांत एका विलक्षण शोधाची कल्पना आली. ही कल्पना थोड्या अवधींत इतकी प्रबळ झाली, कीं त्यांना दुसरें कांहीं सुचेनासें झालें. घरींदारीं, बसल्या उठल्या, जागें असतांना, स्वप्नांत, शोधाचे विचार! मित्रमंडळी वेड लागले कीं काय म्हणून चेष्टा करूं लागली. बायकोकडेहि हे दुर्लक्ष करूं लागल्यामुळे प्रथम तिला असूयामूलक भलतीच शंका आली. ती रुसलीफुगली, पण या स्वारीला शोधाशिवाय दुसरेंतिसरें सुचत नसल्यामुळें त्या तिच्या रुसण्याफुगण्याचा उपयोग झाला नाहीं. यामुळें त्या मानिनी गृहिणीचा संताप अधिकच प्रज्वलित झाला, व काय करावें नि काय करूं नये असें तिला होऊन गेलें. प्रो. बोस यांनींहि प्रफुल्लबाबूकडे सहानुभूतीच्या दृष्टीनें पाहिलें नाहीं, 'तुमची कल्पना बरोबर आहे, पण अव्यवहार्य आहे एवढेंच काय तें' असें प्रेमानेंच पण किंचित् उपरोधिक विनोदानें म्हणून प्रो. बोस यांनीं प्रफुल्लकुमुदांना वाटेस लावलें. परंतु त्यांचा नाद कांहीं केल्या सुटेना. उलट तो दुणावला. अर्थात् प्रो. बोस यांच्या कामाकडें प्रफुल्लांचें दुर्लक्ष होऊं लागलें व शेवटीं नाइलाज म्हणून बोस यांनीं प्रफुल्लबाबूंना 'आपलें शोधाचें वेड चांगलें आहे पण आपली हौस घरीं बसून स्वस्थपणें पुरवावी म्हणजे ठीक पडेल' असें सौम्यपणें सुचवून त्यांचा स्मितपूर्वक निरोप घेतला.

अशा प्रकारें चांगली फुरसत मिळाल्यानंतर आणि चोवीस तास आपलेसे झाल्यानंतर बाबू प्रफुल्लांनीं आपल्या घरची रासायनिक प्रयोगशाला विस्तृत केली. या पायीं अर्थात् घरादाराचें वाटोळें झालें. बायकोच्या कांहीं जडजवाहिरांचें आणि सोन्याच्या दागिन्यांचेंहि ॲसिडांत, कांचेच्या भांडयांत व नळकांडयांत रूपांतर झालें. बायकोला नवरा ठार वेडा झाला असें वाटूं लागलें व दागिने गेल्यापासून तर तो शत्रूसारखा भासूं लागला! पण ती करणार काय ?

अशिक्षित व ऐहिक विलासदृष्टीच्या बायकोची नाहीं तर नाहीं, पण आपल्या सुशिक्षित व रसिक मित्रांची तरी सहानुभूति मिळते कीं काय म्हणून पहावें, या हेतूनें प्रफुल्लकुमुदांनीं त्यांच्या गांठी घेतल्या. पण त्यांनींहि हा अव्यवहार्य नाद सोडून देण्याला त्यांना सांगितलें.

बाबू प्रफुल्लकुमुद यांनीं Berkeley's theory of Vision नांवाचें पुस्तक वाचल्यापासून त्यांची अशी खात्री झाली होती, कीं रंग हे वस्तूंमध्यें वास्तविक नसतात, तर ते पाहणाराची दृष्टि, तिचें स्थान, तिच्यावर सूर्यकिरणें कोणता कोन करून पडतात, तिच्याभोंवतीं कोणत्या वस्तु असतात, इत्यादि अनेक गोष्टींच्या अपेक्षेनें रंग बदलतात. 'पानी, तेरा रंग कैसा ? तो जिसमें मिला वैसा.' पाण्याचें कशाला, सर्व वस्तूंची अशीच स्थिति आहे. पदार्थविज्ञानशास्त्राची आधुनिक तत्त्वें देखील असें सांगतात, कीं एखाद्या वस्तूचा रंग म्हणजे त्या वस्तूंत कांहीं स्वतंत्र तत्त्व आहे असें नव्हे; तर त्याच्यावर येऊन आदळणाऱ्या अनेक व अनेकविध किरणांपैकीं जीं त्या वस्तूला शोषून घेतां येत नाहींत– म्हणजे जीं त्या वस्तूंत लीन होऊं शकत नाहींत– त्या किरणांचा रंग त्या वस्तूला चढतो. आंबा 'हिरवा' आहे याचा अर्थ आंब्यावर जीं किरणें पडतात त्यांतील हिरव्याशिवाय इतर किरणांचे अंश आंब्यामध्यें लीन होतात. हिरवेपणा वास्तविक आंब्यांत नाहीं, तर एका अर्थी बाह्य किरणांत आहे. या गोष्टींचा बाबू प्रफुल्लकुमुद विचार करूं लागल्यावर त्यांना अशी कल्पना सुचली कीं, वस्तूवर पडणारीं सर्व प्रकारचीं किरणें शोषून घेऊन आत्माधीन किंवा आत्मलीन करण्याची शक्ति जर त्या वस्तूला कोणत्या तरी कारणानें प्राप्त झाली तर त्या वस्तूला कोणताहि रंग असणार नाहीं, म्हणजे ती अदृश्य होईल !

सूर्यकिरणांचें पृथक्करण करून त्यांतून सात रंग दाखविण्याचे प्रयोग,

किंवा सात रंगांच्या कागदांच्या चकत्या कमळासारख्या पुठ्यावर डकवून तो पुठ्ठा जोरानें गरगर वाटोळा फिरविल्यावर पांढरा रंग उत्पन्न करून दाखविण्याचे प्रयोग, पुष्कळ वाचकांनीं पाहिले असतील. हातचलाखीनें वस्तु जागच्याजागीं नाहींशी करण्याचे गारुडी खेळहि पुष्कळांनीं पाहिले असतील. पण हातचलाखीनें नव्हे तर शास्त्रीय पद्धतीनें एखादी वस्तु— चालता बोलता मनुष्यहि– अदृश्य करून दाखविण्याचे प्रयोग बाबू प्रफुल्ल-कुमुद यांनीं करून दाखविले, याबद्दल त्यांचें कोणाला कौतुक वाटणार नाहीं ? प्रस्तुत लेखक पदार्थविज्ञानशास्त्रांत विशेष पारंगत नसल्यामुळें या शोधाची उपपत्ति जितक्या आत्मप्रत्ययानें व सुबोध रीतीने एखाद्या तज्ज्ञ मनुष्यास सांगतां येईल तितकी त्याला सांगतां येणार नाहीं; पण तो आपल्या-कडून यथामति प्रयत्न करून पाहणार आहे. हेतु हा कीं, वाचकांचें इकडे लक्ष लागावें. या शोधाचें ज्ञान झाल्यावर योगी लोक एकदम गुप्त कसे होतात व लोकांना न कळत विशिष्ट स्थलीं कसे जातात, याची थोडी-बहुत कल्पना येईल.

'ईथर' नांवाची जी अतिसूक्ष्म, हवेपेक्षांहि पातळ व सर्वगामी वस्तु जगांत पसरलेली आहे, तिच्यामध्यें विशिष्ट प्रकारच्या लाटा किंवा लहरी उत्पन्न झाल्या म्हणजे विशिष्ट प्रकारचे रंग दिसतात, असें तज्ज्ञांचें मत आहे. लहरीं-लहरींमधील अंतर व त्यांचा वेग, यावरून एखाद्या वस्तूचा रंग ठरतो. दर सेकंदाला अमुक लक्ष मैल वेग असेल तर त्या लहरींपासून अमुक रंग निष्पन्न होतो, अशा प्रकारचे निश्चित नियमदेखील शास्त्रज्ञांनीं प्रयोगपूर्वक ठरवि-लेले आहेत. तेव्हां गणितशास्त्रानेंच हें सिद्ध होतें, कीं ईथरच्या लहरींचा वेग अमुक प्रमाणाचा केला असतां प्रकाश किंवा रंग मुळींच दिसणार नाहीं. अशा प्रकारच्या ईथर-लहरी आपणांला कृत्रिमरीत्या विद्युत्साहाय्यानें उत्पन्न करितां येतील, असें प्रफुल्लबाबूंचें म्हणणें होते. बिनतारी तार जी पाठवितात ती विशिष्ट वेगाच्या ईथर-लहरी उत्पन्न करून त्यांच्या द्वारें पाठवितात. तेव्हां विजेच्या साहाय्यानें 'अप्रकाशा'च्या लहरी उत्पन्न करता येणें– म्हणजे एखादी वस्तु अप्रकाश किंवा अदृश्य करणें– अशक्य नाहीं, हें उघड आहे.

अशा विचारसरणीनें प्रेरित होऊन प्रफुल्लकुमुद यांनीं चार वर्षें घर-दार, बायको, मुलें इत्यादिकांकडे यत्किंचितहि न पाहतां एकाग्रतेनें प्रथम

प्रो. बोसच्या प्रयोगशाळेंत, व नंतर आपल्या खाजगी प्रयोगशाळेंत एतत्संबंधीं प्रयोग केले; पण यश म्हणून येईना. तथापि त्यांनीं हताश न होतां आपले प्रयोग चालूच ठेवले. बायकोनें हा नाद ( किंवा तिच्या मताप्रमाणें 'हें वेड' ) सोडून देण्याविषयीं पुष्कळ सांगून पाहिलें, पण व्यर्थ! प्रफुल्लकुमुदांना बायकोशीं चार शब्द बोलण्याचे किंवा तिचे चार शब्द स्वस्थपणे ऐकण्याचें देखील सुचत नव्हतें, तर ते काय असल्या स्वार्थी उपदेशाला दाद देतात! शेवटीं निराश होऊन वैतागानें बायकोनेंहि आपल्या वेडसर पतीशीं हुजत घालण्याचें सोडले; व आपण बरी आणि आपला मार्ग बरा असें तिनें धोरण स्वीकारलें!

प्रफुल्लबाबूंना आपली उपपत्ति बरोबर आहे आणि आपण आपल्या गुरूप्रमाणें—प्रो. बोसप्रमाणें—अविश्रांत शोध करीत राहिल्यास त्यांच्याप्रमाणें आपणांलाहि यश येईल व आपल्या देशाची दिगन्त कीर्ति होईल अशी खात्री वाटत होती, हें तर या चिकाटीचें एक कारण होतेंच. दुसरें कारण असें होतें कीं, योगिजनांचें गुप्त आगमन आणि प्रयाण याविषयींच्या गोष्टींवर स्वामी विवेकानंदांच्या व रामतीर्थांच्या आख्यायिकांवरून त्यांची श्रद्धा बसलेली होती. बाबू मोतिलाल घोस यांच्या Spiritual Magazine नांवाच्या मासिकाच्या योगानें ही कल्पना दृढ झाली होती. एच्. जी. वेल्स यांच्या 'The invisible man' नांवाच्या गोष्टीवरून या कल्पनेला बरेंच चालन मिळालें होतें. पूर्वींच्या नाटकांत अप्सरा 'तिरस्करिणी' घेऊन पृथ्वीतलावर संचार करीत असत असें वर्णन असतें. हें वर्णन 'अप्रकाश किरणां'चा शोध लागल्यावर शास्त्रीय पद्धतीनें सत्य ठरेल अशी बाबू प्रफुल्लांची कल्पना होती.

प्रफुल्लकुमुद हे श्रीमंत होते हें मागें सांगितलेंच. पण ते श्रीमंत होते तरी—किंवा श्रीमंत होते म्हणूनच असेल—त्यांना फॅशनचा, वरकरणी उपचारांचा, दांभिक भाषणांचा, दिखाऊ प्रतिष्ठितपणाचा, ढोंगी भारदस्तपणाचा वगैरे अगदीं वीट आला होता. वेदान्त्यांची दृष्टि कशीहि असो; वरील दृष्टीनें तरी जग हें खचित खचित 'मायिक' आहे असें तें म्हणत व या माये-पासून सत्यस्वरूपी परब्रह्माकडे जाण्याकरितां जगांत जर अदृश्य रीतीनें राहतां येईल तर फार बरें, अशी त्यांची कल्पना होती. रानावनांत जाण्या-पेक्षां जगांत राहून—पण अदृश्य राहून—त्यांतील रूढींच्या व दांभिक

उपचारांच्या मायिक जबाबदारींतून मुक्त होतां यावें अशा दृष्टीनें 'अप्रकाश किरणां'चा शोध त्यांना लावतां आला असता तर तो हवा होता; आणि 'हवा होता' म्हणून तो 'लावतां येईलच' अशी त्यांची मनोदेवता त्यांना सांगत होती.

ही मायाविषयक विचारसरणी बरीच मायिक अथवा सदोष आहे. जगांतली राहणी दिवसेंदिवस अधिक कृत्रिम, दिखाऊ, ढोंगी आणि मानभावीपणाची होत चालली आहे हें कांहीं खोटें नाहीं; तसेंच, पोषाखांत, भाषेंत, व्यवहारांत, जिकडेतिकडे औपचारिकता, नाटकीपणा व बेगडी सभ्यता दिसून येते, हेंहि खरें; पण शुष्क रूढींचा व बाह्य उपचारांचा—ढोंगीपणाचा व शिष्ट लुच्चेगिरीचाहि— उपयोग आहे. आपणांला जगाचा पोषाख दिसतो, अंतरात्मा दिसत नाहीं, हें एकपरी बरें आहे. आपल्या पाठीमागें लोक आपल्याविषयीं काय बोलतात आणि काय काय करीत असतात हें आपणांला कळत नाहीं आणि त्यांच्या दृष्टीआड आपण काय काय बोलतों व काय काय करतों हें त्यांना समजत नाहीं, हेंच एकंदरींत चांगले आहे. कारण, हें कळलें तर मनुष्याला वेड लागण्याचीच पाळी येईल! जनलज्जेचा दाब नसता, ज्यांना आपण कृत्रिम उपचार म्हणतों त्यांचें जर आपणावर दडपण नसतें, तर किती तरी पापें आपल्या हातून झालीं असतीं! किती तरी लोकांचे आपणांला जोडे खावे लागले असते! आपल्या पाठीमागें ज्या गोष्टी होत आहेत त्या सर्व डोळ्यांदेखत पाहण्याचा प्रसंग येत नाहीं हेंच चांगलें आहे. नाहीं तर वैतागानें, रागानें किंवा निराशेनें जीव देण्याचीच पाळी आली असती! आपण जें जग पाहतों ती माया असेल; पण माया आहे म्हणून तर ती दर्शनीय झाली आहे! मध्यान्हीच्या सूर्याकडे जसें आपणांला पाहतां येत नाहीं, तसेंच निरुपाधिक निर्व्याज सत्याकडे पाहणें कठीण, नव्हे, अशक्य आहे! आपण खरे कसे आहों, लोक आपणांला खरोखर काय समजतात, याचें हुबेहुब चित्र सामान्य मनुष्याच्या बाबतींत तरी इतकें अमंगल असतें कीं, तें असामान्य धैर्याशिवाय शांतपणें पाहणें अशक्य आहे. सत्यस्वरूपदर्शन हें 'विश्वस्वरूपदर्शना'प्रमाणें अर्जुनालाहि बहुधा भयप्रद झालें असतें. मायेच्या हिरव्यागार चष्म्यांनीं जगाकडे आपण पाहतों म्हणून बरें आहे; नाहीं तर त्याचें प्रखर तेज असह्य झालें असतें. भर्तृहरि राजाला दिखाऊ जगाच्या पडद्याआड

काय काय व्यवहार चालले असतात, याचा अनुभव थोडासा आल्याबरोबर

**धिक् तां च तं च मदनं च इमां च मां च**

असें तो म्हणाला, व डोक्यांत राख घालण्यास तयार झाला. अशा दृष्टीनें विचार करूं लागलों म्हणजे आपले विचार लोकांना कळत नाहींत, लोक आपल्याशीं खरें बोलत नाहींत, जो तो व्यवहारांत वारांगनांप्रमाणें औपचारिक हास्य, आनंद, अभिनन्दन, आदरसत्कार इत्यादि व्यक्त करतो, याविषयीं विशेष वैषम्य वाटत नाहीं. कृत्रिमता, ढोंग, कपट इत्यादिकाचें सुखकर व मोहकारक अभ्रपटल सत्यस्वरूपी प्रखर सूर्याच्या आड नसते, तर जगांत संतापज्वालांनीं हाहाःकार उडाला असता. कपटपटु स्त्रियांचीं पापात्मक चरित्रें व अर्थात् पुरुषांचींहि अशाच धर्तीचीं चरित्रें नव्याण्णव हिश्शांनीं गुप्त आहेत. तशीं जर तीं नसतीं, तर सर्व भूमि खुनी रक्तानें लाल होऊन गेली असती. प्रत्येक मनुष्य जर प्रत्येक वेळीं खरें बोलूं लागेल तर जोडाजोडीशिवाय घटका जाणार नाहीं. संसारांतील 'माया' ज्या दिवशीं जाईल त्या दिवशीं प्रलयकाल जवळ आला आहे असें समजावें. संसारांत 'माया' आहे म्हणून त्यांत काव्य आहे, राम आहे. 'माये'च्या अभावीं खून व मारामाऱ्या तरी होतील, किंवा परब्रह्माचें निःश्रेयस सुख तरी मिळेल. पण हें दुसरें सुख लाभणें दुष्कर आहे, म्हणून ती मायाच बरी, असेंच सामान्य मनुष्य म्हणेल.

पण हें विषयान्तर आटोपतें घेताधेतां बरेंच लांबलें. बाबू प्रफुल्लकुमुद यांना 'अप्रकाश-किरणांचा' शोध लावण्याची प्रबल इच्छा कां झाली याचें आपण विवेचन करीत होतों. या नादाच्या किंवा वेडाच्या पायीं त्यांनीं आपली इस्टेट रसायनशाळेंतील स्टोव्हच्या ज्वालेंत व ॲसिडांत घालून तिची राखरांगोळी केली, हें वर सांगितलेंच आहे. सर्व लोक त्यांना वेड्यांत काढूं लागले. त्यांना वेड्यांच्या इस्पितळांत पाठविण्याचें प्रत्यक्ष त्यांच्या बायकोच्या मनांत एकदां आलें होतें; पण काय झाले कोणाला ठाऊक, तो बेत तसाच राहिला; आणि हा ईश्वराचा या देशावर मोठा उपकारच झाला म्हटलें पाहिजे. कारण, हा बेत रहित झाल्यानंतर एक वर्षाच्या आंतच 'अप्रकाशकारी किरणां'चा शोध जगांत प्रकाशित करण्याची वेळ आली, व प्रफुल्लकुमुद हे **'क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते'** या न्यायानें खरोखरच

प्रफुल्लकुमुदाप्रमाणें शोभूं लागले, व आपल्या कीर्तीच्या सुवासानें सर्वांस आनंद देऊं लागले!

* * * *

या अपूर्व शोधानें जगांत मात्र केवढा अनर्थ उडाला व हाहाःकार झाला! पण त्याचें वर्णन पुढें ओघाओघानें येईल तेव्हांच केलेलें बरें.

विजेच्या साहाय्याने 'अप्रकाश किरणें' पाहिजे तेव्हां उत्पन्न करतां येऊं लागल्यावरहि वीज ज्यांत सांठविली आहे, अशा प्रकारची नीट, आटपसर, सुंदर वस्तु कशी करतां येईल इकडे प्रफुल्लबाबूंचें लक्ष लागलें. वाफेच्या शक्तीची तात्त्विक कल्पना मनांत आल्यापासून तिला एंजिनांत कोंडून लगामीं लावण्यापर्यंत मध्यंतरीं कितीतरी दिवस जसे गेले तसे या शोधाच्या बाबतींतहि झालें; पण करतां करतां अखेर कोणत्याहि वस्तूला किंवा मनुष्याला पाहिजे तेव्हां अदृश्य करणारी 'अप्रकाश अंगठी' त्यांनीं आपल्या अचाट कल्पनासामर्थ्यानें आणि कल्पकतेनें शोधून काढली. दौतीला, कागदाला, कुत्र्याला, मांजराला प्रयोगाकरितां अंगठी बांधून पाहिल्यावर तीं अदृश्य झालेलीं अनेक वेळां पाहून प्रफुल्लबाबूंना जो आनंद झाला असेल त्याची यथार्थ कल्पना ज्याच्या हातून एखादें मोठे कार्य झालें असेल त्यालाच येईल.

प्रफुल्लबाबू तर आनंदानें इतके फुलून गेले कीं, कांहीं विचारूंच नका. अनेक दिवसांनंतर अथवा वर्षांनंतर बायकोशीं स्वस्थपणे आणि प्रफुल्लित मुद्रेनें ते त्या दिवशीं बोलूं लागले तेव्हां त्या बायकोला प्रथम असें वाटलें कीं, यांचें वेड आज बरेंच वाढलें आहे! पण पतीनें 'अप्रकाश अंगठी'चा क्रांतिकारक शोध आपण अखेर लावला असें जेव्हां त्यांनीं सांगितलें तेव्हां तिला जें आश्चर्य व जो आनंद झाला त्याची यथार्थ कल्पना प्रफुल्लबाबूंनाहि त्या वेळीं येणें शक्य नव्हतें!

या शोधाची बातमी हां हां म्हणतां कलकत्ता शहरांत पसरली. अंगठीची किंमत प्रफुल्लबाबूंनीं फक्त एक रुपया ठेविली होती; कारण पैसे मिळविणें हें त्यांचें केव्हांहि ध्येय नव्हतें. त्यांनीं गिलिट केलेल्या दहा लाख अंगठ्या प्रयोगाकरितां आणल्या होत्या, त्यांपैकीं नऊ लाख प्रयोग करण्यांतच फुकट गेल्या व एक लाख शिल्लक होत्या. या एक लाख अंगठ्या

एका दिवसाच्या आंत उडाल्या! कारण अदृश्य होऊन जगांत पाहिजे तेथें व पाहिजे तसें वावरण्याची इच्छा कोणाला नाहीं?

पण या शोधानें त्या शहरांत अत्यन्त अनर्थ उसळला. प्रफुल्लबाबूंच्या घरीं ज्या झुंडीच्या झुंडी येत त्यांना 'अप्रकाश अंगठी' मिळाल्याबरोबर ते रस्त्यांतून अंगठी घालूनच अविचारानें हिंडूं लागले. त्यामुळें झालें काय, तर पुष्कळ लोक मोटारींखालीं व घोड्यांच्या गाड्यांखालीं सांपडले, कित्येकांचे सायकलीखालीं पाय मुरगळले, आणि कित्येक लोकांची रस्त्यांतल्या जाणाऱ्या-येणाऱ्या लोकांशीं टक्कर होऊन लोकांचीं व त्यांचीं डोकीं शेकलीं गेलीं. जागोजाग रक्ताचे पूर व चेंगरलेले अवयव पाहून खुनांचे वारंवार अनुभव असलेले पोलिसहि आश्चर्यचकित होऊन गेले.

नाटकगृहांत, शाळांत, फराळाच्या दुकानांत, वेश्यागृहांत, राजकीय सभांमध्यें, सगळीकडेच या क्रान्तिकारक शोधानें गडबड उडवून दिली. फराळाच्या दुकानांत, रस्त्यांत, 'अदृश्य' होऊन आलेल्या म्हाताऱ्या बायांची इतकी गर्दी झाली कीं, त्या दुकानांच्या मालकांनीं दुकानांचीं आंतील दारें बंद केलीं, आणि अदृश्य होऊन आलेल्या लोकांना दृश्य झाल्याशिवाय ते आंत सोडीनासे झाले. 'अप्रकाश अंगठी'च्या शोधाची बातमी शहरांत पसरल्यापासून तीन तासांच्या आंतच फराळाच्या दुकानांत झुंडीच्या झुंडी येऊं लागल्या. पण त्यांतल्या त्यांत ध्यानांत ठेवण्यासारखी गोष्ट ही कीं, त्या दुकानांवर पहिली स्वारी म्हाताऱ्या बायांची होती. मागून हरदास-पुराणिक आले. यांमध्यें एक वेदमार्तंड होते, आणि दुसऱ्या एकानें आदल्या दिवशीं गीतेंतील सात्त्विक, राजस व तामस आहारावर कथेंत प्रवचन चालविलें असतां हॉटेलांतील तामसी खाद्यांचा तिखटमीठ लावून बराच समाचार घेतला होता. म्हाताऱ्या बायकांना या दुकानांतील रीतरिवाज माहीत नसल्यामुळें कोणाशीं काय मागावयाचें हें पहिल्यानें त्यांच्या ध्यानांत येईना. पण एक बोलके पुराणिक हॉटेलांतील पोह्यांतलीं वांगीं हॉटेलांतच खात बसले होते त्यांच्या साहाय्यानें त्या बायांची सर्व अडचण दूर झाली. इंग्रजी शिकलेल्या किंवा शिकत असलेल्या बायकामुलीहि तेथें 'अप्रकाश अंगठी' घेऊन आल्या होत्या; पण त्या या कामांत म्हाताऱ्यांच्या जरा मागें पडल्या होत्या. या शिकलेल्या बायकांच्या पाठोपाठ जी टोळी आली तिच्यामध्यें बरींच मुलें होतीं. कोणी चौकशी केली असती तर त्याला आढळून आलें

असतें कीं, ज्या बोर्डिंगांत व घरांत अति कडक शिस्त ठेवण्यांत येते त्यांमधलींच हीं बहुतेक सर्व मुलें होतीं !

सभागृहांतली मौज याहून निराळीच होती. एका राजकीय सभेला त्या दिवशीं अंगठीवाल्या सरकारी नोकरांनीं इतकी गर्दी केली कीं, गुदमरून जाण्याची पाळी आली. पण प्लॅटफॉर्मवर असलेले शंभर एक लोक व खालीं हजार एक लोक एवढेच फक्त दृश्य होते. यांनींसुद्धां 'अप्रकाश अंगठ्या' बरोबर आणल्या होत्या. मनांतला हेतु असा कीं, वक्त्याचें भाषण नीरस होऊं लागलें, किंवा बेसुमार लांबलें, तर अदृश्य होऊन तेथून निसटतां यावें आणि तसा प्रसंग त्याच दिवशीं एके ठिकाणीं आला. वक्त्याच्या भाषणाला संध्याकाळीं सहाला आरंभ झाला व तें नऊला संपलें ! या वेळीं प्लॅटफॉर्मवर शंभरांपैकीं दहाजण शिल्लक असतील. हे लोक तरी कां राहिले होते, म्हणाल तर अध्यक्ष विद्वान् म्हणून प्रसिद्ध असलेले गृहस्थ होते, त्यांचें भाषण ऐकण्याची संधि पुष्कळ दिवसांत आलेली दवडण्याची त्यांची इच्छा नव्हती. वक्त्याचें भाषण झाल्यावर या थोड्याच लोकांनीं इतक्या आनंदानें, उत्साहानें व जोरानें टाळ्यांचा कडकडाट केला कीं, वक्त्यांना बरें वाटलें कीं वाईट वाटलें हें सांगतां येत नाहीं. पुढें अध्यक्षांचें भाषण सुरू झालें. घरून पुष्कळ तयारी करून योजिलेले सर्व विचार श्रोतृसमाजास ऐकविण्याचा त्यांचा निश्चय झाला असल्यामुळें त्यांचें भाषण दहा वाजले तरी संपलें नाहीं. अखेर संपलें तेव्हां त्यांना बरीक वक्त्यांप्रमाणें टाळ्यांचा गजर मिळाला नाहीं. कारण, सेक्रेटरीशिवाय तेथें दुसरें कोणी हजरच नव्हतें ! प्लॅटफॉर्मवरच्या प्रतिष्ठित लोकांनीं व त्या दिवशींच्या वक्त्यांनींसुद्धां 'अप्रकाश अंगठी'चा उपयोग करून घेऊन घराची वाट धरली होती. सेक्रेटरींनीं अध्यक्षांचे उत्तम काम केल्याबद्दल लांबलचक आभार मानले, व जागेच्या मालकाचे जागा देण्याबद्दल लांबलचक आभार ते मानणार होते इतक्यांत टेबलावरील वालशिटांतील मेणबत्ती विझली आणि त्यांनीं अध्यक्षांच्या खुर्चीकडे पाहिलें तों तेथें कोणीच नाहीं असें त्यांना दिसलें !

दुसऱ्या एका सभेंत अशीच मौज झाली. एक प्रागतिक पक्षाचे गृहस्थ राष्ट्रीय पक्षांतील गृहस्थांवर तुटून पडले व म्हणाले "हे जहाल लोक राष्ट्रघातकी आहेत, हे स्वार्थसाधु आहेत, यांना राष्ट्रापेक्षां आपला मान अधिक आहे, हे लोकांना फसवून त्यांचे पैसे लुबाडीत आहेत." अशा

रीतीनें आरंभ केलेलें भापण शेवटीं इतक्या थराला गेलें कीं, त्यांच्याच पक्षांतील एका समंजस मनुष्याला चीड येऊन 'मोजुनि माराव्या पैजरा' अशी इच्छा झाली. पण प्रतिष्ठितपणामुळें हें करतां येईना. इतक्यांत 'अप्रकाश अंगठी' आणल्याची त्याला आठवण झाली आणि त्यानें पायांतला चढाव काढून वक्त्याचे गाल रंगवले. अध्यक्षांना काय झाले हें समजेना, पण वक्ते रक्तबंबाळ होऊन प्लॅटफॉर्मवर पडलेले पाहून त्यांनीं स्वयंसेवकांकडून त्यांना डॉक्टरांकडे पाठविले व सभेच्या कामास पुनः सुरुवात केली.

आतां राष्ट्रीय पक्षांतील एक ज्वलद्देशाभिमानी गृहस्थ बोलण्यास उठले व त्यांनीं प्रस्तुत विपय सोडून देऊन सामाजिक सुधारक लोकांचा उद्धार त्या राजकीय सभेंत केला व " हे लोक स्वतःच्या कामविकारप्रेरणेनेंच सुधारणांचे बंड काढतात–" इत्यादि अनर्गल प्रलाप ते करूं लागले. हें पाहून तरुण पिढींतील एका राष्ट्रीय गृहस्थाचा राग अनावर झाला, व त्यानें 'अप्रकाश अंगठी'ची कळ दाबली आणि अदृश्य होऊन त्या वक्त्याला प्लॅटफॉर्मवरून खालीं फेकून दिलें! सभेंत हाहाःकार उडला. ज्यांना 'अप्रकाश अंगठी'ची बातमी कळलेली नव्हती, त्यांना भुताटकीचा कांहीं तरी येथें प्रकार आहे असें वाटले व ते घाबरून तेथून पळून गेले. बाकीच्यांना खऱ्या प्रकाराचें अनुमान करतां येत होतें, पण नक्की मनुष्य पकडणें शक्य नव्हतें. आमच्या वक्त्याला तुमच्यापैकींच कोणींतरी इजा केली असें मवाळ व जहाल पक्षांतले लोक विरुद्ध पक्षाच्या लोकांना बोलूं लागले व सभेंत एकच गोंधळ उडाला. अखेर पोलिसांनीं 'मध्यस्थी' करून कांहींजणांचीं टाळकीं शेकलीं आणि तेव्हां कुठे सार्वजनिक शांतता रक्षण केल्याचें त्यांना समाधान झालें!

'अप्रकाश अंगठी'नें दुसरीकडे एका गल्लींत जो अनर्थ उडविला त्यांत रक्तपात नव्हता, पण नैतिक अधःपात अधिक होता. 'लोक पाहतील' ही आतां भीति नसल्यामुळें किती तरी 'प्रतिष्ठित' लोक वारांगनांच्या माडीचे जिने चढूं लागले. कांहीं वेश्यांच्या लहान खोल्या त्या दिवशीं गच्च भरून गेल्या. खोली गांठल्यावर अंगठीची 'तिरस्करिणी' टाकली गेली, पण आपले पतिराज अमक्या अमक्या बाईकडे जातात असा पुष्कळ दिवस संशय असलेल्या कांहीं बायका अंगठी घालून पतीला

पकडण्याकरितां तेथेंच आल्या होत्या त्यांनींहि जेव्हां आपली 'तिरस्करिणी' टाकली तेव्हां एकमेकांची तेथें चांगलीच ओळख पटली !

एका वेश्येची मुलगी आपल्या हीन धंद्यास कंटाळून गेलेली होती. तिची आई तिला 'हा आपला परंपरागत धर्म आहे' असें सांगत असे; पण त्या मुलीला हा धंदा मुळींच पसंत नव्हता. परंतु आईच्या विरुद्ध जाण्याचें नैतिक धैर्य तिच्यामध्यें नव्हते. आई वारल्यावर तिनें निश्चय केला कीं, आतां हा धंदा सोडावयाचा. पण पुढे कसा काय चरितार्थ चालेल या भीतीनें तिच्या मनाची चलबिचल होत होती. 'अप्रकाश अंगठी'चा शोध जाहीर झाला त्या दिवशीं संध्याकाळीं ती स्नान करून रामपंचायतनाजवळ आपल्या परीनें पूजा करीत बसली होती. " रामा, तूं अनेक पापिणींचा उद्धार केला आहेस. तूं आतां माझा उद्धार करशील का ? आजपासून मी पापाचरण सोडून देणार आहे. हा निश्चय कायम टिकण्यासाठीं मला तूं साहाय्य केलें पाहिजेस. मला स्वप्नांत नाहीं तर केव्हां तरी दृष्टांत दे, म्हणजे माझें मन प्रसन्न होईल व निश्चय दृढ होईल." अशा प्रकारची प्रार्थना करून तिनें देवापुढचें तीर्थ घेतलें, व दोन थेंब डोळ्यांना लावले व डोळे पुनः उघडून पाहते तो तिला एका स्वामींची भव्य मूर्ति, पादुका घातलेली, भगवीं वस्त्रें धारण केलेली, अशी दिसली ! तिला वाटलें, प्रत्यक्ष श्रीरामचंद्रानें आपणांस दर्शन दिलें आहे ! ती लगबगीनें उठली व पदर सावरून त्या मूर्तीची गंधाक्षता वाहून पूजा करूं लागली. हें पाहून स्वामी म्हणाले " बाई, मी पूजा घेण्याकरितां येथें आलेला नाहीं." पण त्या पश्चात्तापदग्ध वारयुवतीनें भक्तिपूर्वक पूजा करून स्वामींना निरांजन ओवाळलें तेव्हां स्वामी ओशाळले व कांहीं न बोलतां माडी उतरून 'अप्रकाश अंगठी'च्या साहाय्यानें अदृश्य झाले व आपल्या मठाचा मार्ग चालूं लागले !

या अंगठीचा प्रभाव लोकांच्या बोलण्याचालण्यावर जो झाला तो सांगतां पुरवत नाहीं. डिटेक्टिव्ह लोकांनीं या अंगठ्या घेतल्यामुळें कोठेंहि राजकीय गोष्टी बोलण्याची सोयच नाहींशी झाली. शेजाऱ्यापाजाऱ्यांवर टीका करावी तर तेहि आसपास अदृश्य होऊन उभे असतील, नाहीं कोणीं म्हणावें ! या भीतीनें भाषणांतील लोकनिंदेचें अंग अजिबात गळालें. संभाषणरूपी फळांतील लोकनिंदेचा रस गळून गेल्यावर कोरड्या साली व बिया कोणाला आवडणार ? कोणाला कोणाशीं कांहीं बोलण्याचा उत्साह वाटेना.

चाकरांनीं धन्याची निंदा करावी म्हटलें तर धनी कदाचित् अंगठीची कळ दाबून आपलें दृश्य स्वरूप तेथें एकदम दाखवावयाचा! अशाच भीतीनें लोक-नायकांचीं, मित्रांची, गुरूंची, शिष्यांची, ओळखीच्या किंवा अनोळखी माणसांची, कोणाला कांहीं निंदा म्हणून करण्याची सोय उरली नसल्यामुळें बहुतेकांनीं आपलें तोंड शिवून घेतल्यासारखें झालें.

रात्रीं नाटकगृहांत निराळयाच प्रकाराची मौज झाली. बायकांच्या जागा त्या दिवशीं अर्थात् सगळ्या भरून गेल्या; पण खुर्च्यांवरच्या व मजल्यावरच्या पुरुषांनीं दुर्बिणी लांबआखूड करकरून त्या बाजूकडे पाहिलें; पण एक स्त्री दृश्य असेल तर शपथ! हें पाहून अनेक शोकी गृहस्थांनीं रागानें दुर्बिणी बाजूला टाकल्या. 'ज्या संसारांत स्त्रिया नाहींत, ज्या नाटकांत बायकांचीं पात्रें नाहींत, ज्या नाटकगृहांत बायका नाहींत, तो संसार कसला, तें नाटक कसलें व तें नाटकगृह कसलें?' असें म्हणून कित्येक लोक नाटक पहावयाचें सोडून निघून गेले! पण नाटकगृहांतील लोकसंख्या यामुळें कांहीं रोजच्या-पेक्षां कमी झाली नाहीं. कारण 'अप्रकाश अंगठी' घालून कितीतरी लोक त्या दिवशीं आंत फुकट घुसलेले होते! कांहीं लोकांनीं आपल्या घर-च्या स्त्रियांना पुरुषांच्या खुर्च्यांवरच आपल्याजवळ बसविलें होतें, पण हलकट लोकांच्या नेत्रांपासून त्यांना त्रास होऊं नये म्हणून त्यांनीं स्त्रियांच्या बोटांत वरील आंगठ्या दिल्या होत्या. पण यामुळें असें झालें कीं, मिशांसकट सर्व केसांची गुळगुळीत श्मश्रू करून घेतलेले एक वृद्ध, पण धिप्पाड व गलेलठ्ठ पुरुष अप्रकाश अंगठी घालून तेथें आले होते त्यांना तेथील खुर्चीवर कोणीं बसलेले नाहीं असें वाटलें व ते एका चवदापंधरा वर्षांच्या मुग्ध बालिकेच्या मांडीवर बसले त्यामुळें ती मुग्धा चेंगरून गतप्राण होण्याच्या बेतांत आली!

* * * *

अशा प्रकारचे आपल्या शोधापासून अनर्थ होतील अशी प्रफुल्लबाबूंना कल्पनाहि नव्हती! पण त्याना जेव्हां असल्या प्रकारच्या हजारों आपत्तींची दुसऱ्या दिवशीं हकीगत कळली, तेव्हां त्यांना आपल्या अंगठ्या विकण्याचें काम बंद ठेवावें कीं काय असें वाटूं लागलें. 'लोक काय म्हणतील?' या भीतिदायक विचाराच्या जाचांतून व दास्यांतून पुरुषांना व स्त्रियांनाहि

सोडविल्याचें आपणांस श्रेय मिळेल असें त्यांना वाटत होतें; पण आपल्या अंगठीच्या योगानें भलतेच परिणाम घडून येत आहेत हें पाहून त्यांच्या कोमल मनाला अतिशय दुःख झालें.

पण त्यांच्या नशिबीं याहूनहि अधिक दुःख पहावयाचें होतें. 'अप्रकाश अंगठी'चा शोध लागल्यानंतर एक महिन्याच्या आंतच दिल्ली येथील बॉम्बचा प्रसिद्ध स्फोट झाल्यामुळें या अंगठीचा आणि बाँबचा कांहींतरी संबंध असला पाहिजे, अशी कांहीं पोलिसांना कल्पना सुचली. झालें. प्रफुल्ल-कुमुदांना एका तासाच्या आंत पोलिसठाण्यावर नेण्यांत आलें! कोणा कोणाला अंगठ्या विकल्यात या प्रश्नाचे प्रफुल्लबाबूंना नांवनिशीवार उत्तर देतां न आल्यामुळे त्या पोलिसांच्या सुपीक डोक्यांतला संशय दृढ झाला. सौम्य समजावणीनें प्रफुल्लबाबू कबूल होईनात, तेव्हां समजावणीच्या इतर बहुतेक सर्व संस्कारांचा त्यांना यथाविधि अनुभव मिळाला. शेवटीं 'थांबा, थांबा, सर्व सांगतो,' असें म्हणून त्यानीं वेळ मागून घेतला, व संधि साधून खिशांतल्या एका अंगठीची कळ दाबली व अदृश्य होऊन त्यानीं तेथून पळ काढला.

घरीं येऊन पाहतात तों अंगठीसाठीं अंगणांत बायांची, मुलींची, मुलांची, मोठ्या माणसांची, म्हातारे-म्हाताऱ्यांची, सुधारक-उद्धारकांची, सुशिक्षित-अशिक्षितांची, साहेबांची-मडमांची गर्दी उडून राहिली आहे! पण अंगठीच्या व्यापारापासून लोकांचे व आपलेंहि हितापेक्षां अनहित अधिक होणार, हें दोन दिवसांच्या अनुभवानें चांगले निदर्शनास आल्यामुळें त्यांनीं आपल्या बायकोच्या कानांत कानगोष्ट सांगितली व आपण कोठें जाणार व राहणार याबद्दल तिला माहिती देऊन पोलिसांच्या व गिऱ्हाइकांच्या त्रासां-तून मुक्त होण्याकरितां नांवगांव बदलून ते कोठे गुप्त झाले ते अद्यापिहि गुप्तच आहेत!



# अलीगड किल्ल्यांतील एक रहस्य : : ४

गेले पंधरा दिवस हिमालयावर माजलेलें धुक्याचें तमोयुग संपून सूर्य बाहेर निघाल्यावर प्रकाशयुग अवतरलें. कोठें तळहाताएवढाहि ढग आकाशांत उरला नाहीं. एकंदर पक्षीगण घरटीं व इतर आश्रयस्थानें सोडून बाहेर स्वारीवर निघाला. पाऊस थांबला होता, तरी पूर्वसंचित ओसरण्याला कांहीं काळ लागतोच त्याप्रमाणें, डोंगरमाथ्यावरचें पाणी ओहोळांतून अजून झुळझुळ वाहतच होतें. अशा सुप्रसन्न वेळीं मी व माझा वृद्ध स्नेही पंडित अयोध्याप्रसाद असे दोघे बाहेर पडलों. दोन आठवडे घरांतल्या घरांत बसून पाय आंखडले होते, त्यांची रग जिरविण्याकरितां चांगलें दोन कोस हिंडलों व मग विश्रांति घेण्याकरितां तारादेवीच्या चौथऱ्यावर पाय सोडून गप्पा मारीत बसलों. अयोध्याप्रसाद म्हणाला, “ गेले पंधरा दिवस हा पर्वत, या दऱ्या, यांना इंद्रानें जणूं काय बाटविलें होतें ! ”

मी म्हणालों, “ मग आतां सूर्यानें त्याना पुनः शुद्ध करून घेतलें म्हणावयाचें. पण त्यांना ‘बाटविलें’ होतें असें म्हणण्याचें कारण ? ”

अयोध्याप्रसाद म्हणाला, “ त्यांचा नेहमींचा ‘धर्म’ स्वच्छ व प्रसन्नमुख राहण्याचा आहे म्हणून.”

मी म्हणालों, “ इकडे तुम्हां लोकांच्या डोक्यांतच शुद्धिसंघटनेच्या कल्पना आमच्यापेक्षां अधिक खोल गेलेल्या दिसतात. कारण तुमच्या उपमादेखील शुद्धिसंघटनेच्याच येतात. आमच्याकडेदेखील या चळवळी सुरू आहेत; पण त्यांवरून उपमा, रूपकें सुचविण्याइतक्या खोल त्या अद्यापि गेलेल्या नाहींत.”

अयोध्याप्रसाद म्हणाला, “ त्यांतल्या त्यांत शुद्धीची कल्पना आमच्याकडेदेखील कांहींशी नवीच आहे, पण बाटविण्याचा जुलूम मात्र फार जुना आहे.”

यावरून याच विषयावर आणखी कांहीं गोष्टी झाल्या. शेवटीं तो म्हणाला, “ बसल्या बसल्या वेळ जायला तुम्हांला एक गोष्ट सांगतों. ती

माझ्या प्रत्यक्ष आजाची आहे. त्यानें माझ्या वडिलांना ती सांगितली व त्यांनीं ती मला सांगितली; पण गोष्ट तुमच्यावरूनच आठवली."

मी आश्चर्यानें म्हणालों, " आणि ती हो कशी ?"

अयोध्याप्रसाद म्हणाला, "१८०३ च्या सुमारास अलीगड मराठ्यांच्या स्वाधीन होता असें म्हणतात ना ? "

मी म्हणालों, " त्या सुमारास असावा; पण वर्ष पक्कें लक्षांत नाहीं."

अयोध्याप्रसाद म्हणाला, "तें असो. गोष्ट अलीगडासंबंधाची आहे, म्हणून तुम्हां मराठ्या गृहस्थाला पाहून आठवली."

मी म्हणालों, " पहा, कशास काय संबंध ? अलीगड कुठें ? तुम्ही कोण ? मी कोण ? योगायोग तो असा. असो. गोष्ट तर सांगा पाहूं."

अयोध्याप्रसाद म्हणाला, " हीच तर या जगांत मौज ! पुरात वाहून आलेल्या काटक्याकुटक्या कुठल्याच्या कुठें येऊन भेटतात. गीतेंत म्हटलेंच आहे ना–" यथा काष्ठं च काष्ठं च समेयातां महोदधौ–"

मी उत्सुकतेनें म्हणालों, " तुमच्या वेदान्तांत गोष्ट विसरून जायची एकादी; तर ती आधीं सांगा पाहूं. नाहींतर आपण घरापाशीं गेल्यावर 'समेत्य च व्यपेयातां तद्वत् भूतसमागमः' हा दुसरा चरण म्हणण्याची पाळी येईल ! "

अयोध्याप्रसाद म्हणाला, " ठीक आहे, सांगतोंच तर. मात्र मी म्हणजे माझा आजाच समजा हां क्षणभर ! "

मी म्हणालों, " कांहीं चिंता नाहीं. 'आत्मा वै पुत्रनामासीत्' या वाक्याऐवजीं 'आजा वै पौत्रनामासीत्' असें गमतीनें म्हणूं."

" ठीक " असें म्हणून त्यानें तोंडांतला तंबाखूचा बार थुंकून टाकला आणि गोष्ट सांगण्याला प्रारंभ केला.

— १ —

मध्यरात्रीची वेळ. समोर ओसाड अलीगड किल्ल्याचें पटांगण. मी एकटाच देवडीवर पहारा करीत बसलों होतों. सोबतीला फक्त वारा घोंघावत होता. पहिल्या रात्रीं झोंप घेऊन सोबत्याला सोडवून पहारा घेतला. त्याला एकदोन घटकाच झाल्या होत्या, खडखडीत जागा होतों. यामुळें कल्पना-तरंग मनांत एकामागून एक उठत.

एक वेळ वाटलें आमच्या कप्तानसाहेबांनीं या किल्ल्यावर उगाच पहारा ठेवला. आंत रक्षण कशाचें करायचें ? शून्याकाराचें ? मग वाटलें पहारा ठेवला तेंच बरोबर. किल्ला म्हणजे लष्करी ठाणें. दिवसारात्रीं माणूस जागतें हवें. मूळ किल्ला बांधला मुसलमानांनीं. त्यांच्यापासून तो पुढें मराठ्यांनीं घेतला. त्यांच्यापासून इंग्रजांनीं घेतला. अजून शत्रूच्या सैन्याच्या हालचाली आजू-बाजूला होत होत्या. चुकून एखाद्या वेळीं दगा व्हावयाचा म्हणून पहारा ठेवला तोच बरोबर.

किल्ल्याच्या वेशीला मीं आंतून अडसर लावला होता. कोणी दार उघडण्याची भीति नव्हती. शिवाय चांदणें पिठासारखें पडलें होतें म्हणून सहज वाटलें मोकळ्या पटांगणांतून हिंडून पायहि थोडे मोकळे करावे.

पटांगणाच्या दोन बाजू हिंडून झाल्या. तिसऱ्या बाजूला निघालों व बुरुजाचा निम्मा भाग ओलांडला. इतक्यांत कांहींतरी आवाज ऐकलासा वाटला. त्याबरोबर थबकून उभा राहिलों. कानोसा घेतला. तों आवाज खराच. भ्रम नव्हे. पण आवाज कसला ? होय. कोणीतरी, कशानें तरी, कोठें तरी खणीत असावें; पण बुरुजाच्या पोटांतून आवाज निघतो हें कसें ? तसाच पुढें गेलों. बुरुजाची अर्ध प्रदक्षिणा पुरी झाली. इतक्यांत बुरुजाला एक दार दिसलें. दाराच्या बाजूला उभा राहून फटींतून पाहिलें तों एक पणती लुकलुकत असून तिच्या उजेडांत कोणीतरी कुदळ घेऊन खणीत होतें.

कितीतरी कल्पना एकदम मनांत आल्या ! कोणी सुरुंग खणीत असेल ! पण हल्ल्याची बोलवा नाहीं ! कोणी चोरी करीत असेल ! पण ओसाड किल्ल्याच्या बुरुजांत चोराला काय लभ्यांश ? कोणी घर बांधण्या-करितां दगडमाती चोरून नेत असेल ! पण त्यांना बाहेर काय तोटा ? हां ! कोणी एखादा मुडदा तर पुरीत नसेल ? होय. याचा मात्र सर्वांत अधिक संभव ! या विचारानें प्रथम थोडी भीति वाटली. बुरुजांतल्या निरुंद जागेंत युद्ध करण्याचा प्रसंग ! पण कमरेला तरवार होतीच. कांहीं असो. खण-गाराचा पुरा शोध लावण्याची इच्छा मात्र अनिवार झाली. तरवारीच्या मुठीला हात घालून निघालों. माझी चाहूल लागतांच खणणारी आकृति किंचित् थांबली. तिनें इकडेतिकडे पाहिलें आणि मी आणखी थोडा पुढें जातांच ती भयंकरपणें किंचाळून धाडकन् खालीं पडली.

क्षणभर थांबून, किंचाळी ऐकून तिचा कोणी सोबती मागून येत

आहे की काय हें पाहिलें, आणि कोणी येत नाहीं असें वाटल्यावर थेट पुढें गेलों. पाहतों तों एक स्त्री निश्चेष्ट पडली होती. आतां काय करावें? ही सावध कशी होणार? फेट्याच्या पदरानें वारा घालून पाहिला. फुकट! मला वाटलें देवडीवर माझा लोटा पाण्यानें भरलेला आहे तो आणावा आणि पाणी शिंपडून पहावें. म्हणून तसाच धांवत गेलों आणि लोटा घेऊन आलों. पण चमत्कार असा झाला, कीं इतक्यांत पणती विझून अंधार-गुडूप झाला होता! अंधारांत पुढें जावें तर, खरें बोलायचें म्हणजे, दग्याची भीति वाटली. पुन्हा परत आलों. धुमी फुंकून काटक्या पेटविल्या. फेटा फाडून पलिता बनविला. आणि तो काठीवर खोंवून परत येऊन बुरुजांत शिरलों. पाहतों तों खणण्याची कुदळ तशीच पडली होती; पण ती आकृति मात्र अदृश्य झाली! आसपास पाहिलें तों एक ठेंगणें कवाड दिसलें, उघडावें म्हणून ढकललें तों तें बाहेरून बंद!

जिवाला चुटपुट लागली. जमीन दोन बोटांहून अधिक खणली नव्हती. वाटलें कीं, कदाचित् खणणारी व्यक्ति फिरून उद्यां येऊन आपलें काम पुरें करूं पाहील. तसें झाल्यास गूढ उकलेल. मग तसाच देवडीकडे परत फिरलों. नंतरहि दीड प्रहरभर किल्ल्याच्या पटांगणांत पिठासारखें शुभ्र चांदणें पडलेंच होतें. पण मला त्याची एक वेळहि आठवण झाली नाहीं. उजाडतांच पथारी गुंडाळून निघालों. सकाळीं पहाऱ्याची वर्दी देण्याकरितां हेडक्वार्टरच्या ग्याटाकडे चाललों तों सर्व वाटभर मनांत काहूर माजलें होतें. वर्दी देतांना कप्तानसाहेबाला किल्ल्यांत रात्रीं दिसलेला प्रकार सांगूं कीं नको? अखेर मनाचा निर्णय झाला कीं सांगूं नये, व फिरून तोच पहारा मिळाला तर पहावा.

तंबूंत कप्तानसाहेब तंबाखूची पाईप ओढीत बसला होता. त्यानें माझा सलाम घेतला व हंसत विचारिलें—

"काय हरप्रसाद, तुझा किल्ला काय म्हणतो? वर्दी सगळी बरोबर?"

मी म्हणालों, "होय, साहेब." पण शब्दशः खोटें बोलवेना. मीं झट्दिशीं कांहीं निमित्त करून तोंडच फिरविलें.

फिरून कप्तानसाहेब म्हणाला, "ठीक आहे. आज रात्रीं तूं पहारा कोणता घेणार?"

मला आयतीच संधि मिळाली. मीं सहज बोलल्यासारखें दाखवून

म्हटलें, " खावंद, कालच्याच पहाऱ्यावर जाण्याला माझी कांहीं हरकत नाहीं." तोंड म्हणालें, 'हरकत नाहीं,' मन म्हणत होतें, 'इच्छा आहे!'

कप्तानसाहेब म्हणाला, " ठीक आहे, तुझी इच्छा असेल तर तोच पहारा घे."

जवळच समीउल्ला पलटणीची डायरी लिहीत बसला होता. त्यानें आमचीं प्रश्नोत्तरें ऐकून हात थांबवून हळूच मान वर करून माझ्याकडे पाहिलें. रोज पहारा बदलण्याची रीत होती. मलाहि ती माहीत. असें असतां कप्तानसाहेबानें मला तोच पहारा फिरून दिला याचें त्याला आश्चर्य वाटलें नाहीं. पण मीं तो मागितला याचें त्याला विशेष आश्चर्य वाटलें असावें. कप्तानसाहेबाचें आश्चर्य न वाटण्याचें कारण साहेबाची माझ्यावर मर्जी होती म्हणून मीं मागितलेली ही साधी सवलत तो देणारच अशी त्याची खात्री होती. पण त्याला माझें आश्चर्य वाटण्याचें कारण हें असावें कीं, या ओसाड किल्ल्याच्या पहाऱ्याला जो जातो त्याला भीति वाटते व तो पहारा कांहीं कारणानें दिला तर हटकून टाकतो. समीउल्लाला आश्चर्य वाटलें, पण तो साहेबापुढें माझ्याशीं काय बोलणार? त्यानें कपाळाला खोल विचाराची आठी मात्र घातली.

समीउल्ला व मी एकदमच नोकरींत शिरलों होतों. त्यापूर्वी त्याची माझी मैत्री असे; पण ती पुढें नष्ट होण्याचें कारण असें:–समीउल्ला हा प्रथम हिंदु होता, त्याचें नांव तेव्हां रामभरोसी असें होतें. पण लष्करांत मोठी नोकरी मिळवून देण्याचें आमिष दाखवून एका मौलवीनें त्याला धर्मांतर करावयाला लावलें. पुढें नोकरी मिळाली; पण ती मोठी मिळाली नाहीं. मी हिंदु असतां मला जेवढी नोकरी मिळाली तेवढीच त्याला धर्मांतर करून मिळाली! शिवाय लोक त्याची निंदा करूं लागले, गांवांत मान उरला नाहीं. 'ये देख अल्लाके प्यारे' असें म्हणून चावट लोक त्याची थट्टा करीत. 'धर्म घालवून काय मिळविलेंस?' असें म्हणून माझें उदाहरण त्याला देत, आणि पुढेंहि दैव असें, कीं मी वाढत जाऊन नाईक तरी बनलों आणि तो मात्र साधा शिपाईच राहिला. कप्तानसाहेबांच्या कृपेमुळें मला त्याला पांचचार वेळां वरिष्ठ म्हणून हुकूम करण्याचेहि प्रसंग आले. हें सर्व वैषम्य मनाला बोंचून त्यानें माझ्याशीं बोलणें जवळजवळ सोडलें होतें. जुनीच ओळख म्हणून क्वचित् सलामी झडे.

— २ —

असो. या दुसऱ्या रात्रीं फिरून मी पहाऱ्यावर गेलों. मध्यरात्र उलटल्यावर आदल्या दिवसाप्रमाणें त्या बुरुजाकडे निघालों.

बुरुजाकडे तोंड करून जात असतां वर पाहून मी एकदम दचकलों. कारण तटावर कोणातरी मनुष्याची आकृति उभी असावी असा मला भास झाला, पण निर्णय होईना. आणि शंकेच्या दारांतून भुतें आंत येतात हा अनुभवच आहे! अलीगडच्या किल्ल्यांत भुताटकीचे प्रकार होतात, हें मला ऐकून ठाऊक होतें. तेव्हां तीच कल्पना मनांत कां न यावी? तथापि भुतांबितांना भिणारा हा गडी नव्हता. आणि मीं आंतल्याआंत मन घट्ट केलें. याचाच परिणाम म्हणून कीं काय ती आकृति दृष्टिआड झाली. एक वेळ आकृतीची ठेवण—ढब समीउल्लासारखी वाटली. पण ती दृष्टिआड झाल्यावर तिचा अधिक विचार मी कशाला करूं?

पण आज बुरुजांत शिरतांना मीं कालची चूक मात्र केली नाहीं. काल प्रथम त्या स्त्रीच्या दृष्टीला पडलों म्हणून ती एकदम घाबरली. आज दाराआड उभा राहून प्रथम आश्वासनपर शब्द मऊ आवाजांत उच्चारिले, "देवी, माते, भिऊं नको." हे शब्द ऐकून ती स्त्री खणण्याची थांबली; पण घाबरली नाहीं. मलाहि इतकें आश्वासन पुरें झालें. मी बुरुजांत शिरलों व फिरून तेच शब्द मीं आणखी एकदां उच्चारले. ती म्हणाली, "तुम्ही कोण आहां?"

मीः—मी या किल्ल्याचा रखवालदार आहें.

तीः—मीं तुमचा मोठाच गुन्हा केला; माफ करा.

मीः—तुम्हीं माझा गुन्हा केला हें अगदीं खरें आहे. पण तुम्ही येथें कशाला आलां व काय करीत होतां हें कळलें म्हणजे मग तुम्हांला माफी करतां येईल कीं नाहीं हें पाहीन!

तीः—हा रे देवा! आज किल्ल्यांत यायला मला बंदी आहे. पण एक वेळ या किल्ल्यांतच माझें घर होतेंना!

मीः—काय तुम्ही या किल्ल्यांत राहत होतां?

तीः—होय. जुन्या किल्लेदाराचे आम्ही नातलग होतों. मात्र आम्ही एका स्वतंत्र घरांत राहत होतों.

मीः—म्हणूनच वाटतें तुम्हांला किल्ल्यांत शिरण्याची गुप्तवाट ठाऊक आहे ?

तीः—होय. लहानपणीं ती माझी लपंडाव खेळण्याची जागा होती. तीच प्रौढपणीं आज मला संकटकालीं उपयोगी पडली ! रखवालदारसाहेब, किल्ल्यावर तुमचा हक्क असो; पण माझ्या लहानपणच्या खेळाच्या जागेवर माझा हक्क नसावा काय ?

मीः—पण तुम्ही किल्ल्यांत परवानगीशिवाय शिरलां, इतकेंच नव्हे तर या बुरजांतली जागा तुम्हीं खणली आहे ती कां ?

तीः—त्यांत माझे प्राण राखून ठेवले आहेत म्हणून.

मीः—म्हणजे काय ?

तीः—तें तुम्हीं मला अभय दिल्याशिवाय सांगणार नाहीं.

मीः—पण मी या किल्ल्याचा रखवालदार असलों तरी मालक नाहीं हें तुम्हांला माहीत आहे ?

तीः—पण मी जें खणून नेणार होतें, त्यानें तुमच्या किल्ल्याच्या मालकाचें एका काडीइतकेंहि नुकसान होणार नाहीं, असें असलें तर मग अभय द्याल कीं नाहीं ?

मी खरोखरच मोठ्या बुचकळ्यांत पडलों. कदाचित् या बाईचा ठेवा मोठ्या किंमतीचा नसेल. पण किल्ल्यांतील मिळकतीसकट किल्ला आतां इंग्रज सरकारच्या मालकीचा झाला आहे. तेव्हां त्यांतली एखादी काडी तरी हलवूं देण्याचा मला काय अधिकार? तथापि मनाचा धीर करून मी म्हणालों, “ठीक आहे. अभय आहे. बोला.”

तीः—या जागेंत माझे पूजेचे देव ठेवले आहेत.

मीः—काय? पूजेचे देव? इतके दिवस तुम्ही घरीं कशाची पूजा करीत होतां ? आणि किल्ला सोडून जातांना तुम्हीं ते बरोबर कां नेले नाहींत ?

मीः—जातांना देवांचें रक्षण व्हावें म्हणून ते इथें ठेवले. आज माझें रक्षण व्हावें म्हणून मी ते घेऊन जात आहें. पण तुम्हीं मला खणतांना पाहिलें ! आतां मला ते खणून नेऊं देणार ? तुम्हीं अभय दिलें तें खरें ना ?

मीः—होय, अभय दिलें तें खरेंच आहे; इतकेंच नव्हे, तर मीच जमीन खणून देव वर काढून तुमच्या स्वाधीन करतों. मला तुमची सर्व हकीकत ऐकण्याची फार उत्कंठा लागली आहे. पण आतां तितका वेळ

नाहीं. या वेळीं मी आधीं तुमचें काम करून देतों. हकीकत मग कोठें तरी— केव्हां तरी ऐकेन.

असें म्हणून मीं अस्तन्या सारून हातांत कुदळ घेतली आणि तिनें पूर्वी खणल्या जागींच खणूं लागलों. हें पाहून ती गहिंवरून रडूं लागली. “ देव तुमचें कल्याण करो. माझा संसार तर संपलाच होता, पण उरला माझा धर्म तोहि जाणार होता, तो आतां वांचेल. देव तुमचं कल्याण करो ! ” असें वरचेवर म्हणून ती स्फुंदून रडूं लागली, आणि आपणहि मला कांहींतरी मदत करावी म्हणून ती खणलेली माती हातांनीं बाजूला सारूं लागली.

सुमारें अर्धा तास खणल्यावर कापडांत बांधलेली एक पेटी लागली. ती वर काढून मी म्हणालों, “ हीच का तुमची देवांची पेटी ?”

तिनें झेंप घालून ती हातांत घेतली, कपाळाला हात लावून आंतल्या देवांना वंदन केलें व रडत रडत म्हणाली, “ झालें, माझें काम झालें. आतां माझा धर्म वांचेल.”

या तिच्या निष्ठावंत उद्गारांनीं माझी उत्कंठा अधिकच वाढली व मी म्हणालों, “ बरें, मीं आपलें वचन खरें केलें ना ? आतां तुम्ही आपली हकीकत केव्हां सांगणार ? ”

इतक्यांत तटावर कोणीतरी एकाद्या रंगेल गझलाची आवडती ओळ मोठ्यानें म्हटल्यासारखा आवाज आला. मी व ती दोघेहि दचकलों. मी म्हणालों, “ बाई, आतां येथें अधिक वेळ राहतां येत नाहीं.”

ती म्हणाली, “ तटावर कोणींसें गाणें म्हटलें. तो माझ्या भावाचा आवाजसा वाटला. पण तो इथें कसा आला ?”

मी म्हणालों, “ तुमच्या भावाचें नांव काय ? ”

ती म्हणाली, “ हल्लींचें त्याचें नांव समीउल्ला असें आहे.”

माझा हात एकदम कपाळाकडे गेला. पण मी घाईनें म्हणालों, “ पण तुम्ही मला आपली हकीकत केव्हां सांगणार एवढेंच बोला, व एकदम निघून जा कशा.”

ती म्हणाली, “ मी रोज तिसऱ्या प्रहरीं भोलाघाटावरील देवळांत जात असतें. तुम्हीं तेथें आला तर मी माझी हकीकत सांगेन.” असें म्हणून तिनें देवांची पेटी काखेंत घेतली आणि उडी मारून ती भुयारी दारांतून निघून गेली.

मी क्षणभर गोंधळून गेलों; पण लगेच सावध होऊन पायांनीं भराभर कशी तरी माती खड्ड्यांत ढकलली आणि किल्ल्याच्या दरवाजाकडे परत आलों.

— ३ —

दुसरे दिवशीं सकाळीं मी नेहमींप्रमाणें कप्तानसाहेबांकडे वर्दी द्यायला गेलों, तेव्हां फिरून आदल्या दिवसासारखींच प्रश्नोत्तरें झालीं. फिरून रात्रीच्या पहाऱ्याचा प्रश्न निघाला. तेव्हांहि कप्तानसाहेबानें " तुला हवा तर तोच पहारा घे " असें सांगितलें. पण काल समीउल्ला गप्प होता तो आज बोलूं लागला. साहेबहि खुषींत होते. समीउल्ला म्हणाला, " साहेब, अलीगडच्या किल्ल्यांत भुताटकी आहे. मी तर तो पहारा आपण दिला तरी नाहीं म्हणेन. पण हरप्रसादाला तोच पहारा कसा आवडतो याचें आश्चर्य वाटतें."

साहेब हंसून म्हणाला, " सैतान का साथी सैतानहि होगा ! "

यावर बोलणें तितकेंच राहिलें. साहेब उठून जातांच समीउल्ला मला म्हणाला, " काय रे, हरप्रसाद, तुला त्या ओसाड किल्ल्यांत भीति कशी वाटत नाहीं कोण जाणे. आम्ही पूर्वी या किल्ल्यांत राहत होतों, तेव्हां रात्रीचें बाहेर डोकावण्याची आमची छाती होत नसे. बरें, पण एकदोन दिवसांच्या पाहण्यांत तुला कांहीं भूतचीत आढळलें कीं नाहीं ? "

मीहि दुहेरी अर्थानें म्हणालों, " होय बाबा ! काल तुझ्यासारखें एक भूत तटावर घस्त घालीत होतें खरें."

हें ऐकून समीउल्ला चपापला व विषय बदलण्याकरितां म्हणाला, " पण तेव्हां तूं काय करीत होतास ? "

मी म्हणालों, " त्याच्या गाण्याला खालीं ताल देत होतों."

परत घरीं आल्यावर पुन्हा पुन्हा समीउल्लाचेच विचार माझ्या मनांत घोळूं लागले. मीं मनाला अनेक प्रश्न केले पण उत्तर मिळेना.

तिसरे दिवशीं मी भोलाघाटावरील देवळाशीं गेलों. तों ती स्त्री तेथें पूर्वींच आली होती. तिनें मला आपली हकीकत सांगितली ती पुढें कळून येईलच.

त्या रात्रीं फिरून मी पहाऱ्यावर गेलों. मध्यरात्रीनंतर माझे पाय आपोआप बुरुजाकडे चालूं लागले, खणलेली जमीन पुनः पूर्ववत् नीट

करून ठेवावी, या कानाचें या कानाला न कळत हें सर्व प्रकरण संपवून मोकळें व्हावें, व फिरून हा पहारा मागूं नये, असें योजून पावलें मोजीत मी बुरुजाकडे चाललों. पण जागेशीं पोंहोचतों तों दोन गोरे शिपाई संगिनी लावून दाराच्या तोंडाशीं उभे असलेले दिसले. मी दिसतांच त्यांनीं 'कोण आहे ?' असें विचारलें व मी माझें नांव सांगतांच त्यांनीं मला कैद केलें.

दोन दिवसांनीं दवंडी देऊन कोर्ट मार्शल ( कोटमास ) भरलें. माझी चौकशी होणार असें मला वाटलेंच होतें. कोर्टानें माझी जबानी घेण्याला सुरुवात केली. माझ्यावर आरोप ठेवण्यांत आला कीं, किल्ल्यांत पहाऱ्यावर असतां बुरुजांत खणती लावून तेथील जवाहीर मीं काढून चोरून नेलें. मीं जबाबांत जवाहिराची गोष्ट नाकबूल केली. पण मीं जमीन खणली ही गोष्ट मात्र कबूल केली.

कोर्ट मार्शलचा मुख्य अधिकारी आमचा कप्तानसाहेबच होता. त्याची माझ्यावर मर्जी असल्याचें पूर्वीं सांगितलेंच आहे. मीं आपला बचाव करावा म्हणून त्यानें अनेक प्रकारचे प्रश्न करून पाहिले. शेवटीं निरुपाय होऊन मला शिक्षा दिली. आतां मला शिपाई घेऊन जाणार इतक्यांत एक स्त्री धांवत व रडत पुढें आली, आणि तिनें कप्तानसाहेबांच्या पायांवर लोळण घेतली. समीउल्ला जवळच होता. तिला पाहतांच तो रागानें लाल झाला. साहेबानें न सांगतांहि तो तिच्या हाताला धरून मागें ओढून लाथा मारूं लागला व म्हणाला, " तूं पडदा टाकून बाहेर कां आलीस ? येथें तुझें काय काम ? "

कप्तानसाहेबाला आश्चर्य वाटलें. तो समीउल्लाला म्हणाला, " काय रे, ही स्त्री तुझ्या ओळखीची दिसते ? " तो म्हणाला, " होय साहेब; ती माझी बहीण आहे; पण ती शुद्ध पागल आहे."

साहेब दयाळू होता. तो म्हणाला, " थांब, तिला सोड. तिचें म्हणणें मला ऐकून घेतलेंच पाहिजे."

समीउल्ला बाजूला झाला. साहेब म्हणाला, " बाई, तूं इथें कां आलीस ? येथें तुझें काय काम ? "

ती म्हणाली, " माझें नांव उमा. या परोपकारी हरप्रसादाला माझ्याकरितां तुरुंगवास सोसावा लागणार म्हणून ! "

साहेब म्हणाला, “ मग तूं त्याचा तुरुंगवास कसा चुकविणार ? तुझ्यापाशीं काय पुरावा आहे ? ”

असें म्हणतांच तिनें खाकेंतून कापडांत बांधलेली एक पेटी काढून साहेबापुढें ठेविली व म्हणाली, “ हरप्रसादावर किल्ल्यांतील जवाहीर चोरल्याचा आरोप आल्याचें ऐकलें. पण ही पेटी ! पहा, यांत काय आहे तें ! परवां बुरुजांतून ही पेटी मींच रात्रीं खणून काढली. साहेब, तिच्यांत माझ्या पूजेच्या देवांखेरीज दुसरें कांहीं नाहीं.”

साहेब म्हणाला, “ तूं खरें बोलतेस कशावरून ? ”

उमा– “ या देवांचीच शपथ. मी सांगत्यें तें खरें आहे.”

असें म्हणून ती रडूं लागली व हळूहळू कपडा सोडून पेटी उघडून तिनें आंतले देव दाखविले. एक पंचायतन, अभिषेकपात्र, जपाची माळ, गंधाची थाटी व नैवेद्याची वाटी अशी सामग्री होती. जमलेले सर्व लोक आश्चर्यचकित झाले. समीउल्ला दांतओठ खाऊं लागला. कप्तानसाहेब म्हणाला, “ बाई, भिऊं नको. काय असेल तें सर्व सांग.” पण तिच्या तोंडांतून शब्द निघेना. ती भिऊन इकडेतिकडे पाहूं लागली. शेवटीं समीउल्लाकडे पाहून ती अडखळत म्हणाली, “ सरकार भिऊं नको तर काय करूं ? माझी सर्व हकीकत सांगितली तर मी घरीं जिवंत परत कशी जाईन ? ”

साहेब म्हणाला, “ ठीक आहे. तूं सांगूं नको, मी विचारतों. मग तर सांगायला हरकत नाहीं ? तुझ्या जिवाला धक्का लागणार नाहीं ! ”

उमाः—मला सांगितलेंच पाहिजे तर मी खोटें कसें बोलूं ?

साहेबः—ठीक आहे, सांग तर. ही पेटी कुणाची ?

उमाः—माझी.

साहेबः—तींत काय आहे ?

उमाः—माझे देव आहेत.

साहेबः—ही पेटी कुठें होती ?

उमाः—किल्ल्यांतल्या बुरुजांत पुरून ठेवली होती.

साहेबः—कधीं ?

उमाः—तीन वर्षांपूर्वीं.

साहेबः—कां पुरली होती ?

उमा:--त्यांचा उच्छेद होऊं नये म्हणून. ते माझे आणि माझा भाऊ रामभरोसी याचे होते.

साहेब:--तो भाऊ आतां कुठें आहे ?

उमा:--जो आपणाजवळ उभा आहे तोच.

साहेब:--याचें नांव तर समीउल्ला असें आहे !

उमा:--तें त्याचें बाटल्यावरचें नांव आहे. पण मी त्याला त्या नांवानें कधींच हांक मारणार नाहीं.

साहेब:--तो केव्हां बाटला ?

उमा:-तीन वर्षांपूर्वीं.

साहेब:-तो कां बाटला ?

उमा:-लष्करांत नोकरी मिळावी म्हणून !

साहेब:-तुम्ही कुठें राहत होतां ?

उमा:-तीन वर्षांपूर्वीं किल्ल्यांतच राहत होतों. पण इंग्रज सरकारच्या ताब्यांत किल्ला गेल्यावर आम्हांला बाहेर जावें लागलें.

साहेब:-मग जातांना देव बरोबर कां नेले नाहींत ?

उमा:-तो बाटला. त्याला देव काय करायचे ? मीं न्यावे तर तो म्हणे "तूं माझ्यासारखी बाटून जा. तुला मी जन्मभर कुठें पोसूं ? तूं बाटलीस तर तुझा पुनर्विवाह होईल. एखाद्या नबाबाच्या घरीं पडण्यासारखी सुंदर आहेस. तुझें आणि माझेंहि कल्याण होईल. न बाटशील आणि हे देव घेऊन बसशील तर ते विहिरींत फेकून देईन." म्हणून किल्ल्यांतून बाहेर पडण्यापूर्वी मीं ते बुरुजांतल्या अंधारांत पुरून ठेवले.

साहेब:-पण तुला तो काय म्हणून पोसणार होता ?

उमा:-साहेब, दुर्दैवानें लहानपणींच मी विधवा होऊन बापाचे घरीं परत आल्यें.

साहेब:-मग तूं भावाच्या म्हणण्याप्रमाणें कां वागली नाहींस ?

उमेला रागाचा झणकारा आला. ती म्हणाली, " तुम्ही माझ्या भावासारखेच निर्दय असाल असें वाटलें नव्हतें. मी धर्म सोडूं आणि पुनर्विवाह करूं ? यापेक्षां उपाशीं मेल्यें तर काय वाईट ? माझ्या भावानें धर्मांतर करून आपलें कोटकल्याण केलें आहे तेवढेंच पुरे."

साहेबः— बरें, पूर्वी देव पुरून ठेवले ते आज उकरून काढण्याचें काय कारण ?

उमाः— मी बाटणार नाहीं असें म्हटल्यापासून रामभरोसीनें—

साहेब— कोणी ? समीउल्लानें ?

उमाः— होय. त्यानेंच तोंडानें पुकारा करून दिला आहे कीं, मी बाटलेंच म्हणून. त्याचें ऐकून लोकहि तसेंच म्हणूं लागले. शेजारीपाजारीहि माझ्याकडे संशयानें पाहूं लागले. तेव्हां आतां त्यांची खात्री केल्याशिवाय सुटका नाहीं. म्हणून हे देव घेऊन पूजा मांडीन, तेव्हां लोकांची खात्री होईल कीं मी हिंदूच आहें म्हणून!

साहेबः— पण हे देव काढून नेण्यापेक्षां दुसरे देव विकत घेऊन कां नाहीं पूजा मांडली ?

उमाः— ते देव माझ्या वाडवडिलांपासूनचे आहेत. देवासारखे देव बाजारांत पुष्कळ मिळतात. पण ज्याचे तेच त्याला. साहेब, मी आपणालाहि एक प्रश्न विचारूं का ?

साहेबाला तिच्या धिटाईचें आश्चर्य वाटलें. पण त्याला उमाची करुणा आधींच आली होती, म्हणून तो म्हणाला, "खुशाल विचार."

उमाः— साहेब, आपली आई जिवंत आहे कीं मेली ?

साहेब निःश्वास टाकून म्हणाला, "होय बाई, दुर्दैवानें ती कधींच मेली."

उमाः— मग आपण दुसरी एखादी आई कां विकत घेऊन तिच्यावर प्रेम करीत नाहीं ?

साहेब हंसला व ओशाळून म्हणाला, "बाई, तूं म्हणतेस तेंच खरें. जा, तुला तुझे देव घेऊन जाण्याची मोकळीक आहे."

उमानें देवांची पेटी काखेंत घेतली. पण तिचा पाय तेथून निघेना. ती एकदां समीउल्लाकडे पाही, एकदां मजकडे पाही, तिच्या चेहऱ्यांत भीति व सहानुभूति यांची छटा स्पष्ट दिसत होती.

साहेबाला त्याचा उमज पडला. तो म्हणाला, "भिऊं नको. मी समीउल्लाला तुझ्यासमक्षच ताकीद देऊन ठेवतों कीं, फिरून त्यानें तुला त्रास दिला तर त्याला मी नोकरींतून काढून टाकीन. जा."

तरी तिचा पाय निघेना. आतां ती समीउल्लाकडे पाठ फिरवून माझ्याकडे पाहूं लागली.

साहेब म्हणाला, " या हरप्रसादाबद्दल तुझें काय म्हणणें आहे ? "

उमा:—त्यांचा गुन्हा आपण त्यांना माफ करावा. त्यांनीं केवळ परोपकार केला. त्यांचे उपकार मी कसे फेडूं ?

साहेब:—तें माझें मी पाहून घेईन. तुझ्या पूजेच्या कामांत जसें मीं बोलूं नये, तसेंच माझ्या सरकारी कामांत तूंहि बोलूं नयेस, हाच न्याय नव्हे का ?

उमा निरुत्तर होऊन म्हणाली, " तर मग तुम्हांला देव बुद्धि देईल तसें करा." इतकें बोलून साहेबाला लवून सलाम करून माझ्याकडे एक वेळ दुःखानें पाहून ती निघून गेली. ती जातांच साहेब मला म्हणाला, " हरप्रसाद, आतां तरी तुझे म्हणणें काय आहे, बोल."

मी म्हणालों, " माझें कांहींच म्हणणें नाहीं. आपण दिलेली शिक्षा सोसायला मी तयार आहें. कारण आपल्या परवानगीशिवाय त्या बाईचे देव मीं उकरून काढून दिले. पण जवाहिराचा अपहार केल्याचा आरोप मजवर आला होता तो उडाला यांतच मला सर्व कांहीं मिळालें."

साहेब:– मला वाटतें तुझें तिच्यावर प्रेम आहे म्हणून ही गोष्ट तूं केलीस.

मी म्हणालों, " तिला मीं जन्मांत प्रथमच बुरुजांत खणतांना पाहिली. होय, माझें तिच्यावर प्रेम जडलें आहे—" हे शब्द कानीं पडतांच समीउल्ला कावराबावरा झाला. पण मी लगेच पुढें म्हणालों, " प्रेम आहे, पण भाऊ बहिणीवर करतो तें. या धर्मनिष्ठ स्त्रीचा भाऊ नष्ट झाला, तेव्हां त्याची जागा भरून काढून मीं तिला त्या वेळेपासूनच धर्माची बहीण मनानें मानली आहे."

साहेब व समीउल्ला दोघांनींहि आपलीं तोंडें बाजूला फिरविलीं. पण क्षणांत साहेब माझ्याकडे वळून म्हणाला, " ठीक आहे. तुझी शिक्षा मीं माफ केली. जा आपल्या उद्योगाला. परोपकाराचें फळ मनुष्याला देण्याचें काम कोणी ईश्वरावरच कां सोंपवावें ? आणि त्याला पुढचा जन्म तरी कशाला ? "

इतक्यांत एक घोडेस्वार एक लखोटा घेऊन दौडत आला. आम्ही सर्व उभेच आहों, तोंच साहेबानें तो फाडून वाचला आणि म्हणाला, " हरसिंग माझा आणि अलीगडचा संबंध आजपासून सुटला."

मीं आश्चर्यपूर्वक विचारलें, " काय, खावंद, अशी काय गोष्ट घडली?"

साहेब म्हणाला, " माझी बदली मजुफरपुराला झाली. मला उद्यांच येथून निघालें पाहिजे."

मी म्हणालों, " बदली म्हणायला आपणांला येथें येऊन फार दिवस झाले नाहींत."

साहेब म्हणाला, " मला बढती मिळाली आहे, म्हणून बदली झाली."

मी अभिनंदन करण्याच्या इच्छेनें म्हणालों, " साहेब, तर मग परोपकाराचें फळ मनुष्याला याच जन्मीं मिळतें, पुढच्या जन्मापर्यंत वाट पहावी लागत नाहीं, असें आपण नुकतेंच म्हणालां तें खरें तर! उमाच्या बाबतींत माझ्या परोपकारापेक्षां आपला परोपकारच अधिक होय."

साहेबाची बदली झाली, हें ऐकून समीउल्लालाहि आनंद झाला, असें त्याच्या चेहऱ्यावरून दिसलें. पण त्याला आनंद कां बरें झाला असावा?

— ४ —

असो. वरील संभाषण झाल्यावर साहेब घोड्यावर बसून निघून गेला. समीउल्ला माझ्याशीं कांहीं बोलला नाहीं. फक्त त्यानें मिशीला पीळ भरला.

मी घरीं गेल्यापासूनच सचिंतच होतों. बुरुजांतला प्रकार सर्व नीट निभावून गेला; पण उमाची वाट पुढें काय होणार? तिचा पत्ता मला कसा कळणार? तिनें आपले देव घेऊन पुढें काय केलें असेल? तिच्यामागचा शेजाऱ्यापाजाऱ्यांचा त्रास चुकला असेल काय?

दोन दिवस याच विचारांत गेले. तिसरे दिवशीं मी परेडीहून घरीं चाललों होतों. वाटेंत कांहीं फळफळावळ घ्यावी असें वाटून बाजाराकडे वळलों. एक बोळ ओलांडून दुसऱ्यांत शिरलों. इतक्यांत एका बैठ्या घरासमोर कोतवाल, कांहीं शिपाई व इतर अनेक लोक जमलेले दिसले. कोतवाल ओळखीचा होता. त्याला मीं विचारलें, " कोतवालसाहेब, ही काय गडबड आहे?"

तो म्हणाला, " या घरांत अपघात झाला आहे. आंत चला. पहा काय भयंकर प्रकार आहे तो."

मी व तो आंत गेलों. पाहतों तों रक्ताच्यावर उमा मरून पडली होती. तिच्या उरांत खंजीर खुपसला गेला होता. तो उपसलेला बाहेर जवळच पडला

होता. तिचा हात एका पेटीवर होता. पण पेटी मोकळी होती! हें पाहतांच माझ्या डोळयांतून घळ्कन् पाण्याच्या धारा आल्या.

हें पाहून कोतवाल म्हणाला, " या स्त्रीला तुम्ही ओळखतां काय? बिचारी आपल्या जिवावर कां उदार झाली देव जाणे!"

मी म्हणालों, " काय म्हणतां? आत्मघात? छे! भलतीच शंका!" असें म्हणून कोतवालाला हाताला धरून मीं बाजूला नेला व त्याच्याशीं कानगोष्ट केली.

यापुढचें मीं सांगायलाच पाहिजे असें नाहीं. सर्व व्हावयाचें तें यथासांग झालें. मीहि लवकरच बदलून परगांवीं गेलों. पण दगडावर कोरून ठेवावी त्याप्रमाणें अलीगड किल्ल्यांतल्या पहाऱ्याची आठवण जन्मभर माझ्या हृदयांत अढळ राहिली!



## आले कुठून........गेले कुठें? : : ५

नाटक संपायला जवळ जवळ तीन वाजले. गर्दी तर कांहीं पुसूंच नका. धक्काबुक्की करीत मार्ग काढणें माझ्यासारख्याला थोडेंच जमते आहे? तेव्हां किर्लोस्कर नाटकगृहाच्या आंतल्या बाजूला माझीं चांगलीं पंधरावीस मिनिटें तरी मोडलीं असतील. शिवाय कांहीं केल्या पायच लवकर माझे निघेनात तिथून!

बाहेर पडलों, आणि नानावाड्याला वळसा घालून बिनीवाल्यांच्या वाड्यापाशीं आलों. सावकाश मजेंत चाललों होतों. वेळ रात्रीची, वाराही छान सुटलेला, आणि चांदणें तर असें कांहीं बहारीचें पडलें होतें कीं, वारे वा:!

" खरंच! नाटक किती झकास झालं नाहीं?" असें म्हणून चार पावलें पुढें असलेले गृहस्थ थांबले आणि चालूं लागले मजबरोबर. साधा पोशाख, मध्यम उंचीचे, जवळ जवळ माझ्याच वयाचे होते म्हणायचे.

मीं म्हटले, " वा ! हें काय बोलणं ! अहो नाटक तर झालंच चांगलं, आणि गाणं ? " यावर लगेच ते म्हणतात, " तें तर कांहीं पुसूंच नका ! किती मन लावून, आणि काय जीव तोडून गाणं हो हें ! "

" खरं आहे," मी म्हणालो, " असं क्वचित् ऐकायला सांपडतं ! "

" पुनः आश्चर्य हें, कीं हे नाटक इतक्या वेळां होऊन गेलं आहे ना ? पण गर्दी कांहीं कमी नाहीं ! 'स्वयंवर' म्हटलं, की लहानमोठे जीव कसे भराभर गोळा होतात ! मग काय इतकी त्यांत...जादू..."

मी म्हणालो, " नाटकांत म्हणण्यापेक्षां त्यांतल्या गाण्यांत म्हणा हवी तर ! अहो, त्याचंसुद्धां वेड कांहीं कमी नसतं ! एकदां का तें जडलं, कीं मग जिवंतपणींच काय, मनुष्य मेल्यावर सुद्धां......"

हें ऐकतांच तो गृहस्थ काय पण दचकला !

" कां ? कां बरं दचकला ? "

लगेच तो हंसून म्हणतो, " बरोबर आहे ! म्हणतां ते अगदीं खरं आहे. माझंच उदाहरण घ्या कीं......"

इतके होतें आहे, तों फुटक्या बुरुजावरून शनवार मारुतीकडे जाणाऱ्या रस्त्यापाशीं आम्ही आलों.

ते म्हणाले, " तुम्हाला कुणीकडे......इकडे बावडेकरांच्या वाड्याकडे का जायचं आहे ? "

" नाहीं. या रस्त्यानं समोरच मला मारुतीच्या पाठीमागं जायचं आहे."

" तसं असलं तर फारच छान ! " ते म्हणाले, " मलाहि तिकडेच ......ओंकारेश्वराच्या बाजूला जायचं आहे."

" ओंकारेश्वराच्या बाजूला ?" मीं विचारलें, "आपलं नांव काय बरं ! "

पण त्यानें सांगितलेले नांव ऐकतांच मी अमळ घोटाळ्यांत पडलों. मनांत म्हटलें, " या नांवाचा मनुष्य, मला वाटतं, चार-पांच वर्षांपूर्वी... एका भयंकर अपघातांत......"

" कां ? विचारात कसल्या पडलां ? " असें किंचित् घाबऱ्या घाबऱ्या म्हणत तो चालूंच लागला.

पाठोपाठ मीहि निघालो. पुढें दोघेहि आम्ही पहिल्याप्रमाणें सावकाश चालूं लागलों. दोनतीन मिनिटे कोणींच कांहीं बोललें नाहीं !

—२—

ते म्हणाले, "'स्वयंवर' नाटक हें आपल्या पुण्याच्या रंगभूमीवर नुकतंच आलं होतं, तिसरा...किंवा चौथा प्रयोग असेल. शनिवारची रात्र होती येवढी गोष्ट मात्र नक्की; मी आणि......बायको असे उभयतां आम्ही नाटकाला गेलों. तिकिटें बऱ्यांपैकीं काढलीं होतीं, आणि बसलों होतों तेंहि जवळ जवळच........."

असें म्हणून क्षणभर ते थांबले, हातरुमाल काढून त्यांनी डोळे पुसले, आणि सांगूं लागले पुढें, "गर्दी अलोट, आणि नाटक खूपच रंगत चाललं होतं. कृष्णचरित्र आणि तेंहि इतक्या गोड कंठानं आणि जिवाभावानं गायलेलं. ऐकणाराचं अंतःकरण कसं अगदीं भरून चाललं होतं! रुक्मिणीचं एक पद चाललेलं, तेव्हां तें आमच्या राणीसरकारना कितपत आवडतं आहे हें पाहण्याकरितां मी वळलों मात्र, तों काय सांगू तुम्हांला! डोळे असे कांहीं भरून आले होते तिचे..."

"होतं बुवा असं!" मधेंच मीं म्हटलें, "खरं गाणं म्हणतात ते मला वाटतं अशालाच."

"तशीच ती किती प्रसन्न दिसत होती! तेंच......तेंच गोड चित्र दिसावं, जवळ ती असल्याचा भास व्हावा, म्हणून तर इतका जीव टाकीत मी पुनः पुन्हा...!"

पुढें बोलवेचना त्यांच्यानें. मारुतीचें दर्शन घेऊन आम्ही ओंकारेश्वराकडे वळलों. आमच्याशिवाय दुसरें तिसरें कोणी नव्हतें रस्त्यांत.

"झालं!" पुनः ते सांगूं लागले, "ऐकावं तिकडं मग ज्याच्या त्याच्या तोंडीं या 'स्वयंवरां'तलीं पदं. आम्हीहि, वरचेवर ग्रामोफोनवर लावीत असूं तीं गाणीं. पण...काय असेल तें असो, नाटक पाहून आल्यापासून तिला चैनच पडेनासं झालं! बरं, घरांत म्हणावं तर कांहीं कमी नव्हतं. सगळं तिच्या मनाजोगं होतं. असं असून......"

मारुतीमागील तिवाठ्यावर आलों, आणि थांबलों तिथें आम्ही. मधोमध रस्त्यांत उभे होतों.

"इथं राहतां का तुम्ही?" माझ्या घराकडे बोट करून ते म्हणाले, "झालच बरं का माझं. पुढं...त्या दिवसापासून बायको जी कोमेजत आणि खंगत चालली ती कांहीं केल्या म्हणून......विचार विचारून रडकुंडीस

आलों मी ! पण तिचं तिलाच जिथं उलगडेना, तिथं तें बिचारं काय सांगणार दुसऱ्याला ! अखेरच्या वाताच्या झटक्यांत वरचेवर ती म्हणे, 'तीं पहा ! यमुनेच्या कांठीं आपले गोपालकृष्ण आणि गोपगोपी खेळताहेत ! कसं गोड गाणं चाललं आहे नाहीं ? यायचं ना मग तिथं' ? "

असें म्हणतांच तो गृहस्थ काय पण गहिंवरून आला ! खांद्यावर हात ठेवून मी समाधान करायला जातों आहे तों चालायलाच लागला.

मीहि आमच्या खिडकीकडे, कोणाला तरी हांक मारून उठवायला म्हणून वळलों. पावलें दोन पावलें गेलों असेन, तों......काय वाटलें कुणास ठाऊक ? चटकन् मागें फिरलों आणि ओंकारेश्वराच्या रस्त्यानें हळुहळू चालूं लागलों.

इकडे तिकडे पहात मनांत म्हटलें, " आश्चर्य आहे ! इतक्यांत हा गृहस्थ क्षणा दोन क्षणांत गेला तरी कुठं ? आसपासचीं घरं तर बंदच आहेत. कांहींच कुठं हालचाल दिसत नाहीं ! मग हे बुवाजी......आले कुठून, ... आणि गेले कुठें ? "

असें म्हणून आजूबाजूला जों नीट न्याहाळून पाहतों आहें तों...... जवळून......बरं का ?......अगदीं जवळून......कुणी तरी भर्रकन् धांवत गेल्याचं......!!



# आक्काचा मृत्यु ! : : ६

" कसें काय आहे आक्काचें ? "

" छे ! तिचें चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं."

" बरें होईल ! सुटेल तरी बिचारी या यातनांतून."

त्या वेळीं आसपासच्या घरांतील लोक दिवे मालवून निद्रावश झालेले होते. अनेक आप्तेष्टांचे मृत्यु अगदीं निर्भयपणानें तिनें पाहिलेले होते, पण तीच निर्भय आक्का आज स्वतांच्या जवळ येऊन ठेपलेल्या अंताला भीत होती. तिचे डोळे मिटलेले होते आणि ती डोळ्यांची उघडझांप थोडथोडी करीत होती, पण तिच्याजवळ बसलेल्या तिच्या वृद्ध पतीला आणि तरुण

मुलाला ती काय करीत होती हें समजत नव्हतें. ते दोघेजण तिच्याविषयीं काय बोलत होते हे तिच्या क्षीण कर्णेन्द्रियांना समजत नव्हतें असें नाहीं, पण मला सर्व कळत आहे असें तरी ती कोणत्या उपायानें दर्शविणार ? सर्व देह जीर्ण होऊन निस्त्राण झालेला होता. त्या देहाच्या कोणत्याहि अवयवाची हालचाल होत नव्हती. आणि ती आपल्याकडून अतिशय जोरानें हालचाल करीत होती, पण जवळ टक लावून बसलेल्या लोकाना ती निपचित पडून राहिली असल्याचा भास होत होता. तिच्याभोंवतीं असलेल्या अंथरुणावर अर्धवट जाग्या असलेल्या तिच्या जाणत्या मुली मधून-मधून स्फुंदत होत्या. निश्चेष्ट पडलेल्या, बेशुद्ध समजल्या जाणाऱ्या आक्काला ते स्फुंदणे चांगलें ऐकूं जात होतें, पण त्या स्फुंदण्याला ती देत असलेला प्रतिध्वनि बाहेर मुळींच उमटत नव्हता. शरीरांतील सर्व शक्ति एकवटून आणि प्राण गोळा होऊन तिला दुःखाचे उमाळे येत होते. कडेची मंडळी आपल्याला बेशुद्ध म्हणत आहेत हेंहि तिला कळत होतें. ती बेशुद्ध आहे असें समजून भोंवतालचे आप्तजन जें भाषण करीत होते तेंहि तिला पूर्ण-पणें समजत होतें. ‘कसें काय आक्काचे ?’ असा तिच्या थोरल्या मुलानें विचारलेला प्रश्न तिला ऐकूं गेला. ‘छे ! तिचें चिन्ह कांहीं ठीक दिसत नाहीं,’ असें तिच्या पतीने दिलेलें उत्तरहि तिने ऐकलें. आणि त्यावर त्याने काढलेले उद्गारहि तिला समजले. तिचा मुलगा कांहीं फार लहान नव्हता. पंचविशी उलटून जाऊन ‘लग्नास तयार’ अशी जगाला त्याची जाहिरात मिळालेली होती. त्याला मुली सांगून येत होत्या आणि त्यांवर पसंती-नापसंतीचे छाप जोरजोरानें मारले जात होते.

आपल्या मुलाच्या तोंडचे वरील उद्गार ऐकून तिच्या थिजलेल्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले. मी या यातनांतून सुटावें अशी याची खरोखर-च इच्छा आहे का ? या यातनांतूनहि मीं जगावें असें याला कां वाटूं नये ? मी जगलें तर मी याला नको आहे का ? आणि मी मेलें तर याला काय वाटेल ?......या विचारांनीं तिच्या मनांत अतोनात खळबळ उडवून दिली. या दुखण्यांतून ही उठावी असें यानें कां म्हणूं नये ? हो, यानें असें म्हणावयास काय हरकत आहे ? ही यांतून सुटली म्हणजे बरें होईल असें हा म्हणतो त्याचा खरा अर्थ काय ?......आपल्या यातना त्याला बघवत नाहींत हेंच खरें, कीं आतां आपली त्याला जरूरच नाहीं ?

तिच्या विषण्ण, क्षीण मनाचा दाह करावयास एवढे विचार अगदीं पुरे होते. उभ्या पंचवीस वर्षांत जीव कीं प्राण असणाऱ्या त्या मुलासंबंधानें तिच्या मनांत अशी एकदां देखील शंका आली नव्हती. पण आयुष्याच्या अखेरीला, मृत्यूच्या मुखांत पाऊल टाकण्याची वेळ अतिशय नंजीक आली असतांना; प्रत्यक्ष पोटच्या मुलाविषयींहि असले विचार तिच्या मनांत आले. 'बरें होईल ! सुटेल तरी बिचारी एकदां या यातनांतून !' असे आपल्या थोरल्या भावाच्या तोंडून उद्गार निघताच तिच्याभोंवतीं अर्धवट जागृतावस्थेंत असलेल्या त्याच्या बहिणींचे स्फुंदणें अधिक जोरानें, अधिक वेगाने चालू झालें तेंहि तिला ऐकूं गेलें. आपल्यामागें आपल्या मुलींची काय दशा होईल या विचाराने तिचें मन ग्रासून टाकलें. आणि तिनें आपल्या क्षीण कल्पनेच्या जोरावर त्या मुलींची ही मातृविहीन अवस्था अंतर्दृष्टीसमोर उभी करून पाहिली. तें चित्र अर्थातच करुणास्पद असेल, आणि प्रेमळ मातेला तें चित्र किती व्यथित करूं शकलें असेल हें कल्पनेनेंच जाणणें बरें. तिच्या मनांत आलेल्या विचारांनीं डोळयांत जीं आंसवें जमलीं होतीं तीं कानापर्यंत ओघळून गेलीं. तिनें आपले डोळे किलकिले केले आणि डाव्या बाजूस बसलेल्या आपल्या पतीकडे तिनें एकवार पाहिलें. तिच्या थिजलेल्या डोळयांची उघडझांप अर्थातच कोणालाहि समजून येत नव्हती. वृद्ध पतीचें दर्शन होतांच तिचा ऊर भरून आला. चाळीस वर्षांच्या संसारांत ज्याच्या सुखाची आपण तिळप्रायहि हेळसांड केली नाहीं, त्या आपल्या प्रेमळ, सुस्वभावी आाण आपल्यामागें सर्वस्वीं पराधीन होणाऱ्या पतीची किती दुःखदायक दशा होईल हा विचार मनांत येऊन तिचा ऊर भरून आला. पण अंगांतील शक्ति इतकी कमी झाली होती, कीं तिचा श्वासोच्छ्वास दुःखावेगानें जलद चालला आहे अशी भोंवतालच्यापैकीं कोणालाच शंका आली नाहीं. तिच्यासमोर पतीचें तेंहि विधुरावस्थेंतील चित्र उभें राहिलें. आजपर्यंत आपल्या जिवावर ज्यानें कुणाचा ब्रहि म्हणवून घेतला नाहीं, त्या पतीची आपल्यामागे कशी परावलंबी स्थिति होईल हें मनांत येऊन तिला कसेंसेंच झालें. डोळयांच्या संपुटांतून पुन्हा अश्रु आले आणि कानांच्यामागून जाऊन अंथरुणावर ठिबकले. आणि हें चित्र पुसट होऊन तिच्या लाडक्या वसंताचेंहि चित्र तिच्या डोळयांसमोर उभें राहिलें व तिनें मनांत म्हटलें कीं, पंचवीस वर्षांचा

झाला म्हणून काय झालें? तोहि अजून फार लहान आहे. आपल्या-मागें त्याला तरी प्रेमानें कोण बघणार? हो. मुलाला जोंपर्यंत आई आहे तोंपर्यंतच बापाचें व मुलाचें नातें विशेष जिव्हाळ्याचें असतें. पण दोघांमध्यें जिव्हाळा उत्पन्न करणारी ती व्यक्ति चितेच्या भक्ष्यस्थानीं पडली, कीं तो जिव्हाळाहि त्या धर्गानें होरपळून जातो, या गोष्टीची तिला पूर्ण जाणीव होती. तिला वाटलें, कीं वसंताचे आपल्यामागें फार हाल होतील. त्याची काळजी वहायला दुसरें कोण आहे? वसंताला वेळच्यावेळीं खायला-प्यायला मिळणार नाहीं. अजून त्याचें लग्न व्हावयाचें आहे आणि तें तरी आतां हौसेनें कोण करणार? आपल्या पतीला आतां हौस वाटेल का? पत्नीच्या आठवणीनें त्यांनाहि विरक्ति उत्पन्न नाहीं का व्हायची? आणि मग वसंताचें लग्न......? एवढ्या प्रश्नाने तिचें लग्न झालें त्या दिवसापासून घडलेले कितीतरी शोककारक प्रसंग तिच्या मनांत ताजेपणानें उद्भूत झाले.

* * *

त्या वेळीं तिच्या लग्नाच्या जेवणावळी चालू होत्या. एके दिवशीं संध्याकाळीं ती आपल्या मैत्रिणीशीं हितगुज करीत झोंपाळ्यावर बसली होती.

"किनई, यमे, आईची आठवण सारखी होऊन मनाला अगदीं चैनच पडत नाहीं. माझें लग्न तिनें किती हौसेनें केलें असतें, नाहीं?"

"आक्का, अग तुलाच एकटीला आई नाहीं असें आहे होय?"

"यमे, इतरांनाहि आया असतात, पण माझ्यासारखी त्यांची गोष्ट असते का? खरेंच सांग तूं. मी एकदां सासरीं गेलें, कीं माहेरीं यावें असें वाटायला इथें कोणी तरी प्रेमाचें आहे का?"

"आक्का, माझ्याकरितां तरी तूं नाहीं का येणार?"

"यमे, कशी येऊं तूंच सांग? माहेरच्यांनीं बोलाविलें नसतांना मी माझ्या स्वतांच्या मुखत्यारीनें तुझ्याकरितां इकडे कशी निघून येऊं?"

यमीचे डोळे भरून आले. आक्काच्या डोळ्यांनाहि पाणी आलें. पण तें डोळ्यांतल्या डोळ्यांतच ठेवून ती म्हणाली,

"यमे, एक माहेरपण राहो मेलें! पण आई माझें लग्न पहायलासुद्धां जगली नाहीं याचें मला राहून राहून वाईट वाटतें."

"आक्का, तूं किती वाईट वाटून घेणार ? देव करतो तें सर्व आपल्या बऱ्याकरतांच करतो, असें तूंच नाहीं का नेहमीं म्हणत ?"

"पण माझ्या आईला नेऊन, यमे, त्यानें काय ग चांगलें केलें ?"

"अग, तें आपल्याला एक समजत नसेल ! म्हणून त्यानें मुळींच कांहीं चांगलें केलें नसेल असें आपण कसें म्हणावें बरें ?"

"पण यमे, ती नेहमीं म्हणत असे, कीं माझी आई पोराबाळांचीं लग्नें न पाहतां मेली आणि माझेंहि असेंच होणार ! यमे, माझेंहि असेंच होईल का ग ?"

"बघूं तुझा हात !"

यमीला हातावरचें कांहीं म्हटल्या कांहींसुद्धां समजत नव्हतें; पण लग्नासारखा आनंदाचा प्रसंग नुकताच साजरा झाला असतांना आपल्या नवविवाहित मैत्रिणीनें आनंदी रहावें अशी तिची मनापासून इच्छा होती. आणि म्हणूनच तिनें आपल्या भाषणाला थट्टेचा ओघ आणला. तिचा हात आपल्या हातांत घेऊन यमी म्हणाली, "छे ! आक्का, तुझें असें व्हायचें नाहीं."

त्यांच्या थट्टेला आरंभ होणार इतक्यांत आक्काच्या वडिलांनीं तिला हांक मारली. आक्काहि आपला हात यमुनेच्या हातांतून सोडवून घेऊन निघून गेली.

"हं शास्त्रीबुवा, ही आमची मुलगी."

वाडिलांनीं ज्या गृहस्थांना उद्देशून वरील शब्द काढले होते त्यांना आक्कानें नमस्कार केला आणि वडिलांच्या सांगण्यावरून ती तेथें बाजूलाच बसली.

"बघा हिचा हात."

यजमानांची ती आज्ञा ऐकून शास्त्रीबुवांनीं आक्काचा हात हातांत घेतला, " या मुलीला मातृसुख फार कमी आहे," शास्त्रीबुवांनीं भविष्य सांगण्यास आरंभ केला. शास्त्रीबुवांना वाटलें, कीं आपण भविष्य अगदीं बरोबर सांगितलें. पण 'हिला मातृसुख नाहीं,' अशा आशयाचे शास्त्रीबुवांचे उद्गार ऐकल्याबरोबर आक्काचा चेहरा खिन्न झाला.

" हिला भावंड मुळींच नाहीं," शास्त्रीबुवांनीं तिच्या वडिलांकडे पाहिलें.

" शास्त्रीबुवा, अगदीं बरोबर सांगितलेंत. हिचें लग्न केल्यामुळें मला आतां वाटेल तेव्हां गृहस्थाश्रम सोडतां येईल."

" या मुलीचें सासर फार चांगले आहे. हिला मुलगे होतील आणि ते हिच्यादेखत म्हातारे होतील."

" खरेंच का शास्त्रीबुवा ? " आक्काने एकदम प्रश्न विचारला.

आपण कोणाला काय विचारीत आहों याचेंसुद्धां तिला भान राहिलें नाहीं. आपल्या आजीची व आईची जी गत झाली तीच आपली होईल कीं काय, अशी जी मघां यमीशीं बोलतांना तिला धास्ती वाटली त्याची तिला आठवण होऊन तिचे भान नाहींसें झाले. आपण कुणासमोर, कुणाला काय विचारीत आहोत, याचा तिला विसर पडला. तिनें अगदीं अधीर-पणानें वरील प्रश्न विचारला आणि शास्त्रीबुवांनीं त्याची खात्री केल्यावर तिला एक प्रकारचें समाधान वाटलें– आनंद वाटला. आपली आई म्हणत होती त्याप्रमाणें अशा गोष्टी पिढ्यान्‌पिढ्या चालत नसतात एकूण! तिचें तिलाच वाटले. मग आजीचे व आईचे दोघींचेहि म्हणणे त्यांच्या बाबतींत खरें कसे झाले ? तिचें मन गोंधळून गेले. आणखी कांहीं सटरफटर गोष्टी सांगून शास्त्रीबुवानीं आपलें भविष्यकथन समाप्त केलें.

त्या दिवशीं आक्काच्या मनांत काहूर माजून राहिलें. शास्त्रीबुवांनीं सांगितलेले भविष्य तिच्या मनांत घोळत होतें. मुलगा होणें म्हणजे काय, याचीसुद्धां तिला नीटशी कल्पना नव्हती; पण आईचें निरनिराळ्या प्रसंगीचे बोलणें तिच्या पुरे लक्ष्यांत राहिलें असल्याकारणानें तिला या गोष्टी प्रत्यक्ष अनुभवानें ठाऊक नव्हत्या तरी कल्पनेनें जाणतां येत होत्या.

* * *

आसन्नमरण स्थितींत अंथरुणावर निश्चेष्ट स्थितींत पडलेल्या आक्काला वरील चाळीस वर्षांपूर्वी घडलेल्या प्रसंगाचें स्मरण झाले. तेव्हां जोशीबुवानीं सांगितले, कीं हिचे मुलगे म्हातारे झालेले ही पाहील. शास्त्रीबुवांचें ते भविष्य खरें ठरण्याचा योग येत नाहीं हें तिला पुरतेपणीं समजलें होतें. वसंताचें लग्न आपल्यादेखत होणार अशी आपल्याला किती खात्री होती ? त्या लग्ना-बद्दल आपल्याला किती हुरूप वाटत होता. पण शेवटीं आई म्हणाली तेंच खरें होणार का ? माझ्यादेखत वसंताचें लग्न होतच नाहीं तर मग...

ती अगदीं जुन्या चालीची बाई असल्याकारणानें तिला आपल्या मुलाच्या लग्नाची फार हौस असणें साहजिक होतें. पण तिच्यादेखत तें लग्न होण्याचा योग आला नाहीं. तिचें शरीर इतकें क्षीण झालें होतें तरी तिचे मनोव्यापार अतिशय जलद रीतीनें काम करीत होते. या विचारतंद्रींत निमग्न असतां ती दुःखाचे सुस्कारे सोडीत होती पण ते सुद्धां तिला जोरानें सोडतां येत नव्हते. भोंवतालच्या लोकांना तिच्या श्वासोच्छ्वासांत यत्किंचित्हि फेरबदल झाल्यासारखें वाटत नव्हतें. तिच्या मनोभावनांच्या अनुरोधानें तिचा चेहरा हताश, खिन्न असा होत होता; पण तिच्या चेहऱ्यावर अंत-काळची जी कळा आलेली होती तिच्याखालीं या सर्व सूक्ष्म छटा मावळून जात होत्या. हा प्रसंग तिच्या मनांतून नाहींसा होतो न होतो तोंच दुसऱ्यानें डोकें वर काढले.

*                *                *

मे महिन्याच्या सुटींतला तो दिवस! त्या दिवशीं संध्याकाळीं आपल्या एका शेजारणीशीं आक्का गप्पा मारीत बसली होती. दुपारीं तिनें पापड केले होते. वसंताच्या लग्नाच्या वेड्या आशेने तिनें ही लग्नाची तयारी चालविली होती. आज पापड केल्यामुळे तिच्या शरीराला जरी थकवा आला होता तरी वसंताच्या लग्नाच्या आशेने तिच्या मनाला विलक्षण हुरूप वाटत होता. तिची वृत्ति उल्हसित होती. उमाकाकूंशीं बोलतां बोलतां ती म्हणाली, "काकू दोन वर्षें हे असेंच चाललं आहे. मी दरवर्षी लग्नाची तयारी करतें आहे पण दरवर्षी कांहीं ना कांहीं तरी लग्नाला अडथळा होतो आहे."

"पण आक्का, यंदा मात्र तुमच्या येथें खास लग्न होणार!"

"मला असें वाटतें, कीं इजा, बिजा, तसेंच तिजा होणार!"

"आक्का, असें मुळींच म्हणूं नका. आतां तुमच्या वसंताचें लग्न होईल...!"

"वसंताचें लग्न व्हायचें नाहीं..."

आंतल्या बाजूला वसंत कायसें करीत बसला होता, त्याच्या कानीं वरील संवाद जाऊन तो बाहेर आला. बाहेर येतां येतांच त्यानें वरील शब्द उच्चारले.

त्याचे ते शब्द ऐकून त्या दोघींनाहीं भीति वाटली, पण तितकेंच

आश्चर्यहि वाटलें. आक्काचा सर्व उल्हास—सर्व आनंद पार मावळून गेला. तिला काय झालें हेंसुद्धां नीट समजलें नाहीं. वसंताला इतकें रागवायला काय झालें त्याचें कारण तिला समजेना. उमाकाकूहि चट्कन् संध्याकाळ झाल्याचें मिष करून तेथून निघून गेल्या. वसंत आपल्या आईसमोर बसला आणि मघांच्या चढलेल्या स्वरांतच त्यानें विचारलें,

"हें तुम्ही काय चालविलेलें आहे ? माझ्या लग्नाची इतकी वाच्यता झालेली मला खपणार नाहीं. ज्याच्या त्याच्याजवळ माझ्या लग्नाची कहाणी तूं कां सुरू करतेस ? आज मी तुला निक्षून सांगून ठेवतों, कीं तूं जिवंत आहेस तोंपर्यंत मी लग्नच करणार नाहीं."

दुसरी कोणतीहि बाई त्या जागीं असती तर ती रागावल्याशिवाय खास राहिली नसती; आणि मुलगा बिलगा कांहींएक न बघतां कांहीं तरी अधिकउणें उत्तरसुद्धां देऊन गेली असती. पण मुळींच न रागावतां तिनें विचारलें,

"अरे, पण मी तुझ्या म्हातारपणापर्यंत जगणार आहें."

"जग. तिथपर्यंत जगलीस तर मी आजन्म ब्रह्मचारीच राहीन."

"आणि मग मी मेलें तर म्हातारपणीं लग्न करशील का ?"

"मी इतका जगतोंय् कशाला ? मला एका ज्योतिषानें सांगितलें आहे कीं, माझे आईबाप माझ्यामागे राहणार आहेत ! "

"वसंता, असें नको रे बोलूं ! "

हें बोलतांना आक्का अतिशय विव्हळ झाली होती. दुसऱ्या एखाद्यानें —एखाद्यानें कशाला ? —मघांच्या उमाकाकूंनीं हा दोघांचा संवाद जर ऐकला असता तर तिला खास वाटलें असतें, कीं किती मूर्ख, गाढव आणि अविचारी मुलगा आहे हा ! नुसता अविचारीच नाहीं तर दुष्टसुद्धां वाटला असता ! वसंताची आतांची वागणूक त्याच्याविषयीं दुसऱ्याचा असा ग्रह व्हावा अशीच होती. वास्तविक त्याला इतकें रागावण्याचें कांहींच कारण नव्हतें. आक्काला या त्याच्या वर्तनाचा फारसा राग आला नाहीं पण तिला अतोनात वाईट वाटलें. आपल्या बोलण्याचालण्यांत खरोखरच कांहीं चूक झाली का ? त्याला तरी असा उगीच राग कसा येईल ? किती झालें तरी शिकलासवरलेला मुलगा ! तो उगीच अशी डोक्यांत राख कशी घालील ? आपल्याच बोलण्यांत कांहीं तरी चूक झाली...आपण, तो म्हणतो तशी त्या

गोष्टीची वाच्यता फार नाहीं का केली ?... हो. आपलेंसुद्धां जरा जास्त झालें...जिच्या तिच्याजवळ आपण वसंताच्या लग्नाची गोष्ट काढली. जिला तिला आपण ही गोष्ट सांगण्याकरतां घरींदेखील बोलाविलें......कित्येक आप्तेष्टांना आपण लग्नाचीं, ठरायच्या आधीं, उगीच आमंत्रणेंसुद्धां दिलीं...... हो, माझीसुद्धां चूक झाली. ती वसंताला म्हणाली,

"हो वसंता, अरे वेडी आई चुकली तर इतकें रागावूं नये."

"रागवूं नको तर काय करूं ? तीच गोष्ट कितीदां उगाळायची ?"

"हो. माझें चुकलें खरें !"

* * *

तिचा श्वासोच्छ्वास मंदमंद होत चालला होता. लांबून तिच्याकडे बघणाराला तिची अखेर फार शांतपणें होणार असें वाटलें असतें. तिच्या तोंडावर कोणताहि विकार उमटत नव्हता. तिची कोणतीहि हालचाल होत नव्हती. श्वासोच्छ्वासाबरोबर नासिकाग्राचें जें आकुंचन आणि प्रसरण चाललें होतें तेवढीच काय ती तिची हालचाल होत होती. ती आपल्याकडून तोंडावर बसणाऱ्या माशा वारण्याचा प्रयत्न करीत होती. हात न हालवतांच त्या माशा आपण वारल्या असाच तिला भास होई. हातपाय गार होते. ते किनपत गार आहेत हें पाहण्याकरितां त्यांना कोणी स्पर्श केला तर तिला त्या स्पर्श करणाराकडे बघण्याचा मोह अनिवार होत असे. तिची दृष्टि बंद झाली होती. तिचे डोळे थिजलेले होते. पण आशेचा शेवटचा किरण हृदयांत प्रकाशित होता तोंपर्यंत तिनें डोळे उघडण्याचे सारखे परिश्रम चालविले होते. पतिदेवांना व पोटच्या लहान लहान गोळ्यांना एकवार डोळे भरून पाहून घ्यावें या अनिवार इच्छेनें तिच्या पापण्या एकमेकींपासून विभिन्न होण्याचा फार प्रयत्न करीत होत्या. आपण इतकी धडपड करीत आहों तरी कडेची मंडळी इतकी स्तब्ध कां ? असा तिनें मनालाच प्रश्न केला. बिचारीला आपण हालचाल करीत आहों असा नुसता भास होत होता. कडेच्या कांही लोकांना ती गेल्यासारखीच वाटत होती इतका तिचा श्वास क्षीण झालेला होता. आपल्या धडपडीचा कांहीं एक उपयोग होत नाहीं हें पाहून तिला एक तऱ्हेचा वैताग आला आणि सर्व शक्ति एकवटून तिनें एक दीर्घ निःश्वास टाकिला. तो मात्र सर्वांनीं नीट पाहिला. वसंताचे शब्द तिच्या कानीं आले,

" बाबा, झालें; ती गेली."

" दादा, आक्का गेली ? " एका मुलीनें प्रश्न विचारला.

" हो, गेली. संपला तिचा लागाबांधा ! "

तिच्या क्षीण झालेल्या कर्णेंद्रियांना हें सर्व बोलणे ऐकूं गेलें. आपली आतां यांना खरोखरच जरूर दिसत नाही. इतक्यांत तिने ऐकले,

" तिचे हे हाल पाहून ती केव्हां जाते आहे असें मला झालें होतें."

तिला वाईट वाटले. ही केव्हां उठेल असें कुणालाच वाटले नाहीं ना ? तिने मनालाच प्रश्न केला व एक दीर्घ निःश्वास टाकला आणि त्याबरोबरच तिच्या शरीरांतील प्राण विलयास गेले !



# आत्महत्या : : ७

रात्रीची वेळ; सर्वत्र पसरलेली शान्तता आणि तिला विरोध दाखविणारा समुद्राचा धो धो आवाज व किनाऱ्यावर आदळणाऱ्या लाटांचा परत फिरतांचा सळ् सळ् आवाज यामुळें आसपास स्मशानाची भेसुरता पसरल्याचा भास होत होता. चंद्रप्रकाशास ढगांनीं मधेंच थोपवून धरल्यानें चांदणीरात्र असतांहि जिकडे तिकडे काळोख पडलेला होता.

तो मोठ्या रस्त्यावरून किनाऱ्याकडे फिरला आणि तडक समुद्र-किनाऱ्याकडे चालूं लागला. क्षणार्धांत आपण आपलीं दुःखे मागें टाकणार, आणि संकटापासून मुक्त होणार या विचारानें त्यास अशाप्रसंगींहि हंसूं कोसळलें. आवेशानें तो हातवारे करीत होता. जगाचें नातेंगोतें गुंडाळलें गेलें, लोकलज्जेचीं बंधनें निखळून पडलीं, आणि आजवरच्या आयुष्याकडे मागें वळून पाहण्याच्या तल्लीनतेंत तो मोठ्यानें हंसला. सभोंवार पसरलेली शांतता, आणि त्याचें विकटहास्य, यांच्यायोगें एकंदर देखाव्यास अधिक भेसुरता प्राप्त झाली. तो या वेळपावेतों किनाऱ्याजवळ येऊन पोंहोचला आणि नवीन बांधलेल्या धक्क्याखालीं उतरूं लागला; इतक्यांत कशाचें तरी

स्मरण होऊन तो मागें फिरला आणि शहराकडे तोंड फिरवून क्षणैक स्तब्ध उभा राहिला. जेथें आपणास अज्ञानदशेत दिवस काढावे लागले, व केवळ कुत्र्यामांजराप्रमाणे आपले हाल होत असतां जेथे इतरांस कींव आली नाहीं, अशा निष्ठुर शहराचे आणि त्याबरोबर बेफिकीर मानवजातीचे एकदांचें शेवटचे दर्शन घेण्यासाठी त्याचें मन घुटमळत होतें. त्यानें दोन्ही हात जोडले आणि 'शेवटचा रामराम' असे तो उद्गारला, व मागें वळून तो पुन्हा धक्क्यावरून खालीं उतरूं लागला; तोंच त्याच्या पायास कांहीं मऊ व कोमट असे लागून तो अडखळला. त्यासरशीं "कोण आहे? तुम्ही कशाला आला?" असा आर्त स्वर त्याच्या कानीं पडला.

"कोणी नाहीं, मी आहे," असे घाबऱ्या घाबऱ्या त्यानें उत्तर दिलें आणि दचकून तो मागें लांब सरून उभा राहिला. "मला अंधारांत दिसलें नाही."

"बरें, मग! मला एकटीला इथे बसूं द्या आणि तुम्ही आपले दूर जा कसे!" असे म्हणून ती व्यक्ति धक्क्यावरून खालीं उतरूं लागली.

त्यासरशीं त्याच्या मनांत एकदम खळबळ उडाली. एका अबलेची मूर्ति आपल्या जिवावर उदार होऊन पाण्यांत उडी घेण्यास उद्युक्त झालेली आहे, हें त्या काळोखांतहि त्यास समजण्यासारखे होतें. "अहो बाई, कृपा करून थांबा, असा अविचार नका करूं," असे शब्द नकळत त्याच्या तोंडावाटे बाहेर पडले.

"तुम्ही आपल्या वाटेनें जा कसे," असें काकुळतीचें उत्तर तिनें दिलें. "तुम्ही जा कसे! मी कोणाच्या आध्यामध्यांत नाहीं. तुम्ही कोण मला आडविणार?"

"पण तुम्ही आपल्या जिवाचें बरें-वाईट करणार कीं काय?"

"होय, मग?"

"असला अविचार करूं नका, मागें फिरा."

"नका हो माझ्याआड येऊं; जीव देण्याला तरी धीर यावा लागतो. मी आज आठ दिवस प्रयत्न करतें आहें. तेव्हां उगीच मला अडथळा नका हो करूं."

"इतकें काय त्यांत अवघड आहे? अं:, मला अर्ध्या तासापूर्वी

वाटलें, कीं पुरे आतां जगणें, आणि निश्चय झाला तो तडक इकडेच आलों."

"तुम्ही बरेंच धीराचे दिसतां!"

"छेः छेः! मरण्यापेक्षां जगण्यासच धीर पाहिजे, आणि जगण्याच्या आपत्तीपेक्षां मरणेंच मला बरें वाटतें. कसला धीर घेऊन बसलां आहांत!"

अशीं बोलणीं उभयतांचीं झालीं आणि दोघेंहि एकमेकांकडे पहात आणि एकमेकांबद्दल विचार करीत स्तब्ध उभीं राहिलीं. आयुष्याच्या शेवटच्या घटकेस आणि शेवटच्या ठिकाणीं दिसणाऱ्या व्यक्तीस येथपर्यंत आणण्यास काय कारणें झालीं असतील तीं जाणण्याची उत्सुकता उभयतांस सारखीच वाटत होती. काळोख कायमचा होता, त्यामुळें परस्परांचा चेहरा दिसत नव्हता. ती बाई त्याच्याजवळ आली आणि तिनें त्यास न्याहाळून पाहण्याचा प्रयत्न केला; आणि त्यास विचारलें,

"तुम्ही भ्यालांत काय?"

"काय म्हणून?"

"जीव देणें कठीण आहे म्हणतात."

"मला सर्व अनुभव आलेले आहेत. लोक काय म्हणतात! ते कांहीं म्हणेनात; मला तर त्यांत कांहींच वाटत नाहीं!"

"कां? जीव देण्यांत पाप लागतें म्हणतात?"

"माझ्या पुण्याईचें दिवाळें केव्हांच निघालें आहे, तेव्हां पापाशिवाय मजजवळ काय दुसरें राहिलें आहे? मी जीं संकटें भोगिलीं आणि भोगीत आहे त्यांपेक्षां आतां यमयातना तरी काय कठीण असणार? आणखी मी कशाला भीति बाळगूं?"

"माझ्यावर संकटें आलीं नाहींत, उलट माझ्या स्थितीच्या बाईस ज्या सुखसोयी मिळणें शक्य आहे त्या सर्व मला मिळालेल्या आहेत. आणि मरणाशिवाय मला दुसरी कोणतीच ऐहिक उणीव आतां राहिली नाहीं." थोड्या वेळानें ती म्हणाली, "बरें तुम्ही माझ्याबरोबर चला."

"कुठें?"

"माझ्या घराकडे."

"कशाला?"

" नाहीं उगीच, जीव देण्याची वाटाघाट करण्यासाठीं," असे किंचित् थट्टेचे व किंचित् हुकमाचे शब्द तिनें उच्चारिले.

" बरें, एक दोन मिनिटें थांबा."

धक्कयाच्या पायथ्याशीं झुगारून दिलेली फाटकी टोपी त्यानें शोधून काढली. " मी टोपी टाकून दिली ती शोधीत होतों म्हणून उशीर लागला. पुनः लोकांत वावरायचें म्हणजे डोक्यास कांहीं तरी घातल्याशिवाय बाहेर कसें पडायचें ? "

" मग एकंदरींत तुम्ही चांगले गृहस्थ होतां म्हणतां तर ? "

" घरावांचूनचा गृहस्थ मी अजूनहि आहें ! "

" बरें, गिरगांवांत चलावें," असें म्हणून ती पुढें व तिच्याबरोबरच पण एका पावलाच्या अंतरावर मागून तो जाऊं लागला.

ह्या स्त्रीच्या चालण्यांत एक प्रकारची तडफ आणि ऐट दिसून येत होती; आणि तो पाठीमागच्या पाठीमागें नाहींसा होत नाहीं ना, अशी शंका येऊनच कीं काय, ती वरचेवर त्याजकडे मागें वळून पाही. तिच्या एकंदर आविर्भावावरून ती एखाद्या श्रीमान् घराण्यांतील सुशिक्षित स्त्री असावी असें दिसत होतें. तिच्या वर्तनांत एक प्रकारची अशी छाप दिसत होती, कीं त्यास ती आज्ञा करीत असावी असें दिसे; आणि तिची आज्ञा पाळण्यानेंच आपण कृतकृत्य होणार आहोंत असें त्यास वाटावें. त्यामुळें 'गिरगांवांत कोठें, कशास,' असे त्याच्या जिभेवर घुटमळणारे शब्द उच्चारण्याचें त्याला धैर्य झालें नाहीं. ते दोघेंजण तसेच झपाझप रस्ता ओलांडून गांवांत शिरले आणि कोपऱ्यावरील दिव्याच्या उजेडांत चमकणाऱ्या तिच्या कानांतील हिऱ्याच्या कुड्यांच्या चकचकाटानें त्याचे डोळे दिपून गेले. निरनिराळीं वांकणें घेत घेत ते एका मोठ्या इमारतीशीं येऊन पोंहोचले; त्यासरशीं ती थांबली आणि जिना चढूं लागली व चढतां चढतां चौथ्या मजल्यावर येतांच तिनें पोलक्याच्या खिशांतून किल्ल्या बाहेर काढल्या आणि दाराचें कुलूप उघडलें. दिव्यांचीं बटनें दाबून दिवे लाविले आणि " या, असे येथें बसा," असा इशारा बरोबर आलेल्या इसमास दिला. तिच्या सांगण्याप्रमाणें तो भीत भीत आणि अंगावर बिन बटणाचा नुसता कोटच आहे हें तिच्या लक्षांत येऊं नये म्हणून गळ्याजवळील व पोटाजवळील कोटाचा भाग हातानें घट्ट धरून एका कोपऱ्याच्या सांधीस उभा

राहिला. खोलींतील टेबलें, खुर्च्या, आरसे, कपाटे, दिव्याच्या प्रकाशांत लखलखत होतीं आणि त्यांतील किंमती सामानावरून हा ब्लॉक कोणातरी श्रीमान् माणसानें ठेविलेला दिसत होता "हं, असे बसा कीं या खुर्चीवर." असे म्हणतांच तो खुर्चीवर बसला.

"हें पाहिलेत, हें माझे घर," असें म्हणून ती त्याच्यासमोरच्या खुर्चीवर बसली. तिच्या तोंडावर अनायासें विजेच्या दिव्याचा प्रकाश पडत असल्यानें त्यास तिला पाहण्याची उत्सुकता फार वेळ दाबून ठेवावी लागली नाहीं. तिचा उंच आणि सडपातळ बांधा, श्याम पण सतेज वर्ण आणि हुपारी, स्वाभिमान व करारीपणा व्यक्त करणारे किंचित् उग्र पण पाणीदार नेत्र, यामुळे ती सुरेख आणि मोहक दिसत असली तरी काळजी, दगदग आणि उदासीनता यांनीं तिच्या चेहऱ्यावर कायमच्या खुणा ठेवण्याकरितां तिच्या चेहऱ्यावर सुरकुत्या पाडल्या होत्या. अवघें तीस-पस्तिशीचें वय असतांना तिला अकालीं वार्धक्य आल्याप्रमाणें दिसत होतें, आणि चेहऱ्या-वर दिसणाऱ्या वार्धक्याची साक्ष डोक्यावरील पांढऱ्या होत चाललेल्या केसांनीं पटण्यासारखी होती.

त्या स्त्रीने त्या गृहस्थाकडे रोखून पाहिलें, व उघडें पडणारें दैन्य त्यानें जरी दोन्ही हातांनीं कोट घट्ट दाबून लपवून ठेविलें होतें, तथापि त्याची फाटलेली टोपी, लक्तऱ्या झालेले मळकट धोतर, वाढलेली हजामत, खोल गेलेले डोळे आणि गाल यांवरून त्याच्या विपन्नावस्थेबद्दलची तिला नाबडतोब कल्पना झाली.

"आंत चला," असें म्हणून ती आंतल्या दालनांत गेली आणि तिनें फडताळांतील फराळाचा डबा काढला व त्याला बसण्यास पाट मांडून एका बशींत त्याला कांहीं फराळाचें खाण्यास दिलें. "कशाला, मी आतां—" असें तो वरकरणी पुटपुटला; परंतु काळजाची आहुति घेणाऱ्या क्षुधेच्या वडवानलाच्या धगीने त्याचा आवाजहि खोल गेलेला आहे असें त्या स्त्रीच्या लक्षांत आलें. "थोडें खा, आणखी मग आपण बोलूं," असें म्हणत असतां पाटावर बसून त्यानें फराळास सुरुवात केली. वाढलेले पदार्थ त्याने इतक्या झपाट्याने खाल्ले, कीं एकदोन वेळीं तर त्याला ठसका लागला. पदार्थ संपतांच आसपास पडलेले कण आणि तुकडेहि त्यानें टिपून खाल्ले. क्षुधेची प्रखरता आणि उपासमारीची पराकाष्ठा पाहून तिचें मन

जास्तच द्रवलें. "हें पहा या डब्यांत आतां थोडेंच आहे. तें सगळेंच घ्या. नाहीं तरी उद्यां दुसरे पदार्थ करायचेच आहेत," असें म्हणत जवळजवळ सबंध भरलेला फराळाचा डबा तिनें त्याच्यापुढें ठेविला, व त्यास खाण्यास संकोच होऊं नये म्हणून 'पाणी आणत्यें' असें म्हणून ती आंत गेली. थोड्या वेळानें ती येते तों डबा खलास करून तो जमिनीवरचे कण वेंचीत होता. तिला पाहतांच तो वरमला. आतांपर्यंत त्याची खाण्याकडे इतकी एकतानता झाली होती, कीं त्यानें सर्व खाणें होईतों वर अगर बाजूस पाहिलें देखील नाहीं. पाणी पिऊन समाधान पावलेल्या त्यानें कृतज्ञतादर्शक दृष्टीनें वर मान करून पाहिलें व म्हटलें,

"मला अन्नदानानें जीवदान दिलेंत. आतां चार पांच दिवस मी सहज राहूं शकेन; तोंवर कामधंदा लागेल. माझे अनिष्ट दिवस आतां संपत आले म्हणूनच समजा."

"म्हणजे, येवढ्याशा खाण्यावर चार दिवस काढाल म्हणतां?" तिनें आश्चर्यानें विचारलें.

"गेल्या दोन महिन्यांत पोटभर अन्न असें आजच मिळालें आणि गेल्या तीन दिवसांत तर अन्नाचा एक कणही पोटांत गेला नाहीं."

त्याची ती भयंकर हकीकत ऐकून ती स्तिमित झाली, आणि क्षणैक तिच्या शरीरास भीतीनें कंप सुटला. आपलीं दुःखें आपण डोंगराएवढीं समजून त्याखालीं चूर झालों आणि आत्महत्येस तयार झालों, तीं याच्या हालअपेष्टांच्या मानानें कांहींच नाहींत, असें तिला एकदां वाटलें. अन्नान्नदशा किती भेसूर आणि हृदयविदारण करणारी असते, याचें प्रत्यक्ष चित्र तिच्या डोळ्यांपुढें असतांहि जिवाला पुरें न वैतागतां अजूनहि कामधंदा मिळेल अशी आशा बाळगणारी त्याची उमेद पाहून स्वतःच्या क्षुल्लक दुःखावेगानें आपणास जिवाचें बरें वाईट करण्याची हुरहुर लागली याबद्दल तिला विस्मय आणि लज्जा वाटूं लागली. आपणास कोणी नात्यागोत्याचें नाहीं, आणि अमुक एकाकरितां म्हणून जगावें असें कोणी नाहीं, व भावना, विचार आणि आकांक्षा यांची आज सतत पंधरा-वीस वर्षें उपासमार होत असतां जर कोणी आपणास स्नेहिसंबंधी भेटला असता तर आपणहि अशाच प्रकारें त्याच्या स्नेहाकरितां अधाशीपणानें तुटून पडलों असतों, असे त्याला खातांना पाहून तिच्या

मनांत आले; परंतु मानसिक क्षुधा तृप्त न झाल्यानें जे मनस्वी कष्ट होतात असें तिला आजवर वाटलें होतें, त्याच्या मानानें अन्नाच्या क्षुधेनें होणारे हाल किती तरी पटीनें दुःसह्य होत असेंहि तिला पटलें; आणि तिनें एक सुस्कारा सोडला. आपल्याच दुःखांचा एकसारखा विचार करण्यांत दिवस घालविल्यानें तिची जी एकलकोंडी व उदासीन वृत्ती आजवर झाली होती त्यांतून ती खडबडून जागी झाली, आणि सभोंवार पसरलेल्या मानवी दुःखसंतापाच्या प्रत्यक्ष अनुभवानें तिच्या मूळच्या ममताळू मनास दयेचा पाझर फुटला. समोर उभ्या असलेल्या अशा हजारों व्यक्तींच्या शारीरिक हालअपेष्टापुढें स्वतःचा मानसिक उद्वेग कांहींच नाहीं, असें तिला वाटूं लागलें. तिचा कंठ सद्गदित झाला.

"काय म्हणतां ? एवढ्या जबरदस्त अपेष्टा तुम्ही भोगीत आहांत अं ?"

"होय; पण आतां माझा ऊर्जितकाल जवळ आला आहे. माझ्या पोराबाळांची नष्टचर्या संपत आली आहे, आणि त्याचा आरंभ माझ्या या समाधानानें आपण करून दिला आहे. त्यांच्या सर्वांच्या नशिबानें मला कामधंदाहि लागेल."

त्यास आणखी जवळची आणि त्याच्यावर अवलंबून असलेली नात्याची मंडळी आहेत व खुद्द कुटुंबाच्या कर्तबगार पोशिंद्यावर जर हा असला भयंकर प्रसंग, तर त्या निराधार कुटुंबांतील कच्च्याबच्च्यांवर काय प्रसंग ओढवला असेल, ह्या विचारानें ती भयभीत झाली. इतक्या निखालस अपेष्टांतहि त्यास जगण्याची उमेद असल्याचें पाहून मात्र तिला अचंबा वाटल्याशिवाय राहिला नाहीं. त्याची थोडीबहुत हकीगत आपणांस समजली; आपली हकीगत त्यास सांगावी या हेतूनें ती म्हणाली,

"हें सभोंवार दिसतें आहे ना, तें मीं एकटीनें मिळविलें. त्याला मला गेलीं पंधरा वर्षें खर्चीं घालावीं लागलीं."

तिच्या बोलण्याचा त्याच्यावर फारसा परिणाम झालेला दिसला नाहीं व तिच्या बोलण्याचा हेतु लक्षांत न आल्यानें त्यानें उत्तर दिलें,

"खरेंच कां ? किती हो चांगल्या जिनसा आहेत या ? अगदीं राजाच्या इथेंहि इतक्या चांगल्या, किमती जिनसा दिसावयाच्या नाहींत. खरेंच, आपणच सगळें मिळविलेंत अं ?"

" पण त्याचा मला काय उपयोग ? माझ्यावर असा प्रसंग ओढवला त्या वेळीं मी अवघी वीस वर्षांची होतें. नुकतीच वकिली करण्यास सुरुवात केलेली तेव्हां काय इस्टेट असणार; पण दागदागिने मोडून मी येथें शिकण्यासाठीं आलें–"

" —माझे वडील वारले, तेव्हां त्यांनीं कांहीं थोडी इस्टेट ठेवली; पण माझी आई, बायको, मुलें– अशीं आम्हीं पांच-सहा जण खाणारीं—"

" येथें सुईणीचें काम शिकलें आणि—"

" मीहि थोडासा शिकलों, परंतु—"

" मी नर्सचें काम शिकलें," तो मध्येंच आपली हकीकत बोलण्यासाठीं उत्सुक झालेला दिसतांच त्यास तिनें हातानें थोडें गप्प बसून हकीगत ऐकण्यास खुणावलें. " आणि कामधंदा करूं लागलें. प्रथम मीं मोठ्या इस्पितळांत दहा वर्षें नोकरी केली. इस्पितळांतली नोकरी म्हणजे चोवीस तास काम; तसेंच उरल्यासुरल्या वेळांत घराकडे धांवावें, हिरवें-कचें, शिळें-पाकें असेल तें खावें आणि कामावर जावें. अशीं दहा वर्षें केव्हांच निघून गेलीं. मला मुळीं विचार करण्यास फुरसत नव्हती. पुढें मीं नोकरी सोडली, खासगी धंदा करूं लागलें, धंदाहि चांगला चालला. शिवाय घरांत मीं नोकरमाणूस कोणीच ठेविलें नव्हतें. सर्व कामें मला करावयाचीं असत; तेव्हां वेळ कसा निघून जाई हें मला समजत नसे. पैसे मिळवून एक स्वतंत्र फ्लॅट, फर्निचर व एक-दोन नोकरमाणसें ठेवीन ही माझी आज पंधरा वर्षांची एकसारखी महत्त्वाकांक्षा होती. गेल्या वर्षीं मीं बँकेंतील रकमेचा आंकडा पाहिला आणि पंधरा हजार रुपये सांठले आहेत असें दिसून येतांच माझी महत्त्वाकांक्षा पुरी होण्याचे दिवस जवळ आले, तेव्हां मीं हें सामानसुमान विकत घेतलें, हा फ्लॅट घेतला, स्वयंपाकास एक बाई ठेवली. मैत्रिणी, शेजारणीपाजारणी यांच्याकडे जाऊन, अगर सभासंमेलनांत हजर राहून ऐहिक सुखाचा असा पर्यायानें जितका आनंद मानून घेतां येण्यासारखा आहे, तेवढा घ्यावा आणि अशा या एकट्या अभागी जिवाचें रंजन करावें असा मीं विचार केला."

" वाः ! आणखी सुखाची परमावधि कोणती असणार ? "

" होय, तुमच्याप्रमाणेंच मलाहि पूर्वी वाटत होतें कीं, ही स्थिति माझ्या महत्त्वाकांक्षेची पराकाष्ठा होय; परंतु ती स्थिति प्राप्त झाल्यावर मी

पाहत्यें तों माझी पूर्ण निराशा झाली. माझ्यापुढें जोंवर नुसतें ध्येयच होतें, तोंवर तें साधण्याची धडपड करीत असतां जितकें मला सुखाच्या कल्पनेनें सुख वाटत होतें तेवढेंहि सुख प्रत्यक्ष मीं ही जागा भाड्यानें ठेवली, फर्निचर आणिलें त्यांत वाटलें नाहीं. घरांत काम करण्यास एक-दोन नोकर-माणसें ठेविलीं त्यामुळें मला रिकामपण बरेंच सांपडूं लागलें; परंतु त्या रिकामपणामुळेंच मला माझ्या एकलकोंड्या जिवाचा अधिकाअधिक कंटाळा आला. मैत्रिणी-शेजारणींकडे जावें म्हणावें, तर त्या आपल्या संसारांत दंग असावयाच्या. मी गेलें म्हणजे त्यांच्या सुखासमाधानाच्या गोष्टी सोडून मजपाशीं माझ्यासारखीस पटतील अशा गोष्टी त्यांनीं मुद्दाम बोलाव्यात असा प्रकार होई; त्यामुळें त्यांच्या सुखाच्या आड मी येतें असें वाटूं लागलें. बरें, सर्वांच्या पुढें पुढें करावें, दरेकाच्या उपयोगीं पडावें, तरी कामापुरतें जग विचारतें. तेव्हां मला नात्यागोत्याचें, जवळपासचें कोणी नाहीं, आणि अशा स्थितींत जगण्यांत तरी काय हंशील आहे! म्हणून मी गेले आठ दिवस आत्महत्या करण्याच्या प्रयत्नांत आहें. नोकरमाणसांना समजूं नये म्हणून त्यांना अगोदरच कामावरून दूर केलें. पुढची हकीगत तुम्हांला माहीत आहेच." असें म्हणून तिनें एक दीर्घ सुस्कारा सोडला आणि डोळ्यांस पदर लाविला.

तिचें दुःख ऐकून तो कांहींसा द्रवला. आजवर त्यानें आपल्या शक्त्य-नुसार अनेक स्नेह्यांस मदत केली होती आणि ज्या स्त्रीनें आपणास येथवर आणिलें; क्षुधेपासून अगर आत्महत्येपासून आपले प्राण वांचविले, त्या उपकारकर्त्या स्त्रीसहि येथून परत जाण्यापूर्वीं कांहीं धीराच्या गोष्टी सांगण्यांत आणि उदासीन झालेल्या तिच्या आयुष्यांत आशेचे अंकुर पेरावेत असें त्यास वाटलें. आपल्या आयुष्याची करुण कहाणी ऐकल्यानें तुलनेनें तिला तिचें दुःख क्षुल्लक वाटेल आणि पुनः कोणताहि अविचार करण्यास ती तयार होणार नाहीं, अशा कल्पनेनें त्यानें आपलें चरित्र शांतपणानें व धीमेधीमे सांगण्यास सुरुवात केली:—

"माझे वडील चांगल्या हुद्द्याच्या जागेवर होते व मी पंचवीस वर्षांचा होईतोंवर हयात होते. त्यांचा स्वभाव खर्चिक, तेव्हां त्यांनीं फारसा पैसा मागें ठेविला नाहीं, आणि जो कांहीं ठेविला होता तो मीं सट्टेबाजींत घातला. माझें पहिल्यापासून अभ्यासाकडे लक्ष नसे, त्यामुळें विद्या संपादना

करतां आली नाहीं. मी सट्टेबाजीच्या व्यापारांत पडलों तों कांहीं वर्षें मीं फारच पैसा मिळविला; आणि याच मुंबई शहरांत कोटांत एक स्वतंत्र ऑफिस भाड्यानें ठेवून आणि वाळकेश्वरीं बंगला ठेवून एका काळीं स्वतः-च्या मोटारींत वावरणारा एक व्यापारी आज तुमच्यापुढें उभा आहे. माझ्या भागीदारानें मला फसविलें आणि मला दिवाळें काढून देशीं जावें लागलें. पैसा जवळ मुळींच नाहीं, अशा स्थितींत जवळचे जिन्नस, फार काय, पण एकेक वापरण्याचा कपडा ठेवून बाकीचे कपडेहि विकून आम्ही एक वेळ तरी खात होतों. माझा स्वभाव मानी, आणि चालत्या काळांत मी माझ्या स्नेह्यांसोबत्यांस मदत केलेली, तरी त्यांच्याकडून होतां होईतों मदत न घेण्याचा माझा निश्चय. असे हालाचे दिवस काढीत असतां माझी पत्नी बाळंत झाली. तिला औषधपाणीच काय, पण पुरेसें पोटभर खाण्यापिण्यास न मिळाल्यानें—" येथें त्याचा कंठ दाटून आला आणि तो हुंदके देऊं लागला.

"हं, काय प्रसंग येतील ते खरे !"

"ती त्यांतच गेली. झालेलें मूल कांहीं दिवस मागें होतें; पण त्याला नुसतें दूध घालण्यासहि मजजवळ साधन राहिलें नाहीं. तेव्हां तेंहि तिच्या पाठोपाठ गेलें. माझी वृद्ध आई, व दोन मुलें अशीं माझ्या एका स्नेह्याच्या येथें ठेवून मी कामधंदा पाहण्यासाठीं मुंबईस आलों. येथें चार-दोन पैशांचें हॉटेलांतलें खावें, भायखळ्यावर फूटपाथवर रात्रभर पडून राहावें, असे गेले दोन महिने माझा क्रम चालला आहे. अंगांतील सद्रा मीं चार दिवसांपूर्वीं एका भिकाऱ्यास दोन आण्यांस विकला आणि त्यावर एक दिवस निभाव मीं केला. आज तीन दिवस पोटांत अन्नाचा कण नाहीं. तशांत आजच सकाळीं स्नेह्याचें पत्र आलें कीं त्याची नोकरी गेली, तेव्हां माझ्या मंडळींची मीं तजवीज करावी. रात्रीं विचार करीत भटकत होतों, तों एकदम विचार आला, कीं भुकेनें तडफडून मरण्यापेक्षां समुद्रांत उडी घ्यावी. यदाकदाचित् भीक मागून मी जगलों तरी कच्चींबच्चीं अन्नावांचून तडफडून मेल्याचें वर्त-मान ऐकावें लागेल. तेव्हां या सर्वांचाच शेवट लावण्याकरितां मी आत्महत्येस तयार झालों होतों. आतां मला कामधंदा पाहण्यास दोन तीन दिवस मिळाले. या खाण्यावर चार-सहा दिवस मी सहज काढूं शकेन; अशी मला संवयच झालेली आहे."

त्याचें चारित्र्य केवळ पाषाणासहि पाझर फोडण्यासारखें कष्टमय असतां आणि तो ऐहिक दुःखाची सीमा ओलांडीत असतांहि त्याला जगण्याची आणि कामधंदा मिळविण्याची हिम्मत असलेली पाहून तिला थोडासा विस्मय वाटला, आणि त्याच्या या करुण कहाणीच्या मानानें आपलें दुःख सिंधूंत बिंदूप्रमाणें क्षुल्लक असतांहि आपण निराश झालों, याबद्दल तिला पश्चात्ताप झाला. अशा असंख्य दुःखितांचा वर्ग भोंवतालीं असतां त्यांना मदत करण्याचें श्रेय घेणें यांतच आपल्या राहिलेल्या आयुष्याचा चांगला विनियोग होणार आहे, असेंहि तिच्या मनांत आलें.

"अशा परिस्थितींतून कायमचें पाऊल काढण्याकरितां आत्महत्या करावी असें मनांत आलें आणि समुद्राचा किनारा गांठला. कामधंदा करीन म्हणतों तर मिळत नाहीं. भीक मागून मलाहि जगतां येईल; पण आपली जात म्हणजे उपाशी मरेल पण भीक मागणें त्यांना होणार नाहीं." कांहीं वेळ थांबून तो म्हणाला, "पुनः असा अविचार करूं नका. तुम्हांला काय कमी आहे? जगाच्या दुःखाकडे पहा आणि आपलें दुःख विसरा. बरें तर, मी जातों आतां. तुमचे उपकार मी जन्मांतहि विसरणार नाहीं." असें म्हणून तो उठला आणि जाण्यास निघाला.

"कुठं जाणार तुम्ही?"

"निजण्यासाठीं जातों. रात्र बरीच झाली आहे, आपलीहि निजण्याची वेळ होऊन गेली."

"मग तुम्ही आजपासून माझ्या येथें नोकरीस राहतां का? मला नोकर ठेवण्याची ऐपत आहे, आणखी दोन नोकर ठेविलेले होतेच. तेव्हां तुमची राहण्याची इच्छा असल्यास तुम्हीच रहा."

"होय, मी आनंदानें नोकरी करीन; पाहिजे तें काम करीन; पण माझ्याबद्दलची माहिती कोण तुम्हांस येथें देणार?"

"मला जास्त माहिती नको, आणखी कोणाची खात्रीहि नको. आपला दोघांचा आज पुनर्जन्म झाला, निदान अपमृत्यु तरी टळला. अशा वेळीं आपण एकमेकांस भेटलों व एकमेकांच्या उपयोगीं पडलों; तेव्हां तुमच्याबद्दल खात्री देण्यास मला दुसरा कोणी नको आहे. तुम्ही आजपासून येथेंच रहा."

"बरें, तुमच्या आज्ञेप्रमाणें."

तिनें बाहेरच्या दालनांत त्याच्याकरितां एक बिछाना टाकून दिला. " इथें निजा; मी आंत निजतें." असें म्हणून मधलें दार तिनें लावून घेतलें. त्यानें सांगितलेल्या हकीगतीनें तिच्या मनांत काहूर उठलें, त्यामुळें तिला रात्रभर झोंप आली नाहीं. इकडे किती तरी दिवसांनीं अन्न मिळाल्यामुळें त्याच्या कैफानें तो गाढ झोंपीं गेला. निजावयाच्या अगोदर कामधंदा मिळाला आणि आईला व मुलांना मी आतां वांचवीन, अशा आनंदाच्या विचारानें तो हुरळून गेला होता.

दोन बळी मिळावयाचे ते न मिळाल्यानें असंतुष्ट झालेला समुद्र इकडे रात्रभर रागानें डरकाळ्या फोडीत किनाऱ्यावर लाटांचे तडाखे देत राहिला.



# औट घटकेचा देशभक्त : : ८

जुलै १९३० मध्यें उन्हाळ्याच्या दीर्घ सुटीनंतर विद्यालयें उघडलीं, वेळापत्रक तयार झालें, वर्ग भरले, शिक्षक शिकवूं लागले; पण मुलांचीं मनें वर्गांत कोठें होतीं ? प्राणरहित कलेवराप्रमाणें विद्यालयाला रूप आलें. मुलांचीं सुलभ भावनावश कोमल हृदयें महात्माजींच्या पदारविंदीं गुंजारव करीत होतीं, त्यांचे डोळे विलायती कापडाच्या व दारूच्या दुकानदारांवर पाळत ठेवण्यांत गुंतले होते; त्यांचे हात बेकायदा मीठ वेंचण्यांत गुंतले होते; त्यांची जीभ चुरचुर व्याख्यानबाजी करीत होती. पण शिक्षकांना हें माहीत नव्हतें. कारण ते वर्गांतील बांकांवर पूर्वीप्रमाणेंच बसत असत, त्यांच्या हातीं पेन्सिली असत व त्यांचे डोळे समोरच्या काळ्या फलकावर रोखलेले असत; समोर पुस्तकें उघडीं पडलेलीं असत ! मुलांचें लक्ष तिकडे नसे हा प्रश्न आलाहिदा !

एक महिन्याच्या आंतच बापू व बंडू या दोघांनीं कॉलेजला रामराम ठोकला व हिंदभूमीच्या स्वातंत्र्यप्रीत्यर्थ चाललेल्या शांतिसंग्रामांतील सैनिकदलांत आपलीं नांवें नोंदविलीं. बापूचा बाप अधिकारी होता व तो स्वतः श्रीमंतींत, लाडांत व चैनींत वाढला होता. त्यामुळें त्याचा चेहरा तुकतुकीत

व गुबगुबीत दिसे. तो खादीचीं वस्त्रेंहि दिवसांतून तीन वेळां तीन प्रकारचीं घाली. नखरेलदार केसांचा भांग, त्यावर पांढरी शुभ्र टोपी, अंगांत परिट-घडीचा शर्ट, डोळयांवर चष्मा, आणि पायांत मऊ चटकदार वहाणा, या पोषाखांत बापू मिरवत चालला म्हणजे त्याला नजर लागेल अशी त्याच्या आईला साहजिक भीति वाटे. एकदोन वर्षें परीक्षेंत त्याला गोता बसल्यामुळें तोहि अभ्यासाला कंटाळला होता, व आयुष्यांत कांहीं तरी नवी नव्हाळी त्याला हवी होती. त्यामुळें तो स्वयंसैनिक झाला, म्हणून त्याची शौकिन राहणी थोडीच बदलणार!

नगर कॉंग्रेस-कमिटीला बापूचें फार कौतुक वाटे. एवढा थोरामोठ्याचा मुलगा स्वयसैनिक झाला; हें काय थोडें झालें? त्यानें काम कशाला केलें पाहिजे ! त्याच्यामुळें स्वयंसैनिकदलाला प्रतिष्ठा लाभली ! इतर मंडळी त्याला बापूसाहेब म्हणून हांक मारून गौरवूं लागली. सभेंत त्याला उच्च स्थानीं मानाची जागा मिळूं लागली. त्याचा सल्ला विचारला जाऊं लागला. तोहि त्याबद्दल स्थानिक कॉंग्रेस अधिकाऱ्यांना आपल्या खर्चानें क्वचित् घरीं परंतु बहुधा हाटेलांत चहा पाजूं लागला, केक्स, बिस्किटें पुरवूं लागला आणि झुरके मारावयास सिगारेट देऊं लागला! त्याच्या देशभक्तीचा त्यामुळें सर्वत्र बोलबाला झाला. कॉंग्रेसची मोटार उडवत इकडून तिकडे तो झोकांत भटकत असे. कारण त्याच्या घरीं स्वतःची खासगी मोटार असल्यामुळें, मोटार चालविण्यांत तो अत्यंत वाकबगार बनला होता. याखेरीज एक अत्यंत नाजुक कामगिरी त्यानें आपण होऊन पत्करली होती. मुलींच्या प्रभात व सायंफेरीबरोबर तो त्यांचा रक्षक म्हणून सोबतीस जात येत असे. धटिंगण पुरुषांच्या फेऱ्यांना रक्षक काय करावयाचे? परंतु सुंदर ललनांना बापूसाहेबासारखा फॅशनेबल स्वयंसेवक हवासा वाटला तर त्यांत नवल नाहीं. बापूसाहेब त्या मुलींबरोबर वाटेंत गप्पा मारून त्यांची करमणूक करीत व हंशा पिकवीत. कधींमधीं आपल्या कॅमेऱ्यानें त्यांचे तऱ्हेतऱ्हेचे स्नॅप्शॉट घेत असत व कधीं कधीं कॉंग्रेसच्या मोटारींत त्यांच्यापैकीं कांहींजणींना आळीपाळीनें बसवून बागेंतून किंवा दूर तलावावरून सहल करवून आणीत. हेतु हा कीं, त्या मुलींना देशसेवा करतांना आलेला थकवा दूर व्हावा व त्यांचा श्रमपरिहार व्हावा! बापूची सर्वत्र प्रसिद्धि झाली व तो बडा देशभक्तनायक गणला गेला.

बिचारा बंडू गरीबाचा मुलगा, दारिद्र्यांत त्याचे दिवस गेलेले. अभ्यासांत मात्र तो चांगला होता. कोणत्याहि परीक्षेंत त्याला अपयश आलें नव्हतें व त्याचा दुसरा वर्ग गेला नाहीं. परंतु त्याचें भावनावश मन देशाच्या हालअपेष्टांनीं द्रवलें व त्यानें कॉलेजला रामराम ठोकून स्वयंसैनिकांत आपलें नांव दाखल केलें. तो उन्हातान्हांत कधीं अर्ध्या पोटीं तर कधीं उपाशीच वणवण फिरे, निरोप्याचें काम करी, परदेशी कापडाच्या दुकानावर सकाळपासून संध्याकाळपर्यंत आणि सूर्यास्तानंतर दारूच्या गुत्त्यावर सारखा पिकेटिंग करी. उभा राहून राहून त्याच्या पायाचे सांधे ढिले होत, त्याला विलक्षण थकवा येई, दुकानदारांचे अभद्र व अश्लील शिव्याशाप ऐकावे लागत आणि कधीं कधीं तर लाठीकाठीचा मारहि खावा लागे. परंतु त्यानें कधीं उलट तक्रार केली नाहीं, कीं उलटून हात उगारला नाहीं. खाण्यापिण्याची व कपड्यालत्त्याची त्याला फिकीरच नव्हती. तो असल्या हालअपेष्टांनीं आजारीच पडावयाचा, परंतु सरकारला त्याची दया आली, त्याला पकडून झटपट त्याच्यावर खटला भरण्यांत आला, आणि पिकेटिंगबद्दल त्याला सहा महिने सश्रम कारागृहवासाची शिक्षा ठोठावण्यांत आली. त्याच्यासारख्या दरिद्र्याला 'क' वर्ग मिळाला, हें काय निराळें सांगावयास पाहिजे ? पण बंडूचा आत्मयज्ञ कोणाच्या खिजगणतींतहि नव्हता. कारण तो हजारों सामान्य जनांत मोडत होता. त्याच्यांत वैशिष्ट्य कोठें होतें ? साधा भिकारडा स्वयंसैनिक झाला काय व जेलमध्यें गेला काय, एकच ! त्या प्रभातफेरीबरोबर हिंडतां हिंडतां बापूच्या रोमान्सला भरपूर खाद्य मिळालें. महात्मा गांधी व लॉर्ड आर्विन यांचा समेट होऊन युद्ध-तहकुबी होतांच बापूसाहेब विवाह जुळविण्याच्या खटपटीस लागले, आणि पहिल्याच शुभ मुहूर्तावर एका सुंदर तरुणीबरोबर त्यांचें लग्नहि लागलें. श्रीमंताच्या घरचें लग्न, तेव्हां त्याचा थाट काय वर्णन करावा ? शिवाय बापूसाहेबांचें वडील बडे पगारदार सरकारी अधिकारी ! त्यांना सर्वच गोष्टी अनुकूल होत्या ! सर्व स्थानिक कॉंग्रेसचे कार्यकर्ते लग्नांत सारखे झुलत होते, मग इतरांचा पाड काय ? कारण गरीब कारकून, व शाळामास्तर यांच्यावर कॉंग्रेसचा व स्थानिक कार्यकर्त्यांचा सारा रोष ! दुबळ्यांचा छळ करण्यांत पुरुषार्थ न मानणारे हाताच्या बोटांवरच मोजतां येतील; पण स्वयंसैनिकांना सरसहा सक्तमजुरीच्या शिक्षा ठोठावणारे मॅजिस्ट्रेट व जज्ज यांना कॉंग्रेस कार्यकर्ते दचकून व वचकून असत.

त्यांच्यावर बायकॉट टाकण्याचें नांव देखील कोणी काढीत नसे. कारण जबर-दस्ताचा दंडा खांद्यावर असतो. गरीबांना येतां जातां दोन लाथा मारल्या किंवा चार शिव्या दिल्या तर त्याची दाद ना फिर्याद ! जगाच्या सामान्य रहाटीला काँग्रेसचे स्थानिक अधिकारी तरी अपवाद कसे ठरणार ? लग्नाचा जलसेदार थाट उडाल्यावर बापूसाहेब आपल्या नववधूसह महाबळेश्वरला 'हनीमून'-करितां निघून गेले ! कारण ते सुधारक वडिलांचे सुधारक चिरंजीव होते व इंग्रजी पद्धतीनें कोर्टिंग करून त्यांनीं आपली वधू स्वतः पसंत केली होती. प्रभातसायंफेऱ्यांमुळें कोर्टिंग करण्याकरितां त्यांना संधि लाभली एवढेंच ! नाहींपेक्षां या पुराण्या हिंदुसमाजांत तशी संधि सांपडणें दुरापास्त ! काँग्रेस-च्या कामामुळें आलेला थकवा दूर व्हावा व दोन महिने जिवाला विश्रांति मिळावी हा बापूसाहेबांचा उद्देशहि महाबळेश्वरच्या ट्रिपनें साधला. त्यांची योग्यता जाणून त्यांना भरपूर पैसे पुरविण्यांत त्यांच्या वडिलांनीं मुळींच काटकसर केली नाहीं !

बिचारा बंडू जवळ जवळ सहा महिने तुरुंगांत खितपत पडला होता. त्याला तेथें फार कष्ट करावे लागले व खाण्यापिण्याचे त्याचे तेथें फार हाल झाले. त्याचे डोळे खोल गेले, गाल बसले, आणि हात-पाय लुकडे झाले ! एक वर्ष गेलें ! कॉलेजांत पुनः प्रवेश मिळण्याची मारमार दिसूं लागली, व मिळाला तरी तेथील वाढता खर्च त्याला झेपण्यासारखा नव्हता. शिवाय १९३१ पासून शाळा-कॉलेजांची फी वाढली ! पहिलीच फी गरीबांना जड वाटत असे, मग हा जादा बोजा ते कसा सहन करणार ? बी. ए. होण्याचा नाद त्याला नाइलाजानें सोडावा लागला. तो नोकरी धुंडाळूं लागला. बेकारी सर्वत्र माजलेली, आणि कैदी हा शिक्का बंडूच्या कपाळाला चिकटलेला ! तेव्हां त्याला नोकरी कशी मिळावी ? तो भिकारडा ! त्याला ना कोणाचा आसरा ना वशिला; आणि वशिल्याशिवाय आजच्या जगांत माणसाचें पुढें पाऊल देखील पडणें शक्य नाहीं. बिचारा अगदींच दीन व खंगलेला दिसूं लागला ! काँग्रेसचें शिबिर बंद झालें होतें. त्यामुळें त्याला घरींच जेवावें लागे ! आणि आपला भार आपल्या घरच्या गरीब मंडळीवर घालणें त्याच्या सात्त्विक मनाला जड वाटे ! रोज सकाळ-संध्याकाळ तुकडे मोडतांना त्याचें मुख लज्जावनत होई. त्याला जिणें जड वाटूं लागलें.

बापूसाहेब महाबळेश्वराहून परत आले. लग्न व महाबळेश्वर दोन्ही

त्यांना उत्तम मानवलीं ! हिंदुस्थानांतील भिकारड्या विद्यालयांत काळाचा अपव्यय करणें त्यांना प्रशस्त वाटेना. कारण येथें माणसाच्या अंगच्या गुणांची व त्याच्या उच्च कुलाची योग्य कदर होत नाहीं असें त्यांचें प्रामाणिक मत होतें ! येथें काय– सब घोडे बारा टक्के ! एखादा पेपर बिघडला, कीं मुलगा नापास ! त्याला पास केला तर परीक्षकाच्या पदरचे काय चार चव्वल खर्च होतात ? पण एवढा पोक्त विचार करतो कोण ? तेव्हां विलायतेंत जाऊन बॅरिस्टर होऊन येण्याचा बेत त्यांनीं निश्चित केला. केल्यानें देशाटन–– माणसाला चातुर्यहि येतें व दृष्टि पण रुंदावते ! विलायतच्या स्वतंत्र वातावरणांत राहतां येतें व तेथील मौज अनुभवितां येते. तो वेडापीर रामन् खुशाल म्हणो, कीं 'शास्त्रीय संशोधनाकरितां देखील युरोपांत जाण्याची विद्यार्थ्याला मुळींच आवश्यकता नाहीं. हिंदुस्थानांतच वाटेल तें ज्ञान सहज मिळवितां येईल.' बापूसाहेबांच्या वडिलांनीं त्यांच्या विलायतच्या यात्रेला संमति दिली व बापूसाहेबांनीं आपल्यासाठीं बोटींत फर्स्ट क्लासची बर्थ राखून ठेवली ! विलायतचे रीतिरिवाज येथेंच कळावे म्हणून ते तिकडील पोषाखाची व खाण्यापिण्याची युरोपियन हॉटेलमध्यें मधून मधून संथा घेऊं लागले. कारण बोटीवर फजीती होतां कामा नये. आपल्याला युरोपियन चालीरीति यथा-योग्य ठाऊक नसल्या, तर अडाणीपणा आपल्या पदरांत येईल अशी भीति त्यांना वाटे.

एक दिवस त्यांची व बंडूची रस्त्यांत सहज गांठ पडली ! पायाचे टाके तुटले तरी बंडू नोकरी शोधण्यासाठीं एकसारखी पायपीट करीत होता, आणि बापूसाहेब विलायतच्या महायात्रेचीं रोज स्वप्नें पाहत होते ! बापू व बंडू दोघेहि कॉलेजांतील सहाध्यायी व कॉंग्रेसमधील स्वयंसेवक ! अडला नारायण काय करीत नाहीं ? बंडूनें आपली दीन स्थिति बापूसाहेबांना निवेदन केली, व त्यांनीं आपल्या थोर वडिलांजवळ भीड घालून लहानशी नोकरी मिळवून देण्याविषयीं विनंति केली !

बापूसाहेबांचे नेत्र आरक्त झाले. त्यांच्या मुद्रेवर तिरस्कार ओतप्रोत भरला. ते तीव्रतेनें म्हणाले, " बंडू, आपण कॉंग्रेसचे स्वयंसेवक ! तुला लाज नाहीं वाटत नोकरीकरितां तोंड वेंगाडण्याची ? नोकरी म्हणजे प्रत्यक्ष गुलामगिरी ! तेव्हां काय लंब्या लंब्या देशभक्तीच्या बाता मारीत होता !

पिकेटिंग काय केलें, तुरुंगांत काय गेला ? आणि आतां नोकरी मागतोस ? तुला शरम नाहीं वाटत ? देशभक्तीचें चांगलें सोंग आणलें होतेंस ! कॉंग्रेस देखील तुझ्या सोंगाला फसली ! तुझ्याशीं बोलण्याची मला खरोखर लाज वाटते. तुझ्यामुळें आम्हां बाकीच्या देशभक्तांच्या तोंडाला कालिमा लागेल ना ? कांहीं स्वतंत्र धंदा कर. कॉंग्रेसला कां कमीपणा आणतोस ? आपण तर बोवा विलायतेला जाऊन बॅरिस्टर होऊन येणार व स्वतंत्र धंदा थाटणार ! ह्या नोकरीच्या गुलामीत आपण पाऊल टाकणार नाहीं, आणि तूं देखील हा मूर्खपणाचा विचार सोडून दे. तुझ्यासारखे औट घटकांचे ढोंगी देशभक्त कॉंग्रेसमध्यें सामील झाले, म्हणून तर हिंदुस्थानला लवकर स्वराज्य मिळत नाहीं. पुनः मला भेटूं नको. भेटलास तर मी ओळख देणार नाहीं."

बापूसाहेबांनीं बंडूला हें व्याख्यान ऐकविलें व ते चालते झाले. त्यांच्या जिभेची शांति झाली ! कारण तह झाल्यापासून त्यांना व्याख्याना-चा मोकाच येईना ! बंडू मात्र जागच्या जागीं स्तंभित झाला व वेड्या-सारखा बापूसाहेबांच्या फॅशनेबल मावळत्या मूर्तीकडे टक लावून पाहूं लागला ! थोड्या वेळानें तो भानावर आला व एक निःश्वास सोडून म्हणाला, "औट घटकेचा देशभक्त कोण ? मी कीं बापू ? हिंदुस्थानचें राजकारण कोणामुळें नासलें ? माझ्यासारखा दीनामुळें, कीं बापूसारख्या श्रीमंतांमुळें ?"

## ईश्वराचा खेळ ! : : ९

उद्यां गणपती यावयाचा म्हणून सर्व मुलें गणपतीचें मखर तयार करण्यांत गर्क होऊन गेलीं होतीं. शंकर कामट्या तासून गुळगुळीत करीत होता. गणू रंगीबेरंगी कागद नीट कापीत होता. ठकू डिंक कुटून तो भिजत घालण्याची तयारी करीत होती. लहानगा रामा व कमू हीं उत्सुकतेनें या सर्व चाललेल्या कामावर जणूं देखरेख करीत होतीं.

रमाकाकू घरांत नारळ फोडून त्यांचें पुरण करण्यांत गुंतल्या होत्या.

शामराव रात्रीं घरीं येतांना दुर्वा, फुलें, कमळें, केवडा वगैरे पूजेच्या वस्तु व डाळिंबें केळीं वगैरे फळफळावळ घेऊन आले. उद्यां गणपती येणार म्हणून त्या घरांत कोण आनंदी आनंद भरून राहिला होता.

* * *

गणेशचतुर्थीचा दिवस उजाडला. सर्वांनीं स्नानें केलीं. आज शंकर गणपतीची पूजा करणार होता. त्याचा नवा कद आईनें मुद्दाम बासनांतून बाहेर काढून ठेवला होता. सुमारें ८॥ वाजतां रामराव गणरायाची मृण्मयमूर्ति घेऊन घरीं आले.

गणपतीची ती लहानगी– एक हात उताणा तर दुसरा हात 'पुरे' म्हणून समाधान व्यक्त करणारी–उपडा हात असलेली–उजव्या सोंडेची व सुव्या हातांची, केशरी रंगानें रंगविलेली अशी ती मूर्ति पाहून मुलें आनंदानें 'गणपतिबाप्पा मोरया' म्हणून नाचूं-बागडूं लागलीं! शामरावांनीं यंदा गणपती प्रथमच घरीं आणला होता. आजपर्यंत त्यांचें स्वतःचें घर नव्हतें तेव्हां ते म्हणत स्वतःचे घरांतच गणपतीची स्थापना करूं. भाडोत्री घरांत, असले उत्सव करणें त्यांना पसंत नव्हतें. ते गणपतीहि आणण्यास तयार नव्हते. ते म्हणत, कीं गणपती आणावयाचा आणि तो दोन दिवसांनीं पांच दिवसांनीं, अगर दहा दिवसांनीं बुडवावयाचा याचा अर्थ काय? बसवूं तेव्हां घरांत गणपतीची संगमरवरी मूर्ति कायमची बसवूं व तिचा उत्सव दरवर्षी थाटानें करीत जाऊं. पण यंदा आपल्या पत्नीच्या—रमा-काकूंच्या इच्छेप्रमाणें त्यांनीं गणपती आणावयाचा, चार दिवस ठेवावयाचा व जनरीतीप्रमाणें चवथे दिवशीं तो घरामागच्या विहिरींत कवळासावयाचा असें ठरविलें होतें.

चार दिवस उत्सव मोठ्या थाटानें पार पडला. पहिले दिवशीं रात्रीं मंत्रजागर झाला, दुसरे दिवशींची रात्र खास मुलांच्या संमेलनाकरितां राखून ठेवली असून शामराव त्या मुलांत जातीनें मिसळून त्या मुलांच्या बरोबरीनें खेळत होते. मोठ्या माणसांनीं आपल्याबरोबर खेळावें यांत मुलांना फार गंमत वाटते.

शामरावांनीं घरांत कॅरमचा बोर्ड आणून ठेविला होता. पण त्यांना स्वतःला तो खेळ कांहीं जमत नसे. चिमीनें हट्टच धरला, कीं काका मी

तुमचेबरोबर कॅरम खेळणार. काकांनीं खूप सांगून पाहिलें, कीं 'मला येत नाहीं' पण मुलें कांही केल्या ऐकतना. अखेर शामरावांना मुलांनीं खेळण्यास भाग पाडलें. चिमीनें शामरावावर सणसणीत बिनतोड डाव लावला. मुलांनीं चिमीनें डाव जिंकतांच इतक्या जोरानें टाळ्या वाजविल्या, कीं घरांत झोपीं गेलेल्या रमाकाकू जाग्या होऊन बाहेर आल्या.

'चिमे काय ग दंगा आहे, अंमळ स्वस्थ पडूं देऊं नका! चला, निजा आतां. घर जसें कांहीं कारट्यांनीं डोक्यावर घेतले आहे.' शामराव मुकाट्यानें पण मिस्किलपणानें हंसत पत्नीच्या त्या वेळच्या जमदग्नीच्या अवताराकडे पाहत होते. त्यांच्याकडेहि रमाकाकूंनीं मोर्चा वळविला! शामराव तरीहि शांतपणे व मुग्धतेनें त्यांचेकडे पांच मिनिटें पाहत राहिले तेव्हां अखेर रमाकाकू म्हणतात, 'शर्थ झाली बाई. मोठीं माणसेंच लहान मुलांत मिसळलीं; मग बोलायचें तरी काय आणि कुणाला?' आणि मग मुलांकडे वळून त्यांनीं सर्वत्रांना आपापल्या अंथरुणावर पिटाळलें. मग खेळ तेथेंच संपला!

तिसरे दिवशीं शामरावांची मित्रमंडळी जमली. लहान मुलांना आज अकरा वाजेपर्यंत जागण्याची परवानगी होती. बाकी मोठ्या माणसांनीं आज सर्व रात्र जागून काढली.

आज रमाकाकूंचा 'निजा आतां' हा हुकूम कोणीच मानला नाहीं! उलट हरिभाऊ वहिनींनाच म्हणाले 'वहिनी, शामराव व आम्ही आज सबंध रात्र हरिजागर करणार. आज तुमचें कांहीं चालायचें नाहीं!'

रमाकाकू म्हणाल्या 'भाउजी सबंध दोन रात्रीं का जागा ना? जागरण बाधलें तर मात्राचित्रा मी उगाळून देणार नाहीं. 'होळीचे होळकर' तुम्ही, उजाडले, कीं जाल उपरणीं झाडून. सर्व निस्तरायला लागतें मला.' असा टोमणा दिलाच. अखेर कॉफीचे कप बाहेर येऊन थडकले. आज कॉफीचें मुक्तद्वार होतें. रमाकाकू वाणीच्या तिखट, तर हाताच्या सढळ होत्या! त्यांनीं तीन पितळेच्या किटल्या कॉफी करून आणून दिवाणखान्यांत ठेवली होती. किटल्या गरम राहण्याकरितां त्या मंद शेगड्यांवर ठेवण्यांत आल्या होत्या. मंडळी सहा होतीं. एकेकाला पांच पांच कप कॉफी वाटयाला येईल अशा बेतानें रमाकाकूंनीं हिशेब ठेवला होता. ज्यानें त्यानें लागेल तेव्हां किटलीचा कॉक सोडून पेला भरून घ्यावयाचा. कोणी कोणाचें मोजमाप

ठेवावयाचें नाहीं. उजाडेपर्यंत खेळ होऊन मंडळी घरोघर गेली व शामरावहि खेळल्याच जागीं झोपीं गेले.

* * *

शेवटच्या दिवशीं पांच वाजतां वातावरण बदललें. भटजी खांद्यावर उपरणें टाकून उघड्या शरिरानेंच येऊन दाखल झाले. शामरावांनीं स्नान केले. शेजारचीं माणसेंहि जमलीं. गणपतीच्या उत्तरपूजेला सुरुवात झाली. आतां पूर्वीचा उत्साह मुलांत उरला नव्हता. रामू व कमी गणपतीची मृण्मय मूर्ति मखरांतून काढून नुसत्या दुर्वा वाहून ठेवलेली पाहून जरा गोंधळलेली दिसली. मंगलमूर्तीच्या हातावर व पोटावर लोणी ठेवण्यांत येऊन मंडळी मागच्या बाजूला विहिरीच्या रोखानें निघाली.

—चार दिवस 'देव' म्हणून मखरांत बसवलेली मूर्ति विहिरींत टाकण्याकरितां चालविली आहे असें जेव्हां रामू व कमूस कळलें तेव्हां गणपतिबाप्पाला बुडवायचा नाहीं असें म्हणून जो रडण्याचा आकान्त त्यांनीं मांडला तो कांहीं विचारूं नका. 'अग कमा, बाप्पा पुढच्या वर्षीं परत यायचाच आहे. आतां तो बुडवायचाच.' काकू समजूत करूं लागल्या. रामूनें काकांच्या धोतराचा सोगा पकडला तो त्यांना पुढें जाऊं देईना. कमा नुसती आईचे ओचे धरून राहिली होती. रामूनें तर सत्याग्रह करण्याचेंच ठरवलें. नाइलाजानें 'श्रीगणराज' भटजींच्या स्वाधीन करून शामरावांना रामूला घेऊन परत फिरावें लागलें. इकडे इतर मंडळींनीं गणाधीशास त्यांच्या घरीं पाठवून दिलें. मातीस माती मिळून गेली. पण रामूची व कमाची समजूत कांहीं केल्या पटेना. रमाकाकू उग्रावतार धारण करत्या पण शामरावांच्याहि डोळ्यांना पाणी आलेलें जेव्हां त्यांनीं पाहिलें तेव्हां त्या, दोन्ही मुलांना त्यांच्याजवळ सोडून चालत्या झाल्या.

मुलें रडून रडून झोपीं गेलीं व शामरावांनीं खालीं येऊन डोळ्यांना पांणी वगैरे लावलें तेव्हां रमाकाकू म्हणाल्या "इश्श खूळ कां लागलंय् ! मुलांपेक्षां मूल काय व्हावयाचें तें ?"

" बरोबर आहे, आपला विना गेला तेव्हां तूं काय करीत होतीस तें आठवतें कां तुला ? तुझी समजूत करणें आम्हांला अशक्य झालें होतें. आपला विना चार वर्षांचा होऊन गेला. गणपतिबाप्पा चार दिवसांत

आपण घालविला. विना गेल्याचें जें दुःख तुला तेंच दुःख गणपतिबाप्पा गेल्याचें रामा-कमाला!"

* * *

मातीचा गणपती आणणें-नेणें, हा माणसांचा खेळ. मानवी देह जन्माला घालून पुन्हा त्याचा लीलेनें संहार करणें, हा ईश्वराचा खेळ!

* * *

आपणा अजाण माणसांना ईश्वराची लीला समजत नाहीं; आपल्या मोठ्या माणसांच्या लीला मुलांना समजत नाहींत, बाकी त्या खेळांत व या खेळांत फरक काय आहे ?



# एक कारकून : : १०

बोलून चालून कारकून तो! त्याच्या चरित्रांत तें विशेष काय असणार? अंधाऱ्या रात्रीं भयाण अरण्यांत मुसळधार पावसांत भरधांव घोडा फेकायला तो रजपूत राजपुत्र थोडाच होता? सुंदर युवतीची एखाद्या खला-पासून ऐन प्रसंगीं सुटका करायला तो काय कादंबरीनायक होता? तो जगाचा मार्ग सरळ नाकासमोर दिसणाऱ्या वाटेनें चालणारा फक्त एक कारकून होता.

त्याला कोणी नव्हतें. मुगभाटांतल्या एका आडवळणी चाळींत तळ-मजल्यावरील एका असूर्यपश्या खोलींत त्यानें आपला संसार थाटला होता. खोलीच्या मध्यभागीं जुनीं ठिकठिकाणीं भोंकें पडलेली बारा आणेवाली एक चटई होती. तिच्यावर कापूस बाहेर डोकावीत असलेल्या गादीची वळ-कटी भिंतीला लागून होती. गादीच्या त्या स्थितीला कदाचित् वळकटी असें म्हणतां आलें नसतें. कारण सकाळीं उठल्यावर पंत एका लाथेनें बिछाना भिंतीकडे झुगारीत. तेव्हां यदृच्छेनें त्याचा जो आकार होईल तो खरा. रात्रीं भिंतीच्या बाजूनें एक लाथ पाठींत बसली म्हणजे ती गादी चटईवर उताणी होई. गादीवर जुन्या धोतराची चादर व जुन्या ॲननडेलच्या

डिक्शनरीची उशी होती. चटईच्या आवतींभोंवतीं विड्यांचे तुकडे व जळक्या काड्या पसरल्या होत्या. कोपऱ्यांत टिनची एक ट्रंक उघडीच पडलेली होती. खुंटीवर एकुलता एक कोट व त्याच्यावर मेणचटलेली टोपी होती. समोर भिंतीला एक जस्ती दिवा शोभत होता. एका कोपऱ्यांत बादली व कधीं न हात फिरला गेलेला तांब्या आणि दुसऱ्या कोपऱ्यांत एक टमरेल व फाटका दक्षिणी जोडा होता.

पंत गेलीं वीस वर्षें या ऐश्वर्याचा उपभोग घेत होते. वीस वर्षांत त्यांच्या खोलींत गृहलक्ष्मीच्या कांकणांचा किंवा लहानग्या बाळाच्या रडण्याचा आवाज कोणीं ऐकला नव्हता. या वीस वर्षांत कोणीं शेजाऱ्यानें पंतांचा उंबरा ओलांडला नव्हता. चाळींतलीं व्रात्य पोरें पंतांच्या खोलीपर्यंत धिंगामस्ती करीत धांवत येत; पण खोलीजवळ येतांच गुपचूप खालीं मान घालून पुढें जात. पंत चाळीजवळ येतांच नळावरील बायकांचीं भांडणें थांबत व त्या एकमेकींकडे पाहत. पंत मात्र त्या घाबरलेल्या मुलांकडे किंवा गोंधळलेल्या बायांकडे मान वळवून पाहत नसत.

रोज नियमानें खोलींत येणाऱ्या मांजराप्रमाणें पंतांचें आयुष्य नियमबद्ध झालें होतें. त्यांचा दिनक्रम अगदीं रेखीव, ठरलेला असे. सकाळीं उठल्यावर तोटीखालीं स्नान आटोपल्यावर बरोबर सात वाजतां पंत समोरच्या इराण्याच्या हॉटेलांत शिरत. नेहमींच्या एका कोपऱ्यांत छत्री ठेवून स्वारी खुर्चीवर बसे. खुर्चीचें तोंड नेहमींप्रमाणें भिंतीकडे नसल्यास आधीं ते तसें करीत. एका कपाच्यावर पंतांनीं दुसरा कप कधीं मागितला नाहीं. काकूंच्या खाणावळींत साडेनवाच्या पहिल्या पंक्तीला पंत आपल्या नेहमींच्या पाटावर बसत. जेवण संपेपर्यंत त्यांची मान कधीं वर होत नसे. त्यांनीं कधींहि दह्याची 'एक्स्ट्रॉ' वाटी किंवा श्रीखंडाची प्लेट मागविली नाहीं.

पंतांची कचेरी कोटांत कुठेंशी होती. कचेरींत जाण्याचा रस्ता व रस्त्याची बाजू एकच. धोबीतलावाजवळच्या एका आंधळ्या भिकाऱ्याच्या हातावर नियमानें ते एक दिडकी ठेवीत असत. कचेरींत आपण बरें, कीं आपलें काम बरें. तपकिरीची चिमटी घ्यायला पंत कधीं जागेवरचे उठले नाहींत. अकरा ते पांचपर्यंत पंतांचा टाक चुरुचुरू चालून त्यांतून तिरपीं कारकुनी बाण्याचीं अक्षरें निघत.

कचेरी सुटल्यावर चौपाटीवर एका ठराविक बेंचवर समोरच्या चिवडे-वाल्याकडे पाहत पंत बसत. पाठ नेहमीं समुद्राकडे. हातांत नेहमीं पांढऱ्या रंगाची छत्री असावयाची, पण तिचा उपयोग ते काठीसारखा करीत. उन्हांत किंवा पावसांत छत्री उघडण्याचें स्मरण पंतांना क्वचितच होई. चालणें नेहमीं खालीं पाहून. चालतांना ओठ मधून मधून हालत; कधीं मधीं एखादा सुस्कारा बाहेर पडे; पण तो ऐकणार कोण? संध्याकाळीं जेवण झाल्यावर पंत तडक बिऱ्हाडीं जात. दिवा लावण्याचा प्रसंग क्वचितच येई. एका लाथेसरशीं बिछाना घालून ते त्यावर पडून अंधारांतच वरच्या तुळईकडे पाहत तासच्या तास घालवीत.

* * *

अशींच आणखी वीस वर्षें गेलीं. पंतांचा दिनक्रम पूर्वीप्रमाणेंच चालला होता. जुन्या इराण्याचें दिवाळें निघाल्यामुळें व काकूस कैलासवास घडल्या-मुळें जो बदल करावा लागला असेल तेवढाच. तेंच चाळीस वर्षांपूर्वींचें टमरेल कोपऱ्यांत पडलेलें होतें. अन् पंत? त्याच खोलींत राहत होते, त्याच कचेरींत काम करीत होते, त्याच रस्त्यानें जात व परत येत. रेकले जाऊन व्हिक्टोरिया आल्या; ट्रॅम झाल्या; त्यांचे घोडे जाऊन त्या तशाच धावूं लागल्या; दुसऱ्या बिनघोड्याच्या गाड्या दिसूं लागल्या; पण तेच पूर्वींचे पुराणपुरुष होते. पण आतां शरीर थकलें होतें. दम्याचा विकार जडला होता. रात्रभर खोकत बसावें लागे; परंतु पंतांनीं वैद्य-डॉक्टर पाहिला नाहीं, शेजाऱ्या-पाजाऱ्यांचा सल्ला विचारला नाहीं. आतां चालतांना पाय कांपत त्यामुळें खांबांचा आश्रय घ्यावा लागे. कचेरींत आतां पूर्वींसारखें वळणदार अक्षर निघत नसे. हात कांपे, चुका होत, हेडक्लार्क खेंकसून म्हणे, "पंत, तुम्हांला आतां म्हातारचळ झालाय. काय हें अक्षर! परत ड्राफ्ट करा, त्या बेरजा पण चुकल्यात, बेअक्कल कुठचे!" पंत नाकाच्या टोंकावर असलेल्या चष्म्यांतून निर्विकारपणें हेडक्लार्कसाहेबांकडे पाहत व त्यांचें भाषण संपल्यावर शांतपणें कागद घेऊन आपल्या जागीं जात.

आजकाल लहान मुलांनीं आपल्या खोलींत यावें असें पंतांना वाटूं लागलें होतें. पण त्यांना कशी हांक मारावी, त्यांच्याशीं काय बोलावें हें माहीत नसल्यानें तें जमलें नाहीं. तरी पण अलीकडे एक उनाड शेंबडें पोर पंतांच्या खोलींत कधीं कधीं दिसे. पंत त्याच्याशीं न बोलतां पाठीवरून हात

फिरवीत व त्याला दोन पेपरमिंटच्या वड्या देत. शेजारच्या एक आजी-बाईहि पंतांना दम्याची उबळ आली म्हणजे खोलींत येत. पंतांची पिकदाणी आजकाल कोणीतरी घेऊन जाऊन साफ करून आणून ठेवी. पंतांना हें कांहीं दिवसांनीं कळलें पण त्यांनीं चौकशी केली नाहीं.

असेच दिवस चालले. दमा बळावला. रात्रीच्या रात्री जागरणें पडूं लागलीं. खोलीस थुंकीनें गटाराचें रूप येऊं लागलें. आतां त्यांना तोटीवर जातांना भिंतीचा आश्रय घ्यावा लागे. तें शेंबडें पोर चहाचा कप आणून देई. आजीबाई घरगुती औषध देऊं लागल्या व पंत न बोलतां घेऊं लागले. कचेरीस जाणे बंद झालें. पंतांच्या खुर्चीवर नवा कारकून बसला, व काम पुढें चाललें.

एक दिवस उजाडला. शेजाऱ्यांना पंतांच्या खोकण्याचा आवाज ऐकूं आला नाहीं. आजीबाई बघण्यासाठीं आंत गेल्या. त्या चाळीस वर्षांच्या जुन्या गादीवर पंतांचें प्रेत पडलें होतें ! जवळ बादली, टमरेल व ट्रंक होती. आजपर्यंत साथ दिलेल्या त्या मूक मित्रांचा पंतांनीं शेवटचा निरोप घेतला होता. आजीबाईंनीं लगबगीनें पुरुषमंडळीस बोलाविलें. पुढची तयारी चालली. पोलीस लोक आले. माल सरकारजमा झाला. पंतांचें प्रेत गादीवरून काढल्यावर उशाची डिक्शनरी बाहेर पडली. एकजणानें ती उघडून सहज चाळली. तिच्यांत एक तरुण सुंदर स्त्रीचा फोटो होता! फोटोला येत असलेला मधुर वास त्या घाणेरड्या खोलींत पसरला.

पंत कचेरीच्या रस्त्यानेंच सोनापुरास गेले. रस्त्यानें ट्रॅमगाड्या, मोटारी चालल्या होत्या; दुकानदार दुकानांत बसले होते; भय्ये लोक दूध घेऊन परतले होते; चाळींतील बाया भांडत होत्या व पोरें धिंगामस्ती करीत होतीं. अन् पंतांच्या ऐवजीं लागलेला नवा कारकून कचेरींत जाण्याची तयारी करीत होता.



# एक दिवस : : ११

आज 'रविवार' होता म्हणून मोठ्या समाधानाचा सुस्कारा टाकला व खिडकीवाटे बाहेर पाहिलें. चोहोंकडे ऊनहि चांगलें कोंवळें मजेदार पडलें होतें. मग खोलींत कोंडून घेण्यापेक्षां बाहेर पडलेलेंच काय वाईट असा मनाशीं विचार ठरविला, आणि पुढें आलेला चहाचा घोट सावकाश घेत आणि मेजाच्या खणांतून पैशाचें पाकीट काढीत मीं हळूहळू अंगांत कोट चढविला. माझ्या या कृतीवरून मी कुठेंतरी जाण्याच्या तयारींत आहे असा इषारा आमच्या अर्धांगीस मिळाला असावा. एरव्हीं तिनें तेवढ्यांतल्या तेवढयांत तांतडी करून 'मंडई'ला लागणारी पिशवी माझ्या हातांत दिली नसती !

रस्त्यानें जाणाऱ्या येणाऱ्या लोकांच्या घांदलींतून मार्ग काढीत मी न कळतच मंडईजवळ आलों. आणि अगदीं त्याच वेळीं समोरच्या चौकां-तून लगबगीनें झटकणाऱ्या 'वैशंपायना'कडे माझें लक्ष गेलें. एखाद्या व्यक्तीला भेटण्याची तीव्र उत्कंठा असली म्हणजे मनुष्य आसपासच्या गोष्टींकडे लक्ष देत नसावा. कारण माझ्याचसारख्या जातभाईंनीं भरगच्च भरलेल्या रस्त्यांतच उभे राहून मीं मोठ्यानें 'ए सदाशिव—' म्हणून हाक मारली. माझी हाक सदाशिवाच्या कानावर जाण्यास आणि त्याच्या सायकलचे 'ब्रेक' सैल पडण्यास एकच गांठ पडली होती कीं काय न कळे. त्यानें आपली सायकल बरीच पुढें फरपटत नेऊन मगच ती थांबविली. मी जवळ जातांच त्याला कोण ब्रह्मानंद झाला ! त्याच्या अगोदरच फुगीर असलेल्या गालावर मला पाहतां क्षणींच हास्याच्या केवढ्या तरी खळ्या पडल्यासारख्या दिसल्या.

"काय रे ! गृहस्था—मला चुकवून जात होतास नाहीं ?" मीं अगदी उत्कंठेनें त्याच्या हाताची मूठ आपल्या हातांत दाबीत म्हटलें, "पण आज मी तुला तसा सोडणार नाहीं, तूं बोलावीत नसलास तरी तुझ्या घरीं मी येऊन आज चहा उकळणार— समजलास."

माझी अपेक्षा होती कीं, वैशंपायन लाडिक शब्दानें मला कांहींतरी असेच प्रेमळ शब्द बोलेल. परंतु सायकल आपल्या गुडघ्याला टेकवून क

आपल्या कोटाचे दोन्ही खिसे चांचपत त्यानें तोंडांतल्या तोंडांत कांहींतरी पुटपुटण्यास सुरुवात केली. " चल तूं घरीं, त्याचें काय मोठेंसें विशेष ? राहिलें आज काम तर राहिलें. उद्यां होईल– त्याचें काय एवढेंसें–"

" म्हणजे आहे काय तुझें विशेष काम ? "

" तसं कांहीं विशेष नाहीं. ते आपले सुखटणकर नाहींत का—- जळगांवाहून बदलून आलेले हेडक्लार्क, त्यांनीं मला सहज बोलाविलें होतें कधींतरी एकदां येऊन जा म्हणून ! म्हटलें, आज रविवार, भेटले तर भेटले– ! इतकेंच."

मग मीं वैशंपायनाला आग्रह केला, " जा तर तूं आपला त्यांच्याकडे–" पण मध्येंच काय त्याला उमाळा आला कोण जाणे ! त्यानें माझ्या पाठीवर जोराची थाप दिली आणि म्हटलें " बापट, चलच तूं आतां घरीं, चहाच काय, पण तुला आणखी पुष्कळ मजा दाखवावयाची आहे आमच्या येथली, चल—-"

* * *

त्यानंतर तो पलीकडे, सायकलमधें, आणि मी अलीकडे अशा थाटांत त्याच्या घरीं पोंहोचलों. रस्त्यानें जातां जातां मीं कांहींतरीच प्रश्न विचारले; आणि त्यानें उत्तरें दिलीं तींहि पण विचित्रच ! " तुझी सायकल इतके दिवस वापरून अजून कशी कोरीच्या कोरीच ? " असें मीं विचारावें, तर त्याचें उत्तर यावें. " ती मूळ मीं विकतच घेतली नाहीं–माझा निश्चयच होता–तुला माहीत नाहीं का, कीं लग्न झाल्यावर श्वशुरांकडून ही देणगी लाटायची म्हणून ? " " तुझें आपलें बरें आहे बुवा. कशाची काळजी नाहीं." माझ्या या म्हणण्यावर मात्र सदाशिवाला अपरिमित हर्ष होई. आणि मग तो लगेच म्हणे– " बापट ! आतां आम्हीं जर बंगल्याचा प्लॉट घेतला तर त्याला पुढच्या दर्शनी भागाला सज्जा ठेवला तर बरें दिसेल, कीं तसें कांहीं नकोच ? आपला प्लेनच बरा ? " तर मीं आपलें अळेंबळेंच म्हणावें, " तसं कशाला–दर्शनी भागालाच ठेवना सज्जा ! "

मला वाटे 'वैशंपायनानें' मात्र आपल्या स्वतःच्या विचारांत एवढें गढावें आणि माझ्याबद्दल मात्र चुकून कसलीहि चौकशी करूं नये–असें कां ? आपण त्याचे मित्र नाहीं का ? बाळपणापासून तो आणि आपण एकत्र

वाढलेलों– पण मीं मात्र त्याच्या विचाराच्या सुराशीं सूर मिसळावा आणि त्यानें मात्र माझ्याविषयीं बेफिकीर असावें !

* * *

त्याच्या बिऱ्हाडीं पोंहोचल्यावर त्यानें तांतडीनें मला बसावयास आरामखुर्ची पुढें केली, आणि लागलीच म्हटलें, " हिचें लाकूड सागवानी आहे, मनोहर ! "

" आणि हिची ठेवण किती ऐटबाज आहे पहा." " खरेंच की, सुंदर आहे बुवा ही खुर्ची ! " आणि " तासन्तास हींत बसून राहिलें तरी पाठीला रग म्हणून कशी ती लागत नाहीं; बघ–"–" बरं आहे आपलं ऑफिसांतून घरीं आल्यावर इथेंच पडायला–" असें म्हणून विषयाला पालट मिळावा म्हणून मीं खुर्चीवर सपशेल अंग टाकिलें. पुढें मग वैशंपायनानें आपल्याला हें वर्ष आर्थिकदृष्ट्या किती फायद्याचें गेलें हें सांगितलें. आणि आपण केलेल्या नव्या खरेदीची साधारण कल्पना माझ्या डोळ्यांसमोर उभी केली. चहापेक्षां या सर्व गोष्टींच्या वर्णनाची गोडीच त्याला मला पाजावयाची होती असें दिसलें.

मी आतां त्याची रजा घेणार एवढ्यांत त्यानें चपळाईनें घरांत जाऊन एक बारीक डबी माझ्या हातांत दिली.

" उघडून पहा, मनोहर ! कुड्यांचा जोड केवढ्याला घ्यावा सांग."

" केवढ्याला घेतलास ? "–मींच उलट त्यास प्रश्न केला.

" दीडशें रुपयाला ––कां महाग पडला होय ? "

" छे रे ! सुंदरच सौदा केलास हा–" " मग काय मी जाऊं आतां ? " तो मला दारापर्यंत पोंचवायला आला. मला निरोप देतांना परत वळतांना मोठ्यानें माझ्याकडे ओझरतें वळून म्हणालाच. " ठीक आहे मनोहर ! तूं म्हणतोस त्याप्रमाणेंच बंगल्याला दर्शनी सज्जाच ठेवतों म्हणजे झालें ! "

* * *

दुपारीं जेवण झाल्यावर मीं मनाशींच सकाळच्या गोष्टीबद्दल विचार केला. 'त्यांत वैशंपायनाकडे काय दोष ! आपल्याशीं तो समरस झाला नाहीं. आपण तरी त्याच्याशीं एवढें कुठें एकरूप होऊन बोललों ? त्यांत आपलाहि नाहीं का दोष ? आपल्या मनांतल्या गोष्टी त्यानें शांतपणें ऐकून

घेतल्या असत्या म्हणजे आपल्याला नसता का आनंद झाला? जसें सदाशिवाच्या गोष्टींत एवढें महत्त्व नव्हतें तसेंच आपल्या गोष्टींत त्याला महत्त्व वाटलें असतें असें कशावरून?—आणि तसें पाहिलें तर कालपासून आपण जें हृद्गत आपल्याजवळ ठेवलें आहे त्यांत एवढें विशेष तें काय आहे?'

* * *

संध्याकाळीं घरीं तशीच विशेष गोष्ट घडली. जेवण झाल्यावर मी आपण होऊन पत्नीजवळ कांहीं गोष्टी बोलावयास सुरुवात करणार तोंच ती म्हणाली, "मीं आज आपल्याला न विचारतां एक जिन्नस खरेदी केली आहे बरें का? तुम्हांला काय होतं! –तुम्ही ऑफिसांत जातां— पण 'बाळ' रडून घर डोक्यावर घेतो. त्याची नको कां कांहीं समजूत करायला?—म्हणूनच त्याला तोंडांत चोखायला मीं हें रबराचें बूच विकत आणलें–बघा कसें आहे तें—"

"छान आहे कीं–" एवढें बोलावयास आपणास संधि मिळाली यामुळें मला हर्ष झाला; पण यामुळें माझ्या पत्नीस उत्तेजन येऊन तिनें आपली चर्पटपंजरी सुरू केली— "आणि हें चिटाचं कापड— 'रंगपंचमी' आठ दिवसांवर आली– तेव्हां 'बाळाच्या' आंगचीं पांच झबलीं मी वाटणार आहें. पहा ना पण कापडाचा रंग नी त्याच्यावरच्या फुल्या तुम्हांला पसंत आहेत का त्या."

"वा! सुन्दरच आहेत कीं! कापड टिकेलहि पण छान! आणि फुल्या पण मोठ्या नाहींत." मी बोलून गेलों खरा—पण काय बोललों तें मला खरोखर कळलें नाहीं. मग तिनें आपल्या शेजाऱ्यापाजाऱ्या मैत्रिणींच्या संबंधीं कांहीं टकळी करण्यास सुरुवात केली. मग मला बिलकुल राहवेना. "तुमचीं सर्वांचीं संभाषणें ऐकून घेण्याचा जणूं कांहीं मीं मक्ताच घेतला आहे वाटतें! आणि मी कांहीं बोलायला लागलों म्हणजे मात्र तुम्हीं कोणीं ऐकून घेण्याइतकीहि शांतता धारण करूं नये–" मी खुर्चीवर बसल्या बसल्याच बोलूं लागलों, "मला तुला आज पुष्कळच गोष्टी सांगावयाच्या आहेत. पहिली गोष्ट म्हणजे माझा या नोकरींत चांगलासा निभाव लागेल, असें मला वाटत नाहीं. तूंच पहा मी कामांत अळंटळं करतों का?

पण आमचे वरिष्ठ तिरसिंगराव, त्यांना मात्र माझ्या या कर्तव्यानें पाझरच फुटत नाहीं. सेवाधर्म परम गहन म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं."

"हें बघ काल काय झालं— त्या काळया फाईल बुकांत ३८ नंबरचा कागद नोंदण्याच्या ऐवजीं मीं तांबड्या... ... ... दिवा भडकला वाटतं... ... ...थोडा बारीक तरी कर—"

माझ्यासमोर भडकणाऱ्या दिव्याकडे लक्ष जाऊन मीं म्हटलें. आणि त्याच वेळीं आपल्या संभाषणाचा आपल्या पत्नीवर काय परिणाम झाला असावा हें पाहण्याच्या उद्देशानें तिच्याकडे सहज वळून पाहिलें पण ती आपल्या हातांतील शिवणकामांत गर्क झाली होती असें दिसलें. मात्र माझ्या समोर टिक् टिक् करणारें घड्याळ माझ्याकडे आणि मी घड्याळाकडे असे एकमेकांकडे शून्य मनानें बघत राहिलों!



# एकाच चित्राचे दोन रंग : : १२

कलकत्ता मेल जबलपूर स्टेशनवर उभी राहिली.

एका भिकारणीनें तिकिट कलेक्टरची नजर चुकविली आणि हलकेंच एका डब्यांत प्रवेश केला. आंधळा भिकारी धडपडत त्याच डब्यांत आला. "देवा! आंधळाऽऽहे! दोन्ही डोळयांनीं दिसत नाहीं, द्या हो द्या! दया करा! गरिबाला द्या कांहीं." काठी टेकीत आंधळा डब्यांत मार्ग काढूं लागला. बिचाऱ्याचा चुकून कुणाला तरी धक्का बसला. "माफ करा......" 'काय आहे हो त्रास'? पुढें गेला...करतो काय?—पोटाला उपास, सुरकुतलेला चेहरा, वाढलेली दाढी, डोळयांतला वडस, फाटकी पैरण, छातीचीं हाडें, सारें कांहीं उदास! पैरणीला पाण्याचा स्पर्श कितीक दिवसांत नव्हता. तिला थोडासा घाण वास मारत होता. कॉलेजिएट तरुणानें सेंट लावलेला रुमाल काढला लव्हेंडरचा घमघमाट आजूबाजूस दरवळला. सुवासानें आंधळ्याची कळीही जराशी खुलली.

" दादा ! पैसा द्या !..." आशेनें हृदयाची हांक आली.

" चल, हो पुढें..." तरुण रक्त सळसळलें. भुकेल्या जिवाचें व्यथित अंतःकरण कळवळलें. आंधळें दारिद्य सर्व डबा फिरून आलें. वाटींत पैसा पडला ! एकाचें मन पाझरलें. डब्यावर '८० उतारूंची सोय' अशी पाटी, मग डब्यांत ७९ दगडांची कां दाटी ? आंधळा जीव कोपऱ्यांत जाऊन उभा राहिला. वाटींत हात फिरवून एकच पैसा चाळवला !

भिकारणीच्या पोरीनें आतां संधि साधली. चालू चीज गात तिनें एक उंच तान घेतली. एकदम कितीतरी उतारूंची दृष्टि मागें गेली. कॉलेजकुमाराचें मन वाचनांत गढलेलें. दरिद्री कुमारीनें मात्र त्याला पुरें ओळखलें. गात गात संगीताची चांदणी त्याच्याजवळ आली.

'पुढें हो !–' तों वर दृष्टि गेली. शब्द तोंडांतल्या तोंडांत विरून गेले. सारें मन तिच्या उसळत्या सौंदर्यानें वेधलें 'जातीच्या सुंदरांना कांहींही चालतें.' काळयाकिट्ट लक्तरांनीं तिची कांति थोडीच झांकते ! तिचा एक डोळा थोडासा मिटून फडफडला; कोळशाच्या कणानें का कशानें ठाऊक कुणाला ! डबलब्रेस्टचीं बटनें किती सहज निघालीं ?

आणि तिच्या हातावर काय ?

चौकोनी चवली !

कळी खुलली, गोड हसली–दादा ! सलाम.

तरुणाच्या उचंबळणाऱ्या मनोवृत्तींना हाच आराम !

* * *

एका कोपऱ्यांत एक प्रफुल्ल चेहरा चवल्यांची मोजमाप करीत होता. दुसऱ्या कोपऱ्यांतला दुर्मुखलेला चेहरा वाटींतली दिडकी काढून कपाळावर लावीत होता !



# कर्ज फिटलें—पण सावकार गमावला ! : १३

माझा संसार अगदीं गरिबीचा. पण मला कर्जपाणी कांहीं फारसें नव्हतें. माझें लग्न नुकतेंच झालें होतें.

जरी मी गरिबींत वाढलों होतों तरी माझ्या वडिलांनीं नांवलौकिक चांगला कमाविला होता. वडिलांनीं आपलें आयुष्य इतक्या सरळ, साध्या व निष्कपटी तऱ्हेनें घालविलें होतें, कीं माझ्या वडिलांची ओळख सांगण्यांत प्रत्येकाला अभिमान वाटे! वडिलांनीं देह इतक्या शान्तपणें ठेविला, कीं मला आश्चर्य वाटलें! मघांशीं होते आणि आतां नाहींत! पुण्यवान आत्म्याखेरीज असें झटपट मरण कुणाला लाभेल? वयाची सत्तरी उलटून गेलेली तरी चेहरा बालकासारखा निष्पाप!

वडिलांच्या या चारित्र्याचा फायदा मला मिळूं पाहत होता. थोरा-मोठ्यांच्या मुली मला सांगून येत होत्या; पण माझा लाडका हटवाद असा होता, कीं मला बायको इतक्या गरीब घराण्यांतील पाहिजे, कीं माझ्या घरीं येण्यांत तिला सौख्यमंदिरांत पदार्पण केल्यासारखें वाटलें पाहिजे! म्हणून मीं अगदीं खेडवळ मुलगी पत्करली होती!

तिच्याजवळ कांहीं नव्हतें—पण अंतःकरण होतें!

रूप?—

मी स्वतः इतका वेडा गोळा होतों, कीं चांगलें आणि वाईट रूप यांतील भेदच मला कळत नव्हता!

फूल गुलाबाचें चांगलें का चमेलीचें चांगलें? बरें, जाईचें चांगलें कीं जुईचें चांगलें? सगळींच फुलें—पण एखाद्या फुलाच्या जातीवर आपली आवड लादून बाकीच्यांना आपण नांवें काय म्हणून ठेवायचीं?

शिवाय माझी कल्पना अशी, कीं परमेश्वरानें नाना तऱ्हेचीं बाहुलीं निर्माण केलीं आहेत व प्रत्येकींत कांहीं तरी वैशिष्ट्य ठेविलें आहे. त्यांतील एक वैशिष्ट्य माझ्या वांटणीला येणार, मग त्यांत मी आपली आवडानिवड आणखी काय दाखविणार?

आणखी असें, कीं बाह्यरूपावर दिवस-रात्रीचा परिणाम होतो! सुंदर स्त्री अंधेरांत उभी राहिली, काय त्या सौंदर्याचा उपयोग?

आणि अंतःकरण ? आत्म्याचा प्रकाश अंतःकरणावर दिवसां-रात्रीं असतोच ! आत्म्याचा नंदादीप अंतःकरणाजवळ चोवीस तास तेवत असतो !

आणि गंमत अशी झाली होती, कीं मला अगदीं आवडीचें माणूस मिळालें होतें ! माझ्या माणसाला स्वतःची आवडनिवड अशी विशेष नव्हतीच ! निवळ फुलासारखें त्या माणसाचें आयुष्य होतें ! देवाच्या डोक्यावर वहा, टेबलावर ठेवा, डोक्यांत घाला––फूल तें फूल—तसें माझ्या बायकोचें होतें !

अगदीं सूर्यफुलाप्रमाणें आयुष्य ! जसजसा सूर्य फिरेल तसतसें सूर्यफूल फिरतें––तसें माझ्या बायकोचें होतें !

कांहीं कांहीं ठिकाणीं मीं असें पाहिलें आहे, कीं नुकत्याच लग्न झालेल्या बायका फक्त नवऱ्याच्या सान्निध्यांतच हंसतात–डुलतात–खुलतात ! अगदीं चंद्राप्रमाणें फक्त नवऱ्याच्या तेजानें प्रकाशित !

असला परप्रकाशीपणा माझ्या बायकोंत नव्हता ! मी घरांत नसलों तर माझ्या आईजवळ माझी बायको लाडिकपणानें हंसे–वागडे ! अगदीं 'हें करूं का, तें करूं का–' वगैरे वगैरे मायलेकींचा प्रकार ! माझी बहीण आली, कीं जणूं सख्ख्या बहिणी ! थोडक्यांत सांगायचें म्हणजे तें एक स्वच्छ पाण्याचें कारंजें होतें––जसा जसा प्रकाश पडेल तसा त्यांत रंग भरायचा !

म्हणून मी वेडा गोळा नेहमीं थट्टेनें म्हणे, कीं माझी बायको कांहीं क्षयानें मरणार नाहीं ! कारण––

माझी कल्पना अशी आहे, कीं हल्लीं क्षयाची वाढ जी झपाट्यानें होत आहे त्याला कारण नवराबायकोचा फाजील प्रेमीपणा असावा ! सान्निध्यांत असलीं तर अतिरेक आणि दूर असलीं तर फाजील ध्यास ! याचा परिणाम शरीरावर होतो आणि—

वगैरे ! मधेंच हें दुसरें आख्यान लागलें !––आजच्या आख्यानाच्या संदर्भानेंच बोललें पाहिजे !

माझ्या लग्नाला सुमारें वर्ष झालें होतें.

एक दिवस गंमत काय झाली—रात्रीं खोलींत आम्हीं दोघेंच होतों ! बायको स्तब्ध उभी होती; पण तिच्या त्या स्तब्ध उभें राहण्यांत मीं मात्र मनांत तर्क केला होता, कीं हिला माझ्याजवळ आज कांहींतरी मागायचें आहे !

मीं थट्टेनें विचारलें, "कां, काय पाहिजे आज ?" ती किती तरी

लाजली! 'शकुंतलाजन्म' या राजा रविवर्म्याच्या चित्रांत विश्वामित्र जसा तोंडझांकला दाखविला आहे त्याप्रमाणें आपलें तोंड लपवीत तोंडांतल्या-तोंडांत अगदीं अस्पष्ट स्वरांत तिनें म्हटलें, "मला चार आणे पाहिजेत!"

जणूं—तिला चार आणे मागण्याची इच्छा होणें आणि विश्वामित्रानें शकुंतलेला जन्म देणें या दोन्ही गोष्टी सारख्याच कमी दर्जाच्या होत्या!

'मला चार आणे पाहिजेत!' हे शब्द तिनें इतक्या अस्पष्ट स्वरानें व बोबडेपणानें उच्चारले, कीं ते माझे मला म्हणूनच कळले!

स्वतःच्या बोबड्या मुलाचे बोबडे स्वर जसे आपले आपल्यालाच कळतात—

काय पोरकट उपमा दिली! पण अंतःकरणांत जें घुमत असतें तेंच तोंडावाटे व लेखणीवाटे बाहेर पडणार!

आम्हा दोघांनाहि हल्लीं 'पुत्रमुख' पाहण्याची अनिवार उत्कंठा लागली होती! तेव्हां एखादी तरी उपमा पोरासोराची यायचीच!

मीं हंसत हंसत म्हटलें, "चार आणे पाहिजेत! कशाला?"

"पाहिजे आहेत!" उत्तर संपलें.

"कळलं; पण कशाला?"

"शेजारच्या वत्सलावहिनी रोज डोक्यांत फुलांच्या वेण्या घालतात, मी उद्यां आणणार आहें!"

"वेडे, अगदीं वेडपट आहेस तूं! हे असले श्रीमंती ढंग आपल्याला काय करायचे?" मीं म्हटलें.

वातावरण बदललें! तिनें आपली इच्छा दाबून टाकली. "छे, मला नकोय् कांहीं—मीं उगाच म्हटलं कांहीं तरीच वेड्यासारखं!"

या उत्तरानें मात्र मला वेड लावलें! मी भांबावलों व हलक्या स्वरानें तिला म्हटलें, "खरोखरच वेडी आहेस तूं!"

मान डोलवीत ती म्हणाली, "हो!" आणि ती हंसूं लागली!

मीं हंसत हंसत खिशांतून चार आणे काढले व तिच्यापुढें केले, पण ती घेईना. अखेर बळेंच तिच्या हाताची मूठ उघडून मीं ते चार आणे तिच्या हातांत ठेवले!

त्या चार आण्यांनीं 'चांदोबा' हातीं आल्यासारखें तिला वाटलें!

मीं म्हटलें, " पण ऐकलंस का, हे पैसे खर्च नाहीं हं करायचे मला विचारल्याशिवाय ! "

" बरं ! " असा अर्धा तास गेला. अखेर तिनें ते चार आणे 'तिचे' म्हणून माझ्यापाशीं ठेवायला दिले !

आम्ही गाढ झोंपीं गेलों.

* * *

दुसऱ्या दिवशीं मीं तिला एक छोटीशी ट्रंक आणून दिली व त्यांत तिचे पैसे ठेवायला तिला सांगितलें !

आणि ती ट्रंक असे माझ्याच कपाटांत !

* * *

असेहि दोनचार महिने गेले ! मजजवळ पैसे मागण्याची तिला जणूं खोडच लागली होती. तिनें एकदोन दिवसांआड मजजवळून चारसहा आणे, कधीं आठ आणे असे मागून घ्यावेत आणि त्या ट्रंकेंत टाकावेत ! ही कोरडी हमाली करण्यांत तिला काय मौज वाटत होती हरी जाणे ! तिचा हा क्रम मात्र सारखा चालू होता.

असें करतां करतां ट्रंकेंत अठरा रुपये सांचले. एक दिवस तिनें ते सर्व मोजले आणि मला म्हटलें, " मजजवळ इतके पैसे आहेत, मिळायचे नाहींत हं हे आपल्याला ! " तिनें अवर्णनीय अभिनय केला. मीं हंसत वेडावीत म्हटलें, " बराय्, सांभाळा आपले आपणच ! पण हे इतके पैसे तूं नादिष्ट-पणा केला नाहींस म्हणून जमले ! नाहीं तर या पैशांचा निर्माल्य झाला असता एव्हांना ! "

" खरंच--" इतक्यांत बाहेर कोणीसें आलें--ती बाहेर गेली. तिची आई आजारी होती म्हणून तिला माहेरचें बोलावणें आलें होतें !

आज रात्रीच्या गाडीनें ती माहेरीं जाणार होती. संध्याकाळीं आम्हा दोघांखेरीज घरांत कोणीच नव्हतें. ती म्हणाली, " पैसे आपणाजवळच ठेवावेत हं ! "

" कां, तूं घेऊन जा आपल्याबरोबर तुला हवे असले तर ! "

" नको, आपणाजवळच ठेवा--पण खर्च नाहीं हं करायचे ! "

मी खरें बोललों. " कांहीं सांगतां येत नाहीं बुवा ! मला सध्यां अडचण आहे ! कदाचित् खर्च करीनहि ! "

" बरं, पण खर्च केले—न केले तरी मला व्याज द्यावं लागेल हं ! "

" बराय् , सावकार ! दर काय व्याजाचा ? "

" रुपयाला दोन आणे ! "

" बरं चार आण्यांप्रमाणं देईन ! "

वरील बोलण्यांत जरी थोडीशी विनोदाची छटा दिसली तरी तें आम्ही निर्विकार मनानें बोललों होतों ! दोघांच्याहि मनाला कसली तरी ओढणी लागली होती ! पण दोघांच्याहि चेहऱ्यांवर तसा कांहीं प्रकार दिसत नव्हता !

कसा दिसणार ? घड्याळांत काय नादुरुस्ती आहे तें घड्याळाच्या तबकडीवर पाहून काय दिसणार ?

* * *

मध्यंतरीं चार दिवस गेले, तिची आई हा नश्वर देह सोडून गेली होती. पुण्यांतच तिचा चुलता राहत असे ! दुःखावेगाचे चार दिवस म्हणून ती चुलत्याकडेच राहत होती.

एक दिवस दोनप्रहरची ती सहज आमच्याकडे आली. घरांत आम्ही माय-लेक चहा पीत होतो. इतक्यांत ती आली. माझा चहा घेऊन झाला होता—आईनें आपल्या कपांतला घोटभर चहा तिला दिला.

जातांना तिने आईला विचारलें, " मी केव्हां येऊं आतां ? "

" ये दोनचार दिवसांनीं." आईनें म्हटलें.

मी दारांत उभा होतों.

ती जाऊं लागली. जातांना आजूबाजूला कोणी नाहीं असें पाहून निर्विकार चेहऱ्यानें तिनें मला विचारलें, " माझे पैसे आहेत ना ? "

" हो ! "

" व्याजासकट ? "

" हो ! "

ती निघून गेली. नंतर मधें एकच दिवस गेला.

दुसऱ्या दिवशीं मला निरोप आला, ती आजारी आहे व—तिला प्लेग झाला आहे ! तिची आई प्लेगनेंच गेली होती. पुण्यांत या रोगाचा प्रादुर्भाव नव्हता. म्युनिसिपालिटीच्या सल्ल्यानें तिला प्लेगहॉस्पिटलमध्यें पोंचविण्यांत आलें.

आतां ती कॉटवर निजली होती––

" घरीं केव्हां येणार—?"

" इश्श्, बराय माझं––येईन दोनचार दिवसांनीं––पाणी––मला तहान लागली आहे!"

" मी बसूं का इथंच––?"

" आपण जेवून यावं."

" बरं, आईला पाठवून देतों; मी केव्हांसा येऊं ?"

" या तीन-साडेतीनला!"

मी घरीं आलों. आईला तिच्या समाचाराकरितां म्हणून हॉस्पिटल-मध्यें पाठविली.

दुपारचे तीन वाजले होते. मनाला रंजविण्याकरितां शेजारच्या घरीं मी पत्ते खेळत होतों. तीन वाजून पांच मिनिटें झालीं. डाव अर्धाच झाला होता. मीं विषण्ण चित्तानें हातांतील पत्ते खालीं फेंकले आणि म्हटलें, " पुरे झाला खेळ!"

साडेतीन वाजतां आई परत आली.

मीं म्हटलें, " कसें काय?"

" बराय––अजून धोका दिसत नाहीं!"

मीं कोट-टोपी चढवली व सायकलवरून हॉस्पिटलमध्यें गेलों. पाहतों तों धोका कसलाच राहिला नव्हता! तिची कॉट रिकामी होती!

हॉस्पिटलच्या नोकरानें सांगितलें, " पेशंट डेड हुवा साब,––डेड-रूममें है!"

खेळ खलास!

" मेली—केव्हां?"

" तीन वाजून पांच मिनिटांनीं!"

अगदीं बरोबर मीं पत्त्यांचा खेळ तीन वाजून पांच मिनिटांनींच संपविला होता!

मग आई धोका नाहीं म्हणून कसें म्हणाली? कोणसें गुणगुणलें–– 'कांहीं कांहीं वेळेला रोगाचा प्रसार होऊं नये म्हणून––डॉक्टर लोक केसिस अशाच खलास करतात!'

फोनोग्राफला किल्ली मिळाली, कीं तो गाऊं लागतो. त्याला अंतःकरण

नसतें—जणूं अंतःकरण नसल्याप्रमाणेंच मीं सायकलवर टांग टाकली. वारा उलट दिशेनें वहात होता—व मी गुणगुणत होतों—

"हा कोलाहल चराचरा। खराखरा व्यापुनि उरला।"

* * *

मीं तिचें और्ध्वदेहिक पार पाडलें. तिनें माझ्याजवळ अठरा रुपये ठेविले होते. रुपयाला चार आणे व्याज म्हणजे साडेचार रुपये! अठरा अधिक साडेचार, एकूण साडेबावीस रुपये!

दुसऱ्या दिवशीं विषण्ण चित्तानें मी आंकडे मोडीत होतों—

बांबू—लांकडें—गोवऱ्या—सौभाग्यवती सवाष्ण म्हणून लुगडें, खण वगैरे एकूण रुपये बरोबर साडेबावीस!

मी भयानकपणें ओरडलों!—व्याजासकट मुद्दल फिटलें—पण सावकार गमावला!

या योगायोगाचा अन्वय अर्थ काय लावायचा?



## कर्म ( वेदान्तविषयक गोष्ट ) : : १४

कोण्या एका महान् क्षेत्राच्या ठिकाणीं एका शान्त अशा मठामध्यें कोणी एक ब्रह्मचारी राहत असे. प्रातःकाळीं तीर्थोदकाचें स्नान आणि मध्यान्हकाळीं मधुकरीवृत्ति, याच्याशिवाय बाकीचा जो वेळ राहील, त्या वेळामध्यें वेदाध्ययन, शास्त्राध्ययन, काव्यपरिशीलन, भगवच्चिंतन इत्यादि गोष्टी करून तो ब्रह्मचारी सन्मार्गानें आपली कालक्रमणा करीत असे. त्याचा बांधा सुदृढ, शरीरयष्टि उंच, रंग गोरा, नाक व डोळे नीटनेटके असून त्याची मुखश्री अतिशय तेजःपुंज दिसत असे. आजन्म त्याचें आचरण फार शुद्ध होतें, आणि आमरण तें तसेंच कायम ठेवावें अशी त्याच्या मनाची इच्छा होती. त्याचे आईबाप लहान वयांत आणि गरीब स्थितींत वारले होते. त्यामुळें दारिद्र्य ही त्याची निसर्गसिद्धच अवस्था होती. तरी पण त्याबद्दल त्याला कधीं खेद वाटत नसे. तो सदोदित समाधानामध्यें असे; इतकेंच नव्हे, तर त्याची निर्लोभ वृत्ति इतकी तीव्र होती कीं, द्रव्याचा

त्याला नेहमीं मोठा तिट्कारा वाटत असे. अशा रीतीनें तो आपल्या पूर्व-वयाचे दिवस मोठ्या सुखामध्यें आणि समाधानामध्यें घालवीत असतां, एके रात्रीं पहांटेच्या सुमारास त्याला एक स्वप्न पडलें. त्या स्वप्नांत कोणी एक पुरुष त्याच्या जवळ येऊन त्याला म्हणाला, " ऊठ, निजलास काय ? तुला आतां मी श्रीमंत करणार आहें ! " स्वप्नामध्यें आलेला पुरुष आणि तो ब्रह्मचारी यांचें त्या स्वप्नाच्या अल्प मर्यादेमध्येंहि बरेंच संभाषण झालें. धर्मनिष्ठपणा आणि मधुकरीवृत्ति यांच्यामध्यें वाढलेल्या त्या ब्रह्मचाऱ्याला ती श्रीमंत होण्याची कल्पना स्वप्नामध्येंहि ऐकल्याबरोबर कसेंसेंच वाटलें ! व तो एकदम मोठ्या आवेशानें म्हणाला, " मी श्रीमंत होणार नाहीं ! "

**पुरुषः**—कां बरें ?

**ब्रह्मचारीः**—मला श्रीमंती आवडत नाहीं.

**पुरुषः**—संवयीनें सर्व कांहीं आवडूं लागतें. हल्लीं तुला ही मधुकरी वृत्ति आणि ब्रह्मचर्याश्रम आवडतात, याचें तरी कारण काय ? संवयीशिवाय दुसरें कांहीं नाहीं. भीक मागणें आणि स्त्रीसुखाला आंचवणें, या गोष्टी ज्या सर्वांना मोठ्या दुःसह वाटतात, त्या तुला संवयीनें जर इतक्या प्रिय करून दिल्या आहेत, तर विपुल संपत्ति, सुंदर स्त्रिया, व नाना प्रकारचे सुखोप-भोग, या गोष्टी संवयीनें तुला आवडूं लागणार नाहींत, असें कधीं तरी होईल काय ?

**ब्रह्म०ः**—संवय मनुष्याच्या हातून काय पाहिजे तें करवील, हें मला-हि कबूल आहे. संवय विषाला गोड करील व अमृतालाहि कडू करील. परंतु विचारी माणसानें विष गोड मानून घेण्याची संवय लावून घ्यावी कीं न घ्यावी, हाच काय तो मुख्य प्रश्न आहे. मला तर या शान्त आणि समाधानी वृत्तीचें अमृत टाकून त्या प्रापंचिक विषाची चटक लावून घेण्याची बिलकुल इच्छा नाहीं.

**पुरुषः**—मला इच्छा नाहीं ! केवढा थोरला 'मी' ! अरे, तुझ्या इच्छेला विचारतो कोण ? तुला असें का वाटतें, कीं तुझ्या इच्छेनें हें सारें जग चाललें आहे ? अशा प्रत्येकाच्या इच्छेप्रमाणें जर हें जग चालूं लागलें, तर तें एक क्षणभरदेखील चालणार नाहीं !

**ब्रह्म०ः**—नाहीं चाललें म्हणून काय खोळंबलें आहे ? न का हें जग

चालेना! असलें दुःखदायक जग चालूं राहण्यापेक्षां बंद पडलेलेंच चांगलें! पण तें जग चालो किंवा न चालो; ती गोष्ट कांहीं माझ्या ताब्यांतील नाहीं. परंतु माझी इच्छा मात्र माझ्या पूर्ण ताब्यांतली आहे!

**पुरुषः**—नाहीं! तीहि तुझ्या ताब्यांतली नाहीं. हल्लींची तुझी इच्छा ही पूर्वीच्या तुझ्या अनेक इच्छांनीं नियंत्रित झालेली आहे; आणि तुझी भावी श्रीमंतीची परिस्थिति ही पूर्वीच्या तुझ्या कृत्यांनीं निश्चित होऊन राहिलेली आहे, ती तुला आतां टाळतां येणार नाहीं. पूर्वीच्या एका जन्मीं तूं एकदां नऊ कोटी द्रव्य एका ब्राह्मणाला दिलें होतेंस. तें हल्लीं तुला मिळण्याकरितां फलोन्मुख होऊन राहिलेलें आहे. ते तूं घेतल्यावांचून तुझी सुटका नाहीं. सारांश, तूं श्रीमंत झालेंच पाहिजेस, अशी स्थिति येऊन ठेपलेली आहे.

**ब्रह्म०**:—हा प्रसंग माझ्यावर न येईल, तर फार बरें होईल. आणि शिवाय मी श्रीमंत होण्याला आणखीहि एका महत्त्वाच्या कारणासाठीं अगदीं नालायक आहें, असें नाहीं का तुम्हांला वाटत?

**पुरुषः**—तें कारण कोणतें?

**ब्रह्म०**:—तें कारण हें, कीं माझ्या अंगामध्यें विद्वत्ता उत्पन्न झालेली आहे. माझें सर्व वेदाध्ययन पुरें झालेलें आहे. शास्त्रांमध्यें माझी गति इतकी झालेली आहे, कीं आज या साऱ्या क्षेत्रामध्यें माझा हात धरणारा कोणी नाहीं. काव्यादिकांच्या परिशीलनानें आणि व्यवहाराच्या प्रत्यक्ष अनुभवानें माझ्या अंगामध्यें जरूर तो सर्व शहाणपणा आलेला आहे. मग मी श्रीमंत कसा होऊं? श्रीमंतीचा मुख्य जो गुण तो माझ्या अंगामध्यें यत्किंचित् देखील नसतांना तुम्हीं मला मारून मुटकून श्रीमंत केलें, तरी मला श्रीमंत कोण बरें म्हणणार आहे? मी जर श्रीमंतपणाचें ह्या विद्येच्या अडचणीमुळें एकहि लक्षण दाखवूं शकलों नाहीं तर तुमची खटपट विनाकारण फुकट जाईल. म्हणून म्हणतों कीं, श्रीमंत करण्याकरितां तुम्ही दुसऱ्या कोणाला तरी पकडा! माझ्यासारख्या निरपराध्याला आणि समंजस मनुष्याला तुम्ही विनाकारण कां त्रास देतां?

**पुरुषः**—ज्याला श्रीमंत करावयाचें, तो मूळचाच मूर्ख असलेला चांगला, हें खरें; कारण मग मोठेपणीं मूर्खपणाचा गुण आयते वेळीं अंगांत उत्पन्न होणें फार कठीण जातें. कां कीं, मूर्खपणांत

निष्णात करून देणाऱ्या शाळा फारशा कोठें कोणी अजून स्थापन केल्या नाहींत. तेव्हां तारुण्य, विपयोपभोगांची निस्सीम लालसा, कुसंगति, इत्यादि गोष्टींनीं मनुष्याच्या अंगीं जेवढा कांहीं मूर्खपणा उत्पन्न होईल, तेवढ्यामध्येंच संतोप मानून स्वस्थ बसावें लागतें. तरी पण या गोष्टींमध्यें श्रीमंतीची भर पडली म्हणजे बहुधा श्रीमंतीच्या थाटापुरता मूर्खपणा मनुष्याच्या अंगामध्यें उत्पन्न होतोच होतो. आणि शिवाय श्रीमंती असून विद्वत्ता नसावीच, असाहि कांहीं सक्त नियमच केलेला आहे, असें नाहीं. चुकून-माकून कांहीं अपवाद उत्पन्न झाले, म्हणून त्यांत कांहीं बिघडणार आहे असें मुळींच नाहीं; पण त्याची तुला फारशी काळजी नको. तूं श्रीमंत होण्याला कबूल हो कीं, तूं मूर्ख झालासच म्हणून समज. श्रीमंतीच्या अंगामध्यें सर्व विद्वत्तेला लोपवून टाकण्याचा फार मोठा अजब गुण आहे! तेव्हां तूं रुकार दे, म्हणजे झालें!

**ब्रह्म०**:—प्राण गेला, तरी मी श्रीमंत होण्याला कधींहि आपला रुकार देणार नाहीं! तुम्हीं मला फसवून किंवा गुंगीमध्ये नेऊन श्रीमंत केल्याशिवाय मी आपखुपीनें श्रीमंत होण्याला आपली संमति कधींहि देणार नाहीं. पण तुम्ही माझ्यावर ही बळजबरी कां करीत आहां? तुम्हांला माझी करुणा येत नाहीं काय? देवा, तुला तरी माझी करुणा येऊं दे! मीं असें कोणतें पातक केलें होतें कीं, ज्यासाठीं तूं मला ही श्रीमंत होण्याची शिक्षा देत आहेस? मला समजूं लागल्यापासून मी धर्माचरण करीत असतां त्याबद्दल मला श्रीमंतीचें प्रायश्चित्त!

असें बोलत बोलत तो ब्रह्मचारी स्वप्नामध्यें रडूं लागला; व "माझ्या-वर निष्कारण हा श्रीमंतीचा गहजब कोसळून देणारा निर्दय आणि निष्ठुर असा प्राणी तूं आहेस तरी कोण?" असें तो त्याला रडत रडत विचारूं लागला. मी 'कर्माधिकारी' आहें, असें या प्रश्नाचें अस्पष्ट उत्तर देऊन ती त्या पुरुषाची आकृति हळूहळू दिसेनाशी झाली, व तो ब्रह्मचारी पहांटेच्या प्रहरीं खडबडून जागा झाला. पूर्वेकडे शुक्राची, चांदणी नुकतीच उगवून वर आलेली होती, ती पाहून त्याचें मन अगदीं प्रसन्न झालें; आणि स्वप्नांतील प्रसंग विसरून तो आपल्या नित्यकर्माला लागला.

* * *

एका मोठ्या नामांकित शहरांत कोणी एक वृद्ध मनुष्य राहत असे. त्याच्या सुखाला कोठें कांहीं कमी नव्हतें; परंतु पोटीं फक्त संतति मात्र नव्हती. पुत्रप्राप्तीसाठीं त्यानें आपल्याकडून शक्य त्या सर्व खटपटी केल्या; परंतु एकींतहि त्याला दुर्दैवानें यश आलें नाहीं. लग्नाच्या तीन बायका निपुत्रिक मरण पावल्याकारणानें त्याने पांच-सहा वर्षांपूर्वी चवथें लग्न केले होतें. तरी पण त्याला पुत्रमुख पाहण्याचा योग आला नाहीं. दत्तकपुत्रावांचून दुसरा मार्गच त्याला उरला नाहीं. तेव्हां त्याचे वंशांतील जवळपासचा अगर दूरचा कोणी तरी दत्तकपुत्र पाहण्याच्या इराद्यानें शोध करीत हिंडतां हिंडतां त्याचा उपाध्या वरील ब्रह्मचारी ज्या क्षेत्रामध्यें राहत होता, तेथें येऊन तपास करूं लागला. त्या वेळीं त्याला कर्मधर्मसंयोगाने असें आढळून आलें कीं, हा ब्रह्मचारी त्या गृहस्थाच्या वंशांतीलच, परंतु दूरचा नातेवाईक आहे! त्या तीर्थांतील वंशावळीच्या वह्यांवरून त्यानें या गोष्टीची खात्री त्या ब्रह्मचाऱ्याच्या मनामध्यें पाटवून दिली; व दत्तविधानाला त्याची संमति मिळविण्याविषयीं तो खटपट करूं लागला. ब्रह्मचाऱ्याच्या मनाचा कल आपल्या मधुकरी वृत्तीकडेच कायम होता. तरी पण त्या उपाध्याचें म्हणणें तो शान्तपणानें ऐकून घेत असे; व त्याच्या म्हणण्याचा थोडाथोडा परिणाम त्या ब्रह्मचाऱ्याच्या मनावर होत चालला आहे, अशीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. आपल्या संभाषणामध्यें उपाध्या त्याच्या भावी सुखाचीं आणि वैभवाचीं चित्रें फार मोहकपणानें रेखाटीत असे. एके प्रसंगीं त्याचें मन बरेंच वळत चाललें आहे असें पाहून तो मोठ्या निकरानें त्याजपाशीं पुढीलप्रमाणें बोलला. "तुमचें दत्तविधान झालें, म्हणजे मग तुम्हांला काय कमी आहे? खुशाल बसून खावें! अशी स्थिति असतांना तुम्हांला ह्या मधुकरीच्या झोळीची काय एवढी प्रतिष्ठा वाटते? आम्ही तेथें तुमचें लग्न करून देऊं; मग तुम्ही सुखानें रहाल. अशी स्थिति आपण होऊन चालत आली असतां तुम्ही नको कां म्हणतां? तुम्हांला धर्माचरणानें चालण्याची आवड असेल, तर श्रीमंत होऊन गृहस्थाश्रमामध्यें राहिल्यानें धर्माचरण करण्यास कांहीं प्रत्यवाय का येतो आहे? शिवाय दुसरी गोष्ट अशी आहे कीं, हें ब्रह्मचर्य आणि हें धर्माचरण या गोष्टी करावयाच्या कशाकरितां? पुंण्याकरितांच कीं नव्हे? मग मला सांगा कीं, परोपकारासारखें दुसरें पुण्य कोणतें आहे? तुमच्या कुळांतील एक वृद्ध मनुष्य मरणोन्मुख होऊन 'पुत्र पुत्र' म्हणत रडत

बसला आहे. आपल्या वंशांत औरस नाहीं तर नाहीं, पण निदान दत्तक पुत्र तरी नांव चालविण्याला असावा व त्यानें आपल्या नांवानें पिंडदान केलें म्हणजे आपण आणि आपले पूर्वज उद्धरून जाऊं, अशी त्याची दृढ भावना आहे. अशा मनुष्यावर उपकार करण्याचें साधन फक्त तुमच्याच हातांत आहे. इतर उपकार इहलोकीचेच असतात, परंतु या उपकाराबद्दल तुमचें नांव परलोकापर्यंत जाईल! पितृलोकांतील तुमच्या वंशांतील पूर्वींचे सर्व पूर्वज तुम्हांला काय म्हणतील आणि तुमची त्यांची पुढें मागें जेव्हां कोठें गांठ पडेल, तेव्हां ते तुमचें स्वागत कशा रीतीनें करतील, या सगळ्या कल्पना तुम्ही आपल्या डोक्यांत नीट आणा! आतांहि कदाचित् या वेळीं--मी या गोष्टी तुम्हांला सांगत आहे या वेळीं--ते तुमचे पूर्वज उत्कंठित होऊन तुम्ही काय उत्तर देतां तें ऐकण्यासाठीं येथें--कदाचित् तेथें--कदाचित् या ठिकाणीं--कदाचित् त्या ठिकाणीं-- वर-- खालीं-- कोणी सांगावें कोठें?--येऊन उभे राहिले असतील! त्या सगळ्यांची तुम्ही निराशा करणार? आणि त्यांचा रोष आपल्या डोक्यावर ओढून घेणार?"

हें त्या उपाध्याचें भाषण ऐकुण तो ब्रह्मचारी अगदीं गांगरून गेला. दया, परोपकार, भीति, इत्यादि अनेक मनोविकारांनीं त्याच्या मनामध्यें इतकें भयंकर काहूर उसळून सोडलें कीं, त्याला होय म्हणण्याशिवाय दुसरा कांहीं मार्गच सुचेना. तेव्हां मी तुमच्याबरोबर तुमच्या यजमानाच्या गांवीं येतों, असें त्यानें कबूल केलें; व त्याप्रमाणें त्याच दिवशीं संध्याकाळीं ते दोघे तें क्षेत्र सोडून निघाले. निघते वेळीं आपण पूर्वीं एके वेळीं स्वप्नामध्यें जो पुरुष पाहिला होता, त्याचीच आकृति आपल्यापुढें अस्पष्ट दिसत आहे, असा त्या ब्रह्मचाऱ्याला त्या वेळीं थोडासा भास झाल्यासारखें वाटलें. परंतु तिकडे फारसें लक्ष न देतां तो तसाच निघाला, व ते दोघे मार्गस्थ झाले.

* * *

कमळापुरास जाऊन पोंहोंचल्यावर पुढें लवकरच दत्तविधानाचा समारंभ झाला. ब्रह्मचाऱ्याचें स्वरूप, शहाणपणा व आचरण पाहून त्या दत्तक जनकाला समाधान वाटलें; परंतु तो नेहमीं त्याच्याकडे पाहून दुःखानें सुस्कारे टाकीत असे. दत्तक मुलाचें नांव भोलानाथ असें ठेवण्यांत आलें व एक सुस्वरूप आणि उपवर अशी मुलगी पाहून तिच्याशीं त्याचें लग्नहि

करून देण्यांत आलें. त्याची दत्तक आई म्हणजे त्यांच्या वडिलांचें चवथ्या लग्नाचें कुटुंब, हीहि फार सुरेख असून तिचें वयहि ऐन तारुण्यांतीलच होतें. ती भोलानाथावर निस्सीम पुत्रप्रेम करीत असे, व तोहि तिच्या ठायीं सख्ख्या आईप्रमाणें पूर्ण मातृभक्ति ठेवून तिच्याशीं अत्यंत नम्रपणानें आणि मोकळ्या मनानें वागत असे. परंतु भोलानाथाची नवीन बायको ही जशी बाह्य स्वरूपानें सुंदर होती, तसें तिचें अंतरंग रमणीय नव्हतें. तिचा स्वभाव थोडा खुनशी आणि संशयी होता. सासू आणि सून या दोघींच्या वयांत दोनचार वर्षांपेक्षां फारसा जास्त फरक नव्हता. दोघीहि सारख्याच तरुण आणि सारख्याच सुस्वरूप होत्या. दोघींच्या मध्यें फरक काय तो एवढाच होता कीं, भोलानाथाच्या बायकोचें मन कुढें होतें आणि आईचें मन खुलें होतें. अशी स्थिति असल्यामुळें भोलानाथ आणि त्याची दत्तक आई यांच्या परस्पर वर्तनांतील कित्येक साध्या आणि स्वाभाविक गोष्टीं-बद्दलहि भोलानाथाच्या कुटुंबाच्या मनामध्यें भलभलते कुतर्क उत्पन्न होऊन दृढ होत चालले होते. भोलानाथ आणि त्याची आई यांना याबद्दलची कल्पनाहि नव्हती. त्यामुळें माता आणि पुत्र यांच्यामधील प्रेमानें तीं एक-मेकांपाशीं फारच सलगीनें आणि प्रेमानें वागत असत. परंतु गिरजाबाईच्या संशयग्रस्त दृष्टीला या सगळ्या प्रकारामध्यें भलभलत्या गोष्टींची छाया दिसत होती. निष्कपटपणांत कपट, मातृप्रेमांत विपयान्धता आणि सहज-वृत्तींत निर्लज्जपणा, अशा प्रकारचीं उलटीं प्रतिबिंबें मत्सराच्या आरशांत दिसूं लागलीं. परंतु हें भावी संकटाचें जनक कारण अद्यापि बाल्यावस्थे-मध्यें होतें. तरी तोंपर्यंत भोलानाथ आणि त्याची आई यांच्या मनाला अगदींच स्वस्थता होती असें नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्यांचीं मनें एका भयंकर काळजीमुळें फारच अस्वस्थतेच्या भोंवऱ्यामध्यें सांपडलेलीं होतीं. भोलानाथाचे दत्तक वडील यांचें वेड दिवसेंदिवस जास्तच वाढत चाललें होतें; व तें कमी होण्याची बिलकुल आशा नव्हती. यांच्याप्रमाणेंच यांचे वडील, आजे आणि पणजे, हेहि वेडे झालेले होते, व त्यांतच त्यांचा अंत झाला होता. असा आपल्या कुटुंबाचा पूर्वेतिहास भोलानाथाच्या कानावर आलेला होता; त्यामुळें त्याच्याहि मनावर या पूर्वपरंपरेचे फार विलक्षण परिणाम होऊं लागले. या कुटुंबांत येऊन पडल्यामुळें आपणहि वृद्धाप-काळीं असेच वेडे होऊं कीं काय, या भीतीमुळें तो आपल्या तारुण्यामध्येंच

वेडा झाल्यासारखा झाला होता. ही आनुवंशिक वेडाची बाधा कां व कशी उत्पन्न होते, याविषयीं त्यानें पुष्कळ चौकशी केली; परंतु चतुर्थ संबंधाच्या हल्लींच्या आईशिवाय जुन्या पिढीपैकीं माहिती सांगणारे उपाध्ये-बुवा वगैरे मंडळी कोणी हयात न उरल्यामुळें त्याबद्दल त्याला कांहीं पत्ता लागेना. त्यामुळें तो भ्रमिष्टासारखें करूं लागला. परंतु त्याच्यापेक्षां त्याच्या वडिलांचा भ्रमिष्टपणा आणि वेडेपणा दिवसेंदिवस जास्तच विकोपाला जाऊं लागला. आतां आपण फार दिवस जगत नाहीं, आपला अंतकाळ जवळ आला आहे, असें वाटून एके दिवशीं मध्यान्ह रात्रीचे सुमारास घरांतील सर्व मंडळी निजली असतां त्यानें भोलानाथाला जागें केलें; आणि त्याचा हात धरून त्याच्याशीं बोलत बोलत तो आपल्या घरांतील एका दूरच्या पडक्या बुरजाच्या दरवाजाकडे जाऊं लागला. वाटेनें जातांना तो त्याला म्हणाला— " भोलानाथ, आपण या उत्तरेच्या बुरजा-कडे चाललों. हीच ती उत्तर दिशा. या झाडाच्या वर येथेंच कोठें तरी ध्रुव नक्षत्र असलें पाहिजे. पूर्वी तें मला चांगलें दिसत असे; परंतु अली-कडे तें मला दिसत नाहींसें झालें आहे. इतकें लांब कशाला? माझ्या नाकाचा शेंडाहि मला अलीकडे दिसत नाहीं! साऱ्या रात्रींतून मला कधीं झोप लागत नाहीं; आणि जेव्हां लागते तेव्हां मला अशीं भयंकर स्वप्नें पडतात कीं, त्यांतून मी जागा कसा होतो, याचेंच मला आश्चर्य वाटतें! भयंकर आवाज ऐकूं येतात! किंकाळ्यांनीं कानठळ्या बसतात! अक्राळ-विक्राळ यमदूत माझ्याभोंवतीं नाचूं लागतात; आणि आपले पाश माझ्या अंगावर टाकण्याचा प्रयत्न करूं लागतात! अशा स्थितींत आतां मी फार दिवस जगेन असें मला वाटत नाहीं. माझ्या पाठीमागें तूं सर्व गोष्टी नीट चालवशीलच. परंतु तुला खर्चाला जेव्हां पैसे लागतील, तेव्हां ते तुला कोठें व कसे मिळतील, एवढेंच काय तें तुला दाखवून ठेवण्याचें राहिलें आहे; आणि त्यासाठींच मी तुला आतां त्या बुरजाकडे घेऊन चाललों आहे! फक्त अवसेला आणि पुनवेला मात्र ते तुला मिळतील!" असें म्हणत तो म्हातारा पुढें चालला व आश्चर्यचकित झालेला भोलानाथ कांहीं एक न बोलतां त्याचे मागून चालला. म्हाताऱ्यानें बुरजाच्या बाहेरच्या दाराचें कुलूप काढलें. त्याच्या आंत गेल्यावर एक जिना उतरून ते दोघे खालीं गेले. नंतर त्यानें एका सपाट फरसबंदीमधील एक पातळसा चिरा तेथें

करून ठेविलेल्या कांहीं कृत्रिम साधनानें अलगज उचलून बाजूला केला. त्याच्याखालीं दुसरी एक नवीन वाट लागली. त्या पायऱ्यांनीं खालीं उतरल्यावर त्या म्हाताऱ्यानें तेथें एक बारीकसा दिवा चेतवला; व तो घेऊन त्यानें पुढील एका मोठ्या दगडी दालनाचें दार उघडलें. ते उघडतांना त्या म्हाताऱ्याचे हातपाय इतके लटलट कांपूं लागले कीं, त्याच्या हातां-तील दिवा खालींच पडावयाचा; परंतु तो भोलानाथानें आपल्या हातांत घेतला. म्हातारा स्वतः इतका घाबरला होता, तरी तो आपल्या मुलाला म्हणाला, " भिऊं नको! घाबरूं नको! तुझ्या अंगाला हा घाम कसला सुटला आहे? ही पहा, आपली सर्व संपत्ति या ठिकाणीं सांठवून ठेविलेली आहे!" हे शब्द ऐकत असतां भोलानाथाचें लक्ष त्या दिव्याच्या अंधुक उजेडामध्यें अस्पष्ट दिसणाऱ्या त्या दगडी दालनांतील भयंकर देखाव्याकडे गेलें! त्या दालनांत सोन्याच्या मोहरांनीं भरलेल्या मोठमोठ्या अनेक कढया ठेविलेल्या होत्या. परंतु त्या कढयांवर जेव्हां भोलानाथाची दृष्टि गेली, तेव्हां त्याच्या दृष्टीला तेथें काय पडलें? हीं भुतें कोणाचीं होतीं? कांहीं कढयांवर वृद्ध भाणसांचीं भुतें अगदीं हाडांच्या सांपळ्यासारखीं जखखड होऊन बसलेलीं होतीं! कांहीं कढयांवर अनाथ विधवा स्त्रियांचीं भुतें केंविल-वाणे स्वर काढीत आणि आपली छाती बडवून घेत बसलेलीं होतीं! कांहीं कढयांवर विषप्रयोगानें काळ्या ठिक्कर पडलेल्या आणि सुरीच्या जखमेच्या रक्तानें लालभडक झालेल्या अर्भकांचीं भुतें किंकाळ्या फोडीत पडलेलीं होतीं! अशा रीतीनें तें येवढें थोरलें भव्य दालन, पण सगळें भुतांनीं, पिशाच्चांनीं आणि समंधांनीं खेचून भरून गेलें होतें! कांहीं कढयांवर, अंगावर वीत वीत केस वाढलेले आणि डोळ्यांतून ज्वाळा टाकणारे असे वीस वीस हात लांबीचे आणि हत्तीच्या सोंडे एवढाल्या जाडीचे महाभुजंग वेटोळीं घालून आपल्या फणांनीं फुस्कारे टाकीत बसले होते! कांहीं कढयांतून आगीच्या ज्वाळा निघत होत्या! आणि कांहीं कढयांतील मोहरा क्षणांत सोन्याच्या दिसत आणि क्षणांत त्या सगळ्यांचे कोळसे होऊन जात! त्या दगडी दालनाचा दरवाजा उघडलेला पाहून तेथील तीं सर्व भुतें हे दुष्ट आमचें द्रव्य हरण करण्याकरितां आले, असें वाटून एकदम ओरडूं लागलीं, किंकाळ्या फोडूं लागलीं, आणि सैरावैरा धांवून दरवाजाच्या तोंडाशीं त्यांना आंत न येऊं देण्याच्या इराद्यानें गर्दी करूं लागलीं! त्या वेळीं घाबरून जीभ वांकडी

पडल्यामुळें अस्पष्ट शब्दांनीं म्हातारा आपल्या मुलाला म्हणाला, " हं, पुढें हो; आणि यांतल्या एका कढईतल्या तुझ्या ओंजळींत येतील तितक्या मोहरा चटकन घेऊन ये. हीं भुतें अंगावर आलीं, तरी तूं त्यांना भिऊं नको. त्यांच्याशीं मारामारी करून आणि त्यांना बाजूला सारून तूं त्यांतल्या मोहरा काढून घेऊन ये." असें म्हाताऱ्यानें सांगितलें, परंतु मुलाला तसें करण्याची कांहीं छाती होईना! अखेरीस मुलगा दगडासारखा स्तब्ध आणि काल्यासारखा गार होऊन उभा राहिलेला पाहून म्हातारा पुढें सरसावला आणि एका कढईतील मोहरा काढूं लागला. त्या वेळीं त्याचें आणि भुतांचें जें झुंज माजलें, तें पाहून तर भोलानाथ अगर्दींच मृतप्राय झाला. पण पुढें थोडासा शुद्धीवर येऊन त्यानें आपल्या बापाला आपल्या हस्तगत करून घेण्याचा प्रयत्न चालविला. त्या म्हाताऱ्याला भुतें एकीकडे ओढीत होतीं आणि त्याचा मुलगा त्याला दुसरीकडे ओढीत होता. अखेरीस भोलानाथानें एकदांचें त्याला त्या दगडी दालनाच्या बाहेर ओढून काढलें आणि त्या दालनाचा दरवाजा घट्ट लावून घेतला. कांहीं वेळानें म्हातारा शुद्धीवर आला, व किती मोहरा आपण काढून आणल्या हें मोजून त्या पदरांत बांधून घेऊन मुलाच्या खांद्यावर मान टाकून आल्या रस्त्यानें माघारी गेला. मुलगा भोलानाथ आपल्या बापाला सावरीत सावरीत त्या बुरजाच्या दरवाजांतून बाहेर पडला, तों त्या बुरजावर त्याला पूर्वीं स्वप्नामध्यें दिसलेल्या त्या पुरुषाची आकृति उभी राहून आपल्याकडे पाहत असलेली त्याच्या दृष्टीस पडली!

* * * *

आईः—हल्लीं जसे ते आजारी पडले आहेत, तसे ते अवसेपुनवेनंतर पडत असत. दर अवसेपुनवेला मध्यान्हरात्रीचे हे उठून जात असत, आणि सोन्याच्या मोहरा घेऊन येत असत. पण हे कोठें जातात आणि या मोहरा कोठून आणतात, हें मला कांहीं समजत नसे. मोहरा घेऊन आले, म्हणजे त्यांचे हातपाय कांपत असत, अंगाला घाम सुटलेला असे, आणि मग हिंवासारखा ताप भरून ते मृतप्राय पडत असत. तापाच्या लहरींत ते कधीं बेशुद्ध पडत असत आणि कधीं भुतांखेतांसंबंधानें नाहीं नाहीं तें बडबडत असत! मला बाई आतांपर्यंत या सगळयाचा अर्थ कांहीं एक कळत नव्हता.

पण, भोलानाथ, तूं आतां ही भयंकर हकीकत सांगितल्यावरून सगळ्या गोष्टी माझ्या लक्षांत येऊं लागल्या आहेत !

**भोलानाथः**—आई, भयंकर हकीकत म्हणून काय सांगावी ! काय त्या मेलेल्या माणसांच्या जिवंत वासना ! आणि काय तीं जळून गेलेल्या शरीरांचीं भयंकर आणि बीभत्स रूपान्तरें ! असा देखावा, मला वाटतें, कोणीहि पाहिलेला नसेल ! नको ! त्याचें मला स्मरण देखील व्हावयाला नको ! साऱ्या जगांतील संपत्ति मला कोणीं देऊं केली, तरी मी फिरून तेथें जाणार नाहीं ! मला वाटतें, जितकीं भुतें होऊन हल्लीं तेथें राहिलीं आहेत, तितक्यांची संपत्ति आमच्या कोणीतरी पूर्वजानें अन्यायानें त्यांना नागवून आणि मारवून त्यांच्यापासून लुबाडून घेतली असली पाहिजे ! काय हा संपत्तीचा हव्यास ! इतक्या सोन्याच्या मोहरांनीं भरलेल्या कढया एका कुटुंबा-करितां — एका व्यक्तीकरितां— एका यःकश्चित् मानवी प्राण्याच्या क्षणिक सुखाकरितां— दुसऱ्या शेकडों लोकांना कंगाल करून एका ठिकाणीं सांठवून ठेवण्यांत काय फायदा ? ज्या वंशांतील पूर्वजांनीं आपल्या एका पोटाची खांच भरण्याकरितां अशा रीतीनें हजारों लोकांना उपाशी आणि तळतळत ठेवून प्राणांला मुकविलें, त्यांच्या पुढील पिढीमध्यें औरस संतति झाली नाहीं, तर त्यांत आश्चर्य तें काय ? सगळयांच्या माना मुरगाळून एकच जण जर म्हणेल कीं, त्या सगळ्यांची संपत्ति मी आपल्या एकट्याच्याच कढयां-मध्यें ठेवून देईन, तर तें त्या न्यायी देवाला कसें खपेल ? इतक्या आत्म्यांचे तळतळाट आणि इतक्या वासनांचे शिव्याशाप ज्यांच्या डोक्यावर पडत आहेत, त्यांना चैन कसें पडेल ? ते वेडे कां होणार नाहींत ? आणि त्यांच्या संततीचा नष्टांश कां होणार नाहीं ? इतकीं भयंकर पातकें ज्यांच्या पूर्वजांच्या हातून झालेलीं आहेत, त्यांच्या वंशांतील कोणा स्त्रियांच्या पोटांत गर्भ असले, तरी ते गळून पडले पाहिजेत ! किंवा तसे गळून पडले नाहींत, तर गर्भाशयाच्या आंतल्या आंतच या पातकांच्या निखाऱ्यांनीं ते जळूत खाक झाले पाहिजेत !

**आईः**—हं हं ! थांब ! भोलानाथ, असें बोलूं नको. सहज आवेशा-मध्यें तुझ्या तोंडून निघणारीं हीं शापवचनें कोणाला लागू पडत आहेत, आणि तीं कोणाला बाधक होण्याचा संभव आहे, याची तुला कल्पनासुद्धां नाहीं ! तूं आपल्या आईला असा शाप देऊं नको ! तूं आपल्या भावाला

कठोर शापवचनांनीं जाळून भस्म करूं नको. मी अजूनपर्यंत कोणापाशीं बोललें नव्हतें; परंतु पुत्रप्रेम फार कठीण आहे; या वेळीं माझ्यानें बोलल्या-वांचून राहवत नाहीं.— भोलानाथ, तूं असा दचकतोस कां ?— आणि हें ऐकून तुझ्या कपाळाला ह्या अशा आठ्या कां पडल्या ?—मला मुलगा झाला, तर तुला अजिबात घालवून लावण्यांत येईल, किंवा तो तुझ्यांतील अर्ध्या संपत्तीला वांटेकरी होईल, म्हणून तुला ही गोष्ट ऐकून वाईट वाटलें काय ?

**भोलानाथः**—नाहीं, नाहीं ! आई, तुझ्या पायांची शपथ घेऊन सांगतों कीं, हा विचार माझ्या मनाला शिवलासुद्धा नाहीं. मला या नवकोट संपत्तीपैकीं आणि त्या शेंकडों कढयांपैकीं सोन्याच्या एका कणाचीहि अपेक्षा नाहीं. ज्या धर्मबंधनांनीं आणि ज्या धर्मसंस्कारांनीं मला तुमचा दत्तक पुत्र म्हणून केले आहे, तीं बंधनें जर मला तोडतां येतील, आणि ते संस्कार जर मानवी प्राण्याला तुच्छ मानतां येत असतील, तर हें तुमच्या वंशाशीं जोड-लेलें माझें नातें तोडून टाकण्याला मी एका पायावर तयार आहें ! मी भिक्षा मागून खुशाल पोट भरीन. ही सगळी संपत्ति तुला होणाऱ्या मुलाला अक्षयी लखलाभ असो !

**आईः**—नको नको ! भोलानाथ, माझ्या त्या तान्ह्या बाळावर तूं इतका निष्ठुर होऊं नको. जो भार सहन होणें तुलाहि शक्य वाटत नाहीं, तो भार अजून त्या जन्मासहि न आलेल्या कोमल अर्भकावर टाकून तूं आपलें अंग काढून घेतोस, हे तुला बरें वाटतें काय ? जोंपर्यंत नुसत्या संपत्तीची आशा वाटत होती, तोंपर्यंत तूं दुसऱ्या मनुष्यालाहि आपला बाप म्हण-ण्याला तयार झालास ! आणि आतां त्या संपत्तीवर खवीस आणि समंध बसलेले आहेत, असें पाहिल्याबरोबर तूं माझ्या पोटांतील गोळ्याला पुढें करण्याला तयार होतोस ! ही तुझी काय मातृभक्ति म्हणावी, किंवा तुझें बंधुप्रेम म्हणून वर्णन करावें ?

**भोला०ः**—आई, तर मग मी आतां काय करूं असें तुझें म्हणणें आहे ?

**आईः**—त्या संपत्तीवर जर इतकीं भुतें बसलेलीं असतील, तर कसेंहि करून माझें हें मूल त्या भावी संकटापासून बचावेल अशी कांहीं तरी तोड काढ.

**भोला०ः**—ठीक आहे. दर अमावास्येला आणि पौर्णिमेला या भुतां-

च्या जाचणुकीच्या यातना मीं सोसाव्या किंवा पुढें जन्मास येणाऱ्या माझ्या भावानें सोसाव्या हा प्रश्न आहे. पण यांत प्रश्न तरी कसला ? त्या यातना सोसण्याची जोखीम मीं आपल्या शिरावर घेतली, तर त्या अर्भकाचा जन्म सुखांत व आनंदांत जाईल. असें जर आहे तर मग दुसऱ्याला सुख देण्या-साठीं मीं दुःख भोगण्याला कां तयार होऊं नये ? परोपकारासाठीं, आई, तूं सांगशील तें संकट पतकरण्याला मी तयार होईन !

**आईः**—ठीक आहे. मला जर मुलगा झाला, तर त्याला या भयंकर यमयातना सोसण्याचा कधींहि प्रसंग न यावा, यासाठीं या आपल्या आनु-वंशिक दुःखाचें ओझें तूं आपल्या माथ्यावर घेऊन त्या माझ्या अर्भकाला अशा कोठें तरी दूर दूर नेऊन ठेव कीं, तो या कुळांतील आहे, असें त्याला किंवा दुसऱ्या कोणालाहि कधीं कळूं सुद्धां नये !— नुसतें आतां तोंडापुरतें होय म्हणून उपयोगी नाहीं ! कांहीं झालें तरी मी असें करीन, असें मला वचन दे !

**भोला०ः**—आई, मीं असें केलें, तर धनलोभानें आणि आपल्या धाक-ट्या भावाचा हक्क बुडविण्याच्या हेतूनें मी त्याचा कांटा आपल्या वाटेंतून नाहींसा करून टाकण्याला प्रवृत्त झालों अशीं लोक मला नांवें ठेवतील. तरी पण आई, तुझ्या शब्दासाठीं आणि परोपकारासाठीं मी तुझ्यापुढें घुडगे टेकून आणि तुझ्या पायांची शपथ घेऊन सांगतों कीं, तुझ्या इच्छेप्रमाणें मी व्यवस्था करीन, आणि त्याला प्रत्येक अवसेपुनवेच्या मध्यरात्रीं भुतांशीं युद्ध करणें आणि वेड लागून बरळणें या महायातनांपासून मुक्त करीन.

**आईः**—ईश्वर तुझें कल्याण करील !

“ आपला नवरा, आपली सासू हीं एकांतांत किती वेळ बसलीं आहेत ! अजून यांचीं खलबतें संपलीं नाहींत काय ? मनाची नाहीं, तरी पण जनाची तरी लाज माणसांना पाहिजे ना ? ” असें म्हणत, भोलानाथ आणि त्याची आई ज्या दिवाणखान्यांत एकान्तांत बोलत बसलीं होतीं, तेथें ती मत्सरानें कलुषित झालेली गिरजाबाई येऊन, दाराच्या आडून पाहूं लागली; तों भोलानाथ आपल्या आईच्या पुढें गुडघे टेकून तिची विनवणी करीत अस-लेल्या अवस्थेमध्यें तिच्या दृष्टीस पडला. तेव्हां तर तिचा मत्सराग्नि फारच भडकला; आणि भलत्याच ग्रहानें तिचा संशय अतिशय बळावला. इतक्यांत भोलानाथ दार उघडून बाहेर पडला; तों दाराच्या जवळ आपली

बायको उभी असलेली पाहून त्याला फार आश्चर्य वाटलें! परंतु तिच्या पाठीमागेंच कांहीं अंतरावर ती त्या स्वप्नांतील पुरुषाची अंधुक आकृति पाहून तर त्याला जो विस्मय वाटला, त्याची कोणाला कल्पनाहि करतां येणार नाहीं. ही आकृति त्या कर्माधिकाऱ्याची! हा कोण? हा पुरुष जेथें तेथें माझ्यामागें असतो तें काय म्हणून? याचा हेतु काय? यानें आपलें नांव 'कर्माधिकारी' म्हणून मला त्या स्वप्नाचे वेळीं सांगितलें आहे, त्याचा अर्थ काय? असे अनेक प्रश्न त्याच्या मनांत उद्भवले. परंतु याच्यापेक्षां त्याच्या त्या वेळच्या काळज्या जास्त महत्त्वाच्या होत्या. कारण, दत्तक बापाची प्रकृति अगदीं अत्यवस्थ झालेली होती.

* * *

भोलानाथाचे वडील वारल्यावर त्यांची उत्तरक्रिया वगैरे विधि यथाशास्त्र झाले. फक्त त्यांच्या अस्थि कोठें तरी तीर्थांत नेऊन टाकावयाच्या राहिल्या होत्या. त्याशिवाय बाकीचीं सर्व कामें होऊन सगळी सत्ता आणि संपत्ति भोलानाथाच्या हातांत आली. पण त्याच्याबरोबर सुख व समाधान हीं मात्र आलीं नाहींत; आणि तीं कधीं येतहि नाहींत. मध्यान्ह रात्र झाली कीं, त्याच्या अंगावर शहारे येत! आणि मागची आठवण होऊन त्याच्या अंगाला दरदरून घाम सुटे! अशा कारणांमुळें त्याला रात्रभर कधीं झोपसुद्धां लागत नसे. आपल्या भोंवतालचीं सारीं माणसें सुखानें गाढ निजलेलीं पाहून त्याला त्यांचा मोठा हेवा वाटे. हे किती भाग्यवान् आहेत, आणि मी एवढा श्रीमंत असून किती भाग्यहीन आहे, असें त्याला वाटे. एकदां एके दिवशीं एक भिकारी रस्त्याने चालला होता, त्यानें भोलानाथाला पाहून श्रीमंती, वैभव व भाग्यशालीपणा या गोष्टींविषयीं त्याची स्तुति चालविली. ती ऐकून भोलानाथाच्या डोळ्यांतून घळघळां अश्रूंचे पूर वाहूं लागले! तो आपल्या मनाशीं म्हणाला, 'काय हा भिकारी भाग्यवान् आहे! बिचाऱ्यापाशीं सोन्याची एकसुद्धां मोहोर नसेल हें खरें; पण त्याला भुतांशीं झगडण्याचा प्रसंग कधींहि येत नसेल. याच्या या भिक्षेच्या भांड्यांत जें सुख भरलें आहे, तें माझ्या या सोन्याचांदीच्या भांडयांत नाहीं! याच्या अंगावरच्या या चिंध्यांमध्यें जें समाधान सांठविलें आहे, तें माझ्या या रेशमी वस्त्रांमध्यें नाहीं! श्रीमंतीपेक्षां गरिबी फार चांगली! पण ती माझ्यासारख्या या हतभाग्याला देतो कोण? मी ह्या भिकाऱ्यापाशीं त्याचा

भिकारीपणा मागूं लागलों आणि मी आपला श्रीमंतपणा त्याला देऊं लागलों, तरी खरी स्थिति कळल्यावर त्या गोष्टीलाहि तो कबूल होणार नाहीं. या संपत्तीपासून आणि तिच्या संकटांपासून मला कोण सोडवील?' अशा प्रकारचे अनेक विचारतरंग अनेक वेळीं त्याच्या मनांत येत असत.

गिरजाबाईचा संशय दिवसेंदिवस बळावत चालला. भोलानाथाची आई गरोदर असल्याचें तिनें पक्कें ताडलें. परंतु ती तर आपल्या मुलाला हे कौटुंबिक क्लेश न व्हावेत, म्हणून आपण गरोदर असल्याचे कधींहि दाखवीत नसे. अशा रीतीची ही छपवाछपवी पाहून आपल्या मनांतील संशयाला आतां आणखी जास्त पुराव्याची जरूरीच उरली नाहीं; अशी गिरजाबाई-च्या मनाची पक्की खात्री झाली व ती उभयतांची प्रत्येक वर्तणूक फार बारीक रीतीनें पाहूं लागली. पुढें कांहीं महिने लोटल्यावर पतिनिधनाच्या दुःखानें व्याकुळ झालेली गिरजाबाईची सासू आपल्या माहेरीं कांहीं दिवस राहण्याकरितां गेली. पाठीमागें भोलानाथाच्या मनालाहि एक मोठी काळजी लागलेलीच होती, त्यामुळें तारुण्यामध्येहि त्याला स्त्रीसुखामध्यें फारसें सौख्य वाटेनासें झालें होतें. परंतु याबद्दलची कल्पनाहि गिरजा-बाईच्या मनामध्यें कधीं आलेली नसल्यामुळें अन्यस्त्रीप्रेम हेंच आपल्याविषयी-च्या त्याच्या उदासीनतेचें कारण असें ती समजत असे. अशा गृहस्थिती-मुळें तो अगदीं कंटाळून गेला. एकटें चार दिवस कोठें तरी निवान्त जागीं जाऊन रहावें, असें त्याच्या मनांत आलें. आपल्या वडिलांच्या अस्थि कोठें तरी तीर्थांत टाकण्याकरितां त्याला केव्हां तरी जावयाचेंच होतें. म्हणून त्या अस्थि घेऊन तो पूर्वीं ब्रह्मचर्यावस्थेमध्यें ज्या क्षेत्रांत राहत होता त्या क्षेत्रांतच जाण्याकरितां निघाला. तें क्षेत्र फार पवित्र आणि समाधानकारक होतें, म्हणून आस्थिविसर्जनाचा विधि उरकल्यानंतर मनाला थोडा विसर पडावा आणि विसांवाहि मिळावा, अशा हेतूनें तो ह्या क्षेत्रा-मध्यें पुष्कळ दिवसपर्यंत राहिला. ब्रह्मचर्याश्रमामध्यें असतांना तो ज्या मठामध्यें राहत असे, त्याच मठामध्यें तो या वेळीं जाऊन राहिला. ती पूर्वींची जागा पाहून त्याचें मन गहिंवरून आलें, आणि त्याच्या डोळ्यांतून अश्रु वाहूं लागले. पूर्वींचें त्याचें प्रथमाश्रमाच्या वेळचें आणि मधुकरीवृत्तीचें जें कांहीं फाटकें तुटकें सामानसुमान राहिलें होतें, तें त्यानें तेथेंच एका फडताळामध्यें ठेविलेलें होतें; तें त्याला आढळलें. तें पाहून त्याला आपलें

सगळें पूर्ववृत्त आठवलें. मी येथें होतों! येथें बसत असे! येथें निजत असे! या गंगेचें मी नित्य स्नान करीत असे आणि या ठिकाणीं बसून मी स्नानसंध्या आणि वेदाध्ययन करीत असे तेव्हां मी येथें किती सुखी होतों! पण आतां तें सुख कोठें आहे? तें लहानपणचें माझें सुख मला आज कोणी परत देईल काय? मी येथें फार सुखाचा होतों, पण माझी दैवगति ओढवली, आणि त्या उपाध्यानें येऊन मला गळ घातली! माझ्यावर हा श्रीमंतीचा प्रसंग ओढवणार, हें मला आधींच कळून चुकलें होतें.–हीच ती जागा! याच ठिकाणीं मी निजलों होतों! आणि ह्या येथेंच त्या कर्माधिकाऱ्याची आकृति माझ्या स्वप्नांत माझ्या जवळ उभी राहून मला ही श्रीमंती पत्करण्याविषयीं आग्रह करीत होती! इतके विचार त्याच्या मनांत येत आहेत, तों त्याच पूर्वीच्या ठिकाणीं त्या कर्माधिकाऱ्याची ती आकृति उत्पन्न होऊन मूर्तिमंत उभी राहिली! ती पाहून प्रथम त्याला भयच वाटलें पण पाठीमागून त्याच्या मनांत एक आशा उत्पन्न होऊन तो त्याला म्हणाला, " अरे कर्मचांडाळा–कर्माधिकाऱ्या! तूं मला या ठिकाणीं प्रथमतः श्रीमंतीचें स्वप्न दाखविलेंस; ती श्रीमंती आतां मला पुरे झाली. आतां तरी तुला माझी दया येऊं दे! मी फिरून पूर्वीच्यासारखा येथें निजतों, आणि तूं मला फिरून मी पूर्वीं होतों, तसा गरीब व ब्रह्मचारी कर––पण मी आतां येथें निजलों तरी स्वप्न पडण्यासारखी झोप मात्र आतां लागणें कठीण! पण यदाकदाचित् मला झोप लागली, तर मला त्या झोपेंत तूं फिरून श्रीमंताचा गरीब करशील काय?" यावर मुकाट्यानें 'नाहीं!' म्हणून मान हलवीत ती त्या कर्माधिकाऱ्याची आकृति जमिनीपासून वातावरणामध्यें उंच उंच चढत जाऊन अखेरीस अदृश्य झाली. व आतां मरणाशिवाय यांतून सुटका होण्याला दुसरा मार्ग नाहीं, असे विचार भोलानाथाच्या मनांत घोळूं लागले. असो; हा स्वप्नांतील पुरुष आपल्याला फिरून गरीब करीत नाहीं, तर आपणच आपल्याला गरीब करून घ्यावें, असें म्हणून त्यानें आपल्या अंगावरचे जे कांहीं श्रीमंती थाटाचे कपडे व दागदागिने होते, ते त्या फडताळांत ठेविले, आणि पहिला गरिबीचा पोशाख त्यानें आपल्या अंगावर चढविला. रोज प्रातःकाळीं गंगेचें स्नान करावें, नंतर स्नानसंध्या आणि वेदाध्ययन करावें, व माध्यान्हकाळीं पूर्वीची ती चौपदरी घेऊन माधुकरी मागावी अशा रीतीनें तो राहूं लागला. या अवस्थेंत त्याचे दिवस साधारणपणें सुखानें जात असत, इतक्यांत त्याची

आई आपल्या माहेरीं प्रसूत होऊन तिला पुत्र झाला. तेव्हां या मातापुत्रांच्या दरम्यान पूर्वीं ठरल्याप्रमाणें भोलानाथानें त्या अर्भकाची सर्व यथास्थित व्यवस्था लावून दिली व ती व्यवस्था कशी काय करून ठेविली आहे हें त्यानें तिला कळविलें, व फिरून तो पूर्वीं सांगितलेल्या क्रमानें आपले दिवस त्या क्षेत्रांत सुखासमाधानामध्यें घालवूं लागला. परंतु त्याचें कर्म त्याला कसें चैन पडूं देणार? पहिल्यानें ज्या दिवशीं त्या उपाध्याच्या भापणाला भुलून तो तें क्षेत्र सोडून निघाला, त्याच दिवशीं त्याचें सुख संपलें! तें आतां त्याला कोठून मिळणार? दुर्दैवानें त्याच्याविरुद्ध अगदीं सर्व तयारी करून ठेविली होती. गिरजाबाईच्या मनामध्यें जे निराधार संशय प्रबळ झाले होते, ते तिनें शेजारीपाजारी बायकांच्यापाशींच फक्त बोलून दाखविले होते, असें नाहीं; तर मत्सरानें अंध होऊन आपल्या नवऱ्याच्या कुळावर आणि कीर्तीवर आपण केवढें संकट आणीत आहों, याचा यत्किंचित्‌हि विचार न करतां, आपल्या नवऱ्याचें दुर्वर्तन सुधारण्याच्या हेतूनें तिनें आपल्या समजुतीप्रमाणें ती सर्व हकीकत त्या नगरच्या राजाला कळविली!

भोलानाथाचे वडील जिवंत असतांनाच वास्तविक त्याची बायको त्याच्यापासून गरोदर राहिली होती; परंतु गिरजाबाईची कल्पना अशी कीं, ती पतिमरणानंतर आपल्या नवऱ्याच्या संबंधानें गरोदर राहिली आहे! तिला वास्तविक नऊ महिने पुरे झालेले होते; परंतु कल्पनेची एक चूक झाली म्हणजे दुसरी होण्याला फारसें अवघड पडत नाहीं, या नियमाप्रमाणें गिरजाबाईची अशीहि दृढ समजूत झालेली होती कीं, नऊ महिन्यांच्या आधींच हिनें मुद्दाम गर्भपात करून घेतला असला पाहिजे! तिनें मुद्दाम कांहीं माणसें ठेवून या दोघांच्या हालचालींवर बारीक टेहळणी ठेविलेली होती. त्यावरून मूल कोठें नाहींसें झालें आहे, व भोलानाथ हा एका भिकाऱ्याच्या रूपामध्यें आपलें वेषान्तर करून घेऊन एका क्षेत्रांतील एका मठामध्यें राहिलेला आहे, अशी बातमी तिला कळली. ही बातमी कळतांच आपल्या पूर्वीच्या कुकल्पनेचें संविधानक तिनें शेवटपर्यंत अगदीं बरोबर जमविलें! मूल जर कोठें नाहीं, तर तें मारलेंच गेलें असलें पाहिजे; आणि भोलानाथ जर भिकाऱ्याचा वेष घेऊन एका मठांत दडून बसला आहे, तर या गर्भपाताच्या शासनाच्या भीतीशिवाय असें करण्याला त्याला दुसरें कारण काय असूं शकणार आहे? असे सर्व धागे संगतवार जुळल्यासारखे वाटून ती मत्सराची

प्रत्यक्ष मूर्तीच जी गिरजाबाई, तिनें आपल्या नवऱ्याचें हें अन्यगामी प्रेम आपल्यावर दुर्लौकिकाच्या धास्तीनें तरी परत येऊन बसावें या हेतूनें तिनें ती गोष्ट राजदरबारीं कळविली. पूर्वींचे ते जुन्या काळचे दरबार! त्यांत एवढा बारीक सारीक न्यायअन्याय कोण पाहतो? चोर सोडून संन्याशाला सुळावर देण्याची म्हणहि तेव्हांपासूनच पडलेली आहे! ती कांहीं अलीकडची नव्हे!

* * * *

सकाळची वेळ होती. आकाशांतील नक्षत्रें अर्धवट दिसेनाशीं झालेलीं होतीं. पूर्वदिशा किंचित् आरक्त झालेली होती. निरनिराळ्या वृक्षांमधून पक्ष्यांचे मंजुळ ध्वनि ऐकूं येत होते; आणि सकाळच्या मंद वाऱ्याची बारीक झुळूक हवेमध्यें तरंगत होती. बरेच दिवस अंधारकोठडीच्या तळघरांत राहून अशा वेळीं एकदम हें विश्वसौंदर्यदर्शन झाल्यामुळें त्या हैतभाग्य भोलानाथाच्या मनाची किती उल्हसित वृत्ति झाली असेल याची कल्पना करणें फारसें कठीण नाहीं. ज्या क्षेत्राच्या ठिकाणीं तो राहत होता, तेथील नदी जवळच्याच एका उंच पहाडामधून निघालेली होती. आणि त्या नदीचा त्या पहाडांत जेथें उगम झालेला होता, त्याच्या वरच फार उंच गेलेल्या अशा एका डोंगराच्या सुळक्यावर एक प्रचंड, विस्तीर्ण आणि मजबूत असा किल्ला बांधलेला होता. त्या किल्ल्याच्या अंधारकोठडींत आपल्या कडेलोटाच्या दिवसाची वाट पाहत भोलानाथ कित्येक दिवस कुजत पडलेला होता. अखेरीस तो दिवस एकदांचा उजाडला. पहारेकऱ्यांनीं अंधारकोठडीचीं कुलुपें काढलीं. दरवाजा उघडला. पायांतील शृंखलांचा आवाज अतिशय हृदयद्रावक रीतीनें उत्पन्न होऊं लागला व तो हतभाग्य प्राणी त्या जड बेड्या उचलीत आणि हळूहळू पावलें टाकीत त्या कडेलोटाच्या टोंकाकडे जाण्याकरितां निघाला.

जेथून कडेलोट करावयाचा तो एक भयंकर तुटलेला कडा होता. वरून खालीं पाहिलें, तर पाहणाराची दृष्टि तळापर्यंत कधीं पोंचतच नसे. खालच्या वाढलेल्या गवतांचे लाल गोंडे सोसाट्याच्या वाऱ्यानें वर— अतिशय वर— उडविले, तरी ते त्या दरींत मध्येंच कोठें तरी टोळासारखे तरंगत राहत असत. तळापासून उंच म्हणून उडणारे पक्षी देखील त्या कड्याच्या

जेमतेम मध्यापर्यंत उडत येऊन थकून मध्येंच कोठें तरी बसत असत. या पक्ष्यांमध्यें बहुतेक गिधाडांचीच गर्दी फार असे. अशा त्या तुटलेल्या कड्याच्या समोरच कांहीं अंतरावर दुसरा एक डोंगराचा उंच सुळका वाढलेला होता. त्याच्याकडे पाहत हातापायांत बेड्या घातलेला तो कैदी पहारेकऱ्यांची कडेलोट करण्याची तयारी होईपर्यंत तटस्थ उभा राहिला होता. परंतु त्याच्या मनामध्यें मात्र विचाराची भयंकर खळबळ चाललेली होती. मरणसमयीं आपले सगळें पूर्ववृत्त मनुष्याला दिसूं लागतें असें म्हणतात, तीच अवस्था त्याची या वेळीं झालेली होती. त्याचें सगळें विचित्र चरित्र त्याच्या डोळ्यांपुढें प्रत्यक्ष उभें राहिलें. तेव्हां तो आपल्या मनाशींच म्हणाला, 'मला मरण येत आहे, ही फार आनंदाची गोष्ट आहे. जें मरण मला या संकटातून सोडविण्याकरितां येत आहे, त्याचें मी मोठ्या मित्रभावानें स्वागत करितों. परंतु हीं संकटें तरी माझ्यावर कां आलीं ? मी असें केव्हां आणि काय केलें होतें, कीं ज्यासाठीं मीं अशा ह्या यातनांना पात्र व्हावें ? मीं आजन्म धर्माचरण केलें, आणि लोकांवर उपकार करण्यासाठीं मीं आपल्या स्वतःच्या सुखावर पाणी सोडलें ! असें असतां माझ्यावर हीं संकटें विनाकारण कां यावींत ? ज्यांचा उच्चारहि करण्याची मला किळस येते, अशीं अघोर आणि अमानुष पातकें केल्याचा आरोप मजवर कां यावा ? आणि त्याबद्दल मला देहान्त शासन कां मिळावें ? असें हें कां होत आहे ? आणि हें कोण करीत आहे ?'

हा शेवटचा प्रश्न त्याच्या मनामध्यें उद्भवत आहे, तोंच त्या कड्याच्या समोरच्या सुळक्यावर पूर्वी त्याला अनेक वेळां दिसलेली ती त्या कर्माधिकाऱ्याची आकृति दिसूं लागली. ती आकृति पूर्वी जेव्हां दिसे, तेव्हां ती सामान्य पुरुषाच्या आकाराची असे. या वेळींहि प्रथमतः ती तेवढीच दिसली; पण पुढें हळूहळू ती वाढूं लागली. ती इतकी मोठी वाढली कीं, तिचे पाय त्या पहाडावर टेकलेले, तर तिचें मस्तक थेट आकाशापर्यंत पोंहोंचलेलें ! अशी ती भव्य, प्रचंड आणि विराट् स्वरूपी कर्माधिकाऱ्याची आकृति पाहून तो अगदीं विस्मित आणि क्रुद्ध झाला, व त्याच्याकडे पाहून म्हणाला, "अरे कर्माधिकाऱ्या, या वेळेसहि तूं येथें आहेसच ! जेथें तेथें तूं माझी पाठ सोडीत नाहींस, असा तूं आहेस तरी कोण ? जी जी माझी संकटाची वेळ, त्या त्या वेळीं माझ्या वैऱ्याप्रमाणें मला चिडविण्या-

करितां नेमका तूं माझ्यापुढें येऊन उभा राहतोस, याचा अर्थ तरी काय ?" यावर त्या कर्माधिकाऱ्याच्या त्या आकृतीनें असें उत्तर दिल्याचा भास झाला—" माझें नांव कर्माधिकारी, म्हणून मीं तुला पूर्वी सांगितलेंच आहे. ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें त्या त्या प्राण्याला फळ देण्याचा अधिकार माझ्याकडे सोंपविण्यांत आलेला आहे! मी तुझें कर्म आहें! तसेंच तो उपाध्या, तो तुझा दत्तक बाप, ती तुझी आई, ती तुझी बायको, तो तुझा नवीन भाऊ, हीं सगळीं अंशतः अंशतः तुझ्या कर्मांचीं फळें आहेत! ज्यांच्यापासून जसजसें सुखःदुख प्राप्त व्हावयाचें असतें, तसतसे कर्मानुसार योगायोग जुळून येत असतात! तेव्हां हें सारें तुझेंच कर्म आहे, आणि त्या कर्मांचीं फळें तुला भोगिलीं पाहिजेत!"

**प्रश्नः**—पण अशीं भयंकर फळें भोगण्याला मीं अशीं भयंकर कर्में तरी काय केलीं होतीं ? मीं कोणाच्या द्रव्याचा अपहार केला होता, कीं ज्यासाठीं इतकीं भुतें माझ्या अंगावर चवताळून यावींत ? आणि मीं कोणाचा प्राणघात केला होता, कीं ज्यासाठीं मला ही कडेलोटाची शिक्षा प्राप्त व्हावी ?

**उत्तरः**—या यातना प्राप्त होण्यासारखींच कृत्यें तुझ्या हातून जन्मान्तरीं झालेलीं आहेत!

**प्रश्नः**—हें मीं कशावरून समजावें ? माझ्या इहजन्मीच्या आचरणावरून आणि मनःप्रवृत्तीवरून अशीं कृत्यें माझ्या हातून पूर्वीं झालीं असतील असें मला वाटत नाहीं. आतां जर माझ्या हातून पूर्वजन्मीं अशीं घोर पातकें झालेलीं असतीलच, आणि या जन्मीं मला जर त्यांबद्दल शासन द्यावयाचें असेल, तर मला त्या माझ्या पूर्व पातकांबद्दल या वेळीं तरी निदान स्मृति करून द्यावयास नको काय ? अगदीं अतिशय अन्यायी न्यायाधीश असला तरी देखील, 'तूं अमुक ठिकाणीं, अमुक वेळीं, अमुक अन्याय केलास, म्हणून त्याबद्दल मी तुला ही शिक्षा देतों'; असें तो सांगतो आणि असें असून परमेश्वरासारख्या न्यायी राजाच्या राज्यकारभारामध्यें इतकी अंदाधुंदी असावी ? गुन्हेगाराला शिक्षा मात्र चोपून मिळावी, पण गुन्हा काय तो मात्र कोणीहि त्याला सांगूं नये, सर्वांनीं कानांवर हात ठेवावे, आणि मूग गिळून बसावें, आणि शिक्षा देणाराचें मोफत वकीलपत्र घेऊन कोणी वकिली करूं लागलाच, तर " तूं शिव्या दिलेल्या नसल्यास

तर तुझ्या बापानें दिलेल्या असतील! कारण, एरवीं न्यायी लांडगा तुला खाईल कसा?" या लांडग्याच्या गोष्टीप्रमाणें 'इहजन्मीं' हातून पातक घडलें नसलें, तर तें पूर्वजन्मीं घडलें असलें पाहिजे, अशा प्रकारचे आनुमानिक सिद्धान्त त्यानें ठोकून द्यावेत, हें आश्चर्य नव्हे काय? तसेंच, पूर्वजन्मीं मीं कांहीं घोर पातक केले, असें क्षणभर कबूल केलें, तरी त्या वेळीं तरी मला तसें करण्याची बुद्धि कां झाली आणि सत्कर्म करण्याचीच बुद्धि मला कां झाली नाहीं? 'त्याच्या पूर्वींच्या कर्मांचें तें फळ होय', असें तूं म्हणशील, तर तें पूर्वींचें कर्म तरी माझ्या हातून कां घडलें? ही अशी कारणपरंपरा तुम्ही मागें कोठपर्यंत ढकलीत नेणार? आदिकारणाच्या परंपरा अज्ञेय किंवा दुर्ज्ञेय अशा ढगांच्या आड दडवून ठेवून पुढील परिणामांबद्दल मात्र गरीब बिचाऱ्या जीवकोटींतील प्राण्यांना जबाबदार धरून त्यांच्यावर नाहक जबर शिक्षेची अंमलबजावणी करावी, आणि अशा रीतीनें त्यांचीं तोंडें दाबून धरून त्यांना बुक्यांनीं यथास्थित मार द्यावा, ही कोणती नीति आहे हें मला समजत नाहीं. हे कर्माधिकाऱ्या, या माझ्या शंकेचें तूं समाधान करशील, तर "मी ही कडेलोटाचीच शिक्षा काय, पण याच्यापेक्षां तुझ्या कर्माच्या शस्त्रागारांत सहस्रपट जास्त भयंकर शिक्षा असल्या, तरीहि त्या मी मोठ्या आनंदानें सोशीन!"

**उत्तर:**—नाहीं! या शंकेचें समाधान माझ्यापाशीं नाहीं! मला एवढेंच माहीत आहे, कीं मनुष्याला सुख मिळतें त्या वेळेला हें माझ्या कोणत्या जन्मीच्या कर्मांचें फळ आहे, याच्या स्मरणाची अपेक्षा बाळगण्याला तो कधीं थांबत नाहीं, तर दुःखाच्या वेळींच त्यानें हे आक्षेप कां काढावे?

असें म्हणून ती त्या कर्माधिकाऱ्याची आकृति वातावरणामध्यें वितळून नाहींशी झाली! तें पाहून व त्याचे ते शेवटचे सुयांसारखे टोंचणारे शब्द ऐकून "निष्ठुर! निष्ठुर!!" असे उद्गार त्याच्या तोंडून निघाले. हे उद्गार निघत आहेत, तों पहारेवाल्यांची सर्व तयारी झाली. त्याचे डोळे बांधले गेले. तुटलेल्या कड्याच्या कांठावर त्याला नेऊन उभे करण्यांत आलें. त्यानें 'राम– राम' म्हणून मोठ्यानें देवाचें नांव घेतलें आणि त्याला त्या क्षणीं कड्याच्या खालीं ढकलून देण्यांत आलें!



# कलाविकास : : १५

लखूनें नेमका तोच धडा काढला आणि वाचावयास सुरवात केली. "पक्ष्यांचीं घरटीं"! त्या वेळीं त्याच्या वयांत असताना मला त्या धड्यांतील स्वारस्य कळत नसे. कलेकरितां कला या तत्त्वाप्रमाणेंच मी तो धडा वाचावा म्हणूनच वाचीत असें. पण तीच आतां त्यांत किती अवीट गोडी भरली आहे!! वाचतां क्षणींच एक निराळें वातावरण डोळ्यांसमोर उभें राहतें--पांखरांची सृष्टि!!

"आपल्या मादीची मर्जी संभाळण्याकरितां नर काय वाटेल ती खटपट करील. लोंकरीचा एकादा तुकडा मिळविण्याकरितां मेंढ्याच्या मागोमाग जाईल. कोंबडयाच्या एकाद्या खुराडयाच्या आसपास हिंडून पंखें गोळा करील; व प्रसंगविशेषीं एकाद्या घरांत शिरून त्यांतूनहि लोंकर, रेशीम, कापूस वगैरेवर झांप मारून भुर्रकन् उडून जाण्यास कमी करणार नाहीं...... "

"......याप्रमाणें सृष्टीनें अशीं हत्यारें दिलीं असूनहि केवळ अपत्य-प्रेमाखातर विलक्षण मेहनत करून व कल्पकता दाखवून पक्षी आपलीं सुंदर घरटीं तयार करितात."

लखूनें धडा वाचून संपविला. किती काव्यमय जीवन असतें त्यांचें! आपल्या चिमकुल्या चोंचीनें पक्षी मऊ मऊ, इवले इवले अंकुर आणून देतो आणि पक्षीण घरटें तयार करिते! सर्व नरम, गरम वस्तु ती एका कोंपऱ्यांत जमविते. आपल्या लुसलुशीत, पिसापिसांच्या, गुबगुबीत पोटानें त्या साऱ्या दाबून दाबून नीट बसविते. पंख पसरून एकदां अंडीं घातल्यावर किती जपते ती त्यांना!!

सांज पडल्यावर नर आणि मादी अंडीं पंखाखालीं घालून सुखानें चिंव-चिंवत झोपीं जातात आणि पहांटेच्या मंद वाऱ्यावर भुर्रकन् उडून जातात. किती सुंदर! स्वतःच्या अपत्यांकरितां आपली सगळी कलाकुसर खर्च करायची!! त्या कलेंतच त्यांचें जीवन विकास पावतें! आणि या जीवनांतच त्यांचा कलाविकास खर्च होतो!

मीं खोलीच्या खिडकींतून सहज बाहेर पाहिलें. एका मोठ्या पिंपळावर

एक घरटें होतें. तिथून एक कावळा नुकताच उडून गेल्यामुळें तें कावळ्याचें होतें याबद्दल माझ्या मनांत संशय राहिला नाहीं. कावळ्यासारखा अभद्र, कर्कश पक्षी; लोक त्याचा विटाळ मानतात. त्याचा कर्कश आवाज ऐकून कुणालाहि कसेंसेंच वाटतें. पण त्यालाहि त्या जीवनाची आवश्यकता असते अं! तोहि आपल्या मादीला काटक्या कुटक्या आणून देतो तर! आणि त्याची मादीहि पिलांकरितां कलाकुसर खर्च करून घरटें तयार करते तर--

"कुऽहू"--माझी लेखणी जागच्या जागीं थबकली. माझ्या चित्त-वृत्ति प्रफुल्लित झाल्या. कोकिळेचा स्वर तो! स्निग्ध, मधुर, मंजुळ!--किती वर्णन करायचें? आणि प्रयत्न करूनहि तें साधेल का? हृदयाच्या आंतून--आंतून निघालेला आलाप तो!

मी इकडे तिकडे पाहूं लागलों, "कूऽहू"! पुन्हा स्वर ऐकूं आला. मी खिडकीजवळ गेलों. पूर्वेचें कोंवळें ऊन झाडांच्या शेंड्यांवर सोनेरी रंग फाशीत होतें. मधूनच एकादी मैना चिवचिवत असे. पांखरें घरट्यांबाहेर उडून गेल्यामुळें फारशी किलबिल ऐकूंच येत नव्हती. फक्त एकच आवाज--"कूऽहू"!

त्याच चिंचेच्या झाडांत ती दडलेली होती. पुनः एकदां तिनें साद घातली, नंतर पंखांची फडफड. ती दुसऱ्या झाडावर बसली. तिची चंचल दृष्टि साऱ्या बाजूंना भिरभिरत होती. तिच्या हृदयांतून सकंप पडसाद उठत होते.

तिथून उडाली ती. अगदीं त्याच पिंपळावर आणि त्याच घरट्या-जवळ बसली.-- "अं!" मी संशयांत पडलों. तें घरटें कावळ्याचेंच ना? मी आणखी जवळ गेलों.

तिचे ते तपकिरी छटा असलेले पंख; आणि चोंच--बाकी कावळ्यांत नि तिच्यांत फरक नव्हताच. ती गुपचुप त्या घरट्यांत शिरली. माझी उत्कंठा वाढली. दुसऱ्या झाडावर चढून मी पाहूं लागलों. तिनें आपले पंख पसरविले होते. ती दबून बसली होती--

--सभोंवार पाहत तिनें अंड्यांवर पाचोळा झांकला आणि पंख फड-फड करीत ती उडून गेली. तिच्या स्वरांत आतां कंप नव्हता. सभोंवार पाहण्याचीहि तिला गरज भासत नव्हतेंसें दिसलें. "कुहु कुहु कुहु कूऽऽहू"

--आंतून-आंतून तिनें आलाप काढला-- तिच्या हृदयांतील कोणत्या भावाचा प्रतिध्वनि असेल तो ?--

संध्याकाळीं थकून भागून कावळ्याची मादी येईल. भोळी बिचारी. तिला कळणारहि नाहीं काय झालें तें. मायेनें तीं सारीं अंडीं पंखाखालीं झांकून घेईल आणि तशीच झोपीं जाईल.

पुरेशीं उबवून झाल्यावर त्या अंडयांतून गीद बाहेर येतील. त्यांच्या त्या चिमकुल्या चोचींतून दिसणारा लाल गाभा--त्यांचा इवला इवला आकार--त्यांचा नाजुक कलरव--घरट्याबाहेर हळूच डोकावून भीतीनें आंत दडतांना त्यांची उडालेली तारांबळ--संध्याकाळीं मादीच्या पोटां-पोटांत घुसून निजण्याकरितां त्यांची चाललेली स्पर्धा--

--आणि एकादे दिवशीं त्यांतून कोकिळेचें प्रतीक उडून जाईल! आपल्याला कुणी वाढविलें याचा त्याला विसर पडेल व सूर्यानें सोनेरी रंग फासलेल्या झाडांत लपून तें आवाज काढील--" कूऽऽहू "

खरंच ! किती गोड असतो आलाप तो ! किती सुख वाटतें आपल्या-ला ! ! तीच खरी कला--पण तिचा विकास कोणता ? विलास कोणता ? पण असे प्रश्न उपस्थित करणें म्हणजे अरसिकपणा-! !

'कला' 'कला' 'कला' म्हणत कोकिलेनें रोजरोज या झाडा-वरून त्या झाडावर उडावें--भोगतां येईल तेवढी चैन भोगावी व बिचाऱ्या कावळीनें लोकांनीं तिरस्कारानें चिडून मारलेले दगड चुकवीत चुकवीत पंख दुखवून दुखवून, दुरून दुरून आणलेला चारा तिच्या पिलांच्या लाल कोंवळ्या चोंचींत मायेनें घालावा--आणि त्याच पांखरानें पुनः मोठें झाल्यावर रात्रंदिवस मौज मारीत स्वतःच्या कलेचें विकसन करावें ! ! !

**जीवन ! कला ! ! विकास ! ! !**

--यांचा परस्परांशीं कांहींच संबंध नसेल का ?

--कला-विकास ! कशाला म्हणतात कला-विकास ? ?



# कलावंताचें हृदय : : १६

" देखोजी " असें म्हणून इनायत हुसेनखांसाहेबांनीं आपल्या हातांतील साप्ताहिकाचा अंक रंगनाथबुवांच्या पुढे उघडला आणि त्यांतील दोनतीन पानें उलटून एका पानाकडे बोट दाखवलें. जाड काळ्या ओळींत 'गानसम्राट् शेखर यांची गायनकला' असा पानभर मथळा त्या पानावर होता, आणि बाजूच्याच पानावर एका कोपऱ्यांत एका रुबाबदार तरुणाचा ऐटबाज फोटो छापलेला होता.

रंगनाथबुवांनीं त्या फोटोकडे एकदां पाहिलें, मजकुरावर दृष्टि फिरविल्यासारखी केली, आणि बैठकीच्या जाजमावर तो अंक ठेवून देऊन समोर बसलेल्या विद्यार्थ्याला ते जोगियाची सुरावट पुन्हा सांगूं लागले.

" क्यौं ? " खांसाहेबांनीं विचारलें, " वाचत नाहीं आपण हा मजकूर ? ये आपके शागीर्दकी शहामत देखिये."

" आनंद आहे मला त्यांत," बुवा हंसून उद्गारले, " माझाच शिष्या तो;".पण त्यांच्या स्वरांत विषण्णपणाची झांक मारत होती. बुवांना हा विषय अप्रिय आहे, हें माहीत असूनहि मुद्दाम त्यांना खिजविण्यासाठीं खांसाहेबांनीं संभाषण पुढें चालविलें. आपल्या मुसलमानी मिश्र मराठींत ते म्हणाले,

" बुवाजी, ये आपका शागीर्द है, ये तो बात ठीक है. लेकिन् ये आगलकी बात. आतां नाहीं. आतां तुम्ही त्याला शागीर्द म्हटला तर सब लोक तुमची छी थू करतील. हें वाचलंत काय ? देख लिये ये लेखनीका ××× क्या लिख रहा है."

असें म्हणून त्यांनीं जाजमावरचा अंक उचलला आणि गानसम्राट् शेखर यांच्या मुलाखतींतील एक प्यारा ते वाचूं लागले—

' " आपली ही अपूर्व गायनकला आपण कोणत्या वस्तादजींकडून संपादन केलीत ? " आम्हीं शेखरांना प्रश्न केला. वास्तविक आम्हीं असा प्रश्न विचारणें योग्य नव्हतें. कारण ज्या गायकानें आपल्या अद्भुत कंठमाधुर्यानें आणि तयारीच्या तानबाजीनें हिंदुस्थानांतील सर्व नामांकित गायकांना अल्पावधींतच नामोहरम केलें, पूर्वजांच्या लौकिकावर जगणाऱ्या पिढीजात

गवयांना ज्याच्यासमोर मैफलींत आपलें कलाशून्य गायन गाण्याची शरम वाटते, अशा गायकाचा गुरु कोण आहे हें जाणण्यांत शेखरांचा विशेष गौरव नसून त्यांचें गुरुपण लाविलेल्या गवयाचाच अधिक गौरव होता. तथापि कोहिनूरला जन्म देणारी खाण कोणती, हें जाणण्याचें कुतूहल सामान्य जनांना असतेंच.

आमचा प्रश्न ऐकतांच शेखरांच्या विस्तीर्ण भालप्रदेशावर एक बारीकशी आठी चमकली; पण विनयाच्या स्वरांत ते म्हणाले, " माझी सर्व विद्या मीं स्वतःच संपादन केली आहे. कांहीं गवयांकडून प्रारंभीं मीं लहानपणीं या विद्येचें प्राथमिक शिक्षण संपादन केलें असेल तेवढाच माझा व माझ्या गुरूचा संबंध. त्यानंतर निरनिराळ्या घराण्यांच्या गवयांचें गाणें ऐकून व त्या त्या घराण्यांचें वैशिष्ट्य एकत्र करून मीं माझी गायकी वाढविली."

" रंगनाथबुवांबद्दल आणि त्यांच्या गायकीबद्दल आपल्याला काय वाटतं ? " असा प्रश्न आम्हीं विचारला. हा प्रश्न आम्हांला मुद्दामच विचारावासा वाटला. रंगनाथबुवांकडूनच शेखरांनीं आपली संपूर्ण गायनकला संपादन केली, असा सामान्य व बिन माहितगार लोकाचा समज आहे. या समजाचें निराकरण व्हावें, हाच हेतु या प्रश्नाच्या मुळाशीं होता.

" मीं आतांच सांगितलं आहे," शेखर हंसून म्हणाले, " कीं लहानपणीं कांहीं गायकांच्या शिक्षणाचं साहाय्य झालं. या अनेक गुरूंपैकीं रंगनाथबुवा हेहि एक आहेत. पण हा प्रश्न आपण मला विचारूं नये. कारण माझं गुरुपण सकारण-अकारण आपल्याकडे घेणाऱ्या जुन्या पिढीच्या गवयांचा अलीकडे बराच सुळसुळाट झाला आहे; आणि त्यांपैकीं कांहीं गवयांची मला पुरती तोंडओळखहि नाहीं."

" हो हो, तेंहि खरंच." आम्ही म्हणालों. त्याच वेळीं आम्हांला एक सुंदर उपमा सुचली. आम्हीं हंसून म्हटलें, " पौर्णिमेचा चंद्र आकाशांत एकच असतो, पण पृथ्वीवरच्या सर्वच नद्या-तलावांत त्याचं प्रतिबिंब पडतं. तेवढयावरून चंद्राचं व आपलं नातं अगदीं निकटचं व जिव्हाळयाचं आहे असं त्यांनीं समजणं हास्यास्पद ठरेल."

आमच्या उपमेवर शेखर बेहद्द खूष झाले. “ कसचं, कसचं ! ” ते विनयानें म्हणाले.

संभाषणाचा ओघ निराळया विषयाकडे वळविण्यासाठीं आम्हीं विचारलें, “ आपल्या भोजनांत कोणकोणते पदार्थ प्रामुख्यानं येतात ? कंठमाधुर्यासाठीं आपण कंठसुधावटी, तानसेन, गुटिका इत्यादि औषधांचं सेवन—” ’

“ पुरे पुरे ! ” रंगनाथबुवांनीं उद्वेगानें म्हटलें. हातांतल्या तंबोऱ्याच्या तारांवरून त्यांचीं बोटें झरझर फिरलीं. तारांतून बदसूर निघाल्याचा त्यांना भास झाला. एक खुंटी त्यांनीं किंचित् जोरानेंच पिरगळली. त्याबरोबर ताणलेली तार तुटून तिचें वेटोळें बुवांच्या मांडीवर पडलें.

बुवांची मनःस्थिति ओळखून खांसाहेब म्हणाले,

“ चढलेला तार उतरतां येतो. नाहीं तो खुंटी पिरगळून तोडून टाकतां येतो. पण चढून गेलेल्या शिष्याचा तार आप कैसे दुरस्त कर सक्ते हो ? तरी मी आपल्याला सांगत होतों, आम्हीं खानदानी गवई लोक प्रत्यक्ष पोटच्या पोरालाहि आमची सगळी विद्या देत नसतों. आपल्या शागीर्दाचा नूर काहीं निराळा दिसत होता. त्या वेळीं माझ्या इषाऱ्याची आपण हेटाळणी केलीत. त्याला आपला कलिजा लेखलात; आणि हाच आपला कलिजा आज म्हातारपणीं आपल्या काळजाचे लचके तोडीत आहे. आपलें घराणें एकच. आपले आजे गुरु तानसेनाच्या घराण्याचे शागीर्द. आणि तानसेनाच्या चुलत नातजांवयाच्या सावत्र मेहुणीचा नवरा आमच्या आजोबाचा वस्ताद. म्हणून आपल्या गायकीबद्दल मला अभिमान वाटतो— साऱ्या गवयांना अभिमान वाटतो. ह्या अभिमानाला वस्तादाच्या हयातींत त्याच्यावर मात करून त्याचा शिष्य डाग लावीत आहे. वस्तादाच्या हयातींत त्याच्यावर शागीर्दानें मात करण्याची आफत् आमच्या कोणाच्याच घराण्यांत कोणाहि वस्तादावर आली नव्हती. एका मैफलींत आपल्याहून चढी तान घेतल्याबद्दल बंदे नबाबखांसाहेबांनीं भर मैफलींत आपल्या शागीर्दाला जूतेसे मारला होता. चार दिवस आजारी पडला. नानाबुवा देवासकरांनीं अण्णाबुवांच्या डोक्यांत तंबोरा हाणला होता. शिकंदराबादकर कालेखांनीं तबल्याची हातोडी मारून शागीर्दाच्या डोक्यांतून मगज काढला होता. और बुवा, आप— ”

खांसाहेबांची टकळी आणखीहि अशीच पुढें चालू राहिली असती, व

संगीताच्या जगांतील गुरुशिष्यांच्या मारामारीचा परंपरेनें चालत आलेला इतिहास रंगनाथबुवांना ऐकावा लागला असता; पण त्यांना मध्येंच थांबवून रंगनाथबुवांनीं खिन्नपणें हंसून विचारलें, "मग आपण मला काय फर्मावतां? मीहि माझं एखादं हत्यार माझ्या शागीर्दाच्या डोक्यावर फेकून निकामी करूं?"

बुवांच्या प्रश्नांतील किंचित् थट्टेखोरपणाची लकब लक्षांत न येऊन खांसाहेब चटकन् म्हणाले,

"नहीं नहीं; ऐसा बुरा सल्ला मै आपकू कधींहि देणार नाहीं. ते दिवस गेले. तसं केलं तर पोलिस आमचा गळा पकडतील आणि त्यापेक्षांहि पेपरवाले सैतान, आम्हांला स्वस्थ झोप लागूं देणार नाहींत. आपके शागीर्दको पेपर में 'चॅलेंज्' देदो."

आव्हान-प्रतिआव्हानाची आणि त्यांतहि शेखरसारख्या आपल्या अपत्यसदृश शिष्याला आव्हान देण्याची कल्पनाच बुवांना असह्य वाटली. तिरस्कारव्यंजक स्वरांत ते उद्गारले,

"खांसाहेब, माझ्या उभ्या हयातींत मीं कुणाशीं स्पर्धा केली नाहीं. कुणाचा हेवादावा केला नाहीं. ज्या ज्या ठिकाणीं गुण दिसला, त्या त्या ठिकाणीं मुंगळ्यासारखा त्याला चिकटून माझी कला वाढवली. आणि परिश्रमानं मिळविलेली ही कला माझ्या आवडत्या शागीर्दाला निर्हेतुकपणं दान दिली. शेखर आज माझ्यावर उलटला. त्यानं माझी उघड उघड नाचक्की चालवली, तरी तें अविचारी तरुण रक्त आहे; तिकडे आपण दुर्लक्षच केलं पाहिजे."

"नहीं नहीं." खांसाहेब आवेशानें म्हणाले, "आपला अपमान चार-चौघां मंडळींत राहिला असता तर आम्हीं विशेष फिकीर केली नसती. आपल्याला आम्ही ओळखतों आणि आपल्या शिष्यालाहि ओळखतों. पण आजकाल छन् छन् नाद करणाऱ्या रुपयांचीच मोहिनी लोकांवर अधिक पडते. सोन्याचा आमच्याकडे दुष्काळ आहे; आणि सोन्याच्या मोहरेची पारख करणारे आमच्यासारखे दर्दी फार थोडे हयात आहेत. आपल्या शिष्याला या पेपरवाल्यानें आज डोक्यावर घेतला आहे. रेकॉर्डीतून घरीं-दारीं त्याचें गाणें घुमत आहे. आणि त्या प्रसिद्धीच्या आणि पैशाच्या जोरावर आपलाच काय पण आम्हां सर्व पिढीजाद गवयांचा अपमान हा

××× करीत आहे. आम्हां लोकांबद्दल, आमच्या कलेबद्दल त्यामुळें लोकां-मध्यें भाजलेल्या अनादराचें प्रमाण वाढूं लागलें आहे. बुवाजी, हा वक्त मोठा बांका आहे. या वेळीं आमची लाज आपल्या हातीं आहे! कसेंहि करून एकदां भर मैफलींत आपण आपल्या शागीर्दाचा चारचौघां पेपर-वाल्यांसमोर नक्षा उतरल्याशिवाय आम्हां मंडळींचें खरें महत्त्व लोकांना समजणार नाहीं. बुवाजी, ही बात आपल्या मान-अपमानाची नसून आमच्याहि मान-अपमानाची आहे. आपला अपमान तो आमचाहि अपमान. आमचा अपमान आप असाच पाहणार काय?"

खांसाहेबांचें तर्कशास्त्र मोठें विलक्षण होतें. त्यांच्या मिठास भाषणाची जादूहि तशीच विलक्षण होती. शिष्याच्या द्रोहामुळें दुखावलेल्या बुवांच्या साध्या, सरळ व कोंवळ्या मनाची पकड त्यांच्या युक्तिवादानें चांगलीच घेतली. मनुष्याचें मन स्तुतीपुढें नेहमींच कमकुवत ठरतें. खांसाहेबांनीं केलेल्या स्तुतीचाहि थोडासा परिणाम अर्थातच बुवांच्या मनावर झाल्यावांचून राहिला नाहीं. गुरुद्रोही शिष्याची पुरी खोड मोडण्याचें सामर्थ्य आपल्या अंगीं असतां एखाद्या दुबळ्याप्रमाणें आपण त्याची उपेक्षा करीत राहून व्यवसायबंधूंच्या आणि जनतेच्या अनादराला कां पात्र व्हावें, असा प्रश्न त्यांच्या मनांत उद्भवला. या प्रश्नाचें उत्तर त्यांना सुचेना. त्या गोंधळलेल्या मनःस्थितींतच ते म्हणाले,

"खांसाहेब, आपला आग्रहच असेल तर मी आपल्या हुकमाबाहेर नाहीं. आपल्याला योग्य वाटेल त्या रीतीनं आमच्या मुलाखतीचा, आमच्या मुकाबल्याचा योग जुळवून आणा."

*　　*　　*　　*

रंगनाथबुवांसारख्या नामांकित गवयाचें गाणें कैक वर्षांनीं ऐकावयास मिळण्याचा योग आल्यामुळें गायनप्रेमी लोकांना तो दिवस सणासारखा वाटत होता. नवीनच निघालेल्या ललितकलोत्तेजक मंडळाच्या पहिल्या वाढदिवसानिमित्त हे गाणें होणार होतें. संगीतशार्दूल, स्वरमार्तंड इत्यादि अनेक पदव्या मिळालेल्या शेखरांचेंहि गाणें त्याच बैठकींत ठरल्यामुळें मंडळाच्या चालकांकडून प्रवेशपास मिळविण्यासाठीं अनेक वशिल्याचीं तट्टें शर्यतीच्या घोड्यासारखीं दौडूं लागलीं होतीं. सिनेमा, नाटकें व भविष्यें यांच्यावर गुजराण करणाऱ्या तडाखेबंद पत्रांनीं मुंबईत झडणाऱ्या या

संगीताच्या मेजवानीवर सतत तीन आठवडे अग्रलेख लिहून फ्री-पासाच्याद्वारें मिळणारें आमंत्रण निश्चित केलें होतें. या उभय गायकांच्या डौलाची तुलना एका लेखकानें केली होती; 'अमरनाथ हातांत बॅट घेऊन उतरले. देवधर, तुम्हीं पुणें गांठा.' असा पोटमथळा देऊन त्यानें या तुलनेत शेखरांची भरपूर स्तुति केली होती. सूर टांगते ठेवण्याच्या शेखरांच्या मुलायम लकवी-मुळें आणि तीनतीन चारचार आवर्तनांच्या बोलताना घेऊन गिरेबाज कबुतराप्रमाणें समेवर अचूक येऊन पडण्याच्या शेखरांच्या विलक्षण कौशल्या-मुळे या जलशांत रंगनाथबुवांची गायकी निष्प्रभ ठरणार, असा निष्कर्षहि काढून तो मोकळा झाला होता.

श्रेष्ठ प्रतींच्या गवयांनीं आणि लोकसमुदायानें खच्चून भरलेल्या मंडळाच्या दिवाणखान्यांत जलसा सुरू झाला.

टाळ्यांच्या कडकडाटांत शेखर बैठकीवर जाऊन बसला. गायनाला प्रारंभ होण्यापूर्वीं गुरूच्या पायांचें वंदन करण्याचा शिरस्ता मोडून त्यानें गायनाला सुरवात केली. इतर प्रेक्षकांच्या लक्षांत हा अपमान आला नाहीं, परंतु रंगनाथबुवांच्या व इतर गायकांच्या मनांत हा अपमान शल्यासारखा बोंचला. शेखरनें ऑर्गनच्या मंजुळ साथींत आपला आवाज मिळवून एक लोकप्रिय चीज आळविण्यास प्रारंभ केला.

त्याच्या गायनांत रंग भरूं लागला. आपल्या गुरूला आपल्या तयारीचें आणि कंठाचें संपूर्ण ऐश्वर्य दाखवून चकित करण्याच्या उद्देशानें शेखर गात होता. त्या ईर्षेनें त्याच्या गाण्यांत चैतन्य निर्माण केलें. आलाप, गोड हरकती, दाणेदार ताना यांचा वर्षाव त्यानें सुरू केला. त्याच्या आलापांचे निनाद मधुर सुगंधाप्रमाणें त्या जागेंत दरवळूं लागले. रंगनाथ-बुवा एकाग्रतेनें आपल्या शिष्याची करामत पाहत होते—ऐकत होते. त्यांच्या कलावंत अंतःकरणावर त्या गायनाचा परिणाम होऊं लागला. रंग-नाथबुवांच्या हातखंडा असलेल्या चिजा त्यांना व इतर गवयांना दिपवून टाकण्यासाठीं शेखर मुद्दाम गात होता. त्या चिजा ऐकतांना आपण तारुण्याच्या ऐन उमेदींत प्रवेश करून शेखराच्याच मुखानें आपल्या त्या आवडत्या चिजा पुन्हा आळवीत आहोंत, असा बुवांना भास झाला. शेखराचें गाणें संपलें. साथ बंद झाली. बुवांनीं मोठ्या अभिमानानें आपल्या शिष्याकडे पाहिलें. शेखराला जवळ बोलावून त्याची पाठ थोपटून या

अभिमानाला अवसर करून द्यावा असें त्यांना वाटलें. त्यांनीं शेखराकडे पाहिलें. "वाहवा, खाशी"च्या वर्षावांत उठून बाजूला बसण्यासाठीं जात असतां त्याची नजर बुवांच्या नजरेशीं भिडली. त्या नजरेंत उपहासाची विषारी चमक बुवांना आढळून आली. विजयानंदाचें पाणी तिला चढलें होतें. बुवांचा अभिमान तिनें दुखावला. आपल्या अपमानाची त्यांना आठवण झाली. त्यांनीं संतापानें अधरोष्ठ दाबला.

तंबोरा घेऊन बुवा बैठकीवर येऊन बसले. शेखराचें गाणें श्रोतृ-वृंदाच्या परिचयाचें होतें. पण रंगनाथबुवांच्या गायनाचा लौकिक त्यांना ऐतिहासिक वाटत होता; त्यामुळें श्रोत्यांच्या उत्सुकतेचें प्रमाणहि वाढलें. बुवांनीं बैठकीवर येऊन बसतांच रसिकांना अभिवादन केलें. आतुर श्रोत्यां-नींहि टाळ्यांचा कडकडाट करून त्यांच्याबद्दल आपला आदर प्रकट केला.

बुवा गाऊं लागले; खांसाहेबांनीं त्यांच्याकडे एक अर्थपूर्वक कटाक्ष टाकला. 'आजच्या प्रसंगाचा उद्देश लक्षांत असूं द्या' असेंच त्यांनीं आपल्या कटाक्षानें बुवांना सुचविलें. थोडा वेळ विलंपत करून शेखरानें गायिलेल्या रागांतीलच एक चीज त्यांनीं सुरू केली. निरनिराळ्या तऱ्हेनें ही चीज ते आळवूं लागले; त्यांची विद्वत्ता तींत दिसत होती. त्या चिजेचा रसपरिपोष त्यांच्या आलापांनीं होऊं लागला; पण त्यांत शेखराचें कंठमाधुर्य नव्हतें. अनेक अवघड ताना त्यांनीं आपल्या गळ्यांतून काढल्या; पण शेखराच्या तानांतील सफाई त्यांत नव्हती. अंतरिक्षांत दूरदूर भ्रमण करीत असतांनाच आपलें भक्ष्य ओळखून त्याच्यावर झडप घालणाऱ्या घारीचा वेग व कौशल्य समेवर येतांना त्यांनीं दाखविलें; पण या कौशल्यांतील शेखराचा ढंगदारपणा व डौल त्या करामतीमध्यें नव्हता. पाऊण तासपर्यंत तो राग बुवांनीं संपूर्णपणें विस्तारासह गायिला, आणि तीनदां समेवर येऊन चीज संपविली.

टाळ्या वाजल्या. पण त्या अगदीं क्षीणपणेंच! बुवांनीं आपल्या शिष्याकडे पाहिलें. उपहासाची तीव्र चमक त्याच्या डोळ्यांत घोटाळत होती. श्रोतृसमुदायावरून त्यांनीं नजर फिरविली. जांभया देऊन चुटक्या वाजविणाऱ्या रसिकांचा त्यांत अधिक भरणा होता. बुवांचें मन अस्वस्थ झालें. समाधानाची जागा हुडकण्यासाठीं त्यांनीं खांसाहेबांकडे दृष्टिक्षेप टाकला. खांसाहेबांचा आधींच काळा असलेला चेहरा अधिकच काळवंडला

होता. खांसाहेबांची आणि बुवांची नजरानजर होतांच बुवांच्या नजरेंतील शोधकपणाला आपल्या नजरेनें खरें उत्तर देऊं नये, म्हणून ती नजर टाळण्यासाठीं पिंक टाकण्याच्या मिषानें खांसाहेब खिडकीकडे गेले. बुवांचें अस्वस्थ मन व्याकुळ झालें.

चालकांनीं दुसरी चीज गाण्याचा बुवांना आग्रह केला. रात्र झाल्याची सबब पुढें करून थोडी मंडळी निघून गेली; आणि मागें बसलेले लोक पुढें सरकले. 'ठुंबरी म्हणा', 'नाटकी दप म्हणा' असें कांहींजणांनीं सुचविलें. आजच्या तुलनेमध्यें आपला पराभव झाला; आपल्या यशाला आजच्या मैफलीनें काळाकुट्ट डाग लावला, ही जाणीव बुवांच्या मनाला संत्रस्त करूं लागली. हातरुमालानें त्यांनीं आपल्या विशाल कपाळावरील घर्मबिंदु पुसले.

"दुसरें कांहीं म्हणायचें नसेल तर शेवटची भैरवी होऊं द्या." चालकांनीं बुवांच्या कानाला लागून त्यांना सांगितलें.

थरथरणाऱ्या हातांनीं तंबोरा उचलून बुवा कातर स्वरांत गाऊं लागले.

**"लाज रखो दीनानाथ......जगतमें, लाज रखो दीनानाथ--"**

जोगियाच्या करुण स्वरांचें आन्दोलन सुरू झालें. बुवांच्या व्याकुळ मनःस्थितीचें कारुण्य त्या शब्दांतून पाझरूं लागलें. अत्यंत भावपूर्ण रीतीनें गायिलेल्या त्या चीजेंतील पहिल्याच ओळीचा परिणाम श्रोत्यांवर जादूसारखा झाला. त्या करुण ओळींनीं त्यांच्या अंगावर रोमांच उभे केले. एकचित्त करून ते तें गाणें ऐकूं लागले.

परंतु बुवांचें तिकडे लक्ष नव्हतें. महात्म्यांच्या चारित्र्याशींच तुलना करतां येईल, अशा हिमधवल पर्वताच्या उत्तुंग शिखरावर आरूढ झालेल्या गायकांच्या गुरूची-बुवांची लाज रक्षण करण्यासाठीं धांवून येणाऱ्या दीनानाथाची ते आळवणी करीत होते.

**"सीसपे संकट तुटे पर हय। लाज रखो दीनानाथ--"**

तंबोऱ्याच्या तारांतून निघणाऱ्या सुरांमध्यें बुवांचे स्वर मधून मधून विलीन होत होते. आपली असहाय स्थिति बुवांना कळूं लागली. ईर्षा, असूया इत्यादि क्षुद्र मनोविकारांना बळी पडलेलें त्यांचें पश्चात्तप्त हृदय शोक करूं लागलें. फुलांफळांनीं बहरलेल्या जोमदार तरुण वृक्षाबरोबर आपल्यासारख्या पिकल्या पानानें केलेली स्पर्धा कधीं तरी यशस्वी होईल

काय? आपल्या हातानें जें रोपटें मीं लावलें, खत पाणी घालून ज्या रोपट्याची मीं जोपासना व वाढ केली, त्याच रोपट्यावर आपल्या म्हाताऱ्या हातांनीं कुऱ्हाड उगारण्याचा निर्दयपणा करण्यास मी उद्युक्त झालों तर जग मला हंसल्यावांचून कसें राहील? या माझ्या राक्षसी हेतूंची सिद्धि दीनदयाळ कशी होऊं देईल? शेखराला क्षमा करण्याचा, त्याच्यावर मायेची पाखर धरण्याचा माझा अधिकार; तो दूर सारून त्याच्यावर अंगाराचा वर्षाव करण्यासाठीं मी पुढें सरसावलों. शिष्यद्रोहाचें पातक मीं केलें.

या पातकाच्या विचारानें बुवा व्याकुळ झाले. त्यांचें व्याकुळ मन पुढच्या ओळी गाऊं लागलें.

**" पासमे दौलत रैन अंधेरी और चोरनका साथ।**
**लाज रखो दीनानाथ--"**

सारी सभा तटस्थ होऊन बुवांचें गाणें ऐकत होती. त्या गाण्यांतील कारुण्यानें श्रोत्यांच्या अंतःकरणाला हात घातला. आपल्या हृदयांतील नाजुक भागावर कसले तरी जबरदस्त आघात सुरू झाले आहेत असा शेखराला भास झाला. त्याचें अपराधी मन त्याला टोंचूं लागलें. बुवांच्या स्वरांतील विव्हलतेनें त्याच्या मनांतील माणुसकी जागृत केली. आपली मान वर करून बुवांकडे पाहण्याचा त्यानें भीत भीत प्रयत्न केला; पण बुवांची दृष्टि अंतर्मुख झाली होती. गात असलेल्या चीजेशीं ते तन्मय झाले होते! त्यांच्या वृद्ध व रुबाबदार चेहऱ्यावर दिसणारा भाव पाहून शेखराच्या अंगांतून एक विलक्षण चमक उसळून गेली. बुवा गात होते—

**" गहेरी ये नदीयां। नाव पुरानी, कौन पकरत हात।**
**लाज रखो दीनानाथ--"**

त्या ओळी, ते आलाप आपलें गुरुद्रोही अंतःकरण भेदून जात आहेत असें शेखराला वाटलें. कोणाच्या अपराधक्षालनासाठीं बुवांचें क्षमाशील हृदय त्या दीनानाथाची आळवणी करीत आहे? मोठमोठ्या विद्यावंत गायकांनीं ज्यांच्या पायांशीं बसून संगीताचे धडे घ्यावे अशा बुवांसारख्या प्रेमळ, कलावंत, चारित्र्यवान् तपस्व्याच्या तपांत कोणत्या राक्षसानें विघ्न आणलें म्हणून बुवा हतबलपणें परमेश्वराची प्रार्थना करीत आहेत! बुवांच्या मुद्रेवर शेखराची नजर ठरेना. त्यानें सभोंवार नजर फिरविली. सारा

श्रोतृवृंद त्या गायनांत तन्मय झाला होता. तंबोऱ्याच्या तारेचें स्पंदन चालूं होतें. बुवांच्या वृद्ध कंठांतून येणारे कोमल कातर स्वर त्या तारांवरून सगळीकडे नाचत होते.

बुवांच्या मनाची विकलावस्था भरतीच्या पाण्यासारखी वाढूं लागली. प्रत्येक आलापाबरोबर आपला कमकुवतपणा त्यांच्या नजरेंत भरूं लागला. शेखरासारख्या बुद्धिमान शिष्याच्या स्वरूपांत आपली प्रतिकृति निर्माण करण्याचे ध्येय समोर ठेवून त्याला आपण संपूर्ण विद्यादान केलें; हें विद्यादान करतांना यत्किंचितहि अंगचोरपणा केला नाहीं; अशा स्थितींत त्याचा पाडाव करण्याची क्षुद्र बुद्धि आपल्याला कां व्हावी, आणि कोणत्या शस्त्राच्या बळावर त्याचा पाडाव करावा? संकटसमयीं उपयोगी पडेल असा एकहि अमोघ बाण आपण आपल्या भात्यांत राखून ठेवला नाहीं, ही जाणीव त्यांची असहायता वाढवूं लागली. क्रोधद्रोहादि मनोविकारांना बळी पडून उच्चारलेल्या शापवाणीचें प्रायश्चित्त आपल्या दीर्घ तपाच्या पुण्याला मुकून मोठमोठ्या महर्षींना घ्यावे लागले. शेखराचा पाडाव करण्याची अघोरी इच्छा धरून जो खटाटोप आपण केला, त्याचें प्रायश्चित्तहि आपल्या तपस्येच्या लौकिकाला मुकून आपल्याला घ्यावें लागणार, ही शंका बुवांचें हृदय पिळवटून सोडूं लागली. त्यांना चोहींकडे अंधार दिसूं लागला.

" **गेहेरी ये नदीयां । नाव पुरानी कौन पकरत हात......**"

हा चरण ते पुन्हा घोळून घोळून म्हणूं लागले. हा विलाप ऐकणें शेखराला असह्य झालें. मूर्तिमंत करुणरस त्याच्यापुढें अवतरला होता. किती भावपूर्ण हें संगीत! असा गुरु लाभण्याचें भाग्य आपल्याला प्राप्त झालें असतां, सवंग लोकप्रियतेच्या आहारीं जाऊन आणि विघ्नसंतोषी चिथावणीनें धुंद होऊन या प्रेमळ गुरुमाउलीचा आपण अपमान केला! आपल्यासारख्या अनाथ मुलाला बाळपणापासून जवळ बाळगून ज्यांनीं जगांतील तीव्र संकटांची झळ त्याला लागूं दिली नाहीं, पित्याच्या प्रेमळपणानें ज्यांनीं आपलें सर्व कोडकौतुक पुरविलें, आणि आजारीपणांत ज्यांनीं मातेच्या वात्सल्यानें आपली सेवाशुश्रूषा केली, जगांत मानानें, वैशिष्ट्यानें जगतां यावें म्हणून आपल्याजवळचें अपूर्व विद्याधन ज्यांनीं आपल्या मागें लागून आणि आग्रह कर-करून आपल्या हवालीं केलें, त्या आपल्या

गुरुदेवतेच्या उपकारांचे पांग तिच्याशीं कृतघ्नपणा करून आपण आतांपर्यंत फेडीत आलों. हजारों शेखर ज्यांच्या स्वर्गीय गायनावरून निरहंकार ओवाळून टाकावे, त्या रंगनाथबुवांसारख्या सत्त्वस्थ गुरूशीं अहंकारयुक्त स्पर्धा आपण चालवली ! या द्रोहाला, या कृतघ्नपणाला यशाचीं फळें कधीं तरी येतील काय ! पश्चात्तापानें आणि दिवाणखान्यांत सर्वत्र घुमत असलेल्या दिव्य संगीतानें शेखराचें मन पोळूं लागलें. त्याचा अभिमान वितळून जाऊं लागला. बुवा एक तान घेऊन समेवर आले. 'लाज रखो दीनानाथ' ही ओळ पुन्हा शेखराच्या कानीं पडली.

बुवांच्या हृदयवेदना थांबल्या. दीनानाथाच्या आळवणीनें त्यांच्या मनाला धीर आला.

'माझ्या हयातींत मी हें अखेरचे गाणे गात आहें;' त्यांचें मन म्हणूं लागलें. यापुढें माझी परंपरा चालविण्यासाठीं माझ्यापेक्षांहि वरचढ शिष्य मीं निर्माण केला आहे. जें ध्येय डोळ्यांसमोर ठेवून मीं परिश्रम केले तें ध्येय मला यशस्वी रीतीनें गांठतां आलें, अशी प्रचीति माझ्या लाडक्या शेखरानेंच आज मला आणून दिली. माझ्या आजच्या अपयशांतच माझें यश खरें सामावलेलें आहे—

**" याचसाठीं केला होता अट्टाहास ।**
**शेवटींचा दीस गोड व्हावा ।**
**आतां निश्चिंतीनें पावलों विसांवा ।**
**देवा दीनानाथा...........॥ "**

गाणें थांबलें. बुवांनीं हातांतील तंबोरा खालीं ठेवला. त्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. त्याच क्षणीं शेखरानें आवेशानें पुढें सरून त्यांच्या चरणांना मिठी घातली. अश्रूंच्या रूपानें शेखराच्या पश्चात्तप्त हृदयानें त्या चरणांचा आश्रय घेतला !

गुरुशिष्यांची भेट झाली. चुकलेलें वासरूं गाईला जाऊन बिलगलें. उभयतांच्या नेत्रांतून होणाऱ्या त्या पवित्र अभिषेकाने परस्परांच्या अंतःकरणांतील किल्मिष धुऊन निघालें.



# कलिकेचे अश्रु : : १७

झाडावरचें फूल तोडलें म्हणजे माझ्या मनाला एकदम धक्का बसतो. कळी यावी, सूर्योदयीं ती फुलावी, तें फुललेलें फूल पाहून आपणहि फुलून जावें, ते फूल त्याच फांदीवर विकासावें आणि त्याच फांदीवरून कालान्तरानें पाकळी पाकळी सोडून देत नाहींसें व्हावें.

असें झालें तरी मला वाईट वाटत नाहीं. पण तेंच फूल कुणी तोडून आपल्या टेबलावरच्या फुलदाणींत दुसऱ्या चार झाडांच्या पानापाचोळ्यांत गुंतवून ठेवलेले दिसलें, कीं माझ्या अंगावर शहारे येतात.

माझ्या या अरसिकपणाबद्दल माझा बाळमित्र रामभाऊ सदोदित माझी थट्टा करायचा. त्या थट्टेचें मला कांहींच वाटत नसे; पण चारचौघे जमले, कीं ही माझी खोड सर्वांच्या करमणुकीचा विषय होऊन राहायची. मला बोलण्याचा अगदीं कंटाळा. त्यामुळें कुणी कितीहि थट्टा केली तरी मी त्याच्याशीं वादविवाद करण्याचें टाळीत असें.

आणि वादविवाद तरी काय करणार ? त्याला कांहींच मुद्दा नव्हता. नुसतें मला तसें वाटत असे एवढेंच. कां वाटतें याला कारण माझ्यापाशीं नव्हतें. म्हणून कुणींहि टवाळी केली तरी मुकाट्यानें ती सहन करण्याखेरीज मीं तरी दुसरें काय करावें ?

पण कमीनें त्या दिवशीं माझी अगदीं गळचेपी केली. कमी रामभाऊंची मुलगी. मी हा असा फटिंग; ना बायको ना पोर. संसाराला विटलेला. पण लहानपणापासून कमीनें मला लळा लावला होता. बापापेक्षां कमीचें तिच्या आईवर फार प्रेम. पण त्याहूनहि तिचा ओढा माझ्याकडेच फार. एवढी चिमुरडी होती तेव्हांपासून मीं नुसते हात पुढें केले, कीं आईच्या कडेवरून माझ्याकडे धपकन् उडी घ्यायची. मागेंपुढें पाहायची नाहीं. लहानग्या कमीनें मला नुसतें वेड लावून ठेवलें होतें.

डॉक्टरीच्या धंद्यामुळें मला फुरसत अशी फारच क्वचित् मिळत असे. फुरसत मिळाली कीं रामभाऊच्या बागेंत येऊन बसायचें, हा माझा नित्याचा क्रम. माझें घर अगदीं रस्त्यावरच असल्यामुळें, आवड असूनहि एखादी लहानशी बाग तयार करणें मला शक्य नव्हतें. रामभाऊचें घर रस्त्यापासून

अगदीं दूर, म्हणूनच सभोंवार सुंदर बगीचा त्याला उठवितां आला, या गोष्टीचा मला फार हेवा वाटत असे. पण रामभाऊचा आणि माझा लहानपणापासूनचा अगदीं जिव्हाळ्याचा स्नेह असल्यामुळें त्याच्या घरीं मला केव्हांहि परकेपणा वाटला नाहीं.

मी बागेत येऊन बसलों, कीं रामभाऊचीं सर्व मुलें माझ्या सभोंवार गोळा व्हायचीं आणि हजारों प्रश्न विचारून मला भंडावून सोडायचीं. मुलांच्या भंडावण्याचा मला आनंद होत असे हें जरी खरें होतें, तरी माणसें कापायच्या धंद्याला विटून एखादा एकान्ताचा क्षण मिळण्याची ज्या वेळीं मला तळमळ असे, त्या वेळीं मात्र हे मुलांचे लाड मला दुःसह होत असत.

आज तसेंच झालें होतें. एका अत्यंत घाणेरड्या रोगाच्या केसचें एक अत्यंत घाणेरडें ऑपरेशन मला काल भर मध्यरात्रीं करावें लागलें होतें. मनाला किळस आला होता. माणसें कळून सवरून काळाच्या जबड्यांत कां जाऊन पडतात, या विचारानें मनाला उद्विग्नता आली होती. याच गृहस्थाला मीं गेल्या वर्षीं नुसत्या औषधानें बरा केला होता. त्याच वेळीं पुन्हा अनीतीच्या मार्गावर पाऊल न टाकण्याबद्दल त्याजकडून शपथ घेवविली होती. पण त्या चांडाळानें एक वर्षाच्या आंतच शपथ मोडली आणि संसाराचा सत्यानाश केला.

मनुष्यस्वभावाच्या या पाशवी वृत्तीचा विचार करीत मी सारी रात्र बिछान्यावर तळमळत पडलों होतों. झुंजुमुंजु होतांच उठून रामभाऊच्या बागेत येऊन बसलों. झाडावरच्या कळ्या उमलल्या नव्हत्या. सूर्योदयाची वाट पाहत बुरखा घेऊन गुपचुप बसलेल्या त्या कलिकांकडे पाहतांना माझें मन प्रसन्न झालें. दंवाचा बारीकसा शिटकाव अजूनहि होत होता. नुकतें कुठें तांबडें फुटूं लागलें होतें. क्षितिजावर वेगवेगळ्या रंगांचे पडदे हळुहळू बदलत असलेले दिसत होते. त्या रमणीय देखाव्यानें बेभान होऊन मी आपल्याशींच हंसत होतों, हें कमीनें मला विचारलें म्हणूनच कळलें. ती म्हणाली, "विसुकाका, हंसतां आहां कां आपल्याशींच ?"

पोरीला समजेल असें काय उत्तर द्यावें याचा निर्धार न ठरल्यामुळें मीं तिला म्हटलें, "पण तूं आज एवढ्या पहांटे बागेंत कां ?"

कमी म्हणाली, "तुम्हीच वाटतं तेवढे लवकर उठणारे ? आम्हीं पहांटे

उठूंच नये वाटतं ! ” मला मोठ्यानें हसूं कोसळलें, तें पाहून ती म्हणाली, “ हंसलं म्हणजे झालं नाहीं कांहीं. आधीं उत्तर द्या.”

आधीं माझ्या प्रश्नाचें उत्तर देण्याचा मी तिला आग्रह करूं लागलों. ती कसली छट मुलगी ! “ कां हंसत होतां तें आधीं सांगा.” म्हणून तिनें माझा अगदीं पाठपुरावा केला. मीं तिला म्हटलं, “ ह्या कळ्या अझून उमलल्या नाहींत, म्हणून हंसत होतों.”

कमी म्हणाली, “ आतां काय सांगावं तुम्हांला काका ! एवढे मोठे डॉक्टर झालांत, पण सूर्योदय झाल्याशिवाय कळ्या उमलत नाहींत एवढंसुद्धां कळत नाहीं ना ! थांबा—”

ती ‘थांबा’ कां म्हणाली आणि तशीच धांवत कां गेली याचा मी विचार करूं लागलों, तोंच एक लहानशी गुलाबाची कळी तोडून आणून तिनें माझ्यापुढें केली. तोडलेली कळी पाहतांच माझ्या अंगावर शहारे आले.

कमी म्हणाली, “ असे दचकलांत कां ? कळी तोडली म्हणून ? मला माहीत आहे तुमची खोड, पण आज कांहीं मी तुमचं ऐकणार नाहीं. आज ही कळी घेऊन तुमच्या कोटाच्या बटणांत ठेवणार.”

माझ्या संमतीची वाट न पाहतां तिनें ती कळी माझ्या कोटाच्या बटणांत अडकवूनसुद्धां टाकली. मीं नको म्हणण्यासाठीं हात पुढें केला, तों पाण्याचे दोनच बिंदु माझ्या हातावर पडले. मीं कमीच्या तोंडाकडे पाहिले. ती गालांतल्या गालांत हंसत होती. कलिकेवरचे हे दंवाचे बिंदु काय ? खिशांतला रेशमी रुमाल काढून मीं ते हळूच टिपून घेतले.

मीं कमीला विचारलें, “ आज ऐकणार नाहीं म्हणालीस त्याचा अर्थ काय ? ”

कमी हंसत हंसत म्हणाली, “ आणि हे म्हणे बडे डॉक्टर ! ”

मला या तिच्या उत्तरानें कांहींच बोध झाला नाहीं. मी वेड्यासारखा तिच्या तोंडाकडे पाहत राहिलों.

मीं म्हटलें, “ कमे, म्हाताऱ्याची अशी थट्टा करतेस हें बरं नव्हे.”

कमी म्हणाली “ थट्टा म्हाताऱ्यांची करायची नाहीं तर करायची तरी कुणाची ? चला घरांत. चहा तयार झाला असेल-- कीं इथंच आणून देऊं चहा ? ”

आतां बहुतेक फटफटीत उजाडलें होतें. रामभाऊ ब्रशनें दांत घाशीत माझ्यासमोर येऊन केव्हां उभे राहिले तें माझ्या लक्षांतसुद्धां आलें नाहीं. ते म्हणाले, " काय डॉक्टर, भल्या पहांटे इथं काय करतो आहेस ? आणि कमे, यांना सांगितलीस का कालची हकीकत ? "

" अं: ! मी नाहीं जा." असें म्हणून कमी पळत निघून गेली. 'आज ऐकणार नाही', 'कालची हकीकत' हें काय गौडबंगाल आहे याचा मी विचार करूं लागलों. रामभाऊ माझा सहाध्यायी. आम्ही दोघेहि समवयस्क. एवढें वय झालें तरी एकमेकांना अरे-तुरेच म्हणत असूं, रामभाऊ म्हणाला, " पाहतो आहेस काय असा बावळटासारखा. थांब. तोंड धुवून येऊन तुला सांगतों सारी हकीकत."

रामभाऊ एका बाजूनें गेला आणि वहिनी दुसऱ्या बाजूनें चहाचा कप घेऊन आल्या. चहाचा कप देतांना वहिनी मला म्हणाल्या, " हें काय भावजी, तोडलेलं फूल ? "

मीं उत्तरलों, " तुमच्या दुष्ट पोरीची ही खट्याळी ! आज मला असाच त्रास देणार म्हणाली पोरटी."

वहिनी म्हणाली, " अगदीं खुषींत होती, नाहीं का ? "

" होय; कां ? "

" तसंच कांहीं झालं आहे. काल तिचं लग्न ठरलं ! "

" कुणाशीं ? "

" व्याहीबुवा— आपल्या जयंताशीं."

माझ्या हृदयांत चर्रर्र झालें. मी दचकून ओरडलो, " छेः-छेः, भलतंच कांहीं ! "

वहिनी बिचाऱ्या घाबरून गेल्या. त्या म्हणाल्या, " असं कां म्हणतां भावजी ? जयंत एकापरीनं तुमचा पुतण्या—तुमच्या आतेभावाचा मुलगा. दोन मित्रांच्या घरची सोयरीक जमली म्हणून तुम्हांला आनंद व्हायचा, तें असं 'भलतंच' कां म्हणतां ? "

मला उत्तर सुचेना. काय बोलूं ? जयंताशीं कमीचें लग्न ? जयंताशीं कमीचें लग्न ? काय अनर्थ हा ! कसें सांगूं ? काय बोलूं ? दोहींकडून तोंड बांधून मार. :कमी म्हणजे माझ्या जिवाचा कलिजा—जयंत तर माझा पुतण्याच. मी सैरभैर झालों.

वहिनी म्हणाल्या, " बोलत कां नाहीं ? तुमचा जयंत बॅरिस्टर झालेला. मुंबईत असतो. चांगले पैसे मिळवतो. घरदार चांगलं गडगंज आहे. नांव ठेवण्यासारखं कांहीं म्हटल्या कांहींसुद्धां नाहीं. आणि असं कां म्हणतां ? भलतंच कां म्हणतां ? "

काय उत्तर द्यावं हें मला मुळींच सुचेना. हातांत चहाचा कप घेऊन वेड्यासारखा मी वहिनींच्या तोंडाकडे पाहत राहिलों. वहिनी अगदींच भेदरून गेल्यासारख्या दिसल्या. त्या म्हणाल्या, " असं काय करतां भावजी ! काय ते स्पष्ट सांगा ना— जयंत तुम्हांला काल भेटला नाहीं का ? "

मीं कातावून म्हटलें, " पण तुमच्या अकला गेल्या होत्या कुठं ? ठराव करण्यापूर्वी मला आधीं कां नाहीं विचारलंत ? "

वहिनी म्हणाली, " कबूल—चुकलं, पण आतां तर सांगाल ना ? "

मी कपाळावर हात मारून म्हटलें, " काय सांगूं , माझं कपाळ ! त्या गाढवानं पॅरिसला गेल्या वेळीं—नाहीं, वहिनी, मला कांहीं सांगतां येत नाहीं. मी डॉक्टर आहें. माझ्या धंद्याचा बाणा मोटा बिकट आहे. दुसऱ्यांचीं रहस्यं मला सांगतां येत नाहींत."

" पण पोरीच्या बऱ्यावाईटाची तुम्हांला कांहीं चाड आहे ना ? "

" आहे म्हणूनच म्हणतों आहें, कीं हे लग्न होतां कामा नये."

" मग काय तें स्पष्ट सांगा. मला सांगायचं नसेल तर तिकडे सांगा."

" मला कांहीं सांगतां येत नाहीं. मी कुणाला कांहींहि सांगणार नाहीं. हा नात्यागोत्याचा संबंध—त्यांतून मी डॉक्टर. धंद्याचीं रहस्यं अशीं सांगूं लागलों तर उद्यां कुणी रोगी माझ्याकडे पाऊलसुद्धां टाकणार नाहीं. असेल पोरीच्या नशिबीं तसं होईल. निढळीचा लेख पुसायचं डॉक्टरच्या हातीं नाहीं. जयंताच्या बापाचं आणि माझं पूर्वीपासून वांकडं. मी कांहीं सांगूं लागलों तर बापाचा सूड मी मुलावर उगवतों आहें असंच कुणाला वाटणार. तुम्हांला वाटेल तें करा. मला विचारूं नका."

माझ्या या त्रागेखोर भाषणानें वहिनी घाबरून पुनः पुनः तेंच तेंच मला विचारूं लागल्या. बॅरिस्टर जांवई मिळतो या आनंदानें खुषींत असलेल्या त्या बिचारीला माझ्या संदिग्ध भाषणाचें जास्तीच भय वाटूं लागलें. रामभाऊ समोरून येत आहेत असें पाहून त्या म्हणाल्या, " तिकडून येणं

होत आहे, मला सांगायचं नसेल तर तिकडे सांगावं. पोरीवर तुमचा जीव आहे ना ? मग तिचं बरंवाईट झालेलं भावजी, तुम्हांला आवडेल का ? "

मी कांहींच न बोलतां चहाचा कप तिथेंच टाकून उठलों. जातां जातां रामभाऊने वहिनींना विचारल्याचे मला ऐकूं आलें, " कां ग, डॉक्टर चहा टाकून कां गेला ?" वहिनींनीं काय उत्तर दिलें ते मला ऐकूं आलें नाहीं.

मी घरीं आलों. कोट काढून ठेवीत असतां ती अर्धी उमलत असलेली गुलाबाची कळी खालीं पडली. मीं म्हटलें, " हेंच तें दुश्चिन्ह ! "

बुटाचा पाय कळीवर देण्यासाठीं वर उचलला. मनाला कसेंसेंच वाटलें म्हणून पाय मागें घेतला. त्या तशा सकाळच्या वेळींहि मला दरदरून घाम आला होता. तोंड पुसण्यासाठीं मी खिशांतून रुमाल बाहेर काढला. टिपून घेतलेल्या त्या दंवाच्या दोनच बिंदूंचे ओले डाग त्या रुमालावर अजून दिसत होते. मी रुमाल उचलून कपाटांत ठेविला आणि टुवालानें तोंड पुसलें.

— २ —

कमीचें जयंताशीं लग्न झालें.

नशिबानें खैर केली. एक मेजर ऑपरेशनची केस घेऊन त्याच वेळी मला मुंबईला जाण्याची संधि मिळाली. आयतेंच माझें काम झालें. या जोडप्याच्या मस्तकावर अक्षता टाकण्यास माझे हात कसे वाहले असते ? तीन आठवडे मी मुंबईतच होतों, त्यामुळें लग्नाचे सर्व सोहळे मी गांवीं येण्यापूर्वींच उरकले जाऊन वधूवरें मुंबईला निघून आलीं होतीं.

मी गांवीं जातांच नित्याप्रमाणें रामभाऊच्या बागेंत बसावयास गेलों. नित्याप्रमाणें इतर मुलें येऊन माझ्याशीं खेळत बसलीं. वहिनी दोनतीन वेळां बागेंतून इकडून तिकडे गेल्या, पण त्यांनीं माझ्याकडे ढुंकूनसुद्धां पाहिलें नाहीं. रामभाऊ एक वेळ बागेकडे वळल्यासारखा दिसला, पण मला पाहतांच दचकल्यासारखें करून झट्कन् मान फिरवून घरांत निघून गेला. नित्याप्रमाणें माझा चहाचा कप आला नाहीं.

यापुढें या घरांत मी परका झालों याची मला जाणीव झाली. नवराबायकोनें माझ्याशीं भाषण वर्ज्य केलें होतें. मुलें तेवढीं माझ्याजवळ येत असत. मीं माझा नित्याचा क्रम मात्र चुकवला नाहीं. पण पूर्वींचा तो

आपुलकीचा भाव गेला. आतांचें बागेंत जाणें— सार्वजनिक बागेंत जाण्या-इतकेंच लौकिक स्वरूपाचें होतें.

रामभाऊनें असा अबोला कां धरला हें जरी मला माहीत होतें, तरीहि प्रत्यक्ष त्याला प्रश्न विचारण्याचें धाडस मीं केलें नाहीं. त्यानेंहि माझ्याशीं भाषण करण्याचा प्रसंग कधीं आणला नाहीं. गांवांत हा एक चर्चेचा विषय होऊन राहिला होता, हें मला कळत होतें; पण मी काय करणार ? अबोल्याचा उपक्रम त्यांनीं केला होता. रामभाऊचे घर अशा परीनें मला वर्ज्य झालें, पण बाग मात्र वर्ज्य झाली नव्हती.

कमीच्या लग्नाला सुमारें नऊदहा महिने होऊन गेले होते. या मुदतींत कमी एक वेळहि माहेरीं आली नाहीं.

एके दिवशीं सकाळीं उठून मी पोषाख करायच्या तयारींत असतां भिकू गडी बूट साफ करीत करीत माझ्या बाजूला येऊन उभा राहिला. बूट माझ्या पायांत चढवून बंद बांधीत आपल्याशींच पुटपुटत म्हणाला, " जांवईबुवा काल गटारांत पडले होते. "

मीं विचारलें, " कुठले जांवईबुवा ? "

तो म्हणाला, " रामभाऊंचे जांवईबुवा—ते बालिष्टर—कालच आले आणि रात्रींच हा तमाशा झाला."

रोग्यांच्या गर्दीमुळें गेल्या दोन दिवसांत मी बागेंत गेलों नव्हतों.

" एकूण कमी आली आहे वाटतं माहेरीं ! " मीं हळूच भिकूला विचारलें. तो नुसती मान हालवून 'होय' म्हणाला आणि मी पुढें कांहीं विचारण्यापूर्वीच निघून गेला.

आज पुनः बागेंत गेलों. मी जातांच छोटी चंपू धांवतच येऊन म्हणाली, " काका, कमूताई आली आणि तिचा नरवाहि पण आला."

मीं म्हटलें, " नरवा नव्हे—नवरा. "

ती हट्टानें म्हणाली, " नाहीं. नरवा आला. आणि काल भाऊ त्याच्याबरोबर भांडले. आणि नरवाहि भाऊंबरोबर भांडला आणि कमूताई रडली; आणि आईहि पण रडली. आई म्हणाली, 'काका शहाणे' आणि नरवा म्हणाला, 'काका दुष्ट, चांडाळ' आणि मग कमूताईनं नरव्याच्या तोंडावर हात ठेवला आणि नरव्यानं मग कमूताईच्या तोंडांत मारलं."

चंपूच्या प्रत्येक बाल-बोलासरशीं माझ्या हृदयाचें पाणी पाणी होत

होतें. शेवटीं जयंतानें हीहि कमाई केली तर! मीं चंपीला विचारलें, "कमूताई कुठं आहे?"

चंपी म्हणाली, "ती कालपासून सारखी रडते आहे!"

गरीब बिचारी पोर! एकदां वाटलें तिला बोलावून सर्व कांहीं विचारून घ्यावें. पण पुन्हा वाटलें विचारण्यांत तरी काय हंशील!

रामभाऊ किंवा वहिनी येतील तर आज जरा चमत्कारिक वाटेल या भयानें तसाच निघालों आणि घरीं आलों.

मनाला चैन पडेना. पुनः पुनः वाटूं लागलें, कीं माझा भ्याडपणा अंतीं एका पोरीच्या आयुष्याची माती करणार. कां त्या वेळीं मीं अडथळा केला नाहीं? स्वस्थ कां राहिलों? एर्वीतेर्वी रामभाऊनें माझ्याशीं अबोला धरलाच. बोललों असतों—भांडलों असतों—सर्व हकीकत उघड करून सांगितली असती तर तो अबोला सार्थ तरी झाला असता. कदाचित् रामभाऊचें मनहि फिरलें असतें.

भवितव्यतेनें माझ्या तोंडाला कुलूप घातलें, असें मनाचें समाधान करून घेऊन स्वस्थ बसण्याचा मी प्रयत्न करीत होतों, पण मन स्वस्थ बसूं देईना. भलभलतीं दृश्यें डोळ्यांसमोर दिसूं लागलीं. मस्तक सुन्न होऊं लागलें. 'तूंच गुन्हेगार—तूंच गुन्हेगार' असें कुणी तरी माझ्या कानांत सांगत आहे, असा भास होऊं लागला.

कमीचेच तर ते शब्द नव्हत ना? डोळे फाडफाडून समोर पाहूं लागलों. कुणीच नव्हतें. शब्द मात्र ऐकूं येत होता. माझें हृदय धडधडूं लागलें. हृदयाचे ठोके कानांत ऐकूं येऊं लागले. मी कासावीस झालों. खुर्चीवरून उठून उभा राहिलों आणि मोठ्यानें म्हणालों, "कमे, कमे, पोरी—मी तुझा सहस्रशः अपराधी आहें."

काळोख पडला होता पण दिवा लावण्याचें मला भान राहिलें नव्हतें. त्या अस्पष्ट प्रकाशांतून शब्द ऐकूं आला—'काका!'

भ्रम—केवळ भ्रम!

पुनः शब्द झाला, "काका, दिवा कुठं आहे?"

कमीचाच आवाज. खरोखरच का ती आली? मीं न उठतांच विचारलें, "कोण तें?"

"काका, माझा शब्ददेखील अनोळखी झाला का इतक्यांत?"

" कोण ? रुमे ! तूं या वेळीं इकडे कुणीकडे ? "

" आधीं दिवा लावा पाहूं."

मीं उठून दिवा लावण्यासाठीं काडी पेटविली. दिवा लावण्याऐवजीं त्या काडीच्या भेसूर प्रकाशांत मी रुमीच्या चेहऱ्याकडे पाहूं लागलों. काडी जळून हाताला चटका बसला. मीं काय पाहिलें ? हातची काडी विझून खालीं पडली.

रुमी उभी होती तिकडे पाठ फिरवून मीं पुनः काडी पेटविली. वात वर न काढतांच दिवा लावला. माझ्यानें राहवेना. त्या अंधुक प्रकाशांत मीं पुनः रुमीच्या तोंडाकडे नजर वळविली—मला तिचा चेहरा भयानक दिसूं लागला. तिचे डोळे खोल गेले होते, पण वरच्या पापण्या सुजल्या होत्या—डोळ्यांच्या खळग्यांभोवतीं काळ्या रंगाचें वर्तुळ पडलें होतें ! गाल—रुमीचे ते गुलाबी गाल—आतां गुलाबाच्या वाळलेल्या पाकळीसारखे झाले होते. झाडावर उमलूं पाहणारी गुलाबाची कळी काढ्यासाठीं उपयोगांत येणाऱ्या गुलाबकळीसारखी दिसत होती. हा कुणाचा अपराध ?

रुमी पुढें झाली आणि तिनें दिव्याची वात वर चढविली. वात चढवीत असतांना दिव्याचा प्रकाश तिच्या चेहऱ्यावर पडून तो अधिकच भेसूर दिसूं लागला. दिव्याच्या किल्लीवरचा हात न काढतां रुमी म्हणाली, " विसूकाका, बोलत कां नाहीं ? "

मी वेड्यासारखा हसलों ! कां हसलों तें माझें मलाच कळलें नाहीं.

" हशावारी नेलंत तरी गुन्हा कांहीं चुकत नाहीं ! " असें म्हणून ती दिव्यापासून दूर झाली. गुन्हा ? गुन्हा ? मला मघाशीं गुन्हेगार म्हणत होती ती रुमीच तर !

" काका, बोलत कां नाहीं ? अशी माया पातळ कां केलीत ? "

मीं कठोरपणानें विचारलें, " कुणीं माया पातळ केली ? तुझा बाप माझ्याशीं बोलत नाहीं— तुझी आई बोलत नाहीं. भलता लघळपणा करायला मीं कशाला यावं तुमच्या दाराशीं ? "

रुमीनें मनगटानें डोळ्यांतलीं आंसवें पुसलीं आणि रडव्या आवाजानें तिनें मला विचारलें, " त्यांचा राग माझ्यावर काय म्हणून ? "

साधाच प्रश्न—पण मी गांगरून गेलों. कांहीं तरी विचारायचें म्हणून म्हणालों, " तूं आलीस हें मला कुठं कळलं आहे ? "

" चंपीनं नाहीं सांगितलं ? "

त्या चिमुरड्या पोरीनेंदेखील ही कलागत लावली तर!

रागानें खुर्चीवर मूठ आपटून मीं म्हटलें, " तुझें माहेर मला वर्ज्य आहे. गेल्या दहा महिन्यांत तुझ्या घराची पायरी मी चढलो नाहीं, कीं चहाचा एक थेंबहि घेतला नाहीं."

केंविलवाण्या शब्दांनीं ती उद्गारली, " हा माझा अपराध का ? मी इथं असतें अन् तसं कांहीं झालं असतं तर—"

तिचें भाषण अर्धेंच थांबवून मी म्हटले, " दोन दिवस झाले तुला येऊन ? "

ती म्हणाली, " होय."

" मग अझून कां मला कळवलं नाहींस ? "

" काका—काका—मी आतां कमी राहिलें नाहीं. मी स्वतंत्र नाहीं. आतां माझ्यावर माझी सत्ता नाहीं. तुमचं नांवसुद्धां माझ्या घरांत वर्ज्य आहे, हें तुम्हांला माहीत असलं पाहिजे. चंपीनं तें तसं सांगितल्यावर तरी तुम्हीं माझी चौकशी करायला हवी होती."

' तें तसं ?' एकूण चंपीनें सारी सारी हकिकत हिला सांगितली तर ?

उत्तर काय द्यावें हेंच मला सुचेना.

मीं नुसतें विचारलें, " कसं काय चाललं आहे तुझं ? "

डोळ्यांतलीं आंसवें पुशीत ती म्हणाली," काय चालायचं ? आयुष्याचे दिवस मोजतें आहें. देव कधीं माझी आठवण काढील तो सुदिन ! "

" इतकी का तुझी वाईट स्थिति झाली आहे ? अजून लग्नाला पुरे दहाहि महिने झाले नाहींत—"

दांतओठ चावून ती म्हणाली, " दहा दिवसांतच माझ्या दाही दिशा झाल्या."

मला कांहींच कळलें नाहीं. मीं विचारले, " काय झालं ? "

ती म्हणाली, " काय सांगूं ? माझं कर्म ! रोज गाणींबजावणीं चाललेलीं असतात. कालची हकीकत कळली ना तुम्हांला ? तसलेच प्रकार रोज होतात. ज्यांचीं मीं तोंडसुद्धां पाहूं नयेत अशा बायकांकरवीं माझी भरसभेंत विटंबना होत असते. काका, मला थोडं आरसेनिक—नाहीं तर प्रुसिक ॲसिड द्याल का ? "

प्रुसिक ॲसिड ? एवढ्या थरावर गोष्टी आल्या का ? पुनः तेच शब्द ऐकूं येऊं लागले, 'तूंच गुन्हेगार!'

ते शब्द ऐकूं येऊं नयेत म्हणून रागानें मोठ्यानें ओरडून मीं म्हटलें, " चूप--कमे, तूं कोण समजतेस मला, डॉक्टर कीं खाटिक ? "

ती संथपणानें म्हणाली, " खाटिक."

मी स्तंभित झालों. एक क्षणभर थांबून ती पुढें म्हणाली, " सारं कांहीं माहीत असून झांकल्या डोळ्यांनीं माझा असा नाश झालेला तुम्हांला पाहवला ? भाऊंचा अपराध नाहीं. आई बोलून चालून बायको माणूस, पण तुम्हांला कांहीं दयामाया होती ना ? कां असा माझा गळा कापलांत ? "

" जे कांही सांगायचं तें मीं तुझ्या आईला सांगून टाकलं होतं."

" काय सांगितलं होतं ? स्पष्ट कुठं सांगितलं होतं ? सारं कांहीं चांचरत—उघड उघड असं कांहींच नाहीं."

" बॅरिस्टरीला भाळलेल्या माणसांना आणखी स्पष्ट तें काय सांगायचं ? माझं नि त्याच्या बापाचं वैर. खरं सांगायला गेलों असतों तर मलाच तुम्हीं घरमोड्या ठरवलं असतं. त्यांतून डॉक्टरचं ब्रीद. धंद्याच्या नात्यानं कळलेल्या गोष्टी सांगणं म्हणजे महान् अपराध. मीच त्याला इंजेक्शनं दिलीं होतीं, हें कसं सांगूं ? जेवढं सांगतां येईल तेवढं तुझ्या आईला सांगून दिलं."

" भाऊंना कां नाही सांगितलंत ? "

" त्यांनीं कुठं मला विचारलं ? "

" हा खोटा अभिमान ! त्यापायीं माझा मात्र सर्वनाश झाला."

" माझं म्हणणं कुणी ऐकलं असतं ? भाऊबंदकीच्या द्वेषानं मी बोलतों, असाच आळ माझ्यावर आला असता."

ती आपल्याशींच पुटपुटली " हो, तेंहि खरंच."

मला कांहीं बोलायला सुचेना. ती दचकून म्हणाली, " मी आतां जाते. उद्यां पहांटे निघायचं आहे."

मीं आश्चर्यानें विचारलें, " म्हणजे ? माहेरवास इतक्यांत पुरा झाला का ? सारे दोनच दिवस ? "

" दोन दिवसांत झाली तेवढी विटंबना पुरे झाली. मला सोडून राहणं होत नाहीं."

" म्हणजे ? तरीहि ते प्रकार चाललेच आहेत ? "

हुंदका गिळून ती कांपऱ्या स्वरांत म्हणाली, “हो. तेवढ्यासाठींच मला माहेरीं ठेवायची नाहीं. येतें मी. पुढल्या जन्मीं तरी मला बायकोचा जन्म न येवो, एवढाच आशीर्वाद द्या.” माझ्या पायावर मस्तक ठेवून मला नमस्कार करून ती झटकन् निघून गेली.

माझ्या पायांवर दोन अश्रुबिंदु पडले होते. खिशांतील रुमाल काढून मीं ते टिपले. तोच रुमाल! हें द्विरागमन. एक—दोन! तिसऱ्यान्दां तर हीच आवृत्ति नाहीं ना होणार?

— ३ —

मी चहा घेत आरामखुर्चीवर बसलों होतों, इतक्यांत वहिनींचा शब्द कानीं आला, “भावजी!”

“कोण? वहिनी?” मी आश्चर्यानें उद्गारलों.

एक वर्षानें वहिनींनीं माझ्या घरांत पाऊल टाकलें. कां? मी टकमक तिच्या तोंडाकडे पाहत राहिलों. तिचे डोळे रडून रडून सुजल्यासारखे दिसत होते. ती कांहींच बोलत नाहीं असें पाहून मीं विचारलें, “वहिनी, काय झालं?”

हुंदके आवरीत त्या म्हणाल्या, “कमी आली आहे.”

मीं विचारलें, “मग तिला कां नाहीं आणलीत बरोबर?”

त्या म्हणाल्या, “तिला पाहायला येतां का?”

“पाहायला—! म्हणजे? ती आजारी का आहे?”

दांतांनीं दाबलेले ओठ सुटले आणि ती ओक्साबोक्शीं रडूं लागली.

मीं घाईघाईनें टोपी डोक्यावर फेंकली, स्टेथॉस्कोप घेतला, थर्मोमिटर घेतलें आणि तिच्या येण्याची वाट न पाहतां बाहेर धूम ठोकली.

रामभाऊ दारांतच उभा होता. तो म्हणाला, “विसू, मला क्षमा कर—”

त्याच्याकडे न पाहतांच मी घरांत शिरलों. कुठल्या तरी एका खोलींत गेलों. कमी बिछान्यावर पडली होती तिला पाहतांच माझ्या अंगावर शहारे आले.

दोनच महिने झाले. दोन महिन्यांपूर्वीं ती मला भेटली तेव्हां क्षीण झाली होती खरी, पण आतां जें व्हायचें तें झालें होतें. सर्वांगावर ब्लिस्टर्स उठलीं होतीं. चेहरा ओळखतां येत नव्हता.

मी तिची नाडी पाहिली. ताप होताच. स्टेथॉस्कोप लावून पाहिला. हार्ट अगदीं क्षीण झालें होतें. या रोगांत हें असें कां? हृदयाची क्रिया एवढी मंद कां?

माझ्याकडे पाहून कमी थोडी हसली. त्या अस्फुट हसण्यानेंदेखील तिचा तो विद्रूप चेहरा अधिकच भयानक दिसूं लागला.

कमी म्हणाली, "काका, आलं ना बोलावणं?"

मीं विचारलं, "कुठलं?"

"देवाघरचं." असे म्हणून ती पुनः मोठमोठ्यानें हंसली. माझ्या अंगावर पुनः शहारे आले.

* * *

कमीला माझ्या दवाखान्यांत आणून ठेविलें होतें. औषधोपचार सुरू होते. ती म्हणत असे, "कसलीं औषधं नि कसलीं इन्जेक्शनं. प्रुसिक ॲसिड द्या मला."

दवाखान्याच्या कपाटांवर सक्त नजर ठेवण्याविषयीं मी कम्पौंडरला बजावून ठेवलें होतें. वहिनी बहुतेक सारा दिवस तिच्या बिछान्याशेजारीं रडत बसलेल्या असत.

रामभाऊ एक दिवशीं म्हणाला, "विसू, मी घोर अपराधी आहें. निष्कारण तुझा संशय घेतला. बॅरिस्टरीला भाळलों आणि पोरीचा असा गळा कापला. तुझं सांगणं त्या वेळीं ऐकलं असतं तर आज हा प्रसंग कां आला असता? कळलं म्हणून मुद्दाम जाऊन पोरीला घेऊन आलों. औषधाचीसुद्धां आबाळ होत होती. माझ्यादेखतसुद्धां वाटेल तीं थेरं चालवलीं होतीं त्यानं. किळस आली त्या माणसाची—आतां बरी झाली कीं पोरीला तिकडे पाठवायचंच नाहीं. विधवा झाली म्हणून समजेन पण त्या चांडाळाच्या हातीं—"

माझ्यानें पुढें ऐकवेना म्हणून एकदम तिथून निघून बाहेर आलों.

* * *

नुकता कुठं माझा डोळा लागला होता, इतक्यांत भिकूच्या हाकेनें जागा झालों. हातांत कंदील घेऊन भिकू उभा होता तो म्हणाला, "आधीं खालीं चला."

काय झालें, म्हणून मीं विचारतांच त्याला उत्तर सुचेना. 'कमूताई—

कमूताई' असें नुसतें तोंडांतल्या तोंडांत पुटपुटूं लागला. मी बिछान्यांतून उठलों आणि तसाच दवाखान्याच्या वॉर्डकडे वळलों. तेव्हां माझा हात धरून भिकूनें मला ओढलें. तो म्हणाला, " खालीं चला. "

खालीं कां जायचें हेंच मला कळेना, आणि त्याला कांहीं विचारणार तों तो कंदिलाची वात मोठी करून पुढें निघालादेखील.

खालीं रस्त्यावर आलों. माझें काळिज चर्रर झालें. झालें, शेवटीं व्हायचें तें झालें. कमी रस्त्यावर अस्ताव्यस्त पडली होती. जवळ जाऊन पाहिलें--नाडी पाहिली. हाय! भगवन्! हें काय ? जखम कुठंच नव्हती. पण हें असं कसं झालं? वुइक हार्ट ? नुसत्या धक्क्यानंच--अरेरे! माझ्या डोळ्यांपुढें चक्कर आली. भिकूला म्हटलें, " जा, वहिनींना बोलाव." त्यानें आधींच बोलावणें पाठविलें होतें.

माडी कांहीं फारशी उंच नव्हती, त्यामुळें जखम कुठेंच झाली नाहीं. मीं तिच्या तोंडावरून हात फिरविला. मस्तकावर दोनच थेंब दिसत होते. कुठें लहानसा दगड लागला असावा--खिशांतून रुमाल काढून मीं ते टिपून घेतले.

एक-दोन-तीन! झालें-संपलें. ही तिसरी पाळी. तोच तो रुमाल.

* * *

तो रुमाल अजून माझ्या सेफमध्यें आहे, दिवसांतून एक वेळ तरी त्या रक्तबिंदूंचें मी दर्शन घेतों, आणि त्या वेळीं पश्चात्तापानें माझें हृदय भरून येतें.



## कविहृदय : : १८

केयूर कवीनें ज्या वेळीं लीलामंदिरांत प्रवेश केला, त्या वेळीं तो तेथला एकंदर थाट, महाराजांचें भव्य रत्नजडित आसन, उभारलेल्या मयूर पिसाऱ्यासारख्या भागावर विराजित झालेला सुंदर युवतीगण, त्यांच्या आसनाभोंवतीं लावलेल्या निरनिराळ्या वर्णांच्या रत्नदीपांच्या तेजांत चकाकणारीं त्यांचीं उत्तमोत्तम आभरणें आणि बहुमूल्य अलंकार, मोराच्या

तुऱ्यासारख्या त्या आसनाच्या पुरोभागीं विराजमान झालेले नीलमणि-महाराज, त्यांच्यावर चौऱ्या ढाळणाऱ्या सुंदर सुंदर दासी, नर्तकींचें गायन, खाशा मंडळीचा चाललेला ऐषआरामाचा तांबूलपानविधि, आणि सर्वत्र दर-वळून राहिलेला सुगंध इत्यादि वैभव पाहून तो अगदीं दिपून गेला. आज-वर विद्यार्जनासाठीं रानावनांत दिवस काढलेल्या कविदृष्टीला असलें राज-वैभव अपूर्व असल्यामुळें तो अमळ गोंधळून जाणें साहजिकच होतें.

महाराजांचा खुषमस्कऱ्याच कवीचा वाटाड्या असल्यामुळें अगदीं थेटपर्यंत निर्विघ्नपणें त्याचा प्रवेश झाला होता. तो आंत आला त्या वेळीं महाराजांचें लक्ष नर्तकीच्या मोहक गायनाकडे वेधल्यामुळे, त्याचें आगमन त्यांना कळून आलें नाही. त्याच्या नूतन मित्रानें—त्या खुषमस्कऱ्यानें दाखविलेल्या आसनावर कांहींसा अधोवदन होऊन तो विराजमान झाला. आपल्या समोरील तें भव्य मयूरासन एकवार डोळे भरून पाहून घ्यावें, असें वारंवार त्याच्या मनांत आलें, पण त्यावर युवतीगण विराजित असल्यामुळें तिकडे दृष्टि लावून बघणें त्याच्या सौजन्याला बरें वाटेना, म्हणून नाइलाजानें त्याला मोह आवरावा लागला.

लवकरच महाराजांचें या नूतन पाहुण्याकडे लक्ष गेलें. त्याबरोबर त्या खुषमस्कऱ्यानें त्यांना केयूर कवीची ओळख करून दिली. कवीनें विनम्रभावानें महाराजांना वंदन केलें.

महाराजांची मुद्रा या वेळीं प्रसन्न होती. आश्रयार्थ आलेल्या कवीच्या कलानैपुण्याची परीक्षा पाहण्यासाठीं त्याला ते म्हणाले, "केयूर कवि, असं एखादं सुंदर पद्य गा, कीं तें ऐकून इथला रसिकवृन्द थक्कच व्हावा."

महाराजांची आज्ञा होताच, 'माझ्यावर आपला हा मोठा अनुग्रहच झाला' अशा तऱ्हेची आपली चर्या दर्शवीत कवीनें त्यांना पुनः एकवार वंदन केलें आणि समयोचित रागांत आणि आपल्या नैसर्गिक मधुर कंठानें एक पद्य गाऊन दाखविलें. ज्यांत महाराजांच्या अतुल वैभवाचा गौरव केला आहे असें तें पद्य फारच सुंदर होतें. तें ऐकून—विशेषतः त्यांतील 'जणुं काय इंद्रच तुझ्या रूपानें या भूतलावर अवतरला आहे, आणि या अप्सरा तुला शोधा-वयाला येथें आल्या आहेत' ही कल्पना ऐकून, महाराज फारच खूष झाले आहेत असें त्यांच्या प्रसन्न चर्येवरून त्यानें ताडलें. तसेंच त्यांच्या पार्श्वभागीं

बसलेला श्रोतृवृन्द तें ऐकून तल्लीन झाला आहे, असें त्यांच्या सुंदर मुखांवर विलसणारें मधुर हास्य पाहून त्याला कळून आलें. त्याबरोबर त्याला आपल्या काव्याबद्दल आणि त्यानंतर स्वतःबद्दल धन्यता वाटली.

थोडयाच वेळांत महाराजांनीं कवीला प्रसन्न वदनानें निरोप दिला. त्या खुषमस्कऱ्यानें 'तुझें काम फत्ते झालें' असें नेत्रसंकेतानें त्याला सुचाविलें. त्याबरोबर तो आनंदित होत्साता महाराजाना अभिवंदन करून आपल्या बिऱ्हाडीं आला.

विश्वाला दैदीप्यमान करणाऱ्या अग्नीलादेखील ठिणगीचा अवसर मिळण्यासाठीं दुसऱ्याच्या मदतीची जरूर असतेच; मग यःकश्चित् माणसाचें काय घेऊन बसलांत ? नुसत्या गुणावरच गुणिजनांचें प्रारंभीं तेज पडत नाहीं, तर त्यांना नशिबानें हात द्यावा लागतो. केयूर कवीला तो मिळतांच, नीलमणिमहाराज त्याला आपला जिवलग मित्र मानूं लागले. त्याच्या अत्यंत गोड स्वभावानें, अगदीं अल्पावधींतच सर्व स्त्रीपुरुषांना वेड लावलें. राजसभेंतील जे पंडित आणि कलावंत केयूर कवीचा वरचष्मा पाहून प्रारंभीं त्याचा द्वेष करीत, त्यांच्याच आदराला तो आपल्या अंगच्या गुणांमुळें लवकरच पात्र झाला.

त्यानंतर कांहीं दिवसांनीं हेमकाया नगरींतील एका धनिक पंडिताच्या मणिमाला नांवाच्या गुणवती, एकुलत्या एक कन्येच्या स्वयंवराचें निमंत्रण राजसभेंत आल्यावरून, नीलमणिमहाराजांनीं केयूर कवीची तिकडे मोठया इतमामानें रवानगी केली. कवीचा दैवयोग बलवत्तर म्हणून, कीं गुणिजनांनीं एकमेकांना ओळखलें म्हणून, मणिमालेनें केयूर कवीच्या कंठांत आपली प्रेममाला घातली. नंतर तेथें थाटाचा विवाहसमारंभ होऊन, तिच्या पित्यानें कन्या-जामातांची रवानगी करून दिली. नीलमणिमहाराजांनीं त्या नूतन दांपत्याकरितां आपला 'उद्यानमंदिर' नांवाचा रत्नप्रभानगरीपासून एक मैलावर असलेला प्रासाद शृंगारून ठेवला होता. योग्य वेळीं त्या नूतन दांपत्याचा तेथें मोठया थाटानें गृहप्रवेश झाला.

विवाहानंतर प्रथमच ज्या वेळीं महाराजांच्या दर्शनाला कवि गेला त्या वेळीं ते कांहींसे विनोदानें त्याला म्हणाले, " केयूर कवि, आज तुम्ही अशा अपूर्ण स्थितींत आमच्या भेटीला याल अशी आमची अपेक्षा नव्हती."

त्यावर समयसूचकपणें कवि म्हणाला, " महाराज, आपल्याला अर्धवट

भासणाऱ्या या देहावर जशी महाराजांची सत्ता आहे तसंच मला पूर्णत्व आणणाऱ्या भागाचं सत्ताधारित्व महाराणीसरकारांचं आहे."

इतर वेळीं त्याच्या असल्या मार्मिक भाषणानें महाराज प्रसन्न होत, पण आज तसें कांहीं झालें नाहीं. आजची त्याची भेट महाराज अपेक्षा करीत होते तशी झाली नाहीं. लवकरच कवीनें त्यांचा निरोप घेतला. त्या वेळीं एकाची निराशा आणि दुसऱ्याचा संताप झाला आहे, असें त्यांच्या चर्येवरून कोणींहि अनुमान केलें असते.

मणिमालेला चित्रकलेचा अत्यंत नाद असून तिनें त्या कलेंत चांगलेंच प्राविण्य मिळविलेलें होतें. तिच्या लग्नापूर्वींचीं माहेरीं राहिलेलीं चित्रें ती आतांशा रोज पुरीं करीत बसत असे. वसंतऋतूंतील आल्हाददायक असा प्रातःकालचा समय होता. केयूर कवि नित्यनियमाप्रमाणें उद्यानांत सहल करण्यासाठीं गेला होता, अशा वेळीं मणिमाला राजमंदिरांतील एका प्रशस्त दिवाणखान्यांत किनखाबी कोचावर बसली असून तिच्या जवळच असलेल्या एका भव्य फलकाला लावलेलें अपुरें चित्र पुरें करण्यांत ती गढून गेली होती. तें चित्र फारच सुंदर असून त्याचें बहुतेक सर्व काम झालें होतें,. पण त्यांत चुकून-माकून बारीकसारीक कांहीं दोष राहिले आहेत कीं काय, अशा चिकित्सक बुद्धीनें ती त्याचें निरीक्षण करीत होती. तें चित्र हंस-दमयंतीचें असून फारच मोहक होतें. त्यांत कधींहि विशेष चालण्याची संवय नसणाऱ्या राजकन्येची द्रुतगतीनें चालल्यामुळें उडालेली तारांबळ, तसें चालतांना अडथळा होऊं नये म्हणून शालूचे अमळ वर खोंवलेले ओंचे, मुखावर तेवढ्याच अल्प श्रमामुळें चमकणारी घर्मबिंदूंची पंक्ति, हंस हातीं लागत नाहीं म्हणून झालेली निराशा आणि आतां आपल्या मैत्रिणी आपल्याला हंसतील या जाणिवेनें वाटणारी लज्जा अशा दोन भावनांची संमिश्र छटा, श्वासोच्छ्वास जोरानें चालल्यामुळें फुगलेल्या नाकपुड्या, कपाळावर येऊन वाऱ्याशीं क्रीडा करीत असलेली केसांची लहानशीच एक बट, अंबाड्यांतून गळालेली मल्लिकेच्या पुष्पांची वेणी, वक्षस्थळावरून किंचित् ढळलेला पदर वगैरे वगैरे गोष्टी फारच चातुर्यानें दर्शित केल्या असून आपल्याला अशा बेसावध स्थितींत गुपचूप कोणी धरील कीं काय, या भीतीनें हंस एवढा वेळ दमयंतीकडे लाविलेली दृष्टि काढून दुसरीकडे बघतो आहे असें दाखविलें होतें. असो.

मणिमालेची चित्रकलेशीं तन्मय वृत्ति झाल्यामुळें उद्यानांतील प्रातः-कालचा सौगंधिक वारा सेवन करून प्रसन्न झालेला केयूर कवि पुष्पगुच्छ घेऊन तेथें केव्हां आला हें तिला कळून आलें नाहीं; पण तो जसा तिच्या जवळ आला तशी ती विनयानें चट्कन उठली आणि त्या चित्रफलकाच्या उजव्या बाजूला जाऊन उभी राहिली.

आपल्या पत्नीनें इतकें सुंदर चित्र काढलेलें पाहून कविरायाचें अंतः-करण फारच प्रफुल्ल झालें. " मणि, किती सुंदर चित्र काढलं आहेस हें ! " प्रेमपूर्ण दृष्टीनें मणिमालेकडे पाहत तो म्हणाला.

" कितीहि केलं तरी पण तें आपल्या काव्याच्या खालींच." मणिमाला विनयानें उद्गारली.

" जिवंत माणसांत आणि बाहुलींत जितकं अंतर आहे, तितकंच तुझ्या चित्रकलेंत आणि माझ्या काव्यकलेत आहे, असं हें चित्र पाहून मला वाटूं लागलं आहे. कुठं शिकलीस कला ही ? "

आपल्या वल्लभानें एवढा गुणगौरव केल्यावर कोणत्या दयितेला कौतुक वाटणार नाहीं ? आत्मस्तुति ऐकून आनंदित झालेल्या मणिमालेनें केयूर कवीवर एक स्निग्ध नेत्रकटाक्ष फेंकला. त्यामुळें तो अधिकच आनंदित झाला आणि त्या चित्राकडे बघत त्यानें कौतुकानें तिला प्रश्न केला, " खरोखरच का दमयंती इतकी सुंदर होती ? मणि, तूं आपल्या कल्पनासृष्टींत इतकी सुंदर स्त्री कशी निर्माण केलीस ? "

पण या स्तुतीनें तिला अमळ लाजल्यासारखें झाल्यामुळें, आपली ती मनःस्थिति लपविण्यासाठीं ती केयूराला हसत हसत विनोदाच्या स्वरांत म्हणाली, " मग सांगा बरं कविराज, दमयंती जर इतकी सुंदर आहे, तर तिच्याकडून हंसानं तोंड कां फिरवलं आहे ?"

हंसाची दृष्टि ज्या दिशेला होती त्याच दिशेला मणिमाला उभी आहे असें पाहून, कवीनें मोठ्या समयसूचकपणें त्याचें उत्तर दिलें, " दमयंती आणि तूं या दोघींमध्यें अधिक सुंदर कोण आहे हें ठरविण्यासाठीं. "

हें ऐकून तर मणिमाला अतिशयच लाजली. तिला आपली ही झालेली मनःस्थिति कशी लपवावी हें कांहींच न कळल्यामुळें, तशा गोंधळलेल्या मनःस्थितींतच तिनें कवीकडे एक दृष्टिक्षेप टाकला. त्या दृष्टिक्षेपांत इतक्या विविध प्रकारच्या मनोविकारांच्या छटा आल्या होत्या कीं, कविराय त्यानें

अगदीं बेहोष होऊन गेले. कविकृतीचा सूड म्हणूनच कीं काय, मणिमालेनें त्याला हा नयनबाण मारला होता. बिचारा केयूर कवि अगदीं घायाळ होऊन गेला, आणि त्याच्या हातांतलीं फुलें उधळलीं गेलीं. पण त्याच्या तशा मनःस्थितीमुळें तीं न कळत त्याच्या हातून गळून पडलीं, कीं त्यानें तीं आपल्यावर उधळलीं, हें मणिमालेला कळून आलें नाहीं. कारण चटकन तिचें लक्ष समोर गेलें तों नीलमणिमहाराज तेथें उभे होते. त्यांना पाहून लाजलेली मणिमाला आंतर्गृहांत निघून गेली. केयूर कवीच्या चर्येवर मात्र संताप व्यक्त होत होता. आपल्या शृंगारचेष्टा सहजगत्या जर एखाद्याच्या दृष्टीस पडल्या तर आपण ओशाळतों, पण तेंच त्यानें मुद्दाम बघण्याचा प्रयत्न केला असला तर आपल्याला त्याचा संताप येतो. तीच स्थिति केयूर कवीची झाली. त्यामुळें तो आंतल्याआंत जरी खूप संतापला असला तरी तो महाराजाचा आश्रित असल्यामुळें त्याला आपला संताप शब्दानें व्यक्त करतां आला नाहीं; आणि आंबट तोंडानें कां होईना त्याला नीलमणि-महाराजांचें स्वागत करणे भाग पडलें.

त्याच्या अंतःकरणांतल्या भावना त्याच्या चर्येवर पूर्णपणें प्रतिबिंबित झाल्या होत्या; पण मणिमालेच्या रूपावलोकनानें बेहोष झालेला नीलमणि, केयूर कवीच्या भावनांकडे लक्ष देण्याच्या मनःस्थितींत नव्हता. तो उलट म्हणाला, "कवि, तुम्ही अत्यंत भाग्यवान् आहांत बुवा! तुमच्या या भाग्याचा आम्हांला अत्यंत हेवा वाटतो. तुमच्या पत्नीसारखं सौंदर्य आज-पर्यंत आमच्या अवलोकनांत नाहीं."

स्त्रीला परपुरुषाच्या गुणांची स्तुति ऐकणें जितकें कटु वाटतें, तितकेंच पुरुषाला स्वतःच्या स्त्रीची दुसऱ्यानें केलेली रूपविषयक स्तुति ऐकून वाटतें. त्याप्रमाणें केयूर कवीला नीलमणीचा अत्यंत संताप आला; पण तो एक आश्रित होता, त्यामुळें त्याला कांधिक कांहीं बोलणें शक्य नव्हतें.

अमळ थांबून नीलमणि पुनः म्हणाला, "केयूर कवि, तुम्ही आज आमच्याकडे पाहुणचारासाठीं सहकुटुंब आलं पाहिजे."

या वाक्यांत आणि तें उच्चारतांना योजिलेल्या स्वरांत आदराचा अंशहि नसून हा सक्तीचा पाहुणचार आहे, हें कवीनें ओळखलें; पण त्याला नाहीं म्हणण्याचें सामर्थ्य नव्हतें. त्यामुळे त्यानें मानेनेंच आपली नाइलाजाची संमति दर्शविली.

“ठरल्या वेळीं मेणा येईलच.” इतकें म्हणून नीलमणि उत्तराची अपेक्षा न करितां तेथून चालता झाला.

पुरुष जोंपर्यंत गृहस्थाश्रमी नसतो तोंपर्यंत दुसऱ्याच्या परस्त्रीविषयक भावनांकडे त्याचें सहसा लक्ष नसतें. त्याप्रमाणें केयूर कवीलाहि आजपर्यंत नीलमणीची या बाबतींत परीक्षा झाली नव्हती. त्यांच्या प्रथम भेटीच्या वेळीं लीलामंदिरांतील सुंदर स्त्रीसमूह पाहून त्याच्या भाग्याबद्दल केयूर कवीला अत्यंत कौतुक वाटलें होतें; पण तें सारें सौंदर्य नीलमणीच्या सत्तेचें नसून, लुटारूपणानें आणि दुसऱ्याच्या न्याय्य हक्कावर दरोडे घालून मिळविलेलें असलें पाहिजे असें आतां वाटून नीलमणीच्या निंद्य वर्तनाची त्याला किळस आली. याच्या आश्रयाला आपण आलों ही भयंकर चूक झाली अशी त्याची आतां खात्री होऊन चुकली; आणि आतां या संकटांतून पार पडतां येणें अगदीं अशक्य आहे या जाणीवेनें तो खिन्न झाला.

पतीची ती मनःस्थिति पाहून मणिमालेनें त्याला धीर देत एक युक्ति सुचविली; पण तितक्यांत चटकन् त्या दोघांचेंहि लक्ष तीं जेथें उभीं होतीं त्या खिडकींतून खालीं गेलें. त्यावर केयूर कवि म्हणाला, “बघितलंस, मणि, सभोंवतालीं इतका बंदोबस्त आहे, कीं मुंगीलाहि बाहेर फिरकतां येणार नाहीं!”

त्यावर तिनें हळूच त्याच्या कानांत आणखी एक युक्ति सांगितली. त्यामुळें त्याचें थोडें समाधान झालेंसें दिसलें.

* * *

संध्याकाळ होऊन रात्र पडूं लागतांच केयूर कवीला नेण्यासाठीं मेणा आल्याची वर्दी मिळाली. थोड्याच वेळांत तो आणि बुरखा घेतलेली मणिमाला त्यांत जाऊन बसली आणि मेणा चालू झाला.

कांहीं वेळानें इष्ट स्थानीं मेणा उभा केला, आणि केयूर कवीला उतरून आणि त्याला महाराजांच्या भेटीला जाण्याची सूचना देऊन वाहक पुढें चालूं लागले. मेणा पुढे महाराणीसरकारांच्या महालाकडे न नेतां एका गुप्त स्थानीं नेण्यांत आला. तेथें नीलमणि मणिमालेची मोठ्या आतुरतेनें वाट बघत बसला होता.

इकडे केयूर कवीला “महाराज कांहीं महत्त्वाच्या कामांत गुंतले असून थोड्याच वेळांत ते आपली भेट घेणार आहेत.” असा नोकरांनीं

निरोप सांगितला; पण त्याला यापुढें तेथें बसणें इष्ट न वाटून कांहीं तरी सबब सांगून तो राजमंदिराबाहेर पडला, आणि उद्यानमंदिराचा मार्ग सोडून देऊन वेगळ्याच वाटेला लागला.

तो गेल्याला कांहीं फार वेळ झाला नसेल तोंच महाराज अत्यंत संतप्त होऊन केयूर कवीचा तपास करीत आले. त्यांची ती मुद्रा पाहून 'आपण त्याला जाऊं दिलें ही मोठी भयंकर चूक झाली. आतां त्याचा परिणाम काय होतो न कळे' अशा विचारानें सर्व नोकरचाकरांची पांचांवर धारण बसली. संतप्त झालेल्या महाराजांनीं तो असेल तेथून पकडून आणा असा हुकूम सोडला, त्याबरोबर सर्वत्र धांवपळ सुरू झाली. सर्व दिशांनीं नोकर लोक सैरावैरा धांवूं लागले.

लवकरच केयूर कवीला पकडून नीलमणीच्या पुढें उभें करण्यांत आलें. महाराज अत्यंत संतप्त होऊन त्याला म्हणाले, "केयूर कवि, तूं आम्हांला फसविलं आहेस. तुझ्या नूतन पत्नीला महाराणीनं मोठ्या अगत्यानं निमंत्रण केलं असतां तूं तिच्या बदली एका कुरूप दासीला पाठवून आमचा घोर अपराध केला आहेस; त्यासाठीं तूं तिला इथं आणून पोंहोचती करी-पर्यंत तुला उद्यान मंदिरांत एकान्तवासाची शिक्षा दिली आहे."

महाराजांच्या मुखांतून शिक्षा उच्चारली जातांच नोकर लोक केयूर कवीला उद्यान-मंदिरांत घेऊन गेले. दुसऱ्या दिवसापासून कवीची एकान्त-वासांतली खडतर दिनचर्या सुरू झाली. त्याच्या अंतःकरणांतील विरहाग्नीचें दुःख अधिक वाढण्याकरितांच कीं काय, त्याचा पूर्वीचा शृंगारमहालच फक्त त्याला राहण्यासाठीं ठेवला होता.

माणसाच्या आयुष्यांतील अत्यंत सुखाचा काळ— स्वर्गसुखालाहि तुच्छ लेखण्याइतक्या सुखांचा काळ—म्हणजे तारुण्य; आणि तारुण्यांतलें सुख म्हणजे अनुरक्त स्त्रीसहवास. मग त्याचाच अशा तऱ्हेनें नाश केल्यावर कोणाला दुःख होणार नाहीं ? केयूर कवि तर अत्यंत रसिक आणि त्या मानानेंच स्वभावाचा हळवा म्हणून त्याचे ते दिवस अत्यंत दुःखांत जाऊं लागले. मणिमालेच्या विरहानें त्यानें अन्नपाणी वर्ज्य केलें. त्याच्या मुखा-वरची आनंदी छटा पार कोठच्या कोठें मावळली. मेघदूतांतल्या विरही यक्षाप्रमाणें त्याची स्थिति झाली. त्यामुळें त्याला त्या विलासमंदिराचा आणि त्याच्या भोंवतालच्या बागेचा अत्यंत वीट आला. तो आतां चुकून-

सुद्धां बागेंत फिरकेनासा झाला. आपल्या दृष्टीसमोर दिसून मनाला ताप होऊं नये म्हणून त्यानें त्या विलासमंदिरांतील सर्व सुंदर वस्तु एका खोलींत भरून ठेवल्या, आणि तो भव्य दिवाणखाना एखाद्या तापशाच्या मठीसारखा करून ठेवला.

ज्या प्रमाणांत त्याला विरहव्यथा जाणवूं लागली त्याच प्रमाणांत त्याचा नीलमणीबद्दलचा संताप वाढत जाऊन त्याची परिणति नीलमणी-बद्दलच्या निंदाव्यंजक काव्यांत झाली. राजा या दृष्टीनें 'नीलमणि कसा असावयाला हवा होता, आणि तो खरा आहे कसा' हा त्या काव्याचा विषय होता. त्याच्या भेटीसाठीं नीलमणीच्या परवानगीनें त्याच्याकडे वारंवार जे पंडित येत त्यांजकडून त्यानें त्या काव्याला पोषक अशी नीलमणीसंबंधींची बरीच माहिती प्रथम मिळविली, आणि नंतर तें काव्य लिहिण्यास घेतलें. मधून मधून भेटीस आलेल्या विद्वान् रसिकांस तो त्या काव्यांतील कांहीं भाग वाचून दाखवीत असे. त्याना तें अत्यंत आवडे, आणि वारंवार ते त्याचा गुणगौरव करीत.

शान्त वेळीं तो त्या दिवाणखान्यांतल्या एका प्रशस्त खिडकीशेजारीं आसनावर बसत असे. तेथून फार दूरचा प्रदेश त्याच्या दृष्टीच्या टप्प्यांत येत असे. तेथूनच नीलमणीच्या भव्य प्रासाद-शिखरावर फडकणारा विजयध्वज दिसत असे.

केयूर कवीचें तें काव्य आतां संपत आलें होतें. एक दिवस तो असाच त्यासंबंधीं विचार करीत असतां सहज त्याचें लक्ष त्या विजयध्वजाकडे गेलें. त्याबरोबर त्याच्या काळजांत एकदम धस्स झालें. कारण त्या ठिकाणीं आज तो नेहमींचा ध्वज नसून अशुभसूचक असें निशाण फडकत होतें.

'महाराज नीलमणीवर काय बरें संकट आलें असावें ?' असा तो विचार करूं लागला. त्यामुळें त्याच्या काव्याचा विषय त्याला केव्हांच सोडून जाऊन, त्याच एका विचारानें त्याचें मन अस्वस्थ झालें. त्यामुळें त्याला कांहीं सुचेना. तो खिन्न मुद्रेनें त्या निशाणाकडे सारखा बघत होता. इतक्यांत त्याच्या नित्य परिचयाचे कांहीं पंडित येऊन त्याच्यापुढें उभे राहिले. त्यांची मुद्रा प्रसन्न दिसत होती. केयूर कवीने त्या अशुभ वर्तमाना-ची पृच्छा करण्याच्या आंतच त्यांनीं मोठ्या आनंदानें, 'नीलमणि शिकारींत वन्य पशूकडून मारला गेला' अशी वार्ता सांगितली. त्याबरोबर त्याची

च्यां खर्रकन उतरली. तो अत्यंत कष्टी झालेला पाहून त्याला सोडविण्या-साठीं आलेल्या मंडळींना आश्चर्य वाटलें. वास्तविक त्यांच्या अपेक्षेप्रमाणें 'याला आपण बंदिवासांतून मुक्त करण्यासाठीं आलों म्हणून आनंद होईल' असें वाटत होतें, पण तसें कांहींएक न होतां तो उलट अत्यंत खिन्नच झालेला पाहून ते त्याला म्हणाले, "केयूर कवि, आतां आपल्या काव्याचा ऊर्जितकाल आला. आम्ही असल्या सुंदर काव्यावर आपल्याला लक्षावधि रुपये आणि त्रिखंड कीर्ति मिळवून देऊं."

"सद्गृहस्थ हो," तो शान्तपणें म्हणाला, "मजबद्दल आपण जी एवढी कळकळ दाखविलीत त्याबद्दल मी आपला अत्यंत आभारी आहें. आतां आपण काव्यासंबंधीं म्हणालात, पण त्याचा शेवट अद्याप व्हावयाचा आहे. तो आतांच आपण करूं."

सर्वांना वाटलें, 'शेवटचे कांहीं श्लोक राहिले असतील आणि ते आतां पुरे करून देतील.'

केयूरानें एका चंदनाच्या पेटींतून रेशमी रुमालांत बांधलेल्या भूर्ज-पत्रांचें एक भलें मोठें बाड काढलें आणि मंडळी बसली होती तेथें तें आणून त्यानें त्याला स्वहस्तें अग्नि लावून दिला! त्याचें तें विचित्र कृत्य पाहून सर्व आश्चर्यानें ओरडून म्हणाले, "केयूर कवि, तुम्हीं हें काय केलेंत? इतक्या दिवसांचे श्रम व्यर्थ नाहीं का गेले?"

"होय; ते व्यर्थ गेले म्हणूनच मीं हें असं केलं." कवि खिन्नतेनें म्हणाला, "माझ्या श्रमांचा मोबदला फक्त नीलमणींकडूनच मला मिळाला असता; पण दुर्दैवानं ते गेल्यामुळं माझ्या त्या आशेचं निर्मूलन झालं आहे. मित्र हो, मला द्रव्याच्या रूपानं मोबदला नको होता अथवा त्यांनीं हें काव्य वाचून माझा बहुमान करावा अशीहि माझी अपेक्षा नव्हती; तर त्यांना माझ्या या काव्यांत त्यांचं प्रतिबिंब दिसावं आणि त्यायोगें त्यांनीं आपलं चुकलेलं पाऊल मागं घ्यावं हा माझ्या काव्यलेखनाचा उद्देश होता. आणि माझी खात्री होती कीं, त्यांनीं हें जर ऐकलं असतं तर माझ्या अपेक्षेप्रमाणं मला खचित त्याचं फळ मिळालं असतं. दुर्दैवानं तसा योग जुळून आला नाहीं. आतां काय त्या मृतात्म्याच्या निंदेवर मी लौकिक मिळवूं? उत्तर-कार्यासाठीं आणलेल्या साहित्यावर मंगलकार्य उरकून घेणारे कोण भाग्यवान् असतील ते असोत. माझ्याच्यानं तें कदापि होणं शक्य नाहीं." इतकें

बोलून पुनः एकवार खिन्नपणें त्यानें त्या मंद होत असलेल्या अग्नीकडे पाहिलें आणि जड पावलानें तो मंदिराबाहेर पडला !



# कवि आणि कुत्रा : : १९

तो एक सर्वत्र प्रख्या पावलेला कवि होता. त्या प्रसिद्धीबरोबरच अनेक मोठमोठ्या विद्वान् व धनवान् लोकांशीं त्याच्या ओळखीपाळखी बऱ्याच झालेल्या होत्या. ह्या ओळखीपाळखी होण्याचें मुख्य कारण त्याचें सुरेल कठाचें कवितागायन होय.

विद्वान् मर्मज्ञ लोकांना त्याच्याविषयीं पुष्कळ आदर वाटे; कारण तो प्रतिभाशाली कवि होता. प्रतिभेपुढें पढिक विद्वत्तेची काय मातब्बरी ? हें ओळखून विद्वान् लोक त्याला तो स्वतः विद्वान् नसतांहि मान देत. परंतु त्याला त्या मानाची मोठीशी पर्वा वाटत नसे. त्याला वाटे, आपणहि एक बडे विद्वान् आहों व शिवाय प्रतिभाशाली कवि आहों. आपण बरोबरीच्या पढिक विद्वानांची इतकी प्रतिष्ठा कां म्हणून मानावी ?

श्रीमान् संस्थानिकांना—राजे-रजवाड्यांना त्याचें कवितागायन ऐकून आनंद वाटे; ते त्याला करमणुकीसाठीं वारंवार कवितागायनाकरितां निमंत्रण देत, व तोहि हौसेनें त्या निमंत्रणाचा स्वीकार करी. आपण जेवून झाल्यावर भिकाऱ्याला अथवा दारच्या कुत्र्याला घांसभर अन्न ज्याप्रमाणें टाकतों त्याप्रमाणेच श्रीमंतांपाशीं कवि, गवई वगैरे गुणिजनांची किंमत असते. कारण श्रीमंतांना संपत्तीच्या जोरावर जसे कुत्रे तसेच कवि, गवई वगैरे पाळतां येतात अथवा मिंधे करून ठेवतां येतात. हें सारें त्याला जरी माहीत असलें, तरी तो तिकडे लक्ष न देतां, श्रीमंतांकडून आपल्या काव्य-गायनाप्रीत्यर्थ अथवा काव्यरचनेप्रीत्यर्थ काय मोबदला मिळे त्यासाठीं, शितांकरितां भुतें नाचतात तसा नाचे. त्यानें अशा अनेक श्रीमंतांवर—राजे-रजवाडयांवर स्तुतिपूर्ण कविता रचून त्यांचें गायन करून थोडीशी माया जवळ केली होती. आणि वर्तमानपत्रें तर आपले रकाने भरून काढण्यासाठीं त्याचे

फोटो आणि त्याचीं वशिलेबाज स्तुतिवर्णनें छापून त्याच्या नांवाची फुकट जाहिरात करीत होतीं.

अशाच एका प्रसंगीं त्याच्या परिचयाच्या, म्हणजे त्यानें भरमसाट स्तुति करून परिचय करून घेतलेल्या संस्थानिकाच्या राजवाड्यांत पोलिटिकल एजंटसाहेबाचें आगमन व्हावयाचें ठरलें. त्या समारंभानिमित्त अनेक मोठमोठ्या संस्थानिकांना व सरदार इनामदारांना निमंत्रणें होतीं. त्यांतच त्याला—अर्थात् तो कवि म्हणून कवितागायनार्थ निमंत्रण होतें.

त्याला वाटलें, कीं आतां आपलें एवढ्या मोठ्या राजमंडळासमोर—त्यांतल्या त्यांत सर्व संस्थानिकांची सासूबाई जे पोलिटिकल एजंटसाहेब त्यांच्यासमोर कवितागायन होणार! हें आपलें केवढें मोठें भाग्य उदयाला आलें! तो लगेच आपल्याच हातानें आपली पाठ थोपटून हर्षभरानें सायकलीवर स्वार झाला, व जो कोणी इष्टमित्र भेटेल त्याला तें निमंत्रणपत्र दाखवीत सुटला. अर्ध्या वाटेंत सायकलींतील हवा निघून सायकल नादुरुस्त झाली. त्याबरोबर सायकल तशीच एका दुकानांत दुरुस्तीला टाकून भाड्याचा टांगा त्यानें केला व सर्व इष्टमित्रांचीं घरें—कचेऱ्या—हॉटेलें पालथीं घातलीं.

आणि सायंकाळीं तो ठरल्या वेळीं राजेसाहेबांच्या बंगल्यावर गेला. त्यानें दरवाजांत पाऊल टाकतांच राजेसाहेबांचा कुत्रा त्याच्याकडे डोळे वटारून पाहूं लागला. मुक्या जनावराचे मनोभाव ओळखण्याऱ्या कोणा पशुमानसशास्त्रज्ञानें तेव्हां जर त्या कुत्र्याकडे पाहिलें असतें तर त्या दरिद्री कवीनें आंत पाऊल टाकतांच, आपणाला नमस्कार केला नाहीं त्यामुळें आपला अपमान झाला, या जाणिवेनें तो कुत्रा चिडल्याचें त्या मानसशास्त्रज्ञाला दिसून आलें असतें. बरोबरच आहे. तो कुत्रा झाला तरी राजेसाहेबांचा आवडता कुत्रा!

कुत्रा रागावलेला पाहून तो कवि आपलें कवितांचें बाड खांकोटीला मारून दूर दरवाजाबाहेर थरथर कांपत उभा राहिला. तोंच राजेसाहेबांनीं चटकन् तिथें येऊन कुत्र्याला आवरलें, व कवीला बैठकखान्यांत योग्य जागीं बसविण्याची सूचना आपल्या कारभाऱ्यांना दिली. कारभाऱ्यांनीं आपल्या चपराशाकडे पाहिलें व चपराशानें कवीला अगदीं मागच्या रांगेवर एका कोपऱ्यांत नेऊन बसविलें.

पोलिटिकल एजंटसाहेब यावयाला अजून पांचदहा मिनिटें अवकाश

होता. तेवढ्या वेळांत राजेसाहेब व इतर राजशाही पाहुणे त्या कुत्र्याला कुरवाळून खेळविण्यांत दंग होते. त्या कुत्र्यानें लाडिकपणाच्या भरांत तीन-चार राजामहाराजांचीं तोंडेंहि चाटलीं; पण त्यांना त्यांत आनंदच वाटला. कवि कोपऱ्यांतून तें सारें पाहत होता.

ठरल्या वेळीं पोलिटिकल एजंटसाहेबांची मोटार आल्याची इषारत मिळाली. त्यांच्या स्वागतार्थ यजमान राजेसाहेब व इतर सर्व पाहुणे सामोरे गेले. हलकेसलके शिपाईप्यादे मात्र जागच्या जागींच अदबीनें उभे होते; व कवि सामोरा जाऊं लागला तेव्हां एका शिपायानें त्याला पुढे न जाण्याला सूचना केली.

" कां ? " कवीनें रागानें विचारलें.

" राजेसाहेब रागावतील; फालतुक माणसांनीं सामोरें जावयाचें नाहीं." शिपाई उत्तरला.

कवि हिरमुसला होऊन जागच्याजागीं बसला.

महाराज बडया पाहुण्यांना सामोरे निघाले तेव्हां त्यांचा आवडता कुत्राहि नेहमींच्या संवईप्रमाणें पुढें पुढें धांवूं लागला. त्याची नेहमींची लाडीकपणाची खोडच, कीं राजेसाहेबांच्या मोटारींत राजेसाहेबांच्या अगोदर जाऊन बसावयाचें. त्या झोकावर तो आजहि पुढें धांवला.

तेव्हां राजेसाहेबांची मोठीच तारांबळ उडाली. त्यांनीं त्या कुत्र्याला आवरावें कीं बडया पाहुण्यांचें स्वागत करावें ? तरीहि ते प्रथम समजुतीनें व त्या समजुतीचा कांहीं उपयोग होत नाहीं असें पाहून मग रागानें कुत्र्याला मागें जावयाला सांगत होते; पण कुत्रा कांहीं केल्या ऐकेना. राजेरजवाडयां-सारख्या थोर लोकांच्या क्षणोक्षणीं पालटणाऱ्या लहरी त्यांच्या सभोंवारच्या माणसांनाहि कळत नाहींत, तर त्या कुत्र्यासारख्या अजाण प्राण्याला काय कळणार ?

अखेर अगदीं निरुपाय झाला तेव्हां राजेसाहेबांनीं कुत्र्याला रागाच्या भरांत जोरानें एक लाथ हाणली. आपला धनी— आपले त्याच्यावर इतकें प्रेम असतांना व आपणाला नेहमीं अंगाखांद्यावर घेऊन कुरवाळीत असतांना, आज गोऱ्या कातडीचा एक बडा पाहुणा आला, त्याच्यादेखत त्या धन्यानें आपणाला लाथ मारली, ह्या अपमानाच्या जाणिवेनेंच कीं काय, बिचारा कुत्रा मुकाटपणें तेथून उठला व धन्याची शिग्रामगाडी ठेवण्याच्या तबेल्यांत

वळचणीच्या आडवशाला जाऊन बसला. त्याला धन्याची लाथ कांहीं फारशी जोरानें लागली नव्हती. पण त्या लाथेच्या मारापेक्षां त्या अपमानाच्या वेदनाच त्या कुत्र्याला असह्य झाल्या होत्या.

पोलिटिकल एजंटसाहेब मोटारींतून लव्याजम्यासह खालीं उतरले. यजमान राजेसाहेब व इतर निमंत्रित थोर थोर लोक यांनीं त्यांचें यथोचित स्वागत केले. यजमान राजेसाहेब पाहुण्यांना घेऊन सुशृंगारित बैठकखान्यांत गेले. पाहुणे तेथे सपत्नीक उच्चासनावर विराजमान झाले. सर्व सभासद त्या सभेत अगदीं अदबीने आपापल्या जागीं बसले होते.

कोपऱ्यांत माशा मारीत बसलेल्या कवीला प्रथम वाटलें, कीं आतां पाहुण्यांचे संगीत अभिनंदन करण्याचा मान आपणाला मिळेल. पण नाहीं. तो मान यजमान राजेसाहेबांची एक विधवा बहीण कवयित्री म्हणून गाजली होती तिला मिळाला. तिनें जी कविता तिथें गाऊन दाखविली ती स्वकृत म्हणून, व तिची सर्वांनी मुक्तकंठाने प्रशंसा केली. बड्या पाहुण्यांनींहि त्याबद्दल धन्योद्गार काढले. त्या लोकांना काय माहीत, कीं वहिनीसाहेबांनीं पूर्वोक्त कोपऱ्यांतील कवीला पैसे देऊन त्याच्याकडून ती कविता करून घेऊन पूर्वीच आपल्या नांवावर छापली होती म्हणून!

बरोबर सायंकाळीं तीन वाजतां बडे पाहुणे राजेसाहेबांच्या राजवाड्यांत आले, कलावंतिणीचें नृत्यगायन व परस्परांची प्रशंसा करणारीं भाषणे, अल्पोपाहार, हारतुरे, अत्तर-गुलाब वगैरे सर्व शिष्टाचार आटोपून व यजमानांकडून नजराण्यादाखल भारी किंमतीचा कंठा मिळवून साडेचार वाजतां माघारे गेले. तेव्हां कोठें सर्वांना अंमळ हायसे वाटलें.

लगेच राजेसाहेब आपल्या कुत्र्याचा शोध करूं लागले.

तोंच एका जहागीरदार पाहुण्यांनीं म्हटलें, " अहो, आतां आपण आपल्या कविराजांचें कवितागायन ऐकून जिवाची करमणूक तर करूं या खरी ! "

तोंच दुसरा एक इनामदार पाहुणा म्हणाला, " बडे पाहुणे गेल्यावर त्याच बैठकींत कवितागायनाची शिळी कुरवंडी कविराजाच्या तोंडावरून आपण कशी ओवाळायची ? "

कवीला तें ऐकून वाटलें, कीं हे लोक आतां नसत्या मानापमानाच्या भरीं पडून आपल्या कवितागायनांत खो घालणार. तो लगेच उभा राहून

मोठ्यानें ओरडून म्हणाला, " कांहीं हरकत नाहीं. हा कवि मानापमानाचा भुकेला नसून रसिकांच्या सेवेचा भोक्ता आहे."

अखेर त्या सभेच्या उष्ट्या पत्रावळीवर त्या कवीनें पोटभर कविता-गायन ओरपलें. शेवटीं सर्वांचा निरोप घेऊन आनंदाने तो बाहेर पडला.

राजेसाहेब आपल्या आवडत्या कुत्र्याचा शोध करण्यांत गुंतले असल्यानें ते कवीला निरोप देऊं शकले नाहींत.

कवि जो तेथून बाहेर पडला, तो त्यानें प्रथम आपल्या बिऱ्हाडीं जाऊन आपल्या कवितागायनाचा सुरस अहवाल लिहून काढला व टेबलाच्या खणांतून आपल्या फोटोचा ब्लॉक शोधून काढून तो ब्लॉक आणि तो अहवाल खिशांत टाकून तो तडक सायकलीवर बसून 'बुद्धिप्रकाश' दैनिकाच्या कचेरींत गेला. लगेच त्यानें आपल्या फोटोचा तो ब्लॉक व तो अहवाल खिशांतून काढून त्या ओळखीच्या संपादकापाशीं दिला.

" फार उशीर झाला बुवा! उद्यांचा बहुतेक अंक तयार झाला आहे; आतां कसं करूं ? नुसता हा मजकूर घालूं म्हणाल तर उद्यांच्या अंकांत घालतां येईल. पण फोटो जर यायला हवा असेल, तर मात्र परवां!" संपादक म्हणाला.

" हरकत नाहीं, पण फोटो आणि मजकूर एकदम येऊं द्या. त्याखेरीज मजा नाहीं. तुम्हीच म्हणतांना, कीं 'चित्रांनीं चित्त वेधतें'."

याप्रमाणें संभाषण झाल्यावर कवि आपल्या बिऱ्हाडीं माघारा गेला.

इकडे राजेसाहेबांना दुसऱ्या दिवशीं सकाळीं त्यांच्या कुत्र्याचा शोध लागला. पण तोहि तबेल्यांतील वळचणीला मरून पडलेला!

राजेसाहेबांना त्यांच्या कुत्र्याचा मानी स्वभाव माहीत होता. त्यांनीं ओळखलें, कीं त्याला कालचा अपमान असह्य झाल्यामुळें त्यानें त्रागा करून आत्महत्या केली असावी!

आधींच तो राजेसाहेबांचा कुत्रा, तशांत त्यानें स्वाभिमानपूर्वक आत्म-हत्या केलेली! कस्तुरीच्या परिमलाप्रमाणें ती वार्ता हां हां म्हणतां सर्वत्र पसरली व निरनिराळ्या वर्तमानपत्रांचे बातमीदार आपापल्या फोटोग्राफरां-सह त्या कुत्र्याचा फोटो घेण्यासाठीं राजवाड्याकडे धांवले. परंतु कुत्र्याचा खास फोटो आपल्या मनाजोगा अगोदरच त्या कुत्र्याचें प्रेत मऊ मखमली-च्या खुर्चीवर बसवून राजेसाहेबांनीं आपल्या खास फोटोग्राफरकडून काढवून

घेतला होता. आणि तो प्रसिद्ध करण्याचा मान 'बुद्धिप्रकाश' पत्राच्या वतीनें मोठमोठे वशिले लागल्यामुळें त्या पत्राला प्रथम मिळाला.

लगेच राजेसाहेबांचे कारभारी राजेसाहेबांच्या तांतडीच्या आज्ञेवरून 'बुद्धिप्रकाश' दैनिकाच्या संपादककचेरींत गेले. संपादकांनीं तो फोटो घेऊन दुसऱ्या दिवशींच्या अंकांत छापण्याचें आनंदानें कबूल केलें, व तो फोटो तावडतोब ब्लॉक करण्यासाठीं पाठविला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं कवि आपला गुणगौरव व फोटो प्रसिद्ध झाला कीं नाहीं हें पाहण्यासाठीं पहांटेलाच उठून 'बुद्धिप्रकाश'चा ताजा अंक विकत घेऊन उघडून पाहतो, तों त्याला त्याच्या स्वतःच्या फोटोपाशींच त्या कुत्र्याचा फोटो त्याच्या मानीपणाच्या वर्णनासह छापलेला दिसला!



# काकूंचे देव : : २०

शंकर गेल्यापासून आमच्या सासूबाईंची, ज्यांना मी काकू म्हणत असे त्यांची, प्रकृति बरीच ढांसळली; आणि त्यांत कमळाकरानें तो प्रकार केला तेव्हां तर आगींत तेल पडल्यासारखें झालें. त्यांच्या मनावरहि अनिष्ट परिणाम घडून त्यांचें मन वैराग्यशील झालें. ज्या बाईला घरांतलें काम संपतें केव्हां आणि आपण पोचारा–तेरा करण्यास सोंगट्यांच्या अड्डयांत जातों केव्हां असें व्हावयाचें, तिचें दर्शन तिच्या खास मैत्रिणींसदेखील तेरातेरा दिवसांत दुर्मिळ होऊं लागलें.

" काकासाहेब, इतक्या पहांटे टाळ कुटून लोकांची झोंप मोडणारी ही कोण बाई आहे?" पहांटे चार वाजतां भजनाच्या कटकटीनें जागा होऊन मी काकासाहेबांस विचारिलें.

" आवाज तुम्हांला ओळखीचा वाटत नाहीं काय?" त्यांनीं विचारलें व दोनतीन मिनिटें तर्क करण्यास मला अवधि दिला; परंतु मला कांहींच तर्क करतां येईना. त्यांतून सातान्यास मी नवखा असल्यानें शेजाऱ्यापाजाऱ्यांचीं नांवें तरी मला कशीं माहीत असणार?

थोडा वेळ मला तर्क करण्यास देऊन काकासाहेब म्हणाले, " या तुमच्या सासूबाईच आहेत."

हें ऐकून मला फार आश्चर्य वाटलें. काकासाहेब नास्तिक असल्यामुळें त्यांच्या घरांत एक तुळस खेरीजकरून देवाचें कोणतेंहि प्रतीक नव्हतें. तथापि काकूंनीं जनलज्जेस्तव तुळशीखालीं दत्ताच्या पादुका, शिवलिंग आणि नंदी अशा दगडी मूर्तींची स्थापना केली. त्या मूर्तींवरून नवराबायकोंचे कित्येक खटके उडाले; आणि एकदां काकासाहेबांनी नवरेपणाचा हक्क गाजवून त्या सर्व पाषाणांना मंगळवारच्या तलावांत जलसमाधि पण दिली. तेव्हांपासून काकूंची देवपूजा नुसत्या तुळशीच्या वांट्यास येऊं लागली. 'या देवाला जर दुसरे देव घरांत पाहून त्यांचा मत्सर वाटूं लागला तर मी तरी बाई त्यांना घरांत कशाला बाळगूं?' असें उत्तर आपल्या मैत्रिणींस देऊन त्या आत्मसमर्थन करीत असत.

तथापि एका मुलाचा मृत्यु आणि दुसऱ्यानें आज्ञाभंग करून आई-बापांच्या मर्जीविरुद्ध केलेला विवाह या दोन संकटांनंतर काकूंचें मन फारच हळवें बनलें. घरीं देवधर्म नसल्यानें व उभ्या वर्षांत सवाष्ण-ब्राह्मणांचा हात घरांत भिजत नसल्यानें हीं संकटें कोसळलीं असें त्या स्पष्ट म्हणूं लागल्या. सरतेशेवटीं कुलोपाध्याय वेदमूर्ति दिवाकरशास्त्री यांच्याकरवीं त्यांनीं घरांत पंचायतनाची आणि इतर देवदेवतांची प्राणप्रतिष्ठा केली. देव-घराचा उपयोग गेलीं वीस वर्षें धान्यधुन्य ठेवण्याकडे होत असे ते पुनः ज्यांचें त्यांस मिळालें. शिसवीचा सुंदर काळा देव्हारा, दोन बाजूंस उंच पितळी समया, त्यांत चांदीच्या आसनावर ठेविलेले देव, चांदीची मोठी घंटा, चांदीच्या अडणीवर ठेविलेला शंख, चकचकीत उपकरणीं वगैरे सरंजामानें देवघर प्रफुल्लित दिसूं लागलें. प्रथम प्रथम भटजी पूजा करीत व काकू फक्त हळदकुंकू व फुलें वाहण्यास येत, परंतु हळूहळू शास्त्रोक्त पूजा मात्र भटजींकडून करून घेऊन भक्तिभावानें अनौपचारिक पूजा करण्यांत काकू तासानुतास गर्क होऊं लागल्या.

वरील सर्व हकीकत अंथरुणांत पडल्या पडल्याच काकासाहेबांनीं मला सांगितली, व मला म्हटलें, " आप्पासाहेब, चला आपण दोघे खालीं जाऊन या संतीणबाईचें भजनपूजन पाहूं या." माझी झोप उडालीच होती व संतिणींची महाराष्ट्रांतली ही शेवटलीच पिढी असल्यानें त्यांचें भजनपूजन

पाहण्याचीहि मला उत्कंठा होती. म्हणून आम्ही दोघे पाय न वाजवितां खालीं जाऊन देवघराच्या बाहेर अंधारांत उभे राहून काकूंच्या भक्तीचा थाट पाहूं लागलों.

देव्हाऱ्यासमोर संत काकूबाईची स्वारी पांढरें पातळ नेसून मृगाजिनावर विराजमान झालेली होती. त्यांनीं कपाळास व हातास भस्म लाविलेलें असून गळ्याभोंवतीं तुळशीची माळ घातलेली होती. एका हातांत एकतारी व दुसऱ्यांत चिपळ्या घेऊन त्यांच्या तालसुरावर त्यांनीं भजनाचा सपाटा चालविलेला होता. दोनचार अभंग म्हणणें झाल्यावर त्यांनीं—

" अनुदिनीं अनुतापें तापलों रामराया "

असें म्हणण्यास प्रारंभ केला. काकासाहेबांच्यानें उभें राहवेना म्हणून ते पुढें गेले व म्हणाले, "बायकांनीं व्याकरणांतदेखील समान हक्क प्रस्थापित करण्याचा बेत केला आहे कीं काय? नाहीं तर अनुदिनीं अनुतापें 'तापलों' म्हणण्याऐवजीं तुम्ही 'तापलें' असं म्हटलं असतं. तें असो, पण आज जांवईबुवा घरीं पाहुणे आले आहेत एवढं तरी संतीणबाईनीं लक्षांत ठेवायला नको का?"

काकू निर्विकार मुद्रेनें किंचित् थांबून म्हणाल्या, "आणखी घटकाभरानं माझं भजन संपलं कीं, त्यांच्याच तैनातींत लागत्यें."

उजाडल्यानंतर काकासाहेब व मी माजघरांत झोपाळ्यावर बसलों होतों व काकू समोर पाटावर बसल्या होत्या. काकासाहेबांच्या थट्टेचा विषय काकू आणि त्यांचे देव हाच होता. हल्लींचें निरनिराळ्या देवांचें प्रस्थ माजल्यानंतर एके दिवशीं काकासाहेबांनीं रागाच्या भरांत देवास मुद्दाम ओवळ्यानें स्पर्श केला. त्या वेळीं काकूंनीं जो निर्जळा उपास सुरू केला तो दुसऱ्या दिवशीं दिवाकर भटजींच्या हातून पुनः देवांना आंघोळ घालून आठ गोप्रदानें झाल्यानंतर त्यांनीं मोडला. आपल्या बायकोचा हा कडकडीत निश्चय पाहिल्यानंतर ते तिच्या वाटेस पुनः गेले नाहींत. न जाणो, असल्या सत्याग्रहामुळें काकूंच्या प्रकृतीवरच बेतावयाची! ही आठवण सांगून काकासाहेब म्हणाले, "अशी ही अगदीं हटवादी झाली आहे. तरुणपणीं नवऱ्याची इच्छा अन् आवड तीच आपली इच्छा अन् आवड असं तिचं होतं. लोकांच्या किंवा घरच्या वडील माणसांच्या नांवं

ठेवण्याला न जुमानतां ती माझ्याबरोबर फिरायला येई. हीं सुधारकीं मतं तुला कशीं पसंत पडतात असं कोणीं म्हटलं तर ती म्हणायची, 'तिकडचं जें मत तेंच माझं मत.' पण आतां म्हातारपणीं मात्र माझ्या मताला ती मुळींच जुमानीत नाहीं!"

काकूंनीं शान्तपणें विचारिलें, "मतस्वातंत्र्याचे आपण पुरस्कर्ते आहां ना? मग आतां मी आपल्या मताप्रमाणं देवधर्म करूं लागल्यें तर तो आपल्याला कसा पसंत नाहीं?"

स्त्रियांना मतस्वातंत्र्य असावें, परंतु ज्या ठिकाणीं त्यांचीं मतें पतीच्या मतांशीं जुळत असतील तेवढ्यापुरतेंच तें मर्यादित असावें असें सर्व स्त्रीस्वातंत्र्यवाद्यांस वाटत असतें, अशा अर्थाचे शब्द मी बोललों. काकूंस माझें बोलणें पटलें व त्या म्हणाल्या, "स्वतंत्र विचार करण्याची आणखी वागण्याची मुभा नव्या लोकांनाच असावी आणि जुन्यांना नसावी असं सगळ्या नवीन मतवाल्यांना वाटत असतं."

काकासाहेब अंमळ चिडून म्हणाले, "असलीं भरमसाट विधानं करण्यापेक्षां मी या विशिष्ट बाबतीपुरताच विचार करतों. ह्या धातूच्या आणि दगडाच्या देवांची पूजा करून खरा देव कसा प्रसन्न होणार? 'पाषाणाचा देव बोलेचिना' असं तुकारामानं कीं कोणींसं म्हटलं आहे."

मीहि विचारल्यें, "टिळकांच्या पुतळ्याला हार घालणारे लोक आहेतच ना? तुम्हीच नाहीं का परवां पाठक हॉलमधली किंकेडसाहेबांची तसबीर खालीं उतरवण्याचा लोकांनीं बेत केला असतांना यांत त्यांचा अपमान होतो असं म्हणालांत?"

काकासाहेबांचा स्वभाव अमळ खुशामती होता. परंतु त्याचा कोणी उल्लेख करणें मात्र त्यांस बिलकुल खपत नसे. काकूंनीं असा वर्मी घाव घालतांच ते चिडले आणि म्हणाले, "मुद्देसूद बोलणं हें बायकांना माहीतच नसतं. ती तसबीर म्हणजे कापडावर दिलेले रंगाचे लपेटे इतकाच अर्थ नसून तें किंकेडसाहेबांचं स्मृतिचिन्ह किंबहुना त्यांच्याविषयीं आम्हांला वाटत असलेल्या प्रेमाचं प्रतीक म्हणून समजायचं असतं. पण तुमच्या त्या विद्रूप दगडाच्या आकृत्यांमध्यें परमेश्वराच्या कोणत्या सत्कृत्याचं चिन्ह समजायचं तें मला उमगत नाहीं!"

"तें उमगेपर्यंत तरी आपण स्वस्थ कां बसत नाहीं?" काकू

म्हणाल्या, "या साध्या डोळयांना ज्या आकृति विद्रूप वाटतात त्यांचं खरं सौंदर्य तन्मयता आल्याशिवाय आणि पोटतिडकीशिवाय उमगणं कठीण आहे. आपलं पोर वेडंबागडं,रोगी, नाहीं तर पांगळं जरी असलं तरी त्याच्या आईला तें सुंदरच वाटतं. हा भावनेचा खेळ आहे. बुद्धि इथं काम द्यायची नाहीं!"

पूर्वी काकूंचें बोलणें मीं अनेक वेळां ऐकिलें होतें, परंतु त्या वेळीं त्यांचें मन मानपान, खणनारळ किंवा लग्नेंकार्यें या विषयांच्यापेक्षां अधिक उंच उडी घेत नसे. रोजच्या व्यवहारांत लागणाऱ्या शब्दांपेक्षां त्यांची शब्दसंपत्तिहि जास्त विपुल नव्हती; परंतु आतां त्यांचे विचार बरेच प्रगल्भ झाल्यासारखे मला वाटले. मी कांहीं फारसा विद्वान् नाहीं, त्यामुळें त्यांच्या भाषणाचा खरा परीक्षक होण्याची माझी लायकी नाहीं. परंतु कोणत्या तरी हुशार गुरूच्याजवळ काकू तयार झाल्या असाव्या असें मला वाटलें.

"आपल्याला हे देव नकोसे वाटत असले तर त्यांची विटंबना मात्र करूं नका इतकंच मला सांगायचं आहे," काकू पुढें म्हणाल्या, "मी आतां वर्षा-दोन वर्षांपेक्षां जास्त जगणार नाहीं असं मला वाटत आहे. माझ्यामागून हे देव काऊताईकडे तरी पाठवून द्या. अगबाई! दूध उताला चाललं वाटतं!" असें म्हणून चटकन् त्या स्वयंपाकघरांत धांवत गेल्यावर काकासाहेब मला हळूच म्हणाले, "पाहिजेत कोणाला हिचीं हीं म्हातारपणचीं खेळणीं! काऊच्यामागं हा देवपूजेचा रगाडा मी कसचा लावतों! वेळ आलीच तर भटजीकडे देव पोंचते करीन नाहीं तर एका झोळींत बांधून माहुलीस कृष्णाय स्वाहा करीन झालं!" (या ठिकाणीं कृष्णायै स्वाहा अशी दुरुस्ती प्रो. दिघे यांनीं सुचविली, परंतु काकासाहेब जें म्हणाले तेंच आतां लिहिलें आहे.)

* * *

वरील प्रकारास एक वर्ष लोटलें. मी पुनः साताऱ्यास एका रविवारच्या सुट्टीस गेलों होतों. काकूंना परलोकवासी होऊन तीन महिने झाले होते. काका घरांत एकटेच राहत असत. अर्थात् नोकर माणसें कामाकरितां होतींच. शनिवारीं संध्याकाळीं मी तेथें पोंचलों व प्रवासाच्या श्रमानें लौकरच झोपीं गेलों. पहांटे पांच वाजतां जागा होऊन पाहतों तों पलीकडील अंथरुणावरून काकासाहेब उठून गेलेले दिसले. मला गत वर्षीच्या काकूंच्या देवांची आठवण झाली, व ते भटजींच्या घरीं गेले असतील

कीं कृष्णार्पण झाले असतील याचा कयास बांधूं लागलों. तथापि काकासाहेबांसारख्या कट्टया नास्तिकानें घरांतच त्यांना आश्रय दिला असेल असा विचारसुद्धां मला शिवला नाहीं.

अमळशानें कांहीं अभंग कानीं पडल्यासारखा मला भास झाला आणि तोहि काकासाहेबांच्या आवाजांत! मला आपल्या कानांवर विश्वास ठेवूं नये असें वाटलें. परंतु इलाज चालेना. एक अभंग सरतांच 'देव करील दया' हें पद, त्यानंतर आणखी एक अभंग, नंतर एक करुणाष्टक अशा क्रमानें भजन चाललें होतें. अगदीं काकूंचा जो भजनक्रम होता त्याच क्रमानें आतांचें भजन चाललें होतें. हा कांहीं तरी स्वप्नासारखा प्रकार असावा असेंहि मला वाटलें; कारण काकांसारखा नास्तिक पहांटे उठून स्वतःस काल्पनिक वाटणाऱ्या ईश्वराला असा आळवील अशी कल्पना कोणत्याहि समंजस माणसास होणें अशक्य होतें.

शेवटीं मनाची खात्री करून घेण्यास मी उठलोंच, आणि जिना उतरून खालीं गेलों. काकू ज्या मृगाजिनावर बसून पूजा करीत त्याच आसनावर अंगास भस्म चर्चून काका मोठ्या प्रेमानें हातांत टाळ व एकतारी घेऊन भजन करीत बसले होते. कांहीं वेळानें त्यांचें भजन संपलें. मी त्यांची कृति पाहण्यास देवघराच्या बाहेर अंधारांत गुपचूप उभा राहिलों होतों.

भजन संपल्यावर त्यांनीं एकतारी व टाळ बाजूस ठेविले आणि देवांची पूजा करण्यास प्रारंभ केला. प्रथम एक एक देव काढून त्या सर्वांस पाण्यांत ठेवून त्यांनीं कुंचल्यानें देव्हारा साफ केला. नंतर एकेका देवास पाण्यांतून काढून त्याची मूर्ति अगदीं काळजीपूर्वक पुसली व ती अलगत तिच्या स्थानावर ठेवून दिली. तान्ह्या मुलास स्नान घालतांना त्याची आईसुद्धां घेणार नाहीं इतक्या काळजीनें देवांचा स्नानविधि चालला होता. तोंडानें मंत्र पुटपुटणें चालूं होतेंच. सर्व देव यथास्थित ठेविल्यावर 'अरे फुलं राहिलीं!' असें आपल्याशीं पुटपुटून ते देवघराबाहेर निघाले. अर्थात् मी बाहेरील अंगास उभा होतों तेथें त्यांनीं मला पाहिलें व मला ते म्हणाले, "काय अप्पासाहेब, केव्हां आलांत खालीं? झोप तर मोडली नाहीं ना आमच्या भजनानं?"

मला आतां हसूं आवरेना. "काकासाहेब, ज्या गोष्टीकरितां तुम्ही काकूंना चिडवीत होतां ती आतां स्वतःच कशी करतां?"

"त्याचं कारण जराशानं सांगतों, थांबा." असें म्हणून ओसरीवरील कोनाड्यांत फुलांचा पुडा होता तो घेऊन येऊन व मला देवघराच्या दाराबाहेर बसण्यास पाट देऊन ते पुनः मृगाजिनावर बसले आणि फुलांचा पुडा सोडीत, "हं तुमचं काय म्हणणं? मी नास्तिक आणि त्यांतल्या त्यांत मूर्तिपूजेचा विरोधक होतों; असं असून या देवांची पूजा कां करीत आहें, हेंच कीं नाहीं?"

मीं मानेनें होकार दिला.

"ही पूजा मी कोणाची करीत आहें असं तुम्हाला वाटतं? या धातूच्या किंवा पाषाणाच्या मूर्तींतच काय पण जगांत कोठल्याहि जागेंत देवत्व आहे असं मी समजत नाहीं, परंतु हीं प्रतीकं समजून मी यांची पूजा करीत असतों."

"पण जर परमेश्वरच तुम्हांला कबूल नाहीं तर हीं प्रतीकं कोणाचीं समजायचीं!" मीं विचारिलें.

"हीं माझ्या मृत पत्नीवरच्या प्रेमाचीं प्रतीकं, आणि ह्या देवांची पूजा म्हणजे माझ्या पत्नीच्या भोळ्या पण प्रामाणिक समजुतीचा गौरव असं मी समजतों. या लंगड्या बाळकृष्णानं शंकराप्रमाणं तिला शोकसागरांत सोडून दिलं नाहीं किंवा कमलाकराप्रमाणं तिच्या हृदयाला धक्का पोंहोचविला नाहीं म्हणून याच्यावर तिचा आईप्रमाणं लोभ होता. ही पार्वती तिला प्रिय मैत्रिणीसारखी वाटत होती, आणि हे सर्व देव तिच्या सरळ न् दुःखी मनाला समाधान प्राप्त करून देत होते. तेव्हां त्यांचा मलाहि लळा लागावा यांत काय नवल आहे!"

वरील शब्द बोलतांना त्यांचा कंठ भरून आला होता. बोलणें संपवून पुढील पूजाविधीस प्रारंभ करण्यापूर्वी त्यांनीं देवांच्या अंगपुसण्यानें स्वतःचे डोळे पुसून घेतले.



# कानफाट्या ! : : २१

" काय ? आज तरी पत्रबित्र कांहीं सिंगजीचं ? सकाळच्या डिलिव्हरीला कांहीं नव्हतं पण आतांच्या तरी ? "

गोपिकाबाईंनीं मुकाट्यानें मान हालवून 'नाहीं' म्हणून पतिराजांच्या प्रश्नाला उत्तर दिलें. गोपाळराव किंचित् हंसले.

" कां ? अगदीं हसूंसं आलं ? मुद्दामच हसायचं, होय ? आलं असतं तर खालीं दुकानांत पोस्टमननं नसतं वाटतं दिलं ? "

" माझ्या नांवचं असतं, तर जरूर दिलं असतं!" स्मितपूर्वक गोपाळराव म्हणाले, " पण बंधुराजांनीं जर प्रेमाच्या बहिणाबाईंनाच पाठवलं असलं तर तें आम्हांला कसं मिळणार ? म्हणून विचारायचा अपराध जाणूनबुजूनच केला मीं ! पण नाहींच म्हणतां आलं, अं ? कानफाटसिंगजींना गोळवलीला जाऊन आजचा दिवस कितवा बरं ? शनिवार शनिवार आठ, रविवार, सोमवार, मंगळवार–आज अकरा ! इतक्या दिवसांत मीं विलायतला जाऊन आलों असतों, समजलीस ? पण स्वारीचा पत्ता तर नाहींच, पण दोन ओळींचं सुखरूप पोंचल्याचंदिखील पत्र नाहीं ! "

" पुरुषांचं तरी अति म्हणजे अतीच ! " गोपिकाबाई कांहींशा चिडक्या स्वरांत म्हणाल्या, " नसेल झालं काम–अन्— "

गोपाळराव खोखो हंसून म्हणाले, " काम व्हायचं नाहीं हें तर नक्कीच ठरलेलं आहे ! त्याबद्दल मला कधींच शंका नव्हती ! बोलूनचालून कानफाटसिंग ! एखादं काम सरळ स्वारीच्या हातून, होईल म्हणजे काय गोष्ट आहे ! "

रागानें मान वेळून गोपिकाबाई म्हणाल्या, " आपलं एकाद्याचं नांव पडलं म्हणजे पडलं ! इकडेच जर चिंतूला हरहमेश 'कानफाट्या', 'कानफाटसिंग', 'कानफाटराव' म्हणून म्हणायचं तर लोक काय––म्हणणारच ! दुसऱ्याचं उणं काढायला जग टपून बसलंच आहे ! "

गोपाळराव बायकोच्या या बोलण्यानें मुळींच चिडले नाहींत. बोंचकपणें हंसून ते म्हणाले, " उगीच बरं कोण जगाला उणं काढूं देईल ? उगीच उणं कुणीं काढलं तर त्याचं दुणं नाहीं का निघणार ?

तुझ्या भावाला इथं तूं मुंबईत आणलास, अन् मला कामकाजांत मदत करायला म्हणून आपणाजवळ ठेवलास, त्याला आज जवळजवळ वर्ष होत आलं. पण इतक्या अवधींत अमुक एका जबाबदारींतून चिंतूनं मला सोडवलं, असं तूं तरी सांग बरं मला. मुंबईला राहून इथला सोकाजीपणा, चैन, चंगीभंगीपणा हीं मात्र स्वारीनं शंभर टक्के बेमालूम उचललीं आहेत! घमेंडखोरी अन् बाताडेपणा यांत तुझा भाऊ कुणालाहि हार जायचा नाहीं! शिवाय, अमुक एका कामांत त्याची लुडबुड नाहीं असं नाहींच! ज्यांत त्यांत हा आपला नाक खुपसायचा, अन् हमखास त्यांत पुरं अपेश घेऊन यायचा हें ठरलेलं. मग तुझ्या बंधुराजांना 'कानफाट्या' हें नांव सहजच पडलं तर त्यांत आश्चर्य काय? तुला राग येतो म्हणून कुणी बोलत नाहीं इतकंच—!"

"कांहीं तरी आपल्या माणसाला बोलायचं झालं! अन् त्याला कांहीं सीमा? चिंतू खरोखरच कांहीं इतका हा नाहीं—पण इकडेच त्याला 'कानफाट्या, बनविलं आहे—दुसरं काय?" गोपिकाबाई अमळ झणकाऱ्या-नेंच म्हणाल्या.

"मींच चिंतुला बनवलं कानफाट्या? हाः हाः!" खूप हसून गोपाळ-राव म्हणाले, "प्रत्येक महत्त्वाच्या कामांत आपल्या मूर्खपणामुळं अपेश घ्यायची त्यानं कधींच संधि दवडली नाहीं, म्हणून त्याचं त्यानंच हें नांव कमावलं आहे, समजलीस? हेंच पहा आतां! गोळवलीला आमच्या घरा-लागून असलेली मोठी थोरली भाटयांची शेतजमीन विक्रीला निघाली आहे, असं ऐकतांच मी त्रिंबकरावांना तिकडे पाठवणार होतों रक्कम देऊन. कारण मला जायला तूर्त अवकाशच नव्हता. पण सिंगजींचा आग्रह पडला, कीं मी सौदा थोडक्यांत पाडून काम येतों फत्ते करून, अन् तुझाहि त्याबद्दल आग्रह अतोनात, कीं चिंतूलाच जाऊं दे म्हणून! एकादा जंगी पराक्रम आपल्या भावाच्या हातून करवून दाखवून आम्हां सगळ्यांना चकित अन् खजील करून टाकायची केव्हांपासूनची तुझी इच्छा आहे, हें मला ठाऊक आहे. म्हणून मीहि झालों कबूल पंतांना पाठवायला या मोहिमेवर! कारण काम फसकलं तरी केव्हांहि सुधरून घेतां येण्यासारखं आहे या बाबतींत—चार-पांच हजार रुपये टाकून त्या खेड्यांत एवढी जमीन घ्यायला बसलं आहे कोण म्हणा! शहाणपणानं खबरदारी मात्र एवढी मीं घेतली, कीं

सिंगर्जींबरोबर रक्कम कांहीं मीं दिली नाहीं. चार हजारांपर्यंत सौदा पटत *असला तर मी ताबडतोब इन्शुअरनं रक्कम पाठवून देतों, म्हणून त्यांना मीं सांगितलं—झाले अमळ हिरमुसले तुमचे बंधुराज !—पण तें पत्करलं—"*

"इकडचा मुळीं चिंतूवर भरंवसाच नाहीं, म्हणून नाहीं पाठवली त्याच्याबरोबर रक्कम, दुसरं काय ?" मान हिसडून गोपिकाबाई उद्गारल्या.

गोपाळराव शान्तपणें म्हणाले, "हें पहा, तूंच जरा विचार कर शान्तपणानं. आपल्या भावाबद्दल तुला प्रेम अन् अभिमान असणं साहजिक आहे; पण एवढी थोरली रक्कम त्याच्याबरोबर निःशंकपणं पाठवावी असं तुझं तुला तरी वाटतं का ? एक वेळ धरलं वादाकरितां, कीं तुझे बंधुराज माझा विश्वासघात करून रक्कम स्वतः लुंगावणार नाहींत म्हणून; पण बढाईखोरपणा अन् नसती घमेंड या गुणांमुळं ते कुणाकडून हातोहात फसले जाणार नाहींतच असं मी तरी बुवा म्हणणार नाहीं !"

पतिराजांचा हा मुद्दा बिनतोड आहे, असें गोपिकाबाईंनाहि मनांतून वाटत होतें. परंतु उघडपणें तसें कबूल करणें आपणाला नामुष्कीचें आहे, असा विचार त्यांच्या मनांत येऊन त्यासंबंधानें कांहींच उल्लेख न करतां त्या म्हणाल्या, "गरिबाच्या गुणांची कदर कुणालाच जगांत नसते, तर इकडे तरी कशी असेल ? चिंतूचा इकडे कांहीं उपयोग नाहीं तर द्यावा हाकलून—हवा कशाला दोन वेळ अन्नाचे डोंगर रिचवायला ?" बोलतां बोलतां त्यांचा गळा अगदीं भरून आल्यासारखें झालें.

"भलतंच आपलं तुझं असतं तें असं !" गोपाळराव म्हणाले. "चिंतोबाला तूं जवळ ठेवूं नकोस, असं एका शब्दानं तरी मीं तुला कधीं म्हटलं आहे का ? देवदयेनं मिळताहेत आपणाला दोन पैसे, तर राहीना कां आपणाजवळ तो ? तुझा भाऊ तो माझा नव्हे का कुणी ? पण म्हणून त्याला न झेंपणारीं कामं त्याच्यावर कशीं बरं सोपवावीं ? तूंच सांग—"

गोपिकाबाई कोणत्याहि बाबतींत हटण्यासारखी बायको नव्हती. आणि आपल्या बंधुराजांच्या 'कर्तबगारी'विषयीं खरोखरच तिला जबर अभिमान ! तेव्हां रागावूनच गोपिकाबाई म्हणाल्या, "मेलेलं अन्न गिळीत त्यानं पडून रहावं अशी माझी इच्छा नाहीं, अन् त्याला मी तसं राहूंहि देणार नाहीं. इकडूनच मुळीं जिथं तिथं चिंतूचा न् माझा हिरमोड करायचा, मग येतंयू कशाला उत्तेजन, अन् होणार कसं त्याच्या हातून एकादं

महत्त्वाचं काम ! मी म्हणतें, आपणाला त्याची अजून नीट पारखच नाहीं झाली ! मी अगदीं प्रतिज्ञेनं सांगतें, कीं चिंतू कांहीं असातसा माणूस नाहीं. अन् कधीं तरी मी म्हणतें हें खरं आहे अशी आपलीहि पक्की खात्री होईल. फार कशाला, या भाव्याच्या शेतखरेदीच्या बाबतींतच होईल ! चिंतोबाचं पत्र नाहीं तें उगाच नाहीं ! तो काम खास फत्ते करून येतो आहे--पांच हजारांची जमीन पहा आपल्याच कर्तबगारीनं तो दोन-अडीच हजारांत पदरांत पाडतो आहे कीं नाहीं ती ! ”

गोपाळराव हसत हसत म्हणाले, “ सिंगजींनीं कर्तबगारी दाखविली तर सताड डोळे उघडे ठेवून मी ती आनंदानं पाहायला तयारच आहें ! शिवाय, माझा दोन हजारांचा फायदा त्यानं केला तर एक हजार रुपये मी त्याला देईन रोकड बक्षीस ! बरं पण त्याच्यासंबंधांत तुझ्या माझ्यांत उगाच वाद कशाला ? एक कपभर चहा दे ना ! कोरड पडली अगदीं घशाला मघांपासून--हाः—”

हिरमुसल्या होऊन गोपिकाबाई म्हणाल्या, “ खालूनच दुकानांतून सांगावा आणायला--साखर आजच संपली ! ”

“ वा–शाबास ! ” बोंचक हसून गोपाळराव म्हणाले, ‘माझं चहाचं–हॉटेल--पण मला तिथला बाजारी चहा कधींच आवडत नाहीं, हें ठाऊक असतांनासुद्धां अमळ सावधगिरी तुम्हीं ठेवूं नये ? जरा चार दिवसांपूर्वीं साखरेबद्दल सांगितलं असतं तर ? दुकानांतहि अशी जबरदस्त ओढाताण झाली आहे कीं काय सांगावं ! एक कोथळी तर अवघी आहे शिल्लक कोठींत ! मघाशींच रामूनं सांगितलं मला. दुकानांत दररोज सवा-दीड मण लागते--म्हणजे अवघी चार दिवसांची आहे जेमतेम पुरेशी दुकानांत. पुढं कसं होणार ही मोठी चिंताच लागून राहिली आहे मला. या भयंकर दंग्यामुळं बाजार सारे बंद. जथाबंद साखर आणायची कुठून ? किरकोळ साखर आणून आम्हांला परवडायची नाहीं. शिवाय दर चढा किती भयंकर झाला आहे ! ”

“ म्हणजे ! मला काय माहीत, कीं साखरेचा मेला इतका दुष्काळ पडला आहे तो ! मघांशी मीं शेजारच्या शारदाबाईंना दिली दहा शेर त्या अगदीं खनपटीलाच बसल्या म्हणून ! काय तरी माणसं बाई ! आतां आली कारवाई त्यांची लक्षांत —! ”

"वाः! म्हणजे दुष्काळांत तेरावा महिना! शेजाऱ्यांचंहि आणखी लफडं त्यांतच? बरं, पांच शेर देतों पाठवून खालून, पण अंमळ तेवढीच काटकसरीनं पुरवा अं--नाहीं तर द्याल उसनीपासनी कुणाला! आः! या वेळीं जर हजार एक रुपयांची साखर असती माझ्याजवळ, तर तिचं सोनं केलं असतं सोनं, विकून या दंग्याच्या दुष्काळांत!--"

"बरं, चिंतूचं पत्र नाहींच; पण एका अर्थी तो इथं नाहीं तो बरा दंग्याच्या दंगलींत. येऊं नको इतक्यांत म्हणून तार करावी ना त्याला--"

गोपाळराव हसून म्हणाले, "त्यासाठीं तुला भ्यायला नको. सिंगजी आले नाहींत किंवा त्यांचं पत्र नाहीं याचं कारण हेंच! केव्हांच तें माझ्या ध्यानांत आलं आहे. बरं आलेच तर बंदरावर आहेत व्हॉलंटियर्स. नीट सुरक्षित रवानगी करतील त्यांची. अन् ठाकुरद्वारला कांहीं दंग्यांत तेवढं कामहि नाहीं. दुकान खालीं अन् बिऱ्हाड वर. सिंगजी आले तर मला या प्रसंगीं कांहीं मदतच होईल—"

इतक्यांत खालीं गाडी येऊन उभी राहिल्यासारखी वाटल्यावरून कांहीं आशंकेनें गोपिकाबाई गॅलरींत गेल्या, व खालीं पाहून आश्चर्यानें उद्गारल्या, "अग बाई! हा तर चिंतू! बरं झालं बाई. आला सुरक्षित हो! शंभर वर्से आयुक्ष त्याला!"

गोपाळराव पुनः मिस्किलपणें हसले व म्हणाले, "या, या, चिंतोबा! आलांत?"

— २ —

गोपाळराव म्हणजे महावस्ताद माणूस. ज्या कामासाठीं चिंतोबा गोळवलीला गेले होते त्या कामाच्या परिणामासंबंधीं त्यांनीं त्यांना या वेळीं एका अक्षरानेंहि विचारलें नाहीं. इकडचे तिकडचे एकदोन जुजबी प्रश्न चिंतोबांना विचारून ते बायकोकडे वळून म्हणाले, "तुमचे बंधुराज बोटीच्या प्रवासामुळं भारी त्रासून गेले असतील. उशीरहि झाला आहे फार बोटीला. तुमच्या घरांत साखरेचं तर पुरं दिवाळं निघालं आहे. तेव्हां चहाचं त्यांच्या कसं काय? देतों पाठवून खालून दोन कप अन् खायचं कांहीं--अं? तासाभरानं जेवणाच्या वेळेला येतों मी खालून--" असें म्हणून ते निघून गेले.

पतिराजांनीं बंधुराजांना अस्सल गोष्टीसंबंधानें या वेळीं कांहीं प्रश्न

विचारले नाहींत, गोपिकाबाईंना तें एकपरी बरेंच वाटलें! क्षणभरानें त्या चिंतोबांना म्हणाल्या, " बरं झालं बाई एकदां सुखरूप आलास तो! किती काळजी लागून राहिली होती मला! बोटीच्या रस्त्यावर मुसलमानांची मोठी वस्ती म्हणून—"

" हं, बायकोच कीं नाहीं किती झालं तरी तूं ताई! अग, माझ्या-संबंधीं काळजी! या चिंतोबाच्या अंगांत इतक्या युक्त्या आणि हिकमती भरल्या आहेत, कीं कुठल्याहि भयंकर प्रसंगांतून सहीसलामत निसटून जाणं म्हणजे त्याच्या हाताचा नुसता मळ आहे! बंदरावर व्हालंटियर मला उपदेश करायला आले होते; पण त्यांना मीं स्वच्छ सांगितलं, कीं माझ्या-संबंधीं तुम्हांला नको कांहीं काळजी! हें डोकं युक्त्यांनीं भरलं आहे—केव्हांच निसटून जाईन मी, अन् त्याप्रमाणं मी हा आलोंहि बघ! मुसल-मानांच्या भागांत त्यांना असे बनवले आहेत, कीं यंव! हाः हाः—"

" कसा का बनवीनास! पण सुखरूप आलास एवढं खरं!—केवढी चिंता टळली माझी! कोण? गजानन? ठेव टेबलावर चहा न् बश्या जा तूं—दार घे अं नीट लावून. हं, घे बाबा चहा अन्, फराळ करतां करतां मला सांग तिकडची हकीकत. काय झालं कामाचं गेलास त्या? भाटे झाले का कबूल जमीन द्यायला?"

तोंडीं शिऱ्याचे चमच्यावर चमचे ढोशीत बोबड्या वाणीनें, हसत हसत, चिंतोबा म्हणाले, " या चिंतोबानं एकादं काम हातीं घेतलं, अन् त्यांत त्याला अपयश आलं, असं कधीं तरी तुला आठवतं का, ताई? गोळवलीला गेलों, जमिनीची कसून तपासणी केली, माधवराव भाट्यांना भेटलों, अन् जमिनीच्या किंमतीबद्दलहि कसून वाटाघाट केली. माझ्यावर ते अगदीं बेहद्द खूष झाले बघ, ताई! पांच हजार रुपये किंमतीची जमीन माधवराव मला तीन हजार रुपयांना द्यायला कबूल झाले! आहेस कुठं तूं ताई?"

बंधुराजांच्या या भाषणानें गोपिकाबाईंचा आनंद गगनांत मावेना! 'कानफाट्या' म्हणतात अं पतिराज अशा हिकमती हुषार माणसाला! आतां जाऊन पतिराजांना ही बातमी देऊन त्यांचा 'नक्षा' उतरावा, असा विचार क्षणार्धात त्यांच्या मनांत येऊन गेला! त्या आनंदातिशयानें म्हणाल्या, " शाबास—शाबास चिंतू! किती तूं हुषार—किती हिकमती—अन् स्वारी म्हणते—पण जाऊं द्या—ही हकीकत ऐकली कीं स्वारीचं तोंड

अगदीं बंद होईल तुझ्याबद्दल ! शाबास—शाबास ! पांच हजारांची जमीन तीन हजारांना मिळवलीस ना तूं ? वाः— ”

बहिणाबाईच्या या स्तुतीनें खूप उत्तेजन येऊन बंधुराज सांगूं लागले, “ एक जंगी युक्ति करावी लागणार आहे हा सौदा पदरीं पडायला ! पण मीं त्याची योजना केव्हांच करून ठेवली आहे, ताई ! जमिनीबद्दल भाऊंनीं भाटयांना तीन हजार रुपये रोख द्यायचे अन्—अन् त्यांच्या मुलाचं या ज्येष्ठांतच लगीन व्हायचं आहे, तेव्हां त्यांच्या सुनबाईवर घालण्याकरितां दोन हजारांचे दागिने त्यांना पाहिजे आहेत,—त्यांची यादी त्यांनीं दिली आहे, त्याप्रमाणं आम्ही त्यांना ते इथून करून द्यायचे आहेत; गोळवलीस सोनार नाहीं अन् भाऊंवर त्यांचा अतोनात भरंवसा आहे, म्हणून—”

गोपिकाबाईचा चेहरा खर्रकन् उतरला, व त्या चटकन् म्हणाल्या, “ अरे ! म्हणजे रे काय चिंतू ? असे ना तसे झाले पांच हजारच !—”

“ बायकांची अक्कल चुलीपुरती म्हणतात तें खरं आहे अगदीं ! ” चिंतोबा बहिणीकडे पाहून तुच्छतेनें हसून म्हणाले, “ त्यांतली खुबी तुम्हां गचाळ बायकांच्या नाहीं ध्यानांत यायची ! अगदीं थोडक्यांत देतों समजावून. भाऊंनीं रोख रुपये अन् दागिन्यांकरितां शंभर रुपये दिले. म्हणजे मी सगळं कांहीं काम उत्कृष्ट पार पाडतों. भाटयांच्या यादीप्रमाणं सारे दागिने शंभर रुपयांत बेमालूम बनवून—”

“ बेमालूम म्हणजे खोटे ? ” गोपिकाबाई आश्चर्यमिश्र भयानें उद्गारल्या, “ अगबाई—छे—चिंतू ! ”

“ तुम्हांला काय त्याचं ! मी नेतों सगळं निभावून ! असे दागिने बनवून देतों, कीं भाटयांच्या प्रपितामहाला पांच नव्हे दहा वर्षांत तें उमगायचं नाहीं ! ”

जोरानें मान हलवून बहिणाबाई म्हणाल्या, “ छे-छे, त्यांत कांहीं अर्थ नाहीं; अन् तशी गोष्टहि स्वारीजवळ काढूं नकोस तूं. कधीं पटायचं नाहीं तें तिकडे, अन् पटण्यासारखंहि नाहीं. गोष्टदेखील काढूं नकोस अशी तिकडे—त्यापेक्षां सौदा जमत नाहीं असंच आपलं स्पष्ट सांग तूं स्वारीला—”

हताश भावानें सुस्कारा सोडून चिंतोबा म्हणाले, “ तुमची मर्जी ! नाहीं तर घाट अस्सा छान जमवून आणला होता ! सगळ्यांची पार माती केलीत तुम्ही ! ” चहाचा शेवटचा घोट घेऊन वाईट तोंड करून पुनः त्यानें

विचारलें, " पण हें ग काय, ताई ? चहा दुकानांतला कां आज ? घरचा कां नाहीं ? छेः, यूसलेस अगदीं—"

" अरे बाबा, तें असं झालं, घरची साखर अगदीं सरली आज, अन् या मेल्या दंग्यामुळं काय झाली आहे स्थिति बाजाराची ती तुला कशी माहीत असणार ? बाजारांत साखरेचं सोनं झालं आहे सोनं ! जाणार कोण न् कसं बाजारांत ? परवां वेलणकर हॉटेलचा माणूस कपबश्या घ्यायला चकल्यांत गेला, त्याची मेल्यांनीं काय दशा केली तें वाचलंस ना ? दुकानांत सगळी एक कोथळी म्हणे शिल्लक आहे खालीं ! आतांच म्हणायचं, एक हजार रुपयांची साखर जर माझ्यापाशीं आज असती तर तिचं मीं सोनं करून दाखवलं असतं ! "

" आः ! ताई !—" असें म्हणून चिंतोबांनीं डोळे मिटले, व क्षणभर मुकाट्याने राहून ते म्हणाले, " काय नामी कल्पना चमकली आहे डोक्यांत ग ! एक पांचशें रुपये दे, कीं जंगी घबाड मारून दाखवतों तुला, ताई ! दंगा असो नाहीं तर दंग्याचा बाप असो ! अजब करामत लढवून बाजारांतून मी हवी तेवढी साखर पैदा करून आणतों ! एका दिवसांत बडा सट्टा मारतों—पांचशें रुपयांचे पंचवीस हजार रोख आठ दिवसांत ! बोल, देतेस रक्कम ? "

बंधुराजांच्या अजब करामतीवर बहिणीचा पूर्ण भरंवसा होता. पण शंकित स्वरानें ती म्हणाली, " तूं धाडसानं अन् करामतीनं वाटेल तें करशील, माझी अगदीं खात्री आहे. असं कांहीं तरी तूं एकदां करून दाखवच रे चिंतू ! चांगलं यांचं नाक ठेंचूं दे—पण पांचशें रुपये माझ्यापाशीं कुठले बाबा ? "

किल्ल्याच्या तटाला खिंडार पडलें, हें चिंतोबांनीं तेव्हांच ओळखलें ! ते उल्हासानें म्हणाले, " रोख नसले तर सरी दे—एखादा दागिना दे. अवघ्या दोन दिवसांकरितांच दे—परवां तुझी सरी-गोठ नवे परत ! मात्र अगदीं गप्प अं !—कानाच्या कोपऱ्याला नाहीं कळतां उपयोगी ! काय, पटतं ? "

" पटतं रे ! तूं वाटेल तें करशील—बाबांचा मुलगा तूं—पण जरा विचार करूं दे मला—"

" एः, विचारानंच तर तुमच्यासारख्या भित्र्यांचं फसतं ! विचार कसला करतेस ? आज दागिने दे, परवां परत घे; अन् वर दोन तोळे सोनं जादा ! "

" बरं, जा दुपारीं घेऊन. पण बघ हं, चिंतू, भलतंच कांहीं करूं नकोस.

नाहीं तर तुझ्या न् माझ्या गळ्याला फांस लावशील हं! स्वारी अशी संतापेल!"

"किती ग भित्र्या आणि अविश्वासी तुम्ही बायका, ताई? भाऊंना कळणार तरी कसं? दोन दिवस काय ते दागिने तुझ्या पेटींतून माझ्या जवळ असायचे! एकदां हुल्लड साधली कीं पाव हिस्सा नफा तुला देईन कायमचा! अग, तूं न् मी काय दोन आहों? आज दुपारीं अं?--ठरलं अगदीं?"

-- ३ --

खांडबाजारांत एका साखरेच्या अर्धवट बंद वखारींत, गादीवर बैठ्या टेबलाशीं एक प्रौढ मुसलमान बसला असून, त्याच्या टेबलावर नोटांचें एक पुडकें होतें. टेबलावरच्या रिसीट-बुकांत कांहीं लिहीत असून, समोर बसलेल्या एका चष्मेवाल्या तरुण पारशाकडे तो सूक्ष्म दृष्टीनें मधूनमधून पाहत होता. तो पारशीहि वारंवार चेहऱ्यावरून रुमाल फिरवीत होता.

"ऐ कमबख्त!" तो मुसलमान एकदम ओरडला, "तुम क्या समजते हो? तुम हिंदु–काफर है! तुम्हारा वो फटेला कान देखो!–हमको फसानेके वास्ते पारसी बनकर आया? ऐ महमद! देख ये, हिंदु है साला! हरामजादा!—"

क्षणार्धांत आपल्याभोंवतीं दोघांतिघां सुऱ्या परजणाऱ्या मुसलमान जवानांचा गराडा पडलेला पाहतांच "अयाई ग–आई ग!" असें म्हणून तो पारशी एकदम मूर्च्छित पडला!

— ४ —

"वा वा! किती पराक्रमी तुमचे गुणांचे बंधुराज!" आपलें नेहमींचें बोंचक हास्य तीव्र करीत गोपाळराव पत्नीला म्हणाले.

"आज पारशी दलाल बनून मुंबईचा अख्खा साखरेचा बाजार मारून एका दिवसांत लखपति होणार होते अं! अन् तुम्ही त्यांच्या बहिणाबाई तरी कुठं कमी पराक्रमी आहां! बंधुराजांना भांडवल पुरवून त्याच्या भावी व्यापारांत चार आण्यांचा हिस्सा तुम्ही पटकावणार होतां म्हणे! पण काय ग? खरंच, त्या एवढ्या अवाढव्य पैशाचं पुढं तूं करणार होतीस तरी काय?"

बिचाऱ्या गोपिकाबाई! शरमिंधेपणानें अगदीं एवढयाशा होऊन गेल्या होत्या! खालीं मान घालून त्या म्हणाल्या, "पुरे आतां! मेलेल्याबर किती वार करावे ते?"

" मेलेल्यावर वार करावे असा माझा उद्देश नाहीं." गंभीरपणानें गोपाळराव म्हणाले, " चिंतूची ही बेफाट मूर्खपणाची जिती खोड आहे ती कधींच जायची नाहीं. पण तुझे तरी डोळे उघडून तूं यापुढं त्याच्यासंबंधीं सावध रहावं, म्हणून एवढं कारस्थान मला करावं लागलं. काल चिंतूचा चहा गजानन घेऊन आला, त्याला नळाच्या खोलींत लपून तुम्हा बहीण-भावंडांचं संभाषण ऐकायला मींच सांगितलं. तुमच्या अजब युक्तीचा सारा रिपोर्ट त्यानं मला दिल्यानंतर मी अतोनात काळजींत पडलों. पण सांगून-शिकवून तुमची समजूत पडणं शक्य नव्हतं! म्हणून, माझ्या दाट परिचयाच्या एका पोलिस अधिकाऱ्यांना विनंति करून मला मदत करण्याचं त्यांच्याकडून वचन घेतलं. सारवर खरेदी करण्यासाठीं पारशी दलाल बनून तुमचे बंधुराज बाहेर पडतांच, चौघां पोलिसांची टोळी त्यांच्या मागोमाग गेली. बखारींत पारशीबुवाचं हिंदूपण तेव्हांच बाहेर पडलं! अन् त्यांच्यावर घातक हल्ला होणार, तों पोलिसांनीं चिंतोबांची सुटका केली. कानफाट्या तो कानफाट्याच! त्याच्या कानांच्या भोंकांवरूनच त्यानं तो हिंदु असं तत्क्षणीं ओळखलं! कानफाटसिंगजींची मुंबईंतील करामत आतां पुरे!— त्याला आतां कोंकणांतच देतों धाडून कायमचा! तिथं कर म्हणावं हवा तो कानफाटेपणा! हाः हाः!"



## काशी-विश्वनाथ! : : २२

'बोला भैरवनाथाचा चांगभले!' 'बोला भैरवनाथाचा चांगभले' अशा गर्जनांनीं दिक्प्रान्त दुमदुमून टाकले होते. आज कांदळ-गांवची जत्रा. चैत्री पौर्णिमा म्हणजे कांदळकरांना दिवाळी-दसरा! पोटा-पाण्याकरितां दाहीदिशा उधळलेलीं कांदळचीं लहानथोर माणसें 'चैत्री'ला जुळायचीं. थोरांपासून पोरांपर्यंत स्त्रीपुरुष आज आपआपल्या प्रकारें नटून-थटून श्रीभैरवनाथाच्या जत्रेंत भाग घेत होतीं. पंचक्रोशींतल्या पांचपंचवीस गांवांना आपापल्या जमावानिशीं जत्रेला येण्याविषयीं पाटीलकुलकर्ण्यांच्या

सहीच्या चिठ्या गेल्यामुळें गांवगन्ना माणसें जमलीं होतीं. रात्रीचा अकराचा सुमार! पांढरें टिप्पूर चांदणें पडलें होतें. भैरवनाथाचा छबिना निघाला. ढोलाच्या साथीवर नाचणाऱ्या लेझीमवाल्यांची चळ हातघाईला आली. लेझीमवाले दमतात कीं ढोलवाले अशी चुरस लागली. जो तो आपापल्या-परीनें टिप्पीला लागून काम करूं लागला. ढोल्याची आणि लेझमीची लय चुकली आणि दोघांचेहि हात काम करीनासे झाले. आपण विजयी झाल्याचें आणि दुसरे पराभूत झाल्याचें हास्य चेहऱ्यांवर उधळीत, 'बोला नाथ-महाराजांचा चांगभले' असा गजर पुन्हा झाला.

* * *

"मगबुल, तूं हें काय करीत आहेत? तूं मुसलमान, तुझं या मारुती-च्या देवळांत काय काम? आणि हातांत हा हातोडा कशाकरितां?" असें म्हणून विश्वनाथानें मगबुलाचें मनगट पकडलें. तरीहि तो उत्तर देईना. उलट—

"भैय्या, हात छोड, नही तो बतलाउंगा. मैं मुसलमीन हूं, तेरी डालभात पतली करूंगा, देख!" वगैरे माजोरीपणानें तो बोलूं लागला.

विश्वनाथहि कांहीं कच्च्या गुरूचा चेला नव्हता; त्यानेंहि बजरंगाची भक्ति, आखाड्यांतली लाल माती ही काय किमया आहे ती मगबुलला दाखविली. एक हात मानेवर व दुसरा ढुंगणाखालीं घालून विश्वनाथानें त्याला वर उचलून दाणदिशीं खालीं आदळला;—पण इतक्यांत देवळाचे पाठीमागून येणाऱ्या अबदुल्लानें त्याला हात दिला आणि हमीदनें विश्व-नाथाच्या कमरेला मिठी मारली. विसूनें आपणाकडून पुष्कळ धडपड केली पण त्याचा नाइलाज झाला. आतां मगबुलला फारच चेव आला होता; तो विश्वनाथाला शिव्या देऊं लागला, "भटुडर्या, हा बघ तुझा बाप तुझ्या या माकड्या मारुतीवर आतां लघवी करतो आहे. पागल, मी एकटा आहें अशी तुझी कल्पना होती होय? मूर्खा, आम्ही मुसलमान कांहीं तुम्हां हिंदूसारखे खुळचावळे नाहीं. तुझा हा भंगड बजरंग उद्यां सकाळला येथें दिसणार नाहीं; याचे तुकडे तुकडे उडून तो नाहींसा होईल. आणि आतां तूंहि हातीं सांपडला आहेस, तर तुझ्यासाठीं हे माझे जिगरदोस्त अबदुल्ला-हमीद रातोरात फरारी होतील. पुढें तुझी काय वासलात लावायची तें त्यांना बरोबर माहीत आहे. मी तर हें काम उरकल्याबरोबर

जत्रेच्या छबिन्यांत सामील होतों." असें म्हणून मगबुलनें विश्वनाथाला एक लाथ मारली. हमीदनें त्याचे तोंडांत बोळा कोंबला आणि मारुतीवर घाव घालायला त्यानें मगबूलला सांगितलें !

बिचारा विश्वनाथ! आज अनाथ बनून आपल्या उपास्यदैवत बजरंगाकडे पाहत राहिला. त्याच्या नसानसांतून सळसळणाऱ्या मानी रक्ताला उकळी फुटूं लागली. डोळे लालबुंद होऊन त्यांतून रक्ताच्या चिळकांड्या उडणार असें वाटूं लागले. कमरेभोंवतीं पडलेला हमीदच्या हाताचा विळखा सोडविण्याकरितां कडकडून चावा घ्यावा असें त्याच्या मनांत आलें पण तोंडांत बोळा कोंबल्यामुळें तें अशक्य झालें. क्षणमात्रच त्याने डोळे मिटले. मारुतिरायाची बलशालिनी मूर्ति डोळ्यांपुढें आणली आणि मनोभावें 'बजरंगबली की जय' अशी आरोळी ठोकून डंकीवजा कोलांटी मारली. देवदयेनें हमीदचा विळखा सुटला, विश्वनाथ मोकळा झाला आणि तोंडांतला बोळा काढून त्यानें 'तानबा-येसबा धांवा ! ' म्हणून हांक ठोकली. पण सारे लोक छबिन्याच्या गर्दींत गुंतल्यामुळें कोणालाच ती हांक ऐकूं गेली नाहीं. झालेल्या आकस्मिक प्रकारानें मात्र मगबुलच्या काळजानें ठाव सोडला. अबदुल्लानें त्याला धीर दिला. मारुति फोडून आणि विश्वनाथाला ठार करून पसार होण्याचें त्यांनीं आतां ठरविलें. हातांत हातोडा घेऊन मारुतीच्या रोखानें जाणाऱ्या हमीदला विश्वनाथानें आपल्या लाठीचा तडाखा दिला, पण इतक्यांत अबदुल्लानें आपला सुरा त्याचे छातींत मारला आणि--

* * *

छबिना ऐन रंगांत आला होता. ढोल, लेझीम आणि जमलेला अलोट जनसंमर्द यांचा मिश्र आवाज सारें वातावरण दुमदुमून सोडीत होता. विश्वनाथाचे वडील हरिभाऊ आणि गांवचे पाटील खाशाबा चावडीच्या कट्टयावर बसून मजा पाहत होते. या साऱ्या दंगलींत विश्वनाथ नाहींसें पाहून तो कोठें गेला म्हणून पाटलांनीं विचारलें. 'तो आपल्या बहिणीला पोंचविण्यास दोन दिवसांपूर्वीं पुण्यास गेला, आज यायला पाहिजे होता' असे हरिभाऊ उत्तरले. विश्वनाथ आतां येईल, मग येईल म्हणून त्यांचे डोळे त्याच्या वाटेकडे लागले होते.

विश्वनाथानें आपल्या ताईला सासरीं पोंहोचती केली आणि एक दिवस राहून तो परत निघाला. त्याला पुण्यांत करमेना; त्याचा जीव गांवच्या जत्रेंत गुंतला होता. त्याचे मेहुणे वामनराव परांजपे यांनीं आणखी दोन दिवस राहण्याविषयीं त्याला पुष्कळ आग्रह केला, पण त्याची जत्रेकरितां जाण्याची तीव्रतर इच्छा पाहून त्यांनीं त्याला जाण्याची परवानगी दिली; पण दुर्दैव आडवें आलें—त्याच दिवशीं मोटारवाल्यांनीं संप केला होता. विश्वनाथाला गाडी मिळाली नाहीं. तो तसा पायींच निघाला. मध्यरात्री-नंतर आपण घरीं पोंचूं. नंतरचा छबिना आणि दुसऱ्या दिवशींचा कुस्त्यांचा फड तर पहावयास मिळेल म्हणून तो निघाला होता. रात्रीचा बाराचा सुमार! त्यानें वेस ओलांडली आणि गांवालगत असणाऱ्या मारुतीचे दर्शन घेऊन गांवांत शिरावें म्हणून तो देवळांत शिरणार तोंच हातांत हातोडा घेतलेला मगबूल त्याला दिसला. पुढची हकीकत वाचकांस माहीत आहेच.

विश्वनाथानें मारलेली आरोळी गांवांत कुणाला ऐकूं गेली नाहीं, पण गांवाबाहेर असणाऱ्या महारवाड्यांत ती ऐकूं गेली ! बहुतेक महार-मंडळी जत्रेच्या दंगलींतच होती. पण भागनाक महाराची काशी आपल्या म्हाताऱ्या आणि आजारी बापाची सोबत करीत बसली होती तिनें ती ऐकली आणि ती धांवतच तिथें गेली. विश्वनाथाच्या छातींतून भळभळ वाहणारें रक्त पाहून तिनें एक भेसूर किंकाळी फोडली. कर्मधर्म-संयोगानें ती किंकाळी गांवापर्यंत पोंहोचली. किंकाळी फोडतां फोडतां, मारुतीच्या मूर्तीवर पडून हातोड्याचे घाव मस्तकीं धारण करणाऱ्या विश्वनाथाचे प्राण वांचविण्याकरितां, काशीनें विश्वनाथ आणि बजरंग उभय-तांस आपल्या वेंगेत कवटाळलें आणि त्या दुष्टांचे प्रहार आपल्या देहावर झेलले ! त्या अत्याचारी असुरांनीं मारुतीची मूर्ति फोडण्याचे केलेले सारे प्रयत्न ह्या हिंदुसमाजाच्या दोन टोंकांवर असणाऱ्या दुनियामोल जीवांनीं निष्फळ केल्यामुळें त्यांनीं पळता पाय काढला. परंतु गांवांतून येणाऱ्या लोक-लोंढ्यापुढें त्यांस हार खावी लागली. जमलेल्या लोकांनीं त्या तिघांच्या मुसक्या बांधल्या आणि देवळांत जाऊन पाहतात तों विश्वनाथ आणि काशी या उभयतांनीं आपलीं प्राणपुष्पें बजरंगाच्या पायांवर वाहिलेलीं !

* * *

मगबुल—अबदुल्ला—हमीद यांजवरचा सरकारी खटला अद्याप कोर्ट-

कचेऱ्यांत रेंगाळत आहे. त्याचा काय फैसला होईल तो होवो! गांवांतील सर्व जातीच्या लोकांनीं काशी-विश्वनाथांची जंगी प्रेतयात्रा काढली; आणि या मानवरत्नांची कायमची आठवण राहावी म्हणून श्रीमारुतिरायाचे देवळा-शेजारींच एक छोटीशी टुमदार समाधी बांधून त्यावर 'काशी-विश्वनाथ' अशा शीर्षकाखालीं घडलेली हकीकत लिहून ठेवलेली आहे. हा स्मृतिलेख वाचून वाचक न कळत अश्रूंचा अभिषेक त्या दैवतावर करतात, व त्या ओलाव्यामुळें हिंदूंच्या धर्मश्रद्धेचे अंकुर कधीं उगवतील हें पाहण्यासाठा काशी-विश्वनाथांचे आत्मे तेथें घोटाळत असावेत!



## किती थोडक्यांत असतें ? : : २३

इनामदारी नुसत्या नांवाची नसून खरीखुरी होती. इनामदारांचें जमिनीचें उत्पन्न पांचसहा हजारांचें होतें, टोलेजंग वाडा आणि त्याला साजेशी इतर जिंदगीहि भरपूर होती.

या घराण्याचे आतां दोन हिस्से झाले होते. वडील घराणें अण्णा-साहेबांचें आणि धाकटी पाती नानासाहेबांची. अण्णासाहेब हे नानासाहेबांचे पुतणे; वडील बंधूंचे चिरंजीव.

उभयतां चुलतेपुतणे मनानें व आचरणानें शुद्ध होते. इनामदारीचा ऐदीपणा, श्रीमंतीचा पोकळ डौल अगर सरदारी थाटमाट ते कधींच करीत नसत. निष्कारण कंगाल स्थितींत राहून ते आपलें हसेंहि करून घेत नसत. विशेष पाल्हाळ न लावतां, हे चुलतेपुतणे लोकांकडून भलेपणा मिळवून आपापले प्रपंच करीत असत, एवढें सांगून काम भागेल.

पण—! दोघांतहि एक दोष प्रामुख्यानें वसत असे. कोणता बरें हा दोष ? दुसरा कोणता असणार ? हिंदु समाजाच्या पांचवीस पुजलेल्या भाऊबंदकीचा.

तरी ही भाऊबंदकी एक प्रकारें निर्दोषच होती. खरी भाऊबंदकी म्हणजे 'माझें घर जळलें तरी बेहेत्तर पण भावाच्या वरादाराची राखरांगोळी

झाली पाहिजे' असें म्हणणाऱ्यांची. पण अण्णासाहेब-नानासाहेबांची भाऊ-बंदकी अशा राक्षसी स्वरूपाची नव्हती. दोघांचा फक्त अबोला होता. तो मात्र इतका पक्का, कीं तिऱ्हाइत इसमास हे दोघे पुरुष एकाच घराण्यांतील आहेत ही गोष्ट खरीसुद्धां वाटली नसती. परस्परांनीं परस्परांचा संबंध सर्वस्वीं वर्ज्य केला होता.

पुरुष मंडळींचें व्रत बायकांनींहि चालविलें होतें. त्यांना इतर गोष्टींत मन घालायचें तरी कारण काय? पुरुषांच्या मर्जीप्रमाणें चालावयाचें एवढेच त्यांना माहीत.

या भाऊबंदकीचा उगम कोठें आहे हें जाणण्याची कोणासहि उत्कंठा असणार; पण ती शमविण्यास इनामदारांच्या मागील दोन पिढ्यांचा इति-हास समजून घेतला पाहिजे. तो असा आहे—

दादासाहेब हे इनामदारी खरी नांवारूपास आणणारे पुरुष. मुळांत बेताचीच असलेली शेतीभाती स्वतःच्या कष्टानें नांवारूपास आणण्याचें आणि आपल्या घराण्याचें वैभव व लौकिक वाढविण्याचें श्रेय याच पुरुषास दिलें पाहिजे. उद्योग, साधी राहणी आणि गोड स्वभाव यांचे ते अवतार मानले जात.

दादासाहेबांच्या पश्चात् त्यांच्या जिंदगीचे बाबासाहेब आणि नाना-साहेब असे दोघे वारस झाले. त्यांनींहि वडिलांचें वळण योग्य प्रकारें गिरविलें. त्यांनीं नवीन कमविलें नाहीं पण कमविलेलें गमाविलेंहि नाहीं.

काय असेल तें असो, इतर जगास साखरेसारखे गोड असलेले हे बंधु परस्परांशीं मात्र थोडे तुसडेपणानें वागत. याच तुसडेपणाचा परिणाम विभक्तपणांत—अबोल्यांत झाला.

प्रथम घडलेलें कारण अगदींच क्षुल्लक होतें. अशा कारणामुळें दोघां बंधूंचा बेबनाव झाला असें लोकांस सांगितल्यास खरेंसुद्धां वाटणार नाहीं.

इनामदारांचे घरीं गणेशोत्सव थाटानें होत असे. गांवकऱ्यांच्या मानानें सर्वांत मोठा गणपति, छत, हंड्या, झुंबरें, तसबिरींची आरास, रोषणाई चांगल्या प्रकारची होई. पांच दिवसांत म्हणणें, कथा, पुराण, गाणें वगैरे अनेक कार्यक्रमांची गर्दी असे. मोरयाचें प्रयाण होईपर्यंत वाडा फुललेला असे.

एके वर्षीं चतुर्थीच्या आदले दिवशीं बाबासाहेबांनीं नानासाहेबांस

हांक मारून म्हटलें, " नाना, गणपति नाहीं का आणायचा ? संध्याकाळ होत आली."

नानासाहेबांनीं अंगरखा-रुमाल चढविला. गड्यास पाट, वस्त्र, नारळ, विडा वगैरे घ्यावयास सांगून व आपण दक्षिणेचे पैसे घेऊन ते तयार झाले. त्यांची तयारी पाहून बाबासाहेब म्हणाले, " नाना, गणपति चांगला बळकट दे म्हणावं त्या गणू कुंभाराला. नाहीं तर देईल मागले वर्षासारखा लचपचीत. पांच दिवस संभाळतां संभाळतां पुरेवाट झाली. आणि तूंहि जरा नीट पाहून घे. त्याच्याच सांगण्यावर भरंवसा ठेवूं नको."

" पण बाबासाहेब, मी यंदा गणूकडचा गणपति घेतच नाहीं मुळीं. त्या पुराणिक भटजींनीं चांगले गणपति केले आहेत. चांगला गणपति आणि आयता ब्राह्मणाच्या हातचा."

" छे-छे, नाना, तसं नाहीं करायचं हं. पुराणिक असूं दे नाहीं तर हरदास असूं दे, आपला गणू कुंभार आहे तो खरा. आपल्या वाडवडिलांनीं घातलेला पायंडा आपण कशासाठीं मोडायचा ? तें कांहीं नाहीं, कुंभाराचाच गणपति घेऊन ये."

" यांत पायंडा कसला ? चांगला जिन्नस मिळत असतां, पायंडा म्हणून वाईट जिन्नस घेतलाच पाहिजे असं थोडंच आहे ? शिवाय, 'यंदा मी तुमचेकडील गणपति घेईन' असं मीं पुराणिक भटजींना बोलून ठेवलं आहे."

" हं ! असं का ? वचन मोडण्यापेक्षां घ्या त्यांचा गणपति. आतां आमची मुखत्यारी संपली म्हणायची. नानासाहेब, पुराणिकांचा गणपति आणा आणि आपल्या इच्छेप्रमाणं उत्सव यथासांग साजरा करा. मी मात्र इथं राहायचा नाहीं. पहांटे मी नरसोबाच्या वाडीस निघून जातों."

ही गोष्ट इतकी विकोपास जाईल असें नानासाहेबांस वाटलें नव्हतें. आणि तसें होण्यास कारणहि नव्हतें. अशा क्षुल्लक कारणासाठीं वडील बंधु डोक्यांत राख घालण्यास उठलेले पाहून नानासाहेबांनीं पड घेऊन म्हटलें, " बाबासाहेब, आपल्या मर्जीविरुद्ध वागण्याची माझी इच्छा नाहीं. मी गणू कुंभाराचाच गणपति आणतों." असें बोलून नानासाहेब गड्यासह निघून गेले.

नानासाहेब गेल्यानंतर बाबासाहेबांनीं मनुष्याबरोबर विडा दक्षिणा

देऊन पुराणिक भटजींकडील गणपति आणवून ठेवला. नानासाहेब कुंभाराकडील गणपति घेऊन आले तोंच सोप्यावर दुसरा गणपति—आणि तोहि पुराणिकांकडील—त्यांना दिसला.

पुराणिक भटजींचा आपल्या बंधूवर बोल येऊं नये यांच सद्भावनेनें बाबासाहेबांनीं तो गणपति आणविला होता. उत्सवासाठीं जरी तो बसवितां आला नाहीं तरी दिवाणखान्यांत नेहमीं ठेवण्यास त्याचा उपयोग करतां येईल अशी त्यांची समजूत.

पण नानासाहेबांस ही गोष्ट विपरीत भासली. आपणास खिजविण्या-साठीं वडील बंधूंनीं ही गोष्ट केली असें त्यांना वाटूं लागलें. ते अधिकच खिन्न झाले.

दुसरे दिवशीं उत्सव सुरू होऊन पुढील कार्यक्रम यथासांग पार पडला. नानासाहेब वरकरणीं हसत; जरूर तितकाच त्यांत भाग घेत. आपल्या बंधूची ही उदासीनता बाबासाहेबांच्या दृष्टोत्पत्तीस आली, पण तिचें कारण त्यांच्या कल्पनेसहि कळण्यासारखें नसल्यानें त्यांनाहि असमाधान वाटूं लागलें. इनामदारांचे वाड्यांत सर्व आनंद लुटत होते; स्वतः इनामदार मात्र आंतल्या आंत उदास—कष्टी होते.

मित्रापाशीं उघडें केल्याशिवाय मनांतलें दुःख हलकें होत नाहीं. म्हणून नानासाहेबांनीं आपले नेहमींच्या बैठकींतील दोस्त सावळोबा भोळे यांचेपाशीं आपलें मन मोकळें केलें. सावळोबा विचारी असते तर त्यांनीं म्हटलें असतें, “ नानासाहेब, ही भलतीच कल्पना मनांतून अजिबात काढून टाका, आणि तुम्ही दोघे बंधु रामलक्ष्मणासारखे गुण्यागोविंदानं रहा.”

पण असें झालें असतें तर आमच्या गोष्टीस येथेंच पूर्णविराम द्यावा लागला असता किंवा लिहिण्याचेंच मुळीं कारण पडलें नसतें. बंधुबंधूंत बेबनाव आणून त्यांचा कांहीं फायदा होणार होता असें नाहीं, पण फुकटची मौज तरी पहायला मिळाली तर त्यास हवी होती. त्यानें गंभीरतेनें म्हटलें, “ नानासाहेब, अहो हें असं व्हायचंच. मऊ लागल्यावर कोपरानं खणत नाहीं कोण ? बाकी नानासाहेब, आपली सहन-शक्ति अलौकिक खरी. अहो, हल्लींच्या काळीं कोण ऐकून घ्यायला बसला आहे ? कुणी कुणास हूं कीं चूं म्हणायची सोय उरलेली नाहीं. आपल्या जागीं दुसरा एखादा भाऊ असता तर त्यानं असा सासुरवास सोसण्यापेक्षां

'तुमचं आमचं पटणं शक्य नाहीं; आमची वांटणी टाका आत्तांच्या आत्तां' असं बाबासाहेबांना सांगितलं असतं." एवढे बोलून त्या गृहस्थानें नानासाहेबांच्या चर्येकडे पाहिलें. आपला बाण बरोबर लागल्याचें प्रत्यंतर त्याला त्या चेहऱ्यावर दिसलें म्हणून तो कृतार्थतेनें हसला.

इनामदारांच्या घरीं त्या वर्षीं दोन नवरात्रें बसलीं. गांवकऱ्यांना दसऱ्याचें सोनें दोन घरीं द्यावें लागलें.

दादासाहेब इनामदारांच्या दोघां मुलांचीं तोंडें दोन दिशांस झालीं. कोणाचा कोणाशीं संबंध उरला नाहीं, आणि कारणहि नव्हतें. घरदार, शेतवाडी आणि दुसऱ्या एकूणएक जिंदगीची बरोबर निमी वांटणी बाबासाहेबांनीं नानासाहेबांच्या हातीं दिली.

बाबासाहेब कठोर नव्हते; पण तापट मात्र होते. भावानें विभक्त व्हावे हें त्यांना बरें वाटलें नाहीं. जसा विषाद वाटला तसाच त्यांना त्याचा रागहि आला. त्यांनीं थोडें दटावून किंवा समजुतीनें सांगितलें असतें तर नानासाहेबांनीं आपला विचार बदललाहि असता. पण धाकट्या भावापुढें शरणागति केल्यासारखें होईल म्हणून त्यांनीं मुकाट्यानें वांटणी तोडून दिली.

नानासाहेबांना तरी अबोला दूर करण्याची उत्सुकता वाटण्याचें कारण काय ? तेहि त्या बाबतींत उदासीन राहिले.

हा शेणाभेणाचा दिसणारा अबोला पुढें लोखंडाचा झाला. दोघां भावांची भाषा नाहीं, जाणें-येणें नाहीं.

पुढें बाबासाहेबांनीं अवतारसमाप्ति केली. त्यांचे चिरंजीव अण्णासाहेब दौलतीचे मालक झाले. त्यांनींहि वडिलांचें वळण गिरविलें. आपापल्या घरीं दोघेहि आनंदांत होते.

* * *

एकाच रक्ताच्या माणसांनीं एकमेकांशीं अशा पद्धतीनें वागणें मनापासून नको असणारें एक मनुष्य होतें, तें म्हणजे बापूसाहेब—नानासाहेबांचे चिरंजीव. आपल्या घरांत हा प्रकार केव्हां आणि कसा शिरला याचें बापूसाहेबांस ज्ञानहि नव्हतें. त्यांनीं आईस विचारलें तर त्या म्हणत, 'मला तरी काय माहीत पुरुषापुरुषांत काय झालं तें ? आम्ही वेगळीं झालों याहून मला कांहींसुद्धां माहिती नाहीं.' बापूसाहेबांची ही जिज्ञासा तृप्त होण्यास

कांहींच मार्ग नव्हता. नानासाहेबांस विचारण्याचा त्यांना धीर होत नव्हता. तरी त्यांनीं एकदां छाती केलीच. पण 'तुला काय करायचं आहे?' यापेक्षां दुसरें उत्तर मिळालें नाहीं.

तरी पण बापूसाहेबांनीं ठरविलें कीं तीव्र दावेदारी चालविण्यासारखें कसलेंच कारण या प्रकारास घडलें नाहीं. आणि पूर्वी कांही घडले असलें तरी आज तें विचारांत घेण्याचें कारण नाहीं. आतां दोघांचा सलोखा होण्यास हरकत नाहीं; आणि तो झालाच पाहिजे.

या दृष्टीनें स्वतः प्रयत्न करण्याचें बापूसाहेबांच्या मनांत होतें. संधि कोणती साधावी आणि आरंभ कुठून कसा करावा हा प्रश्न होता. इतक्यांत एक सुसंधि आली.

अण्णासाहेबांच्या कन्येचे लग्न ठरलें. मुहूर्त उद्यांवर आला. त्यांचे घरीं आज केळवणाची जेवणावळ होती. नानासाहेब बहुतेक अशा प्रसंगीं घरीं राहायचेच नाहींत. ते फारकरून नरसोबाच्या वाडीस जाऊन राहायचे. या वेळींहि ते कुटुंबासह वाडीसच गेले होते. बापू आणि त्यांची तरुण सहचारिणी एवढींच घरीं होतीं.

केळवणादिवशीं सकाळीं बापूसाहेबांनीं पत्नीस म्हटलें, "लवकर वेणीफणी–अंगधुणं आटपा, आज मेहूण जायचं आहे."

पत्नीनें प्रश्न विचारण्यापूर्वीच बापूसाहेब बाहेर गेले; ते दहाच्या सुमारास परत आले. त्यांनीं पत्नीची तयारी झाली कीं नाहीं हें पाहिलें. तोंच पलीकडील मांडवांत अण्णांचा शब्द ऐकूं आला, "अरे खेळत काय बसलां भलत्याच वेळीं ! पाटरांगोळ्या करा, पानं मांडायचं बघा."

बापूंनीं मुकटाभांडें घेतलें आणि बाहेर पडले. कोणाकडे जावयाचें याबद्दल त्यांची पत्नी अजूनहि अजाण होती.

निरनिराळ्या माणसांकडून निरनिराळीं कामें करून घेत अण्णासाहेब मांडवांत उभे होते. तोंच हातांत मुकटाभांडें घेऊन बापूसाहेब तेथें दाखल झाले. बापूंना पाहतांच अण्णासाहेबांना अतिशय आश्चर्य वाटलें. एखाद्या निवडुंगाला आंबे लागलेलें किंवा एखादें वासरूं वाघाचें आंग चाटतांना पाहून त्यांना जितकें आश्चर्य वाटलें असतें त्याच्या शतपट–सहस्रपट आश्चर्य बापूसाहेबांना आलेले पाहून वाटलें. अण्णासाहेब चकित नजरेनें त्यांचेकडे पाहत आहेत तोंच चतुर बापूसाहेब चट्कन म्हणाले, "अण्णासाहेब, आतां बघत

बसायला वेळ नाहीं. अकरा वाजायला आले. अजून पाट-रांगोळ्याला ठिकाण नाहीं. बरं आतां कांहीं काळजी करूं नका आपण इकडची. मी आहें अन् काम आहे. बरं, पानं किती घालायचीं ? दोनशें पुरतील आज. उद्यां-परवां व्याह्यांचीं पानं होतील थोडीं कमीअधिक. बरं, आपण आतां असं करा, दुसऱ्या आमंत्रणाला कोणी तरी द्या पाठवून चटकन्. काय वैनी, (बापूसाहेब आपल्या घरीं आलेले पाहून ज्यास त्यास आश्चर्य वाटत होतें. 'असें हें झालें कसें' हें पाहण्यासाठीं त्या सोप्यावर आल्या तोंच बापूंनीं त्यांच्याशींच संभाषण सुरू केलें.) स्वैपाकाची तयारी आहे ना ? नाहीं तर मंडळी जमतील, आम्ही पानं घालूं आणि तुमच्या स्वैपाकाचा असायचा नाहीं पत्ता. आणि वैनी, एखादी छोकरी पाठवून जाऊबाईंना आणा ताणून. चांगलं काम घ्या. वडीलच आहांत." अशा प्रकारें बापूसाहेबांनीं तें लग्नघर अगदीं भारून टाकलें. आधीं आश्चर्य उत्पन्न झालें, त्यांत आदराचा शिरकाव झाला. बापूंच्या पत्नीहि मन लावून कामास लागल्या.

चांगला हेतु आणि गोड वर्तन यांनीं कोणावर छाप पडणार नाहीं ? दोन पिढ्यांचा अबोला नाहींसा झाला, एवढेच नव्हे तर अण्णासाहेबांनीं बापूंवरच सर्व कारभार सोपविला. लग्नसमारंभ, प्रयोजनें बिनबोभाट व सुयंत्रितपणं पार पडलीं.

दुसरे दिवशीं बापूसाहेब अण्णासाहेबांस म्हणाले, "अण्णासाहेब, आतां स्वस्थपणें पडायला हरकत नाहीं. इथं आहे गर्दी, आमच्या माडीवर चला. झोंप निवान्त पाहिजे."

अण्णासाहेब बापूसाहेबांबरोबर त्यांचे घरीं गेले. आतां तेथें जाण्यांत त्यांना कांहींच वाटलें नाहीं. गोष्टी बोलून दोघे आडवे होतात तोंच दारांत गाडी येऊन उभी राहिली आणि नानासाहेब व आई गाडींतून उतरल्या. बापू सामोरे गेले आणि अण्णासाहेबहि.

तें पाहून नानासाहेबांना आश्चर्य किती व कसें वाटलें याचें वर्णन निराळें करण्याचें कारण नाहीं. बापूंना मांडवांत पाहून अण्णासाहेबांची जी अवस्था तीच या वेळीं नानासाहेबांची झाली.

बापूंनीं वडील मातुश्रींना नमस्कार केला आणि अण्णासाहेबांनींहि. बापूंनीं मंडळी आंत येऊन बसल्यावर सुरुवात केली, "अण्णासाहेबांनीं चंपाचं लग्न मोठ्या थाटानं केलं बरं का आई; आणि जांवईहि मोठा

छानदार शोधून काढला आहे. चंपाचा अन् यशवंतरावाचा जोडा असा शोभतो म्हणतेस ! "

अण्णासाहेबांनीं म्हटलें, " काकू, बापूनं कंबर बांधली म्हणूनच हें सारं कार्य बिनबोभाट आणि सुंदरपणें पार पडलं."

तें निष्कपट आणि सलोख्याचें, प्रेमाचें संभाषण ऐकत असतांना हा प्रकार घडला तरी कसा एवढें विचारण्याची आठवणसुद्धां त्या वृद्ध दांपत्यास झाली नाहीं. त्यांनीं निरनिराळ्या लग्नकार्यांतील निरनिराळ्या प्रसंगांच्या गोष्टी सांगण्यास सुरुवात केली.

एका चांदण्या रात्रीं सगळी मंडळी बोलत बसली असतांना अण्णासाहेब म्हणाले, " काका, बाबांचा आणि तुमचा जो इतका बेबनाव झाला तो कां ? "

" अण्णा, काढूं नकोस आतां त्या गोष्टी. तरुणपणच्या खुळेपणाचा तो परिणाम होता. गद्धेपंचविशी फार वाईट."

" पण याच पंचविशींत बापूनं निखळलेले दुवे सांधले."

हर्षगद्गद स्वरानें नानासाहेब म्हणाले, " देवाची कृपा आणि पूर्वजांची पुण्याई."

" आणि वंशजांची चतुराई ! " अण्णासाहेबांनीं समारोप केला.



# गरिबीचा संसार : : २४

आमच्या शेजारींच एक फार जुनें, अगदीं पडीत असें घर होतें. त्यांत मागल्या बाजूच्या पडवींतल्या खोलींत एक गरीब विधवा बाई राहण्यास आली. काय करील बिचारी, नवऱ्याला सारी दहा रुपयांची नौकरी होती. तेवढ्यांत काय होणार ? पदरीं सहा मुलें, आणि सगळ्यांत लहान काय तें सहाच महिन्यांचें होते. तथापि त्या दहा रुपयांत आपणहि काबाडकष्ट करून कांहीं भर घालून तीं दोघे आपला संसार चालवीत असत. परंतु दुष्ट काळाला तेंहि खपलें नाहीं असें दिसतें. कारण लवकरच तो घरांतला कर्ता पुरुष--तिचा नवरा मरण पावला. हा दुर्धर प्रसंग गुदरल्यावर

बिचाऱ्या राधाबाईची काय स्थिति झाली असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. तिला बिचारीला आतां कशाचाहि आधार उरला नाहीं. दहा रुपये ही श्रीमंतांना जरी कांहीं वाटली नाहीं, तरी भुकेनें व्याकुळ होऊन ज्यांचीं चिमकुलीं तोंडें अगदीं सुकून गेलीं आहेत अशा सहा मुलांच्या आईला महिन्याचे दहा रुपये म्हणजे कुबेराची संपत्ति असें वाटत असेल यात शंका आहे काय? परंतु आज राधाबाईला ते तरी कुठें होते! बरें, तिला आधार तरी कोणाचा होता काय? माहेर तिला लहानपणींच विसरून जावें लागलें होतें; कारण तिचें लग्न होऊन वर्ष-दोन वर्षें झालीं नाहीं तोंच तिची आई व भाऊ दोघें वारलीं. बाकीची मंडळी त्यांच्या आधींच वारली होती. आणि नवरा वारल्याबरोबर 'सासर' हा शब्दहि नाहींसा झाला असें झालें; कारण सासरचें असें म्हणण्यास कोणीहि नव्हतें. अशा स्थितींत तिला काय बरें झालें असेल? आतां या मुलांचें पोट तिनें भरावें तरी कसें? परंतु अशा स्थितींत सांपडलेल्या सद्गुणी माणसांस परमेश्वर विशेष धैर्य देतो त्याप्रमाणें राधाबाईनें धैर्य धरलें.

नवऱ्याची उत्तरक्रिया वगैरे झाल्यावर तिनें आपली एक रुपया भाड्याची जागा सोडली आणि वर सांगितलेल्या आमच्या शेजारच्या वाड्यांत सहा आणे भाड्याची खोली घेऊन ती राहिली. ती त्या ठिकाणीं येऊन राहिल्यापासून आम्हीं तिचें एकंदर चरित्र पाहिलें. ती अहोरात्र काबाडकष्ट करी आणि आपल्या मुलांचें पोट भरी. केव्हांहि रात्रीचे जागे व्हा, राधाबाईच्या खोलींत जात्याची घरघर ऐकूं येत नाहीं असें व्हावयाचेंच नाहीं. बिचारी केव्हां विश्रान्ति घेत असेल तिचें तिलाच ठाऊक. माझ्या येथलेंहि दळण तिच्याच घरीं जात असे, त्यामुळें ती रोज आमच्या घरीं आमचें पीठ आणून देण्यास येत असे. परंतु चमत्कार हा कीं, पीठ देण्यास अगर कधींमधीं माझ्या बायकोनें पोहे कांडण्यास अथवा मसाला कुटण्यास जर बोलाविलें तर तेवढ्यापुरती ती यायची मुकाट्यानें, परंतु हसून-बोलून काय तें काम करायची; आणि माझी बायको त्याबद्दल जें काय देईल तें घेऊन चालती व्हायची. रिकाम्या चकाट्या पिटण्यास अगर टवाळ्या करण्यास ती कधीं एक क्षणभरदेखील बसली नाहीं. इतकेंच नव्हे, तर कामाला न बोलावतां उगीच बसण्याला म्हणून माझ्या बायकोनें तिला एकदां बोलाविलें तर तेव्हां तिनें अगदीं निर्भीडपणें तिला सांगितलें कीं,

"मला कामाला बोलवाल त्या वेळीं मी येईनच; पण उगीच बसायला मी कशी बरं येऊं?' तिचें हें उत्तर ऐकून माझी बायको तिजवर रागावली व राधाबाईच्या उद्धटपणाचें उदाहरण म्हणून मला तिनें ती हकीकत सांगितली. तेव्हां ते ऐकून मी किंचित् हंसलों व तिला म्हणालों, "इकडे बघ, तूं आपल्यावरून का त्या बाईची स्थिति पाहणार? तुला एवढं कळूं नये, कीं सहा मुलांचं व आपलं पोट भरायचं जिच्या एकटीवर पडलं आहे, तिनं जर असा चकाट्या पिटण्यासाठीं वेळ घालविला तर तिचं व्हावं कसं? तुमच्यासारख्या सुखवस्तु बायकांचं ठीक आहे; परंतु तिला बिचारीला सारा दिवस काबाडकष्ट केल्याखेरीज कांहीं दुसरी गति आहे?"

हें माझें बोलणें ऐकून माझी बायको "तें कांहीं असो, पण तिनं असं उत्तर पाठवायचं नव्हतं. कांहीं एक घटका–अर्धी घटका सांपडत नाहीं का उगीच बसायला?" असें तोंडांतल्या तोंडांत पुटपुटली; परंतु तेवढ्यावरूनच माझी खात्री झाली कीं, राधाबाईनें केलें हेंच खरोखर योग्य केले असें तिच्या मनांत तिला समजून आलें असावें; तथापि मनुष्यस्वभावाप्रमाणे आपली चुकी आपण झटकन् कबूल करणें बरें नव्हे असें वाटून तिनें एकदम स्पष्टपणें 'आपलें म्हणणें खरें' असें मला बोलून दाखविलें नाहीं.

त्या दिवसापासून ती राधाबाईस उगीच बसण्यास बोलावीनाशी झाली; परंतु घरांत यत्किंचित् अधिक आगळें झालें, कीं राधाबाईस कामासाठीं म्हणून बोलावून आणून आपल्याकडून होईल तितकी तिला मदत करूं लागली.

राधाबाईचा आणखी एक असा गुण असे कीं, कोणाचें काम न करितां फुकट म्हणून कांहीं घ्यावयाचें नाहीं. आणि मला अमुक नाहीं, किंवा माझ्या पोरांना तमुक नाहीं, तेवढं तुम्ही मला द्याल काय? असें तिच्या तोंडून एक दिवसदेखील कधीं कोणीं ऐकलें नाहीं. ती आणि तिचीं मुलें घरांत काय खातात आणि काय नाहीं– हे बाहेर कधींहि कळत नसे. तिचे दोन थोरले मुलगे ११ आणि ९ वर्षांचे होते. एक मुलगी सात वर्षांची, एक साडेपांच वर्षांची पुनः एक मुलगा सुमारें चार वर्षांचा आणि शेवटली मुलगी वर्ष-दोन वर्षांची, अशीं मुलें होतीं. तिचें मूल कधीं कोणाजवळ कांहीं मागतांना दृष्टीस पडलें नाहीं. इतकेंच नव्हे तर मीं एक-दोनदां अशी मजा पाहिली आहे, हीं मुलें माझ्या मुलांबरोबर खेळण्यास येत.

त्यांचे खेळ अगदीं सौम्य, दुसऱ्याला त्रास न होणारे असे असत. दुपारीं दोहोंच्या सुमारास शाळेंत जाण्याची वेळ झाली म्हणजे माझीं मुलें कांहीं तरी खाऊन जात. राधाबाईचीं मुलें माझ्या मुलांबरोबर खेळावयास अगर अभ्यास करावयास येत, आणि माझ्या मुलांची फराळाची वेळ झाली, कीं पट्‌कन् नाहींशीं होत. खाण्याच्या वेळीं तीं कधींहि तेथें नसत.

एका आदितवारीं मी घरीं होतों. राधाबाईच्या दोघी मुली आणि तो चार वर्षांचा मुलगा अशीं माझ्या मुलींबरोबर खेळत होतीं. मी तेथेंच एका खुर्चीवर स्वस्थ पडलों होतों. इतक्यांत माझी बायको एका ताटांत कांहीं साखरपाऱ्याच्या वड्या व द्राक्षे घेऊन आली. तिने तें ताट मजजवळ आणलें. तेव्हां माझ्या मुली चट्‌कन् आमच्याजवळ आल्या. राधाबाईचीं मुलें होतीं त्या ठिकाणींच उभीं राहिलीं. तें माझ्या लक्षांत तेव्हांच आलें. मीं लागलींच त्यांतल्या दोन वड्या व द्राक्षें घेऊन सगळयांत लहान मुलास हांक मारली. तो मुलगा आशापूर्ण अशा नजरेनें त्या जिनसांकडे पाहात होता परंतु जागचा हालला नाहीं. तेव्हां मीच उठून "घे, घे कांहीं हरकत नाहीं" असें म्हणत त्याच्याजवळ गेलों. त्या मुलानेंहि मोठ्या उत्सुकतेनें परंतु भीत भीत आपला हात पुढें केला.

आतां त्याला मी ती वडी देणार, इतक्यांत त्यानें विंचू डसल्याप्रमाणें आपला हात मागें ओढला व तोंडानें तो "नको मला" असें म्हणाला. तें त्याचें विलक्षण वर्तन पाहून माझ्या मनांत आश्चर्य, आनंद व प्रेम हीं एकदम उत्पन्न होऊन त्या आईची मला किती तरी धन्य वाटली! त्या मुलाचा चेहरा त्या वेळीं किती विलक्षण दिसला, कांहीं पुसूं नये! मी त्यास ते जिन्नस घेण्याकरितां परोपरीनें सांगूं लागलों, परंतु तो घेईना. उलट मी त्यास धरून त्याच्या हातांत देण्यास पुढें गेलों तर तो पटकन् दूर झाला आणि दाराकडे गेला; तेव्हां "तो नाहीं घेत तर नाहीं, तूं आपली घे ग ठके या साऱ्या वड्या आणखी हीं द्राक्षं!" असें म्हणून मीं तीं त्याच्याहून थोरल्या बहिणीच्या पुढें केलीं. तेव्हां ती चटकन् म्हणते, "अंः हं, माझ्या आईनं सांगितलं आहे, कीं दुसऱ्याच्या घरीं कांहीं खाऊं नये." असें म्हणून तीहि जाऊं लागली. परंतु मी तिला पकडून "वेडे पोरी, घे तूं आपली! मी सांगेन तुझ्या आईला." असें म्हणून तिच्या तोंडांत वडी घालूं लागलों. परंतु ती अगदीं केंविलवाण्या स्वरानें म्हणाली, "नका हो,

माझ्या आईला समजलं तर ती माझ्याशीं बोलणार नाहीं." तें तिचें बोलणें ऐकून तिची परीक्षा पाहण्यासाठींच कीं काय, मीं तिला एकदम म्हटलें, "अग, तुझ्या आईला कोण सांगायला जाणार आहे?" त्याबरोबर ती म्हणते, "कोण म्हणजे? मीच जाऊन सांगेन."

ती इतकें बोलल्यावर मीं तिला तसेंच जाऊं दिलें. तिची थोरली बहीण व धाकटा भाऊ केव्हांच गेलीं होतीं. माझ्या हातून सुटल्याबरोबर जणूं काय आपण मोठ्या मोहांतून सुटलों असें वाटून ती पोरगी तडक चालती झाली. पुरीं सहा वर्षें जिला झालीं नाहींत त्या पोरीला इतका शहाणपणा, इतकी सत्याची आवड आणि इतकें शुद्ध वळण लागलेलें पाहून मला काय वाटलें आणि काय नाहीं याचें वर्णन करितां येत नाहीं. दुसऱ्या कोणीं जर अशी गोष्ट मला सांगितली असती तर ती खात्रीनेंच खोटी वाटली असती; परंतु प्रत्यक्ष माझ्या अनुभवांत घडली, तेव्हां त्याबद्दल जितकें खात्रीनें लिहितां येईल तितके लिहिण्यास माझे मन क्षणभरदेखील कचरत नाहीं.

त्या मुलीचे व मुलांचे कपडे आपले जाडेभरडे व जुनेपाने असत. परंतु एक दिवससुद्धां मीं त्यांच्या अंगावर अस्वच्छ कपडा म्हणून पाहिला नाहीं. वर सांगितलेली गोष्ट घडली त्या दिवसापासून मी त्या कुटुंबाकडे विशेष पाहूं लागलों. एक दिवस तर मी त्या सगळ्यांत मोठ्या मुलीला आपल्याजवळ बोलाविले, आणि तिच्याशीं बोलतां बोलतां त्यांची एकंदर राहण्याची पद्धति काय होती ती तिच्याजवळून काढून घेतली. आपल्या भावाच्या लंगोट्या व बहिणींचा आणि आपला चोळीपरकर ती मुलगी धुवून वाळत घाली! शिवाय दोन दिवसांआड सर्व भावंडांचे अंगांत घालायचे कपडे धुण्यास ती आईला मदत करी. त्यांनीं आपले कपडे धोब्याकडे दिले नाहींत किंवा शिंप्याकडे शिवण्यास दिले नाहींत. सर्व शिवणकाम—त्यांचें तें किती असावयाचें?—घरीं आईच करीत असे. मुलांच्या बंडीचा बंद किंवा सदऱ्याची गुंडी हीं कधीं मोकळीं दिसलीं नाहींत कीं तुटलेलीं आढळलीं नाहींत. मुलांच्या हातून चुका झाल्या तर त्यांस मोठी शिक्षा म्हणजे आईनें त्यांच्याशीं घटका-दोन घटका न बोलणें. पण ही शिक्षा त्या मुलांस जबर मारापेक्षांहि अधिक वाटे. त्या मुलीनें सांगितलेल्या हकीकतीवरून मला स्पष्ट असें दिसून आलें कीं, ती आई म्हणजे एक

देवताच असली पाहिजे. कारण अशा स्थितींत आपल्या लेंकरांस इतक्या उत्कृष्ट तऱ्हेनें शिक्षण देऊन त्यांच्या ठिकाणीं योग्य तितका अभिमान जागृत करणें म्हणजे लहानसहान काम नव्हे. तें जिनें केलें ती देवताच म्हटली पाहिजे. मी आपल्या बायकोस तिचें तें उदाहरण दाखविलें, आणि म्हटलें, "पाहिलेंस ना? याचं नांव शहाणपणा, आणि शिक्षण!" माझी बायको कांहीं बोलली नाहीं, यावरूनच तिच्या मनांत ती गोष्ट ठसली असें दिसलें. त्या दिवसापासून आम्ही दोघेंहि त्या कुटुंबाबद्दल अधिक काळजी वाहूं लागलों.

एके दिवशीं रात्रीचे दहा वाजून गेले होते, आणि माझ्या बायकोच्या पोटांत एकाएकीं फार दुखावयास लागलें. तेवढ्या रात्रीं आतां बोलवावें कोणाला? मुलें निजलेलीं. आणि एवढ्या रात्रीं तीं कसचीं बाहेर जातात? इकडे घरांत बायकोमाणूस कोणी नाहीं. आणि बायको गरोदर होती, परंतु दिवस तर भरले नव्हते. यामुळें मी मोठ्या बुचकळ्यांत पडलों, व राधाबाईला तरी हांक मारावी म्हणून शेजारच्या घरीं आपणच गेलों. मी आजपर्यंत तिच्या घरीं गेलों नव्हतों. जाण्याला कारण काय? त्या घराचें पुढचें दार उघडें असल्यामुळे मी गेलों तो हांका वगैरे न मारतां तडक तिच्या खोली-च्या दाराशीं गेलों. दार अर्धवट किलकिलें होतें, यामुळें दार उघडून 'राधाबाई' अशी हांक मारून मी झटकन् आंतच शिरलों. तों राधाबाई घाबऱ्या घाबऱ्या उठली. तिच्या हातांत एक पोथीचें पान होतें, आणि मोठीं सर्व मुलें एका स्वच्छ समईच्या भोंवतालीं बसून आपापले धडे करीत होतीं, धाकटीं तीन मुलें मात्र काय तीं पलीकडे निजलीं होतीं. कांहीं दृष्टीस पडलें तरी आश्चर्य वाटण्याजोगी ती वेळ नव्हती. यामुळें मी आपल्या बायकोची हकीकत सांगून राधाबाईला 'चला' असें म्हटलें मात्र, तिनें क्षणाचाहि विलंब न करतां आपल्या थोरल्या मुलीस पोथी गुंडाळून ठेवण्यास सांगितलें व ती माझ्या पाठोपाठ आली.

बायकोच्या पोटांत दुखणें कांहीं मोठें भय वाटण्यासारखें नव्हतें. अंमळ साफ चोळून व तेल लावून किंचित् शेकल्यावर यथास्थित झालें. राधाबाई परत गेली; माझें चित्त स्थिर झालें. तेव्हां मग त्या बाईला लिहिण्यावाचण्यास येतें, मुलांच्या अभ्यासाच्या वेळीं ती स्वतः वाचीत व त्यांचे अभ्यास ऐकत बसते, याबद्दल मोठें आश्चर्य वाटले! कोणाला खरें

वाटो की खोटें वाटो, पण मी खरोखर सांगतों, कीं तें पाहून मला फारच लज्जा वाटली; कारण मी आपल्या मुलांच्या अभ्यासाच्या वेळीं असा कधीं बसलों आहें असें मला तर आटवले नाहीं.

त्या गरीब बिचाऱ्या राधाबाईच्या आणखी कितीक गोष्टी तरी मीं या अशा पाहिल्या, त्या सर्व येथें सांगूं लागलों तर त्यांचें एक पुस्तकच होईल; परंतु त्या भानगडींत मी पडत नाहीं. आतां एवढेंच सांगतों, कीं अशा तऱ्हेनें ज्या मुलांचे शिक्षण झालें, ती मुलें पुढें मोठीं होऊन त्यांनीं आपल्या आईचे पांग फेडले. सगळयांत वडील होता, तो पहिली परीक्षा पास होऊन त्यानें आधीं नोकरी धरली. राधाबाईच्याजवळ पैसे नव्हते तेव्हां अर्थातच तिला आपल्या मुलीच्या लग्नाची मोठी काळजी पडली होती, परंतु त्या काळजींतूनहि ती फार लवकर मुक्त झाली; कारण त्या मुलीचे गुण मनांत भरल्यामुळें एका सुखवस्तु गृहस्थानें--एवढें कशाला? मींच-आपल्या मुलाला बायको केली. हें लग्न होण्याच्या वेळीं माझ्या बायकोनें फार आढेवेढे घेतले, परंतु त्या वेळीं मीं कसें तरी करून तिचे मन वळविलें. आज तीच आपल्या त्या सुनेला नांवाजून नांवाजून पुरे पुरे करीत आहे.

राधाबाईच्या थोरल्या मुलास त्याच्या हुशारीमुळे व वशिल्यामुळें एकदम तिसांची नोकरी लागली. आज वाढत वाढत तो सव्वाशांवर आहे! त्यानें आपल्या दोघां भावांस कॉलेज-शिक्षण देऊन एकजण हायकोर्ट वकील, व एक इंजिनिअर झाला आहे. राधाबाईला आतां आपण आपली पोथी अगर कांहीं तरी दुसऱ्याच्या उपयोगी पडण्याजोगें काम याखेरीज कांहीं उद्योग नाहीं. त्यांचें व माझे आतां बोलणें होतें. तेव्हां, अर्थातच मागील गोष्टी निघतात आणि अशा गोष्टी निघाल्या म्हणजे राधाबाई मला म्हणतात "तुमच्या कृपेचीं फळें आज हीं मला मिळत आहेत" आणि असें त्यांनीं म्हटलें म्हणजे मला कसेंसेंच होऊन मी त्यांस स्पष्टपणें म्हणतों, "राधाबाई, हीं कोणाच्या देखील कृपेचीं फळं नव्हेत. हें सर्व तुमच्या सुशीलतेचं फळ आहे. तुमच्यासारख्याच जर साऱ्या बायका निघतील, तर मग हिंदु—" पुढें आतां माझ्याच्यानें लिहवत नाहीं. मागील सर्व गोष्टी डोळयांपुढें उभ्या राहून माझे डोळे भरून आले आहेत.



# गौरीशंकर : : २५

त्या दिवशीं 'हिमालयन् थिएटर्स' लिमिटेड कंपनीनें नवीन बांधलेल्या 'कांचनगंगा' नांवाच्या सिनेमागृहाचा उद्घाटनसमारंभ होता. 'हिमालयन् थिएटर्स' लिमिटेड ह्या प्रसिद्ध कंपनीचीं सिनेमागृहें कोणास माहीत नाहींत ? प्रत्येक प्रमुख शहरीं या कंपनीचीं एक दोन सिनेमागृहें असून चांगले चित्रपट दाखविण्याबद्दल कंपनीची बरीच ख्याति आहे. 'कांचनगंगा' सिनेमागृह बांधण्यासाठीं कंपनीच्या विपुल खजिन्यांतील पैसा पाण्यासारखा खर्च झाला होता, व त्या दृष्टीनें सिनेमागृहाचें तें नांवहि अन्वर्थक होतें. आधुनिक सुखसोयींनीं सुसज्जित आणि शिल्पशास्त्रज्ञांच्या कलेचा सुंदर नमुना या दृष्टीनेंहि कंपनीच्या कीर्तिमंदिराचा हें सिनेमागृह कळस शोभण्यासारखें होतें. 'कांचनगंगा' सिनेमागृहाच्या उद्घाटन-समारंभाचे वेळीं आमंत्रित पाहुण्यांना कंपनीनें स्वतः तयार केलेला 'गौरीशंकर' नांवाचा चित्रपट त्याच दिवशीं प्रथम पडद्यावर दाखविला. ह्या चित्रपटाचा विशेष म्हणजे या चित्रपटांतील नायिकेचें काम महाराष्ट्रांतील एका उच्च वर्णीय हिंदु सुशिक्षित कुमारिकेनें—विभावरी परांजपे—इनें केलें असून नायक व खलपुरुष यांचीं कामेंहि महाराष्ट्रीय उच्च वर्णीय पदवीधर तरुणांनींच केलेलीं होतीं. तीं सर्वच कामे फार चांगलीं साधलेलीं होतीं; नायिका 'गौरी', नायक 'शंकर' व खलपुरुष 'सारंग' यांच्या रोमहर्षक अभिनयाच्या जोडीला स्थलकालानुरूप नयनमनोहर निसर्गाचे देखावे, आपापल्या कामांत तरबेज अशा पात्रांचीं कामें, निष्णात डायरेक्टर व उत्तम फोटोग्राफी, यांची जोड मिळाल्यामुळें हा चित्रपट अव्वलपासून अखेरपर्यंत फारच उठावदार बनलेला होता. ह्या चित्रपटाचें कथानक सांगण्याचा माझा हेतु नाहीं. सार्वजनिक रीत्या ज्या वेळीं हा चित्रपट पडद्यावर दाखविला जाईल त्या वेळीं त्याचें कथानकहि कळेल. परंतु आतां जी एक विलक्षण हकीकत मी सांगणार आहें त्या हकीकतीसाठीं या चित्रपटाचा शेवटचा प्रसंग समजावून घेणें मात्र अत्यंत जरूरीचें आहे.

या चित्रपटाचें कथानक सामाजिक असून नायक व नायिका यांचें परस्परांवर प्रेम जडलेलें असतें. परंतु त्यांना परिस्थिति प्रतिकूल असल्यामुळें

त्यांच्या प्रेमांत कल्पनातीत विघ्नें येतात. त्या सर्व विघ्नांचें मूळ कारण खल-पुरुषाचें विलक्षण कारस्थान असतें. सरतेशेवटीं सर्व विघ्नें नाहींशीं होऊन एकमेकांच्या प्रेमाची कसोटी लागून नायक-नायिकेचें मधुर-मीलन होण्याची वेळ येते. शेवटच्या प्रसंगांत नायक 'शंकर' व नायिका 'गौरी' प्रसन्न चित्तानें दिवाणखान्यांत कोचावर बसलेलीं असतात. नायिका नोकरास कांहीं तरी आणण्यासाठीं सांगते. दिवाणखान्याच्या दाराचा रेशमी पडदा बाजूला होतो. नोकर येत आहे अशा समजुतीनें नायक व नायिका एकमेकांकडे सस्मित मुद्रेनें पाहत एकमेकांपासून किंचित् दूर सरकून बसतात. आंत येणाऱ्या व्यक्तीची सांवली पडलेली दिसते; परंतु ती प्रेक्षकांनाच फक्त दिसते. पडदा बाजूला करून खलपुरूष 'सारंग' त्या एकान्ताचा कायमचा अंत करण्याच्या भयंकर इराद्यानें हातांत पिस्तुल घेऊन प्रवेश करतो. त्या वेळेची त्याची ती भयंकर मुद्रा, डोळयांतील सूडाच्या ईर्षेची ती ज्वाला, बेदर्दपणें आंत येण्याची ती धिटाई व उन्मत्तपणें पिस्तुल रोखण्याची आसुरी पद्धत या प्रवेशांत फार उत्तम प्रकारें चित्रित केलेली आहे. शंकर व गौरी दोघेंहि चमकून सारंगाकडे पाहतात, त्याचा उद्देश ओळखतात. गौरी भयाकुल मुद्रेनें एकदम उभी राहते. एका क्षणापूर्वी विश्रब्ध प्रणयतरंग बहारीनें प्रकट करीत असलेलें, अस्फुट स्मितानें व वल्लभाच्या सान्निध्यामुळें गोड लाजेनें जास्तच मुग्ध बनलेलें तिचें मुखमंडल प्रेक्षकांनीं पाहिलेलें असतें. तेंच मुखमंडल सारंगाला तशा स्थितींत पाहून भयाकुल झालेलें दिसतें व प्रत्येकजण विभावरीच्या ह्या वेळच्या अभिनयनैपुण्याबद्दल स्तुति करीत असतो. गौरीला पाठीशीं घालून शंकर सारंगाकडे डोळे रोखून उभा असतो. त्याच्या चेहऱ्यावर क्षणांत त्वेष, क्षणांत तुच्छता, क्षणांत निराशा असे भाव उमटलेले दिसतात. सारंग पिस्तुल झाडतो. शंकर तोंडावर पडतो. गौरी धाय मोकलून आपल्या हृदयेश्वराला अश्रूंनें न्हाऊं घालते. सारंग दुसरी गोळी स्वतःवर झाडून घेऊन आत्महत्या करतो!—असा हा शेवटचा दुःखपर्यवसायी प्रसंग आहे.

गौरी-शंकराच्या ह्या जोडीचें प्रेममीलन व्हावें असें प्रत्येक सहृदय प्रेक्षकाला वाटत असतें; परंतु शेवटीं त्यांच्या प्रेमाचा तो तसला भयंकर शेवट पाहून प्रेक्षक हळहळतात. या प्रसंगांत तीन पात्रांच्या अभिनय-कौशल्याला पुष्कळच जागा ठेविली असल्यामुळें प्रत्येक पात्रानें अभिनयाची

कमाल केलेली आहे. ह्या रोमहर्षक चित्रपटाचे नितान्तरम्य असे सहाहि भाग दाखवून झाल्यानंतर कंपनीच्या चालकांनीं प्रत्यक्ष गौरी, शंकर व सारंग यांना स्टेजवर आणून त्यांची पाहुण्यांशीं ओळख करून दिली, व उत्तम कामें केल्याबद्दल तिघांचाहि जाहीर रीत्या गौरव केला. विशेषतः विभावरीसारख्या सुशिक्षित, उच्च वर्णीय कुमारिकेनें चित्रपटांत काम करण्याचें धैर्य दाखविले, व इतकें उत्कृष्ट काम करून दाखविलें याबद्दल चालकांनीं विभावरीची ओतप्रोत स्तुति केली; आणि विभावरीच्या वडिलांचे तिला परवानगी दिल्याबद्दल कृतज्ञतापूर्वक जाहीर आभार मानले. त्या वेळीं टाळ्यांचा नुसता कडकडाट झाला!

विभावरी माझ्या स्नेह्याची मुलगी; लहानपणापासून माहितीची. तिनें गौरीचें तें काम इतकें समजून उत्तम केलें कीं, तें पाहून मला फार कौतुक वाटलें. समारंभ आटोपल्यानंतर आम्ही सर्वजण विभावरीला शाबासकी देत तिची गाडी येण्याची वाट पाहत उभे होतों. आमच्याभोंवतीं इतरेजनांचाहि पुष्कळ मोठा घोळका जमला होता. ओळखीचा असो अगर अनोळखी असो, जो तो विभावरीची मुक्तकंठानें स्तुति करीत होता. विभावरी त्या स्तुतीनें गुदमरल्यासारखी झाली होती.

" खरोखर, विभाताईनीं गौरीचें तें काम फारच समजून, कसलेल्या नटीपेक्षांहि उत्तम केलें बुवा!" एक पोक्त गृहस्थ म्हणाले.

" झूट! अगदीं झूट! पोरीच्या नीटस चेहऱ्याकडे पाहून खोटी स्तुति करतां! गौरी, गौरी! कुठें गौरी आणि कुठें ही तुमची अल्लड विभावरी! तिला स्त्री-हृदय म्हणजे काय असतें ह्याची थोडीसुद्धां कल्पना नाहीं! म्हणे समजून काम केलें! नुसता तोंडपुजेपणा! म्हातारपणांत पोरकटपणा!"

ते शब्द ऐकून आम्ही सर्वजण चमकून पाहूं लागलों. एक अतिशय गबाळ वेषाचा, दाढीमिशा वाढलेला राकट मनुष्य बोलत होता. समारंभासाठीं मुद्दाम निमंत्रण करून बोलाविलेल्या निवडक पाहुणेमंडळींत सर्व तऱ्हेनें ओंगळ दिसणारी ही व्यक्ति कोण? अशी प्रत्येकजणाला जिज्ञासा उत्पन्न झाली.

'तो वेडा आहे, शंकाच नको. त्याचे ते डोळे पहा! काय ध्यान आहे पण! या वल्लीला आंत प्रवेश तरी कसा मिळाला?'

इतक्यांत विभावरीची गाडी आली. तिला व तिच्या वडिलांना गाडींत बसवून मीं निरोप घेतला. माझ्या स्नेह्यांनीं बरोबर चलण्यास मला फार आग्रह केला; परंतु कांहीं तरी सबब सांगून मी राहिलोंच. मला त्या 'वेड्या'-ची मुलाखत घ्यावयाची होती. कां कोणास कळे, पण मला त्याच्या त्या बोलण्याच्या पद्धतीवरून, त्याच्या त्या स्पष्टोद्गारांवरून तो तसा कां वागला याचें कारण जाणण्याची उत्कट इच्छा लागून राहिली. मीं चोहोंकडे पाहिलें, गर्दींतून तो मनुष्य एकटाच पुढे झटकून रस्त्याला लागला होता. मींहि लवकरच त्याला गांठला.

"माफ करा अं! पण आत्तांच तुम्ही जे बोललांत तें काय? गौरीचें काम तर सर्वांना फार पसंत पडलं!"

माझे शब्द ऐकतांच तुसडेपणानें तो मनुष्य एकदम माझ्याकडे तोंड फिरवून म्हणाला, "कोण तुम्ही? तुमची माझी ओळख नाहीं! जा आपल्या वाटेने- विभावरीचे शिलेदार वाटते? हाः हाः! बरेच पोक्त दिसतां!"

"विभा माझ्या मित्राची मुलगी आहे,—पण तें असो, ओळख नसतांना मी एकदम तुम्हांजवळ बोललों त्याबद्दल प्रथमच मीं माफी मागितली होती. माझ्या प्रश्नांत विभावरी ह्या व्यक्तीचा कांहींच संबंध नाहीं. विभाची तरफदारी मी करीत नाहीं. तुमच्या बोलण्यावरून गौरीचा अभिनय तिला करतां आला नाहीं असें तुमचें मत दिसते—"

"यांत काय संशय? अभिनय शिकणारी व्यक्ति स्त्री—शिकलेली स्त्री—असून तिला स्त्रीहृदय म्हणजे काय हे माहीत नाहीं. अशा व्यक्तीला गौरी-सारख्या अनुपमेय नायिकेचा अभिनय शिकविणारे त्यापेक्षांहि मूर्ख! शेवटचा तो प्रवेशच घ्या ना—खलपुरुष आपल्या वल्लभाला ठार करण्यासाठीं आलेला पाहून कोणती स्त्री अशी नुसती भेदरलेली दिसेल?"

"प्रत्येक स्त्री भेदरून जाईल."

"झूट—एकदम झूट! अहो, सारंगाच्या हातीं असलेलें तें पिस्तुल खोटें होतें हें पडद्यावरच्या तुमच्या विद्यागौरीला माहीत होतें. डायरेक्टरांनीं तिला सांगितलें, 'भेदरलेला चेहरा करा अं' तिनें तसा चेहरा केला. तेंच खरेंखुरें पिस्तुल- काडतुस भरलेलें पिस्तुल आहे अशी कल्पना करा. तें

आपल्या वल्लभावर झाडलें तर निमिषार्धांत आपला वल्लभ गतप्राण होईल अशी खात्री असतांना स्त्री काय करील? भेदरून जाईल?"

"मला वाटतें भेदरूनच जाईल; दुसरें काय करील?"

"तुमचा त्यांत दोष नाहीं. खुद्द स्त्रीलाच जर स्त्रीहृदयाची यथार्थ कल्पना नाहीं तर तुम्ही पुरुष! तुम्हांला ती कोठची असणार. गौरी—गौरी, तूं एकटीच स्त्री ठरलेस ग!"

गृहस्थ वेडा खास नव्हता, कळवळून बोलत होता. शेवटीं शेवटीं त्याच्या डोळ्यांतून झरझर अश्रु वाहूं लागले. मी थोडा वेळ कांहींच बोललों नाहीं. त्या बाहेरून गबाळ दिसणाऱ्या परंतु लोण्यासारख्या मृदु हृदयाच्या विलक्षण गृहस्थाबरोबर मी कांहीं वेळ तसाच चालत होतों.

"तुम्ही जा ना आपल्या कामाला; कां उगाच मला सतावतां?"

"पण गौरी एकच स्त्री ठरते म्हणजे काय? बाकी कोणीच स्त्रिया नाहींत का?" कांहीं तरी बोलून त्या विलक्षण गृहस्थाला बोलता करण्याच्या इराद्यानें मी बोललों.

"बाकीच्या? स्त्रिया कसल्या त्या! त्या सेल्युलाइडच्या, रबराच्या, मातीच्या, मेणाच्या, चिंध्यांच्या, नाहीं तर कचकड्याच्या बाहुल्या! हृदयाशिवाय स्त्री कसली! देशी, नाहीं तर परदेशी बाहुलीच ती! तिची कळ मात्र माहीत असली पाहिजे. ती कळ दाबतांच ठराविक हालचाल करील ती!— आणि बाळांची करमणूक होईल!!"

"तुम्ही निराश झालेले कवि दिसतां!"

"होय; माझी कविता गौरी! मी निराश कवि आणि आणि तुम्ही सारे कपि! माफ करा ना, जा आपल्या कामाला—का तुम्हांला कांहीं कामच नाहीं?"

"तुमच्या मतानें गौरीनें त्या वेळीं काय करायला पाहिजे होतें? कृपा करून मला सांगा. तुम्हांला त्रास देण्याची माझी इच्छा नाहीं, पण तुमचें मत जाणण्याची मात्र माझी उत्सुकता खरोखरीच प्रतिक्षणीं वाढत आहे."

माझे शब्द ऐकून त्या गृहस्थानें मला एकवार आपाद-मस्तक न्याहाळलें. एकदां आकाशांत शून्यदृष्टि लाविली. कांहीं वेळानें विचार केल्यासारखें करून तो गृहस्थ म्हणाला, "खरी भूक म्हणजे कशी असते हें

तुम्हांला माहीत आहे का हो ? माझ्याजवळ रुपया होता, भुकेनें प्राण गोळा झाले होते, तरी तो रुपया मीं खर्च केला नाहीं; कां ? तर-आजचा हा चित्रपट पहायची इच्छा! दारावरील माणूस रुपया पाहतांच मला आंत सोडील अशी माझी खात्री होती. हा रुपया जपण्याकरितां चार दिवस मीं अन्नावांचून काढले—"

"चला, मजबरोबर माझ्या घरीं चला, मला पंक्तीचा लाभ द्या. नाहीं म्हणूं नका. तुम्ही आलां नाहीं तर मला फार वाईट वाटेल, चला—"

त्या गृहस्थानें पुन्हा मला न्याहळून पाहिलें. जणूं काय मीं दिलेलें आमंत्रण मनापासून दिलें कीं केवळ चेष्टा करण्याचे हेतूने दिलें हें तो अजमावून पाहत होता. शेवटीं तो गृहस्थ मजबरोबर येण्यास तयार झाला. आम्ही घरीं आलों. वाटेनें मी कांहीं बोललों नाहीं; तोहि कांहीं बोलला नाहीं.

* * *

घरीं पोंहोचल्यानंतर थोड्याच वेळानें आम्ही दोघे भोजनास बसलो. खरी भूक काय असते तें त्या दिवशीं मीं प्रत्यक्ष पाहिलें! बिचारा खरोखरीच चार दिवसांचा उपाशी होता. माझ्या पत्नीनेंहि तें ओळखलें. गृहलक्ष्मीनें भुकेलेल्या पाहुण्याला पोटभर जेवूं घातलें. त्याचें जेवण संपेतोंपर्यंत मलाहि त्या दिवशीं अतिशय सावकाश जेवावें लागलें. जेवतांना तो गृहस्थ एक अक्षरहि बोलत नव्हता. माझ्या पत्नीनें वाढतांना ज्या वेळीं तिसऱ्यांदा अननसाचा मुरंबा त्यानें हात पुढें केला असतांनासुद्धां मूक आग्रहानें वाढला त्या वेळीं त्यानें खालीं घातलेली मान वर केली. साश्रु नयनांनीं त्यानें माझ्या पत्नीकडे पाहिलें. नंतर मजकडे पाहून तो म्हणाला, "माझी आई मला असाच आग्रह करून वाढीत होती. आग्रह कशाचा करायचा तें एक आईच्याच हृदयाला न सांगतां कळतें." सबंध जेवणांत येवढेंच वाक्य तो बोलला.

जेवणें झाल्यावर आम्ही तिसऱ्या मजल्यावरील मागच्या व्हरांड्यांत दोन आरामखुर्च्यांवर पडलों. शुभ्र चांदणें पडलें होतें. व्हरांडयांतून बसल्या जागेवरून आमच्या चिमुकल्या बागेची शोभा फारच सुंदर दिसत होती. उन्हाळ्याचे दिवस असल्यामुळें मोगरा, सायली, रात्रीची राणी वगैरे फुलांनीं नुसतीं बहरलेलीं होतीं. आमच्या पुढ्यांत ठेवलेल्या टेबलावरील

सिगारेट घेऊन तो गृहस्थ ओढूं लागला व किती तरी वेळ बागेकडे पाहत राहिला. कांहीं वेळानें तो म्हणाला—

" मी तुमच्याशीं तुसडेपणानें वागलों त्याबद्दल मला क्षमा करा अं. एका अनोळखी, माझ्यासारख्या ओंगळ माणसाला कोणतीहि विचारपूस न करतां अगदीं बरोबरीच्या नात्यानें आपल्या पंक्तीला घेऊन त्याचा भुकेलेला आत्मा थंड केलात. तुम्हां उभयतांना देव उदंड आयुष्य देवो. आपल्या पत्नी माउली आहेत. त्यांनींसुद्धां यत्किंचितहि तिट्कारा न दाखवितां मला पोटभर जेवूं घातलें, मला माझ्या आईची आठवण झाली. मला घरीं न बोलावतां तुम्हीं जर एखाद्या भटारखान्यांत घेऊन जाण्याचें योजिलें असतें तर मी आलों नसतों. पण तें असो– मला तुम्ही कांहीं विचारणार होतात ना ? "

" होय. खरंच. त्या चित्रपटांतल्या नायिकेच्या अभिनयाबद्दल विचारणार होतों. आमच्या विभावरीचा अभिनय तुम्हांला पसंत पडला नाहीं ? "

" नाहीं. तिला नायिकेच्या भूमिकेंतील मर्म कोणीं सांगायचा प्रयत्नच केला नाहीं. शेवटच्या प्रसंगांतील तिचा तो अभिनय त्या भूमिके-च्या मर्माशी अगदीं विसंगत होता. एखाद्या कळसूत्री बाहुलीप्रमाणे होता. त्यांत स्त्रीचा आत्मा नव्हता."

" तो कसा काय ? "

" आपण आतां 'गौरीशंकर' हा चित्रपट पाहिला ना ? ह्या चित्रपटाचें कथानक मीं लिहिलेलें आहे."

" काय तुम्हीं ? " मी आश्चर्यचकित झालों ! पण वाटणारें आश्चर्य मीं लपविण्याचा प्रयत्न केला नाहीं. माझ्या पुढ्यांत बसलेला विचित्र ओबड-धोबड प्राणी, नानाविध भावनांच्या लहरींवर लहरी उत्पन्न करणाऱ्या त्या दृश्य काव्याचा जनक असेल हें मला खरेंच वाटेना.

" तुम्हांला आश्चर्य वाटणें साहजिकच आहे. आणि तें लपविण्याचा औपचारिक प्रयत्न तुम्हीं केला नाहीं, हें पाहून तर मला फार बरें वाटलें. पण त्या चित्रपटाचें कथानक मीं लिहिलें येवढेंच नव्हे तर त्यांतल्या नायकाचें कामहि मीं स्वतः केलेलें आहे––"

" काय?–म्हणतां तरी काय!—पण आज आपण जो चित्रपट पाहिला तो कोणता ? "

" तोच आम्हीं बनविलेला चित्रपट आहे. आपण पाहिला त्यांतला बराच भाग नवा जोडलेला आहे हें खरें; पण निसर्गांचे देखावे जुनेच आहेत. मी तुम्हांला बुचकळ्यांत टेवीत नाहीं, नीट पहिल्यापासूनच सांगतों.—

* * *

त्या गोष्टीला दहा वर्षे होऊन गेलीं. चलत्-चित्रपट ही आपल्या देशांत त्या काळीं अगदीं नवीनवलाई होती. चित्रपटाकरतां छोटीं कथानकें लिहिणें, चित्रपटांत काम करणें वगैरे धंदे किफायतशीर होतील असें मला त्या वेळी फार वाटत असे. ग्वालेरीच्या एका श्रीमंत सरदारानें भांडवल दिलें. त्यावर एक कंपनी निघाली होती. तज्ज्ञ म्हणून त्या कंपनीत एक इटालियन गृहस्थ डायरेक्टर होता. त्या कंपनींत काम करण्यासाठीं नट पाहिजेत म्हणून जाहिरात दिली गेली. मीं अर्ज केला. आतां दिसतों तसा त्या वेळीं मी दिसत नव्हतों. पुष्कळ अर्जदारांतून त्या इटालियन डायरेक्टरनें मला पसंत केलें. मी त्या कंपनींत दाखल झालो. त्या वेळीं चाललेल्या चित्रपटांत अलीगडचा मिर्झाअल्ली नांवाचा एक मुसलमान तरुण नायकाचें काम करीत होता. अलीगडकडील मुसलमान मोठे रुबाबदार, देखणे व हुषार असतात. त्यांचा बांधा, एकंदर नोकझोक, मोठा डौलदार असतो. वागणें दरबारी मिजाशीचें असतें. मिर्झाअल्ली तसाच होता. कंपनींतील सर्वजणांशीं त्याचें वर्तन वरून मिठ्ठास पण आंतून मोठें उर्मट असे. नायिकेचें काम करण्यासाठीं इटालियन डायरेक्टरांनीं एक सौंदर्यखनी मुग्ध बालिका पैदा केली होती. ती कारवारकडची होती. तिचें नांव—गौरी. नायिकेला लागणारे सर्व गुण तिचे अंगीं स्वयंभू वसत होते. एखाद्या सुंदर सरोवराच्या स्फटिकवत् जलराशीवर मंद वायूसुद्धां ज्याप्रमाणें लहरी उत्पन्न करतो, अगर सतारीच्या तारांना अस्फुट स्पर्शसुद्धां ज्याप्रमाणें कंपायमान करतो त्याप्रमाणें तिच्या अनुपमेय सुंदर मुखकमलावर कोणताहि भाव अगदीं सहज प्रकट होत असे. ती शिकलेली होती, तशीच चाणाक्ष आणि चतुर होती. सर्वांत मोठी गोष्ट म्हणजे ती सहृदय होती. लोहचुंबक ज्याप्रमाणें लोह आकर्षण करतो त्याप्रमाणें गौरीनें माझें

हृदय आकर्षिलें. तिला मीं पाहिलें आणि त्या क्षणापासून तिचा मी दासानुदास बनलों. थोड्या दिवसांतच मला कळून चुकलें कीं, मिर्झाअल्लीची पापदृष्टि गौरीवर आहे. माझ्या भावनाहि मिर्झाअल्लीला कळल्या असाव्या असा मला संशय येऊं लागला. प्रेम आंधळें असतें म्हणतात; पण तें म्हणणें खोटें आहे ! खऱ्या प्रेमामुळें दिव्य दृष्टि प्राप्त होते. त्या दिव्य दृष्टीमुळेच मिर्झाअल्लीसारख्या अत्यंत चतुर, बाहेरून मोठ्या उदार आणि सरदारी दिसणाऱ्या तरुणाच्या हृत्कपाटाच्या चोर खणांतील तो नीच हेतु मला दिसला. गौरीचें—माझ्या प्रेमनिधानाचें—त्या महाविपारी भुजंगापासून रक्षण करण्याचा मीं संकल्प केला. गौरीच्या माझ्याबद्दल त्या वेळीं काय भावना होत्या, त्या शोधण्याचा मीं प्रयत्नच केला नाहीं. कंपनीनें हातीं घेतलेल्या चित्रपटाचें काम चालू होतें. चित्रपट घेत असतांना बारीकसारीक पण महत्त्वाच्या बाबी—ज्याला 'टेक्निक' म्हणतात त्याचा अभ्यास करण्याबद्दल मला इटालियन डायरेक्टराची ताकीद होती, पण माझें सारें लक्ष गौरीच्या रक्षणाकडे होतें. एके दिवशीं दुपारीं स्टुडिओंत दुसऱ्याच एका प्रसंगाचे फोटो घेण्यांत सर्वजण गुंतले होते. त्या प्रसंगानंतर गौरी आणि मिर्झाअल्ली यांचा प्रवेश घेणार होते. म्हणून गौरी तयार होऊन बागेंत एकटीच बसली होती. फोटो घेत होते तेथून गौरी बऱ्याच आड बाजूला बसली होती. त्या बाजूकडून एक अस्फुट असा गुदमरल्यासारखा आवाज माझ्या कानीं आला. विजेच्या वेगानें मी त्या ठिकाणीं गेलों. मिर्झाअल्ली गौरीला कवटाळून तिचें चुंबन घेण्याच्या बेतात होता. गौरी सर्व शक्ति एकवटून त्याला दूर लोटण्याचा प्रयत्न करीत होती. मिर्झाअल्लीच्या हनुवटीवर मीं एक जोराचा ठोसा लगावला. त्यासरशीं तो कोलमडून पडला. गौरी माझ्या बाहुपाशांत विकल होऊन सुन्न अवस्थेंत पडली. तिला झीट आली होती. मिर्झाअल्ली शब्दहि न बोलतां उठून कपडे साफसूफ करून उभा राहिला. माझें त्याच्याकडे लक्षहि नव्हतें. सर्व शक्ति डोळ्यांत आणून अनिमिष नेत्रांनीं गौरीच्या मुखकमलाकडे एकाग्रतेनें मी किती तरी वेळ तसाच पाहत होतों.

"तकसीर माफ करना यार; फेरसे ऐसा कबी न होगा." मिर्झाअल्लीचे ते शब्द माझ्या कानांवर आले, मी भानावर आलों. माझ्या प्रेमनिधानाच्या मुखकमलावर भृंगाप्रमाणें खिळलेले माझे डोळे मोठ्या नाखुषीनें मीं

मिर्झाअल्लीकडे वळविले. मला दरबारी थाटाचा मुजरा करून तो तेथून निघून गेला. गौरीनें डोळे उघडले. मजकडे अत्यंत कृतज्ञतापूर्वक पाहिलें. माझ्या बाहुपाशांतून दूर होण्याचा तिनें प्रयत्न केला नाहीं. कांहीं तरी बोलण्यासाठीं ती आपले पोंवळयासारखे ओठ उघडणार इतक्यांत खुणेची घंटा वाजली. गौरी दचकली; मजपासून दूर झाली व क्षणार्धांत स्टुडिओकडे निघून गेली. मी किती तरी वेळ तेथेंच उभा होतों.

प्रेमाचें पाल्हाळिक वर्णन करून मी तुम्हांला कंटाळा आणीत नाहीं. पण प्रेमप्राप्ति म्हणजे प्रत्यक्ष स्वर्ग आणि प्रेमनिराशा म्हणजे प्रत्यक्ष नरक येवढेंच सांगतों. मी त्या क्षणीं स्वर्गांत होतों. माझ्या हृदयेश्वरीनें माझ्या प्रेमाचा स्वीकार केला होता. त्यामुळें माझ्या महत्त्वाकांक्षेला जणूं काय नवजीवनच प्राप्त झालें. मीं त्याच सुमारास 'गौरीशंकर' हें कथानक लिहिलें. तें लिहितांना किती तरी वेळां मीं माझ्या स्फूर्तिदेवतेची सल्ला-मसलत घेतली. कथानक लिहून झाल्यानंतर तें मीं कंपनीच्या चालकांना दाखविलें. इटालियन डायरेक्टरला तर तें फारच आवडलें. त्याचा चित्रपट करण्याचें ठरलें. त्या चित्रपटांत नायकाचें काम मीं केलें तरच आपण नायिकेचें काम करूं असा गौरीनें हट्ट धरला. कंपनींतील बहुतेकांना आमचें गोड गुपित कळलें होतें; इटालियन डायरेक्टरनें तर तें कथानक लिहिल्याबद्दल व गौरीचें प्रेम संपादन केल्याबद्दल माझें मुक्तकंठानें अभिनंदन केलें. मीं लिहिलेल्या कथानकांत नायकाचें काम मींच करावें असें ठरलें आणि खलपुरुषाचें—सारंगाचें—काम मिर्झाअल्लीकडे सोपविण्यांत आलें. माझ्या, नव्हे आमच्या त्या चित्रपटांत मिर्झानें कोणतेंच काम करूं नये असें आम्हां उभयतांस फार वाटत होतें; परंतु आम्हांस तसें बोलतां येईना. मिर्झाअल्ली उत्तम नट होता व लोकप्रियहि झालेला होता; शिवाय कंपनीचा बराच मोठा तनखा तो खात होता; त्याच्या कामाशिवाय कोणताच चित्रपट पूर्ण होणार नाहीं असें कंपनींत सर्वांचें मत होतें, आणि तें खरेंहि होतें. माझ्या गौरीशीं त्यानें जो अतिप्रसंग केला त्यामुळें त्याचा आम्हांस विलक्षण तिट्कारा आलेला होता. पण ती गोष्ट आम्हां तिघांशिवाय कोणालाच माहीत नव्हती. शिवाय त्या दिवसापासून मिर्झाअल्लीचें वर्तनसुद्धां फारच चांगलें होतें. गौरीच्या बाबतींत तो फारच आदर दाखवी. ह्या सर्व कारणांमुळें आम्ही त्याच्या कामास हरकत घेऊं शकलों नाहीं व सारंगाचें काम तो करूं लागला;

आणि माझ्या कल्पनेपेक्षां तें काम तो फारच उठावदार असें रंगवूं लागला.

गौरीशंकर चित्रपटाचे निरनिराळे देखावे घेण्याचें काम सुरू झालें. त्या चित्रपटासाठीं कंपनीनें अतोनात पैसाहि खर्च करण्याचें ठरविलें. काश्मिरांत जाऊन निसर्गाचे खास देखावे ह्या चित्रपटासाठीं घेण्याचें ठरलें. आपण चित्रपट पडद्यावर जसा सुसंगत पाहतों त्याच अनुक्रमानें देखावे कधींच घेत नाहींत हें कदाचित् तुम्हांस माहीत असेल. जसें सोयीला येईल त्याप्रमाणें देखावे घेतात. देखावे लागोपाठ अनेक घेतात, आणि मग निवड करून त्यांची संगति लावावी लागते. आमच्या चित्रपटासाठीं सर्व सामग्री सिद्ध होऊन फोटो घेण्याचें काम सुरू झालें. इन्डोअर सीन्स झाल्यानंतर आम्ही काश्मीरला जाणार होतों. काश्मीरास जाण्यापूर्वीच आमचा विवाह होण्याचें निश्चित झालें होतें. त्यामुळें ह्या चित्रपटाला निराळेंच मनोहारित्व प्राप्त झालें होतें. शेवटला प्रसंग इन्डोअर सीन्सपैकींच असल्यामुळें तो आमच्या ह्या मुक्कामांतच घ्यायचें ठरलें. आम्ही दोघेंहि पूर्ण निश्चिंत, सुखी आणि पुढील सुखासाठीं उत्सुक झालेलों होतों. आपला पहिलाच चित्रपट इतका यशस्वी होण्याचीं तीं चिन्हे पाहून आम्ही केवढीं तरी मनोराज्यें बांधीत होतों! पण आमच्या नशिबाच्या चक्राला ठरलेल्या शेवटाकडे काळ गति देत होता!

शेवटचा प्रसंग तुम्हीं पाहिलातच; पण फोटो घेतांना त्याचे अनेक भाग पडतात. प्रथम आम्हां दोघांचा, नंतर सारंगाचा तो प्रवेश, नंतर गौरी एकटी, नंतर सारंग व मी हा प्रसंग शेवटचा–हाय–खरोखरीच शेवटचा ठरला!—ह्या प्रसंगांत आम्हां तिघांसहि अभिनय करण्याला जागा मुबलक होती; आणि आमचे तिघांचेहि अभिनय फारच उत्तम होत असत, असें कंपनींतील सर्वजण म्हणत असत. प्रत्यक्ष फोटो घेण्याचे वेळीं कॅमेरामन फार काळजीपूर्वक फोटो रेकॉर्ड करीत होता. सारंगाची ती भीषण सावली प्रथम नीट पडेना म्हणून रिफ्लेक्टर्स नीट करून बसविले. सारंगाची आंत येण्याची ढब जशी पाहिजे तशीच होती. त्याच्या चेहऱ्यावर सैतानी सूडाची ती ज्वाला जशी पाहिजे तशीच होती. शेवटच्या क्षणाला सारंगनें पिस्तुल रोखलें– मजवर रोखलें त्या वेळीं– त्या वेळीं माझी गौरी भेदरली नाहीं! तिच्या चेहऱ्यावर तुच्छता दिसत होती! निग्रह दिसत होता. त्वेष, संताप, उद्वेग, निराशा सर्व कांहीं दिसत होतें, पण भीतीचा लवलेशहि दिसत

नव्हता. त्या शेवटच्या क्षणांत गौरीनें ओळखलें, कीं मिर्झाअली खराखुरा सूड घेण्यासाठीं भरलेलें पिस्तुल घेऊन आला आहे व तो आपल्या वल्लभावर गोळी झाडणार! माझी गौरी मोठ्या आवेशानें पुढें झाली—धाडकन् पिस्तुलाचा आवाज झाला, माझ्या खांद्यांतून जळजळीत असें कांहीं तरी भासलें. मी बेशुद्ध होऊन पडलों. इस्पितळांत कितीतरी दिवस मी बेशुद्धच होतों. शुद्धीवर आलों नसतों तरी फारच उत्तम झालें असतें; नंतर मला कळलें, कीं गौरीनें माझ्यासाठीं आपल्या प्राणांची आहुति दिली होती. माझी प्रेमज्योति विझाली होती!—तेव्हांपासून पृथ्वीच्या पाठीवर मी हा असा-वेड्यापिशासारखा भटकतों आहें. आतां सांगा, तुम्हांला नाहीं वाटत, कीं गौरी— माझी गौरी ही एकटीच स्त्री ठरते म्हणून—"

* * *

प्रश्न जरी मला विचारला होता तरी त्याची दृष्टि आकाशांत रोहिणी-नक्षत्रपुंजाकडे खिळलेली दिसत होती. त्याच्या डोळ्यांतून अश्रूंची मौक्तिक-माला ओघळत होती!—त्याची ती करुण कहाणी ऐकून मलाहि गहिंवरून आलें. किती तरी वेळ आम्ही दोघेहि तसेच स्तब्ध होतों.



## चंद्रिका-विहार : : २६

दिवेलागण झाली नाहीं तोंच पौर्णिमेच्या जवळ येत चाललेला चंद्रमा आपलें शान्त व स्निग्ध तेज भूतलावर ओतूं लागला. चोरपावलांनीं येणारा अंधार व वरून झरणारें अमृतमय तेज यांच्या झटापटींत सृष्टीचें स्वरूप मोठेंच रमणीय भासूं लागलें.

मी व माझा मित्र मनोहर एका टेकडीवर बसून हा देखावा पाहत होतों. घरीं परतण्याची वेळ झाली असतांहि आम्हांस तिचें भान नव्हतें. कांहीं काळ अनिमिष नेत्रांनीं चंद्रबिंबाकडे पाहत आम्ही बसलों असतां मनोहर मध्येंच म्हणाला, "आजचें चांदणें किती स्वच्छ, किती रमणीय न् उन्मादकारी आहे, नाहीं? कवित्वाचा गंध नसतांहि मनांत अशा गोड

कल्पना नाचत आहेत! वाटतें—" आणि तो मध्येंच थांबला. नंतर त्यानें मजकडे पाहून हास्य केलें.

मीहि हंसलों व म्हटलें, "तुझ्या मनांत कोणता विचार आला आहे सांगूं? तुला असें वाटतें आहे कीं, आपले लाडकें मनुष्य बरोबर घ्यावें न् दूर कोठें असें एकान्तांत यावें न् चंद्रिका विहाराचें सौख्य भोगावें, होय कीं नाहीं?"

माझ्या पसरलेल्या हातावर अनुमतीची टाळी देत मनोहर मनापासून हसला. मीं पुढे म्हटले, "आणखी तुला असेंहि वाटत असेल कीं, जमल्यास त्या बरोबर येणाऱ्या माणसाला पुरुषवेष द्यावा न् स्वच्छंदानें घराबाहेर पडावें. मग एकमेकांच्या खांद्यांवर हात टाकून प्रेमाचे वार्तालाप करीत यथेच्छ भटकावे! रोमान्सचा रोमान्स झाला, वेषान्तरामुळे धोका व कुचेष्टा यापासून रक्षण झालें, न् खरा सुखोपभोगहि झाला."

"श्याम, बहार केलीस." मनोहर माझ्या पाठीवर थाप मारून म्हणाला, "प्रियपत्नीसह चंद्रिकाविहाराची कल्पनाच आधीं रम्य; आणि त्यांत रोमान्सची भर. सुंदर!"

मीं एकदम म्हटले, "मग ती प्रत्यक्षांत आणूं या का? मी माझ्या बायकोला घेऊन येण्यास तयार आहे. बघ, शुभस्य शीघ्रम्! आपली ही आकांक्षा तारुण्यसुलभ व निष्पाप आहे. आपल्या बायकाहि अशा रोमान्स-चा आस्वाद घेण्याइतक्या समंजस आहेत. मुलांबाळांचें लचांड मागें लागण्यापूर्वी अशा काहीं मौजा उपभोगून घेतल्या पाहिजेत. मग?"

"अगदीं एकदम कबूल! मात्र पुरुषी वेश घेण्याचा रोमान्स पहिल्यां-दाच नको. आपल्या बायकाच कबूल व्हायच्या नाहींत."

मीं म्हटलें, "राहिलें; फिरायला तर जाऊं या. मग ऊठ तर, झटपट घर गांठूं. हें पहा, आठाचा सुमार आहे. घरीं जाऊन, भोजन आटोपून बाहेर पडण्यास दीड तासाचा अवधि पुष्कळ झाला." मनोहरनें तें मान्य केलें व आम्ही घराकडे वळलों. पुढच्या गोड कल्पनेच्या ओढीनें आमचीं पावलें झपझप पडत होतीं. मी इतका दंग झालों होतों कीं, घराच्या जवळ येईपर्यंत मला कसलेंच भान नव्हतें.

इतक्यांत मनोहरनें मला थांबवून म्हटलें, "श्याम, मघाशी मी हुरळून चंद्रिकाविहारास येण्याचें मान्य केलें खरें; पण गड्या, माझी

कौटुंबिक स्थिति तितकीशी अनुकूल नाहीं. थांब, उगीच उसळूं नकोस; मी मिळवता आहें, स्वतंत्र आहें. मी हटवादीपणानें एखादी गोष्ट करण्याचें मनांत आणिलें तरी माझ्या आड माझे आईबाप येणार नाहींत हेंहि खरें. परंतु असें असूनसुद्धां संकोचामुळें म्हण किंवा मन दुखविलें जाईल कीं काय, या कल्पनेमुळें म्हण किंवा नव्या सुधारणा अमलांत आणण्याइतकें मनोधैर्य माझ्या अंगीं नाहीं म्हणून म्हण, एवढें खरें, कीं आजच्या आज पत्नीला बरोबर घेऊन चंद्रिकाविहारास येणें माझ्याच्यानें होणार नाहीं—"

"हा लेका नेभळटा! तूं असा नेहमींच अवसानघातकी आहेस—" असें एकदम म्हणून मीं त्याची निर्भर्त्सना केली. त्यानें ती मुकाट्यानें ऐकून घेतली. नंतर मी त्यास 'तरुणांचें कर्तव्य काय?' यावर जोरदार व्याख्यान सुनावलें, व आपण वाटेल तो आरोप सहन करून नव्या युगाचे प्रवर्तक झालें पाहिजे व अन्यायाचा प्रतिकार करण्यास सज्ज असलें पाहिजे इत्यादि चेतवणी दिली.

माझ्या वटवटीचा त्याच्यावर परिणाम झाला असावा. तो गुळमुळत म्हणाला, "तुझ्या बोलण्यांत तथ्य आहे. पाहतों प्रयत्न करून—"

"पाहतों नाहीं, आलंच पाहिजे. अरे, आपल्या बायकांच्या मनाला, आवडीनिवडीला व स्वातंत्र्याला थोडा वाव द्या. कूपमंडूक किती दिवस राहणार? आपल्या बायकांना आपली ही कल्पना किती मोहक वाटेल याची तुला कल्पना तरी आहे? तुझ्या आईवडिलांप्रमाणंच माझी आईहि जुन्या वळणाचीच आहे. पण असल्या सुधारणेच्या बाबतींत मी तिची पत्रास मुळींच ठेवणार नाहीं. या बाबतींत मी तिच्याशीं युक्तिवाद करणारच नाहीं मुळीं. एका शब्दांत निकाल. हं, जा आतां—" तो आपल्या घरांत शिरला व मी आपल्या घराकडे वळलों.

एखाद्या विजयी योद्धयाप्रमाणें मी घरांत शिरलों. केवळ रोजच्या संवयीस अनुसरून मीं पादत्राण पडवींतच काढलें. नाहीं तर नवयुगाचा प्रवर्तक म्हणून मी पादत्राणे बाहेरच काढून ठेवण्याची जुनी चाल सहज खेटरून बाजूला सारली असती. कपडे काढतांच मी स्वैंपाकघरांत जाऊन उभा राहिलों. माझी पत्नी पाटपाणी घेत होती व आई देवाला नीरांजन लावीत होती. उदबत्तीचा मंद सुगंध दरवळत होता.

"जेवायचं झालंयू, कपडे काढून पायच धुवावे." पत्नीनें अस्पष्ट शब्दांत सुचविलें.

मीं तिला म्हटलें, "आणि माझ्याबरोबर तुझंहि पण ताट वाढून घे. आज आपल्याला दोघांना चांदण्यांत फिरायला जावयाचं आहे—" माझ्या पत्नीचा चेहरा एकदम हर्षोत्फुल्ल होईल अशी मला खात्री असल्यामुळें मी तिच्याकडे दुर्लक्ष केलें, व आमच्या आईसाहेब त्यावर काय म्हणतात तें समजून घेण्याकरितां त्यांच्याकडेच पाहिलें; पण त्या आपल्याच नादांत होत्या. माझी मोठी निराशा झाली. आईनें माझ्या बोलण्याकडे जाणून बुजून दुर्लक्ष केलें असावें, असा माझा ग्रह झाला म्हणून मीं जरा गुरकावूनच तिला पुकारलें व आपली इच्छा स्पष्ट शब्दांत बोलून दाखविली. नंतर तिचें उत्तर ऐकण्याच्या आंतच मी 'तरुण मनाच्या आकांक्षा काय असतात, म्हाताऱ्या माणसांनीं त्याचा कसा सहानुभूतीनें विचार केला पाहिजे आणि तसें नच झालें तर आम्हां तरुण-लोक कशी बंडखोरी करूं' याचें भडक वर्णन केलें; आणि तूं आमच्या आड आलीस तर तुझा विनाकारण अपमान होईल असेंहि सुचविलें. यावर आई संतापणार व चिडून कांहीं तरी बोलणार अशी माझी अटकळ होती; परंतु तसें कांहींच झालें नाहीं.

ती शान्तपणें म्हणाली, "श्याम, एवढ्या मोठ्या व्याख्यानाची उगीच उधळपट्टी केलीस. तुझ्या कोणत्याहि इच्छेच्या किंवा कृतीच्या आड येण्याची माझी इच्छा नाहीं. आपलं हिताहित न कळण्याइतका तूं लहान नाहींस हें मला कळतं—" एवढें बोलून ती देवाकडेच पाहत आपल्या सुनेला म्हणाली, "मुली, तुमचीं दोघांचीं पानं घे बाळ. मी वाढतें तुम्हांला—" तिचा स्वर व मुद्रा अगदीं शान्त होती. म्हाताऱ्या माणसांच्या जुन्यापुराण्या समजुतींना पायांखालीं तुडवून नव्या युगाचा प्रवर्तक होण्याची माझी महत्त्वाकांक्षा माझ्या आईनें अशी एकदम पातळ करून टाकली.

आणि या गोष्टीचाहि—तिच्या एकदम अनुमतीचाहि मला राग आला. मी झटक्यानेंच कपडे काढण्यास बैठकीच्या खोलींत आलों तों माझ्या आधींच माझी पत्नी तेथें हजर झाली होती. मला वाटलें, माझ्या मनोधैर्याची मुक्तकंठानें प्रशंसा करून निर्भरालिंगन देण्यासच ती तेथें आली असावी; पण तिची मुद्रा गंभीर व कांहींशी रागीट दिसत होती. ती म्हणाली, "आज आपण हें कसलं वेड डोक्यांत घेतलं आहे? आणि घेतलं तें घेतलंत, सासू-

बाईंच्यावर तोंडसुख कां ? आपल्या आईच्या सौजन्याची व सरळ मनाची आपणास अजूनहि ओळख पटली नाहीं ? विनाकारण त्यांचा अपमान केलात. ही गोष्ट आपण अगदीं अगदीं वाईट केलीत. सासूबाईंनीं मला परवानगी दिली तरी चंद्रिकाविहारास येण्याची माझी इच्छा नाहीं." एवढें म्हणकाऱ्यानें बोलून ती निघून गेली. या आमच्या स्त्रिया ! शिकलेल्या अलीकडच्या मुली !!

हा प्रकार पाहून मी चक्रमच बनलों. मीं विमनस्क मनानें कपडे काढले. मीं स्वगत म्हटलें, "मानसिक दास्याची ही परमावधीच नाहीं का ? नवऱ्याबरोबर फिरायला जाण्यास माझ्या पत्नीस काय मनापासून नको असेल ? परंतु करते काय ? रूढी, समाज, मनोदौर्बल्य, चालत आलेल्या कल्पना यांचें किटण चढलें आहे ना मनावर. ज्याकरितां मनोहर भितो व कच खातो, त्याचकरितां लीला--माझी पत्नीहि– कच खाते. दुसरें काय ? आपण तिला धीट केलेंच पाहिजे--"

मी कांहीं निश्चय करून स्वैंपाकघराकडे आलों. आंत येणार तों माझ्या आईचा स्वर कानीं आला. कांहीं तरी खवचट बोलून ती आपल्या सुनेचा पाणउतारा करीत असली पाहिजे अशी माझी समजूत झाली, म्हणून मी तेथेंच थांबलों न् कान दिला.

आई म्हणत होती, "अग, तूं वेड्यासारखी गांगरतेस काय अशी ? माझा अपमान नाहीं त्यांत. पूस ते डोळे. संसार माझ्याशीं का करायचा आहे ? बाई ग, सारा जन्म ज्याच्याशीं काढायचा, त्याच्या मर्जीप्रमाणंच चाललं पाहिजे. पुरुष म्हणतील तेंच प्रमाण. अन् देवाशपथ सांगतें, असल्या मानापमानाच्या खुळया कल्पना माझ्या मनांतसुद्धां येत नाहींत. तुमचं दोघांचं प्रेम किंवा सुख पाहून मला वाईट वाटावं का समाधान वाटावं ? तुम्हीं असा खेळीमेळीनं संसार करावा हीच तर माझी इच्छा आहे. हं आटप. श्याम येईल न् पुन्हा रागावेल. हंस पाहूं,--खुळी कोठली !"

माझी आई खरोखरच अशी समजूतदार व थोर मनाची होती का ?— होती, असली पाहिजे. सासूकडून त्रास झाल्याचा बोभाटा माझ्या पत्नीनें एकदांहि केल्याचें मला आठवत नव्हतें. मला प्रश्न पडला, चंद्रिकाविहारास जावें कीं नाहीं ?

मला उगीचच थोडेंसें गोंधळल्याप्रमाणें झालें. क्षणा दो क्षणांतच

माझ्या अंतश्चक्षुंपुढें मनोहराची मूर्ति दिसूं लागली. मीं स्वतःचाच निषेध करीत स्वैंपाकघरांत प्रवेश केला. मी पाय धुऊन पाटावर बसलों. आईनें लीलेचें ताटहि बाजूस वाढलें होतें. माझ्याकडे फणकाऱ्यानें पाहत तिनें माझा निषेध चालविला होता. मला त्याची थोडी गंमत वाटली.

मी भोजनास बसलों, व आईच्या अति आग्रहानें तीहि मजकडे रागें रागें पाहत पानावर बसली. आपल्या मनाचा स्वच्छपणा व मोकळेपणा दाखविण्याकरितां आईनें इकडचें तिकडचें कांहीं गमतीचें बोलणें काढलें. ती स्वतः हसली व आम्हां दोघांनाहि तिनें हसविलें. खरेंच! आई फार समजूतदार व चांगल्या मनाची आहे असे मला दिसून आलें.

माझा मागचा भात संपण्याच्या आंतच लीलेचें भोजन आटोपलें होतें. ती झटकन हात धुवून आली व आईला म्हणाली, " ऐकलं का, आपणहि आतां फराळाला बसावं. म्हणजे मागचं सर्व आवरायला बरं पडेल."

आई विनोदी स्वरांत म्हणाली, " कांहीं नको मागची काळजी. म्हातारी आहे मागचं सगळं उरकायला खंबीर. आतां राजाराणी विडा खाऊन बाहेर पडूं देत."

लीला फुरंगटून म्हणाली, " मग मी नाहींच जात फिरायला. "

" बरं, वाढ माझं ताट-" आईनें तिची समजूत केली.

मीहि मोरीवर जातांना म्हटलें, " अर्धा तास वेळ आहे, सावकाश होऊं दे--"

मी आंचवून परत आलों तों लीला आईला म्हणत होती, " खरंच गडे, आपणहि आमच्याबरोबर चलावं ना फिरायला. काय हरकत आहे आपण तीघंहि जाऊं--"

आई फराळाला बसत म्हणाली, " मी बरोबर येऊं?--कशाला ग खुळे?"

" कशाला म्हणजे?--आलं पाहिजे." लीला लाडका हट्ट घेत म्हणाली, " मी नेणार आपल्याला." असें म्हणत तिनें माझ्याकडे सहेतुक पाहिलें. मी तिच्या म्हणण्यास रुकार देऊन आईला फिरण्यास चलण्याविषयीं आग्रह करावा असें तिचें मनोगत दिसलें; पण मला ती गोष्ट इष्ट नव्हती म्हणून म्हणा किंवा अन्य कांहीं कारणानें म्हणा मी मूग गिळले.

आईनें मजकडे पाहत हंसत म्हटलें, "दोघांमध्यें तिसऱ्याची अडचण कशाला ग वेडे ! चांगल्या जमून आलेल्या खिरींत मीठ का टाकतात कुठं ?"

लीला एकदम म्हणाली, "मीठ नाहीं पण रंग जमून येण्याकरतां व स्वादिष्टपणाकरतां केशर टाकावं लागतं, नाहीं का ?--" आणि तिनें पुन्हा मजकडे पाहिलें.

मी कांहीं बोलणार तों आई म्हणाली, "केशर एखाद्याला सोसतं न सोसतं. बाजारांत अलीकडे अस्सल देशी केशर मिळतंय कुठं ! आणि श्याम तर कट्टा स्वदेशभक्त आहे. आज साध्या खिरीचाच बेत बरा--"

मी मुकाटयानें बाहेर आलों. आईला बरोबर घ्यावी कीं न घ्यावी, असा एक विचार माझ्या मनांत घोटाळूं लागला. इतक्यांत लीला तेथें आली व म्हणाली, "सासुबाईना बरोबर चलण्याविषयीं आग्रह करावा ना जरा. बरं दिसेल ते. त्यांच्या येण्यानं जास्त मजाच येईल." कां कोणास माहीत, मनोहर सपत्नीक येणार असल्याचें सागून त्यास आईचें येणें रुचणार नाहीं असें सांगितलें.

लीलेला प्रश्न पडला. पण तिला आपल्याबरोबर आपल्या ओळखीची एक समवयस्क बाई येणार असल्याचें ऐकून आनंद झाला, ती म्हणाली, "बरं तर. आणखी केव्हां तरी सासूबाईसह जायचं अं--" मीं तें मान्य केलें.

सुमारें पंधरा मिनिटांनीं आम्ही पतिपत्नी घराबाहेर पडलों. या पराक्रमास लीलेची मनापासून अनुमति नसल्यामुळें तिच्या मनाला मोकळेपणा नव्हता. 'आपला हा कांहींतरी हट्ट आहे, झालें.' अशी कुरकुर करीतच तिनें घराबाहेर पाऊल टाकलें होतें. मीं तिच्या मानसिक दास्याची कींव करीत तिच्या भित्रेपणावर एक छोटें व्याख्यान झोडलें, आणि घाई करून मनोहराचें घर गांठलें. लीला एका बाजूला उभी राहिली. मीं पुढें होऊन मनोहरास पुकारलें. तो लगबगीनेंच बाहेर आला व म्हणाला "आपलें कांहीं जमत नाहीं बोवा. तुला परवानगी मिळाली का ?"

मीं आपल्या पत्नीकडे बोट दाखविलें. "मग येणार ना ! जरा नेट धर--अगदींच नेभळटपणा धरून कसें चालेल ?--" मीं त्यास धीटपणाचें आणखी एक जोरदार इंजेक्शन दिलें. पण त्याचा विशेष उपयोग झाला

नाहीं. त्याचे हातपाय लुले पडले ते पडलेच. मी त्याच्यावर संतापलों. " असे भिऊन मरा तर." असा त्यास आशीर्वाद देऊन मी पत्नीजवळ आलों व म्हटलें, " चला—"

" मनोहरभाउजी येताहेत ना ?—" तिनें विचारिलें.

" नाहीं. अ पणच जायचें—"

" एकट्यांर्न ?"

" नाहीं, दोघांनीं. तूं न् मीं." मीं चिडून म्हटलें, " तुला यायचें का नाहीं ? नाहीं तर तूंहि मर जा. हिंदुसमाज आणखी रसातळाला जाणार आहे—" मी चालूं लागलों व माझी गृहिणी माझ्यामागोमाग येऊं लागली. मी कोणता तरी एक रस्ता धरला होता. पाय झपझप चालले होते. मनांत उद्वेग होता व तोंडांत आमच्या समाजाला व चालीरीतीला शिव्या होत्या !

फिरत फिरत आम्ही गांवाबाहेर अगदीं मोकळया भागांत आलों. पत्नी सहज म्हणाली, " चांदणं किती छान पडलं आहे. मनाला किती आल्हाद वाटतो—"

" गाढवाला गुळाची चव आहे एकूण—" मी चटकन् झटकारा मारला. पत्नीच्या मनांत जो थोडासा आनंदोद्भव होत होता त्याच्यावर मीं अशी सुरी फिरविल्यामुळें ती एकदम गप्प बसली. पुढें आम्ही एका रानांत जाऊन बसलों. मग माझें मस्तक थोडें शान्त झालें.

माझ्यामध्यें कवित्व संचारूं लागलें. पण पत्नीच्या आनंदाची कळी मीं मघांशीच खुडली असल्यामुळें ती मजशीं समरस होऊं शकली नाहीं.

थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे सपत्नीक चंद्रिकाविहार करण्याचें जें सौख्य मीं कल्पनेनें रंगविलें होतें, त्यापैकीं एकशतांशहि मला प्रत्यक्ष अनुभवण्यास मिळालें नाहीं.

कांहीं त्रासलेल्या व कांहीं खिन्न अशा मनानेंच मी पत्नीसह थोडया वेळानें घरीं परतलों.

काव्यांतील गोड कल्पना प्रत्यक्ष उपभोगण्यास कधींच मिळत नाहींत का ? का आम्ही मृगजलाचे मागें धांवत सुटतों ? मला उत्तर मिळालें नाहीं.

* * *

दोन दिवसांनंतर मी व मनोहर फिरण्यास गेलों. आज पौर्णिमा ! अगदीं लख्ख चांदणें पडल्यानंतरहि आम्ही टेकडीवरच हवा खात बसलों

होतों. वारा गमतीनें वाहत होता. शहराच्यावर धूसरता पसरली होती व ती चढत्या चंद्रप्रकाशांत फारच मजेची दिसत होती. मनोहर म्हणाला, " आजचें चांदणें किती स्वच्छ, किती रमणीय न् उन्मादकारी आहे ! "

" मनोहर," मीं एकदम म्हटलें, " काव्याची भाषा बंद कर. जें आपल्यास साधत नाहीं, किंवा तसें वागण्याचें मनोधैर्य आपल्या अंगीं नाहीं त्याच्या वल्गना करण्यांत अर्थ काय ? "

" कां ?—परवांचा तुमचा चंद्रिकाविहार फसला वाटतं ! मीं मुद्दामच चौकशी केली नाहीं. म्हटलं ही गुपचुप गोष्ट. उगीच कशाला अंतरंगांत शिरा ! "

मीं त्याची निर्भर्त्सना करीत करीत त्या रात्रीच्या अपेशाचें खापर त्याच्याच डोक्यावर फोडलें. त्यानें शान्तपणें तें मान्य केलें व म्हटले, " श्याम, तूं अगदीं वेडा आहेस. उगीच त्रागा करून घेतलास किंवा घेतो आहेस. आपलें पुष्कळसें सुख निव्वळ कल्पनेंतच आहे, वा असतें असें नाहीं का तुला वाटत ? बरें, तें भोगायचें ठरलें तर त्याची कांहीं रूपरेखा ठरवून, दुसऱ्याच्या मनोवृत्तीचा मान ठेवून व शक्य तों कांहीं तडजोडीचा मार्ग काढून भोगायला नको का ?—श्याम, पतिपत्नीनें जोडीनें चांदण्यांत किंवा इतर वेळीं फिरण्यास जाण्यांत खरोखर गैर कांहींच नाहीं. परंतु रूढी-बद्धतेमुळें आम्हांस तें कसेंसेंच वाटतें. याला तूं मानसिक दास्य म्हण नाहीं तर आणखी कांहीं नांव दे. वस्तुस्थिति आहे खरी अशी. ती बदलायची म्हणजे एक घाव दोन तुकडे करून चालणार नाहीं. संसारांत सुख हें वेतन नसून पारितोषिक आहे. तें मिळेल न मिळेल. सुख—अगदीं हक्काचें सुख-सुद्धां झोंबाझोंबीनें मिळत नाहीं. संसारांतील सुख म्हणजे रातराणीच्या फुलांचा उन्मत्त सुवास. दुरून अदृश्यपणें येतो व मनाला आल्हाद देतो. रातराणीच्या फुलांचा गुच्छ करतां येतो का ? हार तरी ? आपण तो करण्याचा अट्टाहास करूं तर मिळणाऱ्या अदृश्य सुगंधाचें सौख्यहि मिळणार नाहीं—"

मीं कांहीं बोललों नाहीं. मनोहर म्हणाला, " अहा ! वारा काय सुंदर आहे ! पूर्णचंद्र किती रम्य आहे ! मनांत अशा कल्पना नाचत आहेत;—" एवढें बोलून त्यानें मजकडे हसत पाहिलें.



# चांडाळ! : : २७

वासू आणि ओंवळ! लोकांच्या दृष्टीनें त्यांचा संसार सुखांत चालला होता.

आणि खरोखर त्यांचें आयुष्य सुख व समाधान यांनीं शिगोशीग भरलेलें होतें. जणुं काय, त्या कुळागारांत वाहणारा पाण्याचा प्रसन्न पाटच. त्यांतील पाणी नेहमीं स्वच्छ, शीतळ, निसर्गानें जसें दिलें तसें. नेहमीं आनंदाने हसणारें, उडणारें. तसेंच त्यांचें आयुष्य. चिंतेची छाया नाहीं, दुःखाचे ढग नाहींत. साधें, प्रसन्न, चिंतारहित. एरवीं गरीब, पण पैशांची गरज नाहीं. मग श्रीमंतीसाठीं तीं कां धडपडतील? वैभवाचा मोह त्यांना कधीं शिवला नाही. कारण, वैभव नसलें तर आयुष्य नीरस होतें, हें त्यांना अजून कळलें नव्हते. पांखरांना कधीं पैशांची गरज भासली आहे काय? रानारानांतून हिंडणाऱ्या हरिणांना सोन्याचांदीचा मोह कधीं पडला आहे काय? पण हें जगच असें, कीं हरीण बागडतात तेथें पारधी फांस मांडून बसतात, आणि त्यांचा नाश करतात!

तें कुळागार हें त्यांचें राज्य. त्याची निगा करणें हें त्या रानवट जोडप्याचें काम. नागवेली लावाव्या, त्यांना पाणी देऊन त्या वाढवाव्या, नंतर पानें खुडून तीं विकावीं, पोफळीच्या झाडांना शिंपणें घालावें, शेणखत द्यावें, हंगाम झाला म्हणजे पिवळीं पिवळीं शिपटीं काढून त्यांचीं पोफळें वेगळीं करावीं, तीं सोलून काढावीं, उकडून वाळत टाकावीं, आणि नंतर तीं दुकानदाराला देऊन बदली पाहिजे तो जिन्नस विकत आणून खुशाल आनंदांत दिवस काढावे, हा त्यांचा क्रम.

आणि तें कुळागार तरी किती सुंदर होतें! टेकडीच्या पायथ्याशीं कुळागाराला सुरुवात झाली होती आणि वरपर्यंत तें चढत आलें होतें. जणुं काय एखादा प्रचंड जिनाच. आठ-दहा हात रुंदीच्या पायऱ्यांवजा लांबच लांब पट्ट्या व त्यांत दोन ओळींनीं पोफळीचीं झाडें लावलेलीं. मध्यें केळी व नागवेली यांची लागवड केली होती; मध्येंच एखादा आंबा, फणस किंवा चांफा त्या नाजुक पोफळींना धीर देण्याकरितां उभा होता. वरच्या पट्टींत उभें राहून खालीं नजर फेंकली म्हणजे मोठें मजेदार दृश्य दिसून

येई. माथ्यावर त्यांचें लहानसें घर होतें, आणि घराच्या अंगणांत पपनसांचीं झाडें लावलीं होतीं.

ओंवळ आतां पोफळींना शिंपणें घालीत होती. पाटाच्या कडेला उभी राहून, शरिराला बांक देऊन हातांतल्या 'कल्ल्या'नें पोफळींच्या मुळांवर ती मोठ्या मजेदार रीतीनें पाण्याचे फवारे टाकीत होती. कांहीं वेळ एका जागीं राहून शिंपणें झाले म्हणजे दुसरीकडे फिरून तसेंच करायचें, हा तिचा क्रम चालला होता.

सभोवतालच्या निसर्गाप्रमाणेंच तिचा देह व तिचा स्वभाव बनला होता. इतर कामकऱ्या बायांप्रमाणें ती काळी नव्हती. कारण, उन्हाळ्यां-तील रखरखीत दिवसांतदेखील सावलीचा गारवा तेथे अखंड प्रतीत होत होता. इतर उच्चवर्णीय स्त्रियांप्रमाणे तिनें आपला सबंध देह लुगड्यांत गुंडाळला नव्हता. एकपदरी पिवळें लहानसें वस्त्र ती नेसली होती. पण त्याचादेखील तिनें घट्ट कांचा मारला होता. वक्षःस्थलाचा वरचा अर्धा भाग व पाठ उघडीच होती. कारण, आपल्या पद्धतीप्रमाणें तिनें अंगांत चोळी घातली नव्हती, व नेसलेल्या वस्त्राचा एक पदर वक्षःस्थलाच्या अर्ध्या भागापर्यंत घेऊन, पाठीमागें आणून, विचित्र पद्धतीनें बांधला होता. गळ्यांत काळ्या-निळ्या पोतांच्या गळसऱ्या घातल्या होत्या, हातांत पितळेचे वाळे घातले होते. कानाच्या पाळ्यांच्या भोंकांतून मोठमोठीं ओबडधोबड भूषणें लोंबत होतीं. नाकांत सोन्याचा दांडा लटकत होता. वक्षःस्थलाच्या अर्ध्या भागावरून नेलेला पदर इतका करकचून बांधला होता कीं, त्यामुळें तें स्पष्ट उठून दिसत होतें. माथ्याचे केस निगा नसल्यामुळें अस्ताव्यस्त होऊन उडत होते. कपाळाला तांबड्या ओल्या कुंकवाचा पट्टा न रेखतां लावला होता. थोडक्यांत, सौंदर्य म्हणजे काय याची तिला जाणीव नव्हती, आणि त्याचें साधन कसें करायचें हें तर तिला मुळींच माहीत नव्हतें. पण मूळ सौंदर्यच जेथें आकर्षक, तेथें इतर साधनांचा अभाव असला तरी तें लपून कसें राहणार ? तळ्यांत उत्पन्न होणारीं साळकें पानांच्यामध्येंच चांगलीं शोभत नाहींत काय ? पाण्याचा पृष्ठभागच त्यांना शोभादायक होत नाहीं काय ?

पोफळींना पाणी देण्याचें काम बराच वेळपर्यंत चाललें होतें. तसें पाहिलें तर काम रूक्षच; पण तिला तें तसें वाटत नव्हतें, हें तिच्या आनंदी,

प्रफुल्ल मुद्रेवरून दिसत होतें. हातांतल्या कामाशीं माणूस तद्रूप झालें, म्हणजे डोळयांत जें एक नाजुक, गोड पाणी खेळतें त्याला दुसरी कसली उपमा देणार? जीवितांत कोणतेंच दुःखस्थान नसलें, हृदयाचीं सुखस्वप्नें नेहमीं फळाला येत असलेलीं दिसलीं, जगाशीं संबंध अगदींच कमी आल्यामुळें त्याचा दुष्टपणा अज्ञात असला, आणि फळाफुलांच्या, झाडांच्या व पाण्याच्या तरल निःश्वासांत, निरागस सान्निध्यांत असलें, म्हणजे मनुष्याचें मन किती आनंदी असूं शकतें हें आम्हांस कसें समजणार? तें कळायला ओंवळची मुद्राच पाहिली पाहिजे.

तिच्या फिक्कट गोऱ्या पाठीवर घर्मबिंदु चमकत होते. पण तिचें शिंपणें चालूंच होतें. इतक्यांत कुठून तरी आवाज आला—

—ओंवळ! ओंवळ!

ओंवळनें शिंपणें बंद करून आसपास पाहिलें व 'ओ' दिली.

—ओंवळ, इकडे ये पाहूं......

आवाज तिच्या नवऱ्याचा होता. वासू चांफ्याच्या वृक्षावर चढून फुलें झडवीत होता. जमिनीवर चांफ्यांची रास पडली होती. कांहीं फुलें पाण्याच्या पाटांत पडलीं होतीं, कांहीं हिरवळीवर पडलीं होतीं, कांहीं केळीच्या पानांवर अलगद राहिलीं होतीं. आसपास पिवळेंच दिसत होतें, आणि चांफ्यांचा गोड सुवास त्या शीतल वातावरणांत भरून राहिला होता.

ओंवळ झाडाखालीं गेली. तिनें वर पाहिलें. पानांच्या गर्दीमुळें तिचा नवरा दिसत नव्हता. तिनें म्हटलें,

—टोपली घेऊन येऊं का मी?

—आण तर; अन् झटकन् भरून घे सगळीं फुलें.

ती घराकडे धांवली, आणि थोड्या वेळानें टोपली घेऊन येऊन ती फुलें गोळा करूं लागली.

—वासू! कशीं विकलींस काल हीं फुलें?

—पैशाला दहा. एक रुपया मिळाला काल.

—आज जास्त मिळेल.

—नाहीं. आज सगळीं फुलें विकतां येणार नाहींत.

—कां?

—धन्याकडे अर्धी पोंचविलीं पाहिजेत.

—त्यांनीं सांगून पाठविलें आहे वाटतें ?

—गेल्या महिन्यांत थोरले धनी वारले, अन् आतां घरचा कारभार धाकट्या धन्यांच्या हातांत आला ना ? ते इथं नव्हते; मुंबईला होते. गेल्या दिवसांत आले आहेत ते इथं. आज त्यांच्याकडे कांहीं दिनकार्य आहे, म्हणून फुलें आणायला सांगितलीं त्यांनीं.

ओंवळनें आपल्या साध्या, सोज्ज्वल नजरेनें वासूकडे पाहत म्हटलें,

—मग तूं नेऊन देतोस ना तिकडे फुलें ?

—तूंच ने तिकडे फुले. नव्या धन्यांना पाहिलें आहेस का तूं ?

—मी गेलें नाहीं या दिवसांत तिकडे.

—फार चांगले आहेत नवीन धनीसाहेब.

—अस्सें ?

—धनी चांगले असले तर आम्हांला कुळागाराचें उत्पन्न सुखानें खायला मिळतें. धन्याची संमति आहे म्हणून हीं चांफीं विकायला मिळतात.

—इतके चांगले आहेत का लहानगे धनी ?

—तें काय विचारतेस ? अगदीं साधे, उदार. कुणाहिबरोबर तासन्-तास बोलत बसतात. त्यांची मर्जी राखली पाहिजे आम्हीं.

—अस्सें ?

—हो तर. त्यांचा शब्द खालीं पडूं देतां उपयोगी नाहीं. नोकर-चाकर त्यांना फार भितात. खूष झाले तर काय देतील अन् काय नाहीं. अन् रागावले तर घरांतून बाहेर काढायला कमी करणार नाहींत. मी नसलों अन् इकडे फिरकले तर त्यांना बसायला सांगायचें अं ? अन् माडाचीं कोंवळीं शहाळीं काढून त्यांचें पाणी द्यायला विसरूं नकोस त्यांना. जातांना ओंवळाच्या फुलांचा गजरा हातांत दे त्यांच्या.

फुलांनीं भरलेली टोपली घेऊन ती घराकडे आली. अर्धी फुलें दुसऱ्या टोपलींत घातलीं, थोडा वेळ विश्रान्ति घेतली, चंची सोडून पान खाल्लें. घाम आला होता म्हणून तोंड धुतलें. वस्त्र भिजलें होतें म्हणून दुसरें बदललें. धनी आपल्याशीं दोन शब्द बोलेल म्हणून केसांवरून फणी ओढली आणि तीं सोनचांफीं पोंचवण्याकरतां म्हणून ती धन्याच्या घराकडे जाऊं लागली.

पण सौंदर्याची मुळींमुद्धां जाणीव नसलेली ती अडाणी, रानवट, खेडवळ तरुणी किती तरी सुंदर दिसत होती !

ओंवळ धन्याच्या वाड्यांत गेली व फुलांची टोपली सदरेवर ठेवून ती चौकीवर उभी राहिली. आपल्याला धनीसाहेब पहायला मिळावे व त्यांनीं आपल्याशीं दोन शब्द बोलावे ही तिची इच्छा होतीच. मोठ्या माणसांनीं आपली चौकशी करावी, आपल्याकडे तोंडभर बोलावें, हें कुणाला नको असतें ? त्यांतून ओंवळ तर अडाणीच. त्या लोकांना बामण म्हणजे पूज्य !

वसंत बाहेर आला. त्यानें ओंवळला पाहिलें. त्याची नजर उत्सुकतेनें, आश्चर्यानें तिच्याकडेच खिळली. गावड्याची बायको अन् इतकी सुंदर ! त्याच्या डोळ्यांना तिची देहयष्टि, तिचे रूप, तिचे भाव फार आकर्षक वाटले. तिच्या त्या उन्नत, विवस्त्र वक्षःस्थलावर गांवकऱ्यांची नजर क्वचितच स्थिरावली असेल. तिच्या नजरेंतील गोड साधेपणाचा मोह त्यांना क्वचितच पडला असेल. पोटाकरतां ज्यांना काबाडकष्ट करावे लागतात, त्यांना सौंदर्याची काय किंमत ? त्यांच्या आयुष्यांत सौंदर्याला कसचें स्थान ?......

पण वसंत रसिक, रंगेल, काव्यप्रिय तरुण होता. तो कविता करी, गोष्टी वाची, कादंबऱ्यांतील कल्पित जगांत बुडून जाई. त्याची दृष्टि व्यवहारापासून, जगापासून बरीच उंच वावरत होती; आणि फाजील काव्यात्मतेमुळें, रोगट भावनांचें पुट त्याच्या मनावर चढल्यामुळें, जगांतील वस्तु त्याला वास्तव स्वरूपांत न दिसतां वेगळ्याच स्वरूपांत दिसत असत.

—कुणाला शोधतेस ?—त्यानें ओंवळला विचारलें.

—चांफीं आणलीं होतीं आपल्याकडे......

—कुठून आलीस तूं ?

—आपल्या कुळागारांतून.

—वासूनें पाठविली का तुला ? मीं काल सांगितलें होतें त्याला चांफीं पाठवून द्यायला. फार बरें केलेंस तूं. वासू घरीं नाहीं का ?

—बाजारांत गेला आहे.

—मी आज येईन कुळागार पहायला.

—या ना.

—जरा थांब अं......

तो आंत गेला व रुप्याची अधेली आणून त्यानें तिच्या हातावर ठेवली. पण तिनें लगेच ती जमिनीवर ठेवीत म्हटलें,

—हें नाहीं घेत मी. वासू बोलेल मला. विकायला नाहीं आणलीं मीं हीं चांफीं......

—हें पहा, तूं वासूकडे नेऊन दे हे पैसे. उचल ही अधेली.

ओंवळनें त्याच्याकडे कुतूहलानें, आश्चर्यानें, आदरानें पाहत पैसें उचलले. वसंताच्या शब्दांचा, त्याच्या औदार्याचा तिच्या मनावर फार परिणाम झाला. लोकांच्या रूपाकडे तिनें फारसें कधीं लक्ष दिलें नव्हतें; पण वसंताचा नखरेबाज पोषाक, त्याचे मागें वळविलेले तुकतुकीत लांब केस, त्याचा सतेज चेहरा, श्रीमंतीची जाणीव न बाळगतां बोलण्यांत दिसणारा साधा सरळ भाव इत्यादि गोष्टींमुळें धाकटे धनीसाहेब तिला मनापासून आवडले.

—मी येतें अं ?—तिनें नम्रपणें म्हटलें व रिकामी टोपली उचलून ती परत फिरूं लागली. इतक्यांत वसंताने हसतच म्हटलें,

—मीदेखील येईन तुमच्याकडे आज.

ती गेली आणि वसंताची कल्पनाशक्ति काम करूं लागली.

ती जातीनें गावडी, पण इतकी सुंदर......तिचा नवरा वासू किती कुरूप......अन् अडाणी! त्याला हिच्या सौंदर्याचें काय चीज करतां येईल ? हिच्या कष्टावरूनच तो हिची किंमत करणार! हिच्या नजरेंतील गोडवा त्याला नेहमींच अज्ञात राहील......हिच्या अवयवांतील तारुण्य त्याला केव्हांच लोभनीय वाटत नसेल......दिवसभर तो हिला कुळागारांत राबवीत असेल. कदाचित् आडदांडपणानें वागवीत असेल, हिच्या आवडी-कडे दुर्लक्ष करून तो हिला छळीत असेल......!

......आणि ही सुखी असेल का ? तें शक्य नाहीं. इतकी सुंदर, इतकी प्रेमळ तरुणी त्या अडाणी नवऱ्याच्या सहवासांत काय सुखी होणार ? आपल्याला अनुरूप अशा नवऱ्याची इच्छा तिच्या हृदयांत खात्रीनें असेल. तरुण—रसिक नवऱ्याची उणीव तिला कधीं कधीं भासत असलीच पाहिजे ......माझ्याकडे ती किती आनंदानें बोलत होती......! तिचें मन फार नाजुक, चंचल, रसिक असले पाहिजे!

ओंवळसंबंधीं वेगवेगळ्या कल्पना चालवून तो तळमळूं लागला.

स्त्रीसौंदर्य ही उपभोगाची वस्तु आहे, या त्याच्या विकृत विचारसरणीमुळेंच त्याला ओंवळचें आयुष्य व्यर्थ होय असें वाटत होतें. आयुष्यांत देह-सौंदर्याला अगदींच गौण स्थान आहे; सुस्वरूप स्त्रीला आपल्या सौंदर्याची फाजील जाणीव व अभिमान नसला म्हणजे कुरूप नवऱ्याच्या सहवासांत देखील ती सुखी राहूं शकते ही वस्तुस्थिति त्याला माहीत नव्हती. यामुळें ओंवळ अत्यंत सुखी असूनहि त्याला ती अत्यंत दुःखी आहे असें वाटलें व तिला सुखी करण्याची जबाबदारी आपल्यावर आहे अशीहि त्यानें आपल्या मनाची समजूत करून घेतली.

ओंवळ नाजुक, सुंदर, तारुण्यानें रसरसलेली. तिचा नवरा चाळिशी-च्या घरांत गेलेला—कुरूप, काळा, अडाणी. अशा विषम नवऱ्यापासून तिला सुख लाभणें शक्य नाहीं. आपण तरुण, श्रीमंत, सुंदर आहों. तिच्या मनाची कळी आपण खुलविली, तिला रसिकतेचें, उपभोगाचें नवेंच जग दाखवून दिलें, प्रेमाची फुंकर घालून मायेच्या उष्णतेनें तिच्या हृदयाची पालवी फुलविली......तर तो गुन्हा होईल काय ? खचित नाहीं; कारण, आपला हेतु केवळ स्वार्थी नाहीं......केवळ तिच्या सुखाचा प्रश्न......

आणि आपल्या स्वार्थी, वैषयिक, उन्मादपूर्ण दृष्टीवर परसुखाचें, पर-हिताचें आवरण चढवून तो सायंकाळीं कुळागारांत गेला.

एरवीं कुळागारांत तो क्वचितच जाई. तो तसा रसिक होता; पण कथाकादंबऱ्यांच्या वाचनानें उत्पन्न झालेली रसिकता ती. निसर्गाच्या प्रत्यक्ष खऱ्याखुऱ्या सौंदर्याकडे त्याचें लक्ष कधींच वेधलें नव्हतें. पण आज नेहमीं-चेंच कुळागार त्याला काव्यमय दिसलें.

झरीच्या पाण्यांत ओंवळ स्नान करीत होती. धन्याला पाहतांच ती प्रथम दचकलीच. पण ती लज्जेनें नव्हे. लाजण्याचे संस्कार तिच्यावर झालेलेच नव्हते. तिच्या जातींतील स्त्रियांना नैतिक बंधनांची देखील फारशी जाणीव नसते. यामुळें आपले कांहीं अवयव धनीसाहेबांना स्पष्ट दिसणार, ही जाणीव तिला त्रासदायक झाली नाहीं. कारण, ती स्नान करतांना गांवकरी कितीदां तरी येत जात; पण त्यांचें तिकडे लक्षच नसे व तिच्याहि मनांत ती गोष्ट येत नसे.

वसंत मात्र विचालित चित्तानें, केळीच्या आडून तिच्याकडे पाहतच

होता. तिनें लगबगीनें आंघोळ आटोपली व पाण्यांतून वर सरून ती धन्याकडे पाहत म्हणाली,

—इथें उभे कां? घराकडे जाऊन बसा आमच्या.

—वासू आहे का घरांत?

—भिरंडीचीं सोलें घेऊन बाजारांत गेला आहे. येईल इतक्यांत.

वसंत ओंवळच्या मागून तिच्या घराकडे गेला. तिचें घर मातीचें असून ते लहानच होतें. घराला एकहि खिडकी नसल्यामुळें आंत अंधार होता. छप्पर पोफळीच्या झावळ्यांचें तयार केलें होतें. बाहेर ओंसरी होती व तेथें बसायला मातीचे दोन सोपे तयार केले होते.

तें दरिद्री घर पाहून वसंताला तिच्या स्थितीचा जास्तच कळवळा आला. नाजुक ओंवळ असल्या अंधारांत राहते हें बरें का?

ओंवळनें त्यांना बसण्याकरतां सोप्यावर कांबळ अंथरली. एका कवाथ्याचीं दोन शहाळीं काढून आणलीं व शेंड्याकडे फोडून तीं वसंतापुढें ठेवीत म्हटलें,

—शहाळ्यांचें पाणी पितां ना आपण?

—हो हो; मला शहाळीं फार आवडतात.

पण त्याला तें कुळागार आवडत नव्हतें किंवा शाहळींहि आवडत नव्हतीं. ओंवळ मात्र मनापासून आवडली होती.

तिच्या मनांत तिच्या स्थितीबद्दल असंतोप उत्पन्न करण्याचें कार्य त्याला करायचें होतें. त्याकरतां सलगी हवी होती.

पण जिव्हाळा दाखविल्याशिवाय तें कसें शक्य आहे? म्हणून त्यानें म्हटलें,

—हें आमचें कुळागार केव्हांपासून तुमच्याकडे आहे?

—आपण धनी; आपणांला माहीत असायचें हें. मी इथें यंदांच आलें. पण मला वाटतें, बऱ्याच वर्षांपासून तें आमच्या घराकडे आहे.

—तुमच्याशिवाय इथें आणखी कोणी खपतें का?

—आम्ही दोघेंहि कुळागाराचें सगळें काम करतों. अन् देवाच्या व तुमच्या दयेनें आम्हांला कांहींच उणें पडत नाहीं.

—सुपारीशिवाय आणखी काय उत्पन्न मिळतें इथें?

—आम्ही इथें पुष्कळ जिन्नस तयार करतों. मिरीं, नागवेलीचीं पानें, केळीं, लिंबू, सोलें......

—अन् तुम्ही दोघें एवढे कष्ट करतां ?

—हो; काय करणार ? आम्ही दिवसभर खपतों.

—दिवसभर पाण्यांत राबावें लागतें तुम्हांला. अन् इतक्या श्रमानें तूं आजारी पडत नाहींस का ?

—थंडी-ताप आलाच तर वासू आहे ना ? बाकी मी आजारी पडतच नाहीं मुळीं. पाण्याची मला संवय झाली आहे.

—दिवसभर त्रास काढणें वाईटच नाहीं का ?

—पण त्रास काढल्याशिवाय कसें होईल ?

—कसें होईल म्हणजे ?

—आम्हांला काय जमिनी आहेत ? काम केलें तर पोटाला मिळायचें—तिच्या मुद्रेवर चिंतेची बारीक रेषा उमटून गेली.

—खरेंच, तुमची स्थिति फारच वाईट आहे. काम केलें तर पोटाला मिळायचें. धन्याची जमीन. ती त्यानें काढली तर पंचाईत. आजार आला तर हाल. पाऊसवारा मोठा आला तर घरकुल मोडून पडायचें. आम्हां बामणांचें असें नाहीं. आमच्या बायका किती सुखी. त्यांची सेवा करायला इतर जातींतल्या बायका तयार. सुंदर पोशाख करायचा, आवडेल तें खायचें, फिरायला जायचें.

—पण तुमच्या कृपेनें आम्ही सुख मानीत आहों.

—कसलें तुझें सुख ? तुझें लग्न केव्हां झालें ?

—गेल्या वर्षी.

—तूं तिसरेपणाची बायको ना ?

—हो.

—तुझें वय किती ?

—राण्याच्या बंडांत माझा जन्म झाला......

—म्हणजे यंदां तुला पंधरावें वर्ष. अन् वासूचें वय ?

ती गप्पच राहिली. तिच्या साध्या-भोळ्या मनाला वेगळाच धक्का बसला. तिला वाटलें, आपण समजत होतों त्यापेक्षां आपली स्थिति वेगळी

आहे......आपण दुःखी आहों......एखाद्या भाटकाराच्या घरीं पडलें असतें तर......

—तुझें नांव काय ?

—ओंवळ !

—ओंवळ ! तूं कांहीं म्हातारी नाहींस...मला आपलें वाटते, कीं तूं सुखी व्हावीस ! कारण आमचे कूळ तूं...वासू एक म्हातारा झालेला. त्यानें तूं इथें येण्यापूर्वीं दोन स्त्रियांशीं संसार केला आहे. तूं नवीन आहेस ...तुला आवडी आहेत. जनावराप्रमाणें दिवसभर राबतेस तें एक सोड, पण जनावराप्रमाणें गलिच्छ वागतेस तें बरें का ? तूं बरी दिसतेस, पण तूं नेसलेलें वस्त्र बरें दिसतें का ? किती जाड अन् किती मळकट !

ओंवळ मान खालीं घालून ऐकत होती. धनीसाहेब फार प्रेमळ आहेत; म्हणून ते आपल्याबद्दल इतकी कळकळ दाखवितात. अन् ते म्हणतात तें तरी खोटें आहे का ? खरेंच, आपली स्थिति सगळ्याच बाजूंनीं वाईट नाहीं का ? तिच्या मनांत खळबळ चालली.

आपला नवरा म्हातारा. घर अगदीं लहान अन् काळोखानें भरलेलें. दिवसभर कुळागारांत काबाडकष्ट. यांत कसलें आलें आहे सुख ?

थोड्या वेळानें ओंवळ म्हणाली,

—आम्ही गरीब. चांगलीं लुगडीं आणायला पैसे नकोत का ?

—तुझ्याकडे नसले पैसे तर मी देईन. तूं मला वेगळी आहेस का ? अडीअडचणीच्या प्रसंगीं आमचे बाबा वासूला पैसे देत नसत का ? मीं तुला दोन लुगडीं दिलीं तर कुठें बिघडलें ?

—पण आपले उपकार आम्ही कसे फेडूं ?

—मनांत असलें तर उपकार फेडशील तूं...अन् हें पहा, ओंवळ, तुझ्या गळ्यांत ते चाळीस पन्नास पोतांचे जोड शोभत नाहींत...अन् हातांतलीं तीं पितळेचीं कांकणें...केसांची निगा राखावी बायको माणसानें, म्हणजे बरें दिसतें ..फुलांना इथें तोटा आहे का ? तीं माथ्यांत माळलीं तर किती शोभा येते ? तूं तरुण आहेस, सुंदर आहेस...तुला शोभेल हें सगळें......

धन्याचें बोलणें ती तल्लीनतेनें ऐकत होती. तरुणांच्या बोलण्यांतला, सहवासांतला आनंद तिला लाभत होता. अज्ञान, अडाणी जातींत जन्म.

यामुळें नैतिक बंधनांची जाणीव तिला फारशी नव्हती आणि म्हणूनच आपल्या मूळ स्थानापासून आपण च्युत होत आहों कीं काय, हें समजण्या-इतकी मानसिक तयारीदेखील तिची झाली नव्हती.

—ओंवळ, आईला सांगून आज दोन लुगडीं पाठवून देतों मीं; तीं वासूला दाखीव. तो मनुष्य एरवीं साधा आहे. शिवाय हे पांच रुपये असूं दे तुझ्याजवळ.

—धनीसाहेब, हे कां म्हणून घ्यायचे मीं?

—कां? मी तुझा धनी म्हणून! तुझें हित मला हवें आहे, माझ्या कुळांनीं हालांत, गरिबींत दिवस काढावे हें मला नको आहे.

तिला वाटलें, वासू आपला नवरा; आणि धनी आपला मालक. आपणांला सुखाचें जग अज्ञात होतें तें धनीसाहेबांनीं दाखवून दिलें. तिला आपल्या सौंदर्याची, तारुण्याची जाणीव झाली; आणि तरुण व सुंदर असूनहि आपणाला कांहींच कसें माहीत नव्हतें याचें तिला आश्चर्य वाटलें.

वसंताच्या बोलण्याचा, पाहण्याचा, त्याच्या औदार्याचा खरा हेतु मात्र तिला अजून समजला नव्हता. धनी चांगले आहेत, प्रेमळ आहेत, एवढें तिला दिसून आलें; आणि कोणत्या तरी रीतीनें धन्यांच्या उपयोगी आपण पडलेंच पाहिजे ही भावना तिच्या हृदयांत उत्पन्न झाली.

धनी जायला उठले, तेव्हां सुरंगीच्या फुलांचा गजरा त्यांच्या हातांत देत तिनें म्हटलें,

—आपल्याला द्यायला आमच्यापाशीं काय आहे?

—हें काय थोडें झालें?—वसंतानें गजऱ्याचा वास घेत म्हटलें. या शब्दाचा अर्थ तिला कळला का?

सायंकाळीं नवरा परतला तेव्हां तिनें घडलेली हकीकत त्याला सांगितली, तेव्हां तो म्हणाला.

—धनीसाहेब फार प्रेमळ आहेत हें मीं सांगितलें नव्हतें का तुला?

—अन् आईला सांगून माझ्याकरितां दोन लुगडीं पाठवून देतों म्हणाले, अन् पांच रुपये दिले माझ्याजवळ.

—फार कनवाळू आहेत ते. देव त्यांचें बरें करील.

नेहमीं तिचें मन किती शान्त, निर्मल होतें; पण आज तिच्या मनाची तळमळ चालली होती. नवऱ्याच्या वाईट रुपाबद्दल, त्याच्या वयाबद्दल

वेडेवांकडे विचार तिच्या मनाला केव्हांच शिवले नव्हते. पण आतां त्याचा चेहरा तिला खरोखर विद्रूप दिसूं लागला. त्याचे बाहेर आलेले चार पांच दांत तर तिला फारच किळसवाणे दिसले. त्याची माथ्याची जटा तिला ओंगळ वाटली. आपण त्याला अनुरूप नाहीं, आपलें आयुष्य जास्त सुखांत, जास्त चांगल्या रीतीनें गेलें पाहिजे असें तिला वाटलें. आणि आज तिला पहिल्यांदांच आपल्या आयुष्यांत किती तरी उणीवा आहेत असें दिसून आलें.

नेहमी ती पहांटेला उठून कामाला लागे; काम पण थोडें ? चार-पांच गुरें, घरांतील व्यवस्था, कुळागाराचें शिंपणें. पण हें सगळें ती मोठ्या आनंदानें करी. पण दुसऱ्या दिवशीं तिला वाटलें, अंथरुणावर तसेंच निजून पडावें; इतकें काबाडकष्ट कोण करील ? मरमर मरायचें अन् कपाळांत सुख नाहीं. त्यापेक्षां सावकाश उठलेलें काय वाईट ! तिचें सगळें लक्ष लुगड्यां-कडे व धन्याच्या प्रेमळ शब्दांकडे लागलें !

शेवटीं धन्याकडून लुगडीं आलीं ! किती सुंदर लुगडीं ! तसलीं लुगडीं तिनें जन्मांत कधीं वापरलीं नव्हतीं. किती तलम ! किनार पण किती चांगली ! तिचा आनंद गगनांत मावेना. तिनें तीं हृदयाशीं धरलीं, तोंडाशीं धरलीं, तीं घेऊन ती घरांत गेली, बाहेर आली, इकडे तिकडे कुळागारांत फिरली !

आणि धन्यांनीं केलेल्या सूचनांची आठवण होतांच तिनें आपले केस विंचरले, अंबाडा घातला, त्यावर आबोल्यांची वेणी माळली, केळी-च्या पानाचा तीर आणून कुंकवाची पट्टी रेखून लावली, गळ्यांतला पोतांचा भार कमी केला, हातांतले मलीन वाळे स्वच्छ केले, नवीन लुगड्याची घडी मोडली आणि तें नेसून झाल्यावर तिनें आपल्या मळकट आरशांत पाहिलें. तेव्हां ती आश्चर्यचकितच झाली ! किती सुंदर ! आपण गावडी कीं...... आपल्या धन्याची......!

आणि या विचाराबरोबरच तिच्या मनांत विजेप्रमाणें एक कल्पना चमकून गेली. आणि आनंद, भय, आशा इत्यादि भावनांनीं तिचें मन गोंधळून गेलें !

* * *

वसंत कुळागाराच्या निमित्तानें ओंवळकडे नेहमीं येऊं लागला. आजहि तो नेहमींप्रमाणेंच येऊन बसला.

दोघेंहि एकमेकांना पाहून हंसलीं. मिटलेली कळी त्यानें खुलविली, मग त्याच्याकडे पाहून ती कां हंसणार नाहीं ?

—ओंवळ ! आतां किती चांगली दिसतेस तूं आज ?

—बसा ना ......!

तो बसला, ती देखील बसली. पण तिचें पूर्वीचें बसणें किती वेगळें होतें !

—ओंवळ ! खरेंच सांग. तुझ्या नेहमींच्या आयुष्यांत तुला आनंद वाटतो का ?

या प्रश्नानें ओंवळ दचकलीच.

—पूर्वी वाटत होता; आतां नाहीं......

—आतां कां वाटत नाहीं ?

—तुम्हीं काल सांगितलें तें खरें. काम करायला मनच लागत नाहीं. आज कुळागाराचें शिंपणें अर्धवटच राहिलें. पण काम केल्याशिवाय कसें होईल ?

—वासू दुसऱ्याकडून काम करून घेईल. पैशांची चिंता करूं नकोस तूं.

—पण धनीसाहेब ! असलीं कामें दुसऱ्यानें करायचीं असतात का ?

—काय हरकत आहे दुसऱ्यानें करायला ? पाहिजे तर मी सांगतों वासूला, एखादा गडी ठेव म्हणून. असलीं लुगडीं नेसून कष्ट करायचे नसतात !

ओंवळ स्तब्ध राहिली. तिची मनःस्थिति फार विचित्र झाली. पूर्वीचे स्निग्ध, नाजुक बंध तुटत असून आपण नव्या दृष्टीनें, नव्या जगांत येत आहों असें तिला वाटलें. दुःख व आनंद अशा विरोधी भावनांत ती बुडून गेली.

—ओंवळ ! तुझें घर दाखव पाहूं मला.

—धनीसाहेब ! तुम्ही पाहण्यासारखें नाहीं तें.

पण मला.पाहिलें पाहिजे. तुमच्या अडचणी मला लक्षांत घेतल्या पाहिजेत.

दोघेंहि घरांत आलीं. दोघांचींहि हृदयें धडधडत होतीं.

घरांत सगळीकडे अंधार होता !

......गुन्हे, अत्याचार कुठें घडतात ?

अंधारांत......!

आणि तीं दोघेंहि अंधारांत होतीं...

* * *

पूर्वीची ओंवळ ! रानवट, खेडवळ तरुणी ! साधीभोळी गावडी ! आपल्या कामांत तल्लीन होणारी, पूर्ण सुखी. आतां तशीच आहे का ती ?

सुंदर लुगडें नेसून ती आतां कष्ट काय करणार ? नवऱ्याचा तिट्कारा, कामाकडे दुर्लक्ष, आळस आणि......

सायंकाळीं नटून-थटून धनोसाहेबांची वाट पाहत दारांत बसलेली...

आणि त्या वेळीं बिचारा वासू—दोन दिवसांपूर्वी संसारसुखांत पोहणारा वासू—त्या टेकडीच्या पलीकडे जाऊन एका दगडावर अश्रु गाळीत बसतो ! आणि रात्रीचे आठ वाजल्यानंतर, भाताचे गोटे उकडून खाण्याकरतां, चोराप्रमाणें घरांत शिरतो......!

असले चांडाळ......!



# चांदीचें ताट : : २८

" आ...ई...आई......"

" काय बाळ ? काय हवं तुला ? ही मी आहें हं इथं."

" आई, मला थोडं पाणी हवं ग."

" बाळ, किती रे पाणी पितोस सारखा ? "

" मला एकसारखी तहान लागते. मी तरी काय करूं ?"

यमुनाताईंनीं काड्याची पेटी शोधून दिवा लावला. जवळच्या तांब्यांतून थोडेंसें पाणी फुलपात्रांत ओतलें व तें फुलपात्र माधवच्या तोंडाजवळ केलें. माधवनें त्या फुलपात्रावर झडप घातली व सर्व पाणी—थोडेंच होतें तें—घटाघटा पिऊन टाकलें. पाणी पिऊन झाल्यावर तो पुन्हा अंथरुणावर डोळे मिटून स्वस्थ पडला.

" आई, तूं केव्हां आलीस ग घरीं परत ?" जरा वेळ स्वस्थ पडल्यावर माधवनें विचारलें.

" मला येऊन बराच वेळ झाला. चांगले दोन तास सहज झाले असतील."

" मग मला तूं उठवलं कां नाहींस आल्याबरोबर ? "

माधवचा गळा जरासा दाटून आला. नऊ-दहा वर्षांचें दुखणाईत पोर ! मोठ्या विचारी माणसाचाहि दुखण्यांत, त्याच्या मनाविरुद्ध एखादी गोष्ट झाल्यास, तोल सुटतो मग माधवसारख्या पोराला वाईट वाटेल यांत काय आश्चर्य ?

" हं, उगा. मी आलें तेव्हां किनई तुला जरासा डोळा लागला होता, म्हणून नाहीं उठवलं."

" अंऽअं...पण मीं तुला उठवायला सांगितलं होतं ना आल्याबरोबर ? मग कां नाहीं उठवलंस अंऽअं..." तो अधिकच स्फुंदूं लागला.

" माधव, तुझी झोप मोडली असती तर तुला त्रास नसता का झाला ? आणि एकदम जागा झाल्यावर तुला मग झोप येते का ?" यमुनाताईंनीं माधवच्या अंथरुणाजवळ बसून प्रेमानें त्याच्या पाठीवरून हात फिरवीत म्हटलें.

माधव पुन्हा डोळे मिटून पडला. यमुनाताईंनीं त्याच्या पोटाला हात लावून ताप पाहिला. त्याचे अंग तापानें नुसतें फणफणत होतें. त्याला हातहि लाववत नव्हता. आज पांचसहा दिवस त्याला ताप येत होता. प्रथम दोन दिवस थंडीताप आहे या समजुतीवर काढले, व मध्यंतरीं जरासें बरेंहि वाटलें; पण कालपासून काय झालें कुणास ठाऊक—पुन्हा तापानें उलट खाल्ली. वळवाचा पाऊस केव्हां येणार–हें सांगून का तो येतो ! आज दोन दिवसांत तापाला उतार म्हणून माहीत नव्हता. उलट तो सारखा वाढतच जातो आहे कीं काय असें वाटूं लागे. माधवच्या शेजारीं टाकलेल्या अंथरुणावर त्या जराशा आडव्या झाल्या. आज पांच दिवसांत, हो—आज त्या गोष्टीला बरोबर पांच दिवस झाले—त्यांना झोप माहीतच नव्हती म्हटलें तरी अतिशयोक्ति होणार नाहीं. देहधर्माला आवश्यक अशा इतर गोष्टींबरोबर, दुसऱ्या दिवसाच्या कामाचा गाडा रेटण्या-

साठीं, जरूर तेवढीच झोप मिळे. अंथरुणावर पडल्यावर त्यांच्या डोळयांपुढून एकेक प्रसंग चलच्चित्रपटाप्रमाणें जाऊं लागले.

**पहिला प्रसंग—**

" यमुनाताई, जरा तुमच्याशीं काम आहे. परसांत चला बरं जराशा." सरस्वतीकाकूंनीं घाबऱ्या घाबऱ्या त्यांना सांगितलें.

स्वप्नांत मनुष्य जसा बोलावणाराच्या मागे आज्ञाधारकपणें जातो त्याप्रमाणें त्या चालूं लागल्या.

" हें पहा यमुनाताई, तुम्ही आमच्याकडे आज सहा महिने कामाला आहांत, आणि आमचा तुमच्यावर पूर्णपणं विश्वास आहे. दामल्यांच्या इथं तीन वर्षं विश्वासानं काढलींत म्हणूनच आम्हीं तुम्हांला कामाला ठेवलं. तुमच्या हातून घरांतला सुतळीचा तोडासुद्धां हालणं शक्य नाहीं. तुम्ही आम्हांला अगदीं घरच्यासारख्या. परवांच्या लग्नकार्यांत घरच्यांनी केली नाहीं अशी मदत तुम्हीं केलीत. जें तें तुमच्या कामाची वाखाणणी करीत होतं पहा."

यमुनाताईंना या बोलण्याचा अर्थच कळेना. ही कशाची प्रस्तावना आहे हे जर त्यांना माहीत नाहीं तर ती सरळ स्वभावाची साधीभोळी बाई गोंधळणारच. एखाद्या तलावांत लहान लहान मासे जसे निःशंकपणें इकडून तिकडे शान्तपणें वावरतांना दिसतात त्याप्रमाणें साधेभोळे विचारच तिच्या मनांत वावरत असत.

"तुम्हांला माहीतच असेल, कीं काल आपल्या घरांतलं चांदीचं ताट हरवलं म्हणून;" सरस्वतीबाईंनी आपलें बोलणें पुढें सुरू केलें, "आम्हीं सर्वजणांनीं खूप खूप शोध केला, पण कुठं म्हणून पत्ता लागत नाहीं."

यमुनाताईंना यांत आपला संबंध कुठें येतो हें कळेना. काकूंच्या भाषणाच्या चऱ्हाटानें त्यांच्या मनाला आवळल्यासारखें झालें.

" मला तुमच्या बोलण्याचा अर्थ नाहीं समजला! कारण हरवलेल्या ताटाचा तुमच्याबरोबर मीहि शोध करतेंच आहें."

" तसं नव्हे हो, तुमचा माधव आज पांचसहा दिवस जरासा आजारी आहे; तो इथं जेवायला येत नाहीं."

उन्हाळ्याच्या दिवसांत खोलींत खूप उकडत असतांना खोलीच्या

सर्व खिडक्या दारें घट्ट बंद केल्यावर अंगाची जी काहिली होते तसा यमुनाताईंच्या मनाचा प्रकार झाला.

" मला काय सांगायचं तें सरळ सांगा ना, काकू ! अशानं मला तुम्ही निष्कारण बुचकळ्यांत पाडतां आहांत."

" सांगतेंच तर आतां. हें पहा, तुमच्या माधवला बरं नाहीं म्हणून त्याचं जेवणाचं वाढून नेत असतां ना ? तर इथं कांहींजणांचा संशय आहे, कीं चुकून वाढण्यांत तें ताट तुमच्याकडे गेलं असेल. मला नाहीं हो तसं वाटत— कारण तुम्ही लगेच तें ताट परत केलं असतं अशी माझी खात्री आहे. तुम्हांला हो काय करायचं तें ताट ? "

यमुनाताईंच्या तोंडचें पाणीच पळालें. इतका वेळ आडून चालविलेल्या बोलण्याचा शेवट— अगर उगम— हा होता तर ? आणि हें जलाल पचविण्यासाठीं प्रथम गोड संभाषणाची शर्करा पसरली होती.

" काकू, माझ्यावर तुमचा सर्वांचा इतका विश्वास नाहीं का ? आज थोडे-थोडके नाहीं सहा महिने तुमच्या घरीं सर्वजण मला पाहतां आहांत." त्यांनीं डोळ्यांत पाणी आणून म्हटलें.

" तें सारं खरं पण इतरांच्या तोंडाला कोण हात देणार ? "

" तुम्हीं जर माझ्याबद्दल खात्रीनं सांगितलं तर इतरांची काय प्राज्ञा आहे असं म्हणण्याची ? "

" घरच्याखेरीज बाहेरचं— तशा तुम्ही आम्हाला घरच्याच हो— असं कुणीच नव्हतं. तेव्हां तुम्हांला एकदां समक्ष विचारलेलं बरं म्हणून विचारतें. माणूस आहे, एखादे वेळ......"

" म्हणजे तुम्हांला अजून माझा विश्वास येत नाहीं का ? माझ्या माधवच्या गळ्याची शपथ घेऊन सांगतें हो— मला तुमच्या ताटाविषयीं कांहीं माहिती नाहीं." अश्रूंनीं डबडबलेल्या डोळ्यांनीं ती कारुण्यमूर्ति बोलूं लागली. 'माधवच्या गळ्याची शपथ' हे शब्द कळवळून उच्चारतांना घरीं अंथरुणावर आजारी असलेला माधवच पुढें आहे कीं काय, असें त्यांना वाटूं लागलें.

" आतां मी कसं सांगूं तुम्हांला ? अहो सगळीकडे शोधून ताट मिळत नाहीं अशी खात्री झाल्यावर शेवटीं आज 'घरांत' ठरवलं आहे कीं पोलिसांत वर्दी द्यायची. आतां वर्दी द्यायची म्हणजे बाहेरचं कोण माणूस

होतं, संशय कुणावर आहे हें सारं येणारच; आणि नोकराचाकरांवर तर पोलिसांचा फार वहीम. तेव्हां तुमच्या हिताचं म्हणून हें मी सांगतें."

यमुनाताईच्या डोक्यांत आतां लख्ख प्रकाश पडला. आज बाबासाहेब आपल्या अब्रूचे धिंडवडे करणार अशी काकूंच्या बोलण्यावरून त्यांना साधार भीति उत्पन्न झाली. त्यांनीं कपाळावर हात मारून ओक्साबोक्शीं रडण्यास सुरुवात केली. त्यांच्या डोळयापुढून गतकालची स्मृति जाईना. आपण कशा स्थितींत होतो आणि कशा स्थितींत आहोत याची जाणीव तीव्रतेनें त्यांना होऊं लागली. हवेशीर बंगल्यांत आरामांत राहणाऱ्या माणसाला निर्जन–वालुकामय प्रदेशांत, उन्हाच्या कहरांत, मरेमरेतो काम करायला लावण्यापैकीच तो प्रकार होता.

आपल्या बोलण्याचा अपेक्षेबाहेर उपयोग झाल्याचे समाधान काकूंच्या चेहऱ्यावर पूर्णपणें दिसून येत होतें. यमुनाताईंना तिथेंच सोडून त्या पुढच्या दारीं आल्या.

दुःखाचा पहिला वेग ओसरल्यानंतर हलके हलके डोळे पुशीत यमुनाताई पुन्हा कामाला लागल्या. पण कामाकडे लक्ष कसे लागणार ? विजापूरच्या गोलघुमटांत एक शब्द उच्चारल्यानंतर तोच शब्द पुनः पुन्हा उच्चारला जातो, त्याचप्रमाणें तिला सरस्वतीकाकूंच्या बोलण्याचे पडसाद ऐकूं येत. थोडासा वेळ गेल्यानंतर घरांतल्या पोक्त माणसांपैकीं एकेकांनीं वरील हकीकत थोड्या फार फरकानें तिला सांगण्यास सुरुवात केली. प्रत्येक वेळीं तिचें मन हलकें हलकें त्या बातमीनें घट्ट होत गेलें, पण त्यामुळे पुढें काय करायचें हा न सुटणारा प्रश्न अधिकच तीव्रपणानें पुढें उभा राहूं लागला.

ती कामाला असलेल्या घरीं नुकतेच लग्नकार्य उरकलें होतें. पाहुणेमंडळी बहुतेक घरोघरीं परतली होती व आतां फक्त अगदीं जवळच्या नात्यांतलींच काय तीं माणसें शिलकी होतीं. लग्नानंतरची कांहीं ना कांहीं निमित्तानें होणारीं जेवणें सुरूच होतीं; व त्या गडबडींत घरांतील एक चांदीचें ताट सांपडत नव्हतें. गोडधोड जेवण झाल्यास, त्या दिवशीं पडणाऱ्या अधिक कामाचा मोबदला म्हणून, माधवला जेवणाचें आमंत्रण अगर वाढून मिळे. घरांत कुठें ताट दिसत नाही असें पाहिल्यावर एकेकांनीं यमुनाताईचा संशय घेण्यास सुरुवात केली.

यमुनाताईंनी परोपरीनें सांगून पाहिलें, पण त्यावर कुणाचा विश्वास

बसेना. उलट ती जों जों बजावी तों तों इतरांचा संशय दृढ होत चालला. चांदीचें ताट म्हणजे कमींत कमी पाऊणशे-ऐशीं रुपयांचा ऐवज. आपली होणारी बेअब्रू टाळण्याकरितां जर आपण हे पैसे भरायचे--नाइलाजानें कां होईना— पण कबूल करूं म्हटलें तरी महिना जेवून मिळणाऱ्या आठ रुपये पगारांत घरचा एका मुलाचा प्रपंच संभाळून दोनतीन वर्षांमध्यें तरी भरपाई होईल कीं नाहीं याची शंकाच होती. कुणाचें कर्ज काढूं म्हटलें तरी कर्ज फेडणार कशावर ? आणि उसने पैसे देणार तरी कोण ? मुलाचे फाटलेले कपडे नवे घ्यायला जिथे घरांत पैसा नाहीं तिथे एवढ्या रकमेची त्या अनाथ विधवेनें कशी भरपाई करायची ?

यमुनाताईंची समजूत घालण्याच्या व माधवची प्रकृति पाहण्याच्या निमित्तानें सरस्वतीकाकू तिच्याबरोबर घरीं आल्या. घरांतलें दाखविण्यासारखे सर्व सामान दाखवून यमुनाताईंनीं ताट आपल्या घरीं नसल्याबद्दल खात्री करण्याचा प्रयत्न केला, पण तो फोल ठरला. कारण त्यानें काकूंचें समाधान झाल्याचें दिसेना.

त्यानंतरचा दुसरा दिवस—

"यमुनाताई, काय ठरवलात विचार मग ?" आज तिच्याबरोबर बोलण्याची खुद्द घरमालकांची--बाबासाहेबांची पाळी होती.

ती त्यांच्यासमोर खालच्या मानेनें गरीब गाईप्रमाणें उभी राहिली. तिच्याशिवाय घरच्याखेरीज बाहेरचें कुणी घरांत वावरत नव्हतें हें तिला माहीत होतें; पण त्यावरून तिनेंच ताट घेतलें हें कसें सिद्ध होतें हें तिला कळेना. कदाचित् घरच्यापैकीं कुणी कशावरून ठेवलें नसेल ? पण तसें ती कसें बोलणार ? आतां त्यामुळें तिथल्या नोकरीला तावडतोब मुकावें लागणार हें ती समजून होती, व त्याला तिची तयारीहि होती; पण अशानें आलेल्या प्रसंगांतून सुटणें अशक्य होतें.

"काय तुमच्या मनांत असेल तें मोकळ्या मनानं सांगा. तुम्ही मला मुलीसारख्या." ती कांहींच बोलत नाहीं असें पाहून बाबासाहेबांनींच पुन्हा बोलण्यास सुरुवात केली.

या बाह्यात्कारीं मायावी भाषणाचा तिला मनस्वी कंटाळा आला होता. घटकेंत ऊन्ह, घटकेंत पाऊस असल्या अर्धवट स्थितीपेक्षां काय पडायचा तो पाऊस एकदम पडून आकाश मोकळें व्हावें अशीच प्रत्येकाची

इच्छा असते. पण ज्यांच्या घरीं नोकरी करायची त्यांना उलटून बोलणें तिच्यासारख्या गरीब स्वभावाच्या स्त्रीला शक्यच नव्हतें. त्यांतून गरिबींत वाढलेल्या स्त्रीला एवढ्या वृद्ध गृहस्थाला दुरुत्तरें करणें तिच्या आंवाक्या-बाहेरचें होतें.

" मी काय ठरवणार ? मला त्या ताटाविषयीं कांहींच माहिती नाहीं. यापेक्षां मी काय सांगूं ?"

तिनें अश्रु दाबण्याचा शक्य तो प्रयत्न केला; पण हृदयांत उसळत असलेल्या पाण्याला उकळी फुटली असतांना तें थोपवणार कसें ? तें उतूं हें जाणारच.

" काल तुम्हांला आमच्या हिनं सारं सांगितलं असेलच. तेव्हां म्हटलं रीतसर पोलिसांत वर्दी देण्याच्या आधीं तुम्हांला एकवार सांगितलेलं बरं. हो, पांढरपेशा वर्गांतली गरीब बाई. पोलिसांत– तिथं काय, एकदां वर्दी देण्याचा अवकाश––"

यमुनाताईंना आपल्या पतीचे प्राण घेऊन जाण्याला जे यमदूत आले होते तेच आज परत आले आहेत कीं काय असा भास झाला.

" मी इतकं जीव तोडून सांगत आहें त्यावर जर तुमचा विश्वास बसत नाहीं तर तुम्हीच वडिलांच्या नात्यानं काय करूं तें सांगा." एवढे शब्द बोलतांना तिला अश्रूंचे किती तरी पाट ओलांडावे लागले.

" हें पहा, मी तुम्हांला आजपासून दोन दिवसांची मुदत देतों तेवढ्यांत जर कांहीं व्यवस्था झाली तर ठीक....नाहीं तर....तुम्हांला नाइलाजानं पोलिसापुढं उभं करणं मला भाग आहे."

भाषणानंतर बाबासाहेबांनीं एक दीर्घ सुस्कारा सोडला.

तिनें लोखंडाचा रस पाहिलाच नव्हता; पण तो न पाहिलेला रसच आज आपल्या कानांत कुणी ओतीत आहे कीं काय, असें तिला वाटूं लागलें.

" नका हो असं करूं, बाबासाहेब ! माझा काय बरं त्यांत संबंध गरिबाचा ? मला यांतून सोडवा, एवढंच माझ्या बाळाकरतां पदर पसरून मागतें हो ! " तिच्या डोळ्यांतून बाहेर ओघळणारे अश्रु आणि केंविलवाणी मुद्रा यांवरून तिला हेंच बोलावयाचें होतें, असें बाबासाहेबांच्या लक्षांत आलें.

तो निर्दय, कवडीचुंबक म्हातारा असल्या रडण्याभेकण्याला जुमानणारा नव्हता. तसें असतें तर आज गांवांत लक्षाधीश म्हणून मिरवण्याचें भाग्यच त्याच्या नशिबीं आलें नसतें.

" प्रश्न आहे आज कमींत कमी शंभर रुपयांचा ! परवांच्या मुलीच्या लग्नांत खर्च झालेत २७०० रुपये; त्यांत ही भर म्हणजे मला आतां डोळेच मिटायला पाहिजेत ! "

आतां मात्र यमुनाताई एखाद्या निर्बुद्ध पुतळीप्रमाणें स्तब्ध उभ्या राहिल्या ! पावसांत पूर्णपणें भिजलेल्या माणसाला आणखी चार थेंब पडले तरी त्याचें काय वाटणार ?

" आतां पटत असलं तर मार्ग आहे. तुम्ही आपल्या घरचं काय किडूकमिडूक असेल तें देऊन ताटाची भरपाई करा, म्हणजे प्रकरण पोलिसांत देण्याचीच जरूरी नाहीं. तुम्ही सांगत असाल तर आणखी दोन दिवस थांबतों. त्याला माझी हरकत नाहीं. बरं, ताट कुठं सांपडलं तर तुमचा ऐवज परत न्या. आम्हांला कांहीं तो ऐवज नको आहे ठेवायला."

* * *

वरील प्रकाराला आज दोन दिवस झाले तरी त्यांतलें अक्षरन् अक्षर यमुनाताईंच्या हृदयावर कोरलेलें होतें. ती त्यांतलें कांहीं विसरणें शक्य नव्हतें; इतकी खोल ती जखम होती. मध्यंतरीच्या दिवसांतल्या शिवरात्र व एकादशीला तिला निर्जल उपोषण घडलें. तोंडाजवळ नेलेला घांस आंत जाईचना. पुढें पडणाऱ्या उपवासांची ती सुरुवात तर नव्हती, अशी कल्पना तिला त्यामुळे होई. वैधव्यानंतरच्या संकटांत प्रथम प्रथम ती देवावर नवसासायासांचा भार टाकी; पण सतत मिळणाऱ्या अनुभवानें तिचा त्याहि गोष्टीवरचा विश्वास उडत चालला होता. रिकाम्या सांपडलेल्या वेळांत संवयीप्रमाणें ती देवापुढें डोळे मिटून प्रार्थना करीत बसे; पण अनुभवाच्या कडवटपणामुळें त्यांत निष्ठेचा अभावच दिसून येई.

घरीं माधव आजारी असूनहि ती त्याच्याकडे लक्ष न देतां हेळसांड करूं लागली. शेजारी-पाजारी सुदैवानें बरे म्हणून त्याच्याकडे ते बघत तरी असत. आज ती अंथरुणावर पडल्या पडल्या बाबासाहेबांनीं मोठ्या औदार्यानें दिलेल्या मुदतीचे दोन दिवस उद्यां संपणार याच विवंचनेंत होती. आणि दुःखें एकदम येतात हें खरें करण्यासाठीं म्हणूनच कीं काय, इकडे

माधवचा आजार वाढत चालला होता. शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या निदानावरून तो विषमाचा ताप असावा, अशी तिची खात्री होत चालली. भविष्य-काळचा 'उद्यां' आपला अक्राळविक्राळ जबडा पसरून तिला भेडसावीत होता. 'विधवांनीं कुंकू लावावें कीं नाहीं' असा गहन प्रश्नच तिच्यापुढें नव्हता. तिच्यापुढें साधा प्रश्न होता, 'विधवांनीं जगावें काय?' पण या प्रश्नाचें उत्तर ठरून गेले होतें—माधवसाठीं तरी तिला जिवाचें बरें-वाईट करण्याचा विचार करणेंहि अशक्य होतें. नाहीं तर तिच्या एकट्या जिवाचा प्रश्नच नव्हता.

शेवटीं तिनें विचार करून ठरविलें, कीं घरांतली देण्यासारखी असेल ती सर्व चीजवस्त थेरड्याच्यापुढें आदळावी. ती देऊन देणार तरी काय? कारण घरांत शिल्लक असे काय होतें? दागदागिन्यांपैकीं ठळक दागिन्यांचा केव्हांच पोषणासाठीं निकाल लागलेला होता. आतां राहतां राहिलेलं किडूकमिडूक साठ-पाऊणशेंच्या आंत-बाहेर होतें. तेंच नेऊन द्यावें, पुढें काय व्हायचें असेल तें होवो. निदान मुलाच्या आजारीपणांत तरी कांहीं वाईटसाईट प्रसंग नको आपल्यावर यायला. मुलाचें आजारीपण शेजाऱ्यापाजाऱ्यांच्या सहानुभूतीवर निभावणे शक्य होते; पण एकदां बेअब्रू झाल्यावर जीवन कंठणें दुरापास्त होते, अशी तिची खात्री होती. एरव्हीं एखादी गोष्ट करायला तयार न होणारें मनुष्य विवक्षित प्रसंगांत सांपडलें म्हणजे करूं नये ती गोष्टहि एखादे वेळीं करूं शकतें. तसाच कांहींसा प्रकार तिच्या बाबतींत झालेला होता.

सारी रात्र विचारानें व शेजारीं अंथरुणावर पडलेल्या माधवच्या कण्हण्यानें तिला झोप येईना. पहांटेच्या गार वाऱ्यानें जरासा तिचा डोळा लागला.

दुसऱ्या दिवशीं नेहमींप्रमाणें ती शेजाऱ्यापाजाऱ्यांना माधवकडे बघण्यास सांगून कामावर जाण्यास निघाली. आजारी मुलाच्या जवळून हालतांना तिच्या मनांत भलतेसलतेच विचार येऊं लागले. मन अगदीं घट्ट करून ती निघाली तेथून. सर्व जिन्नस बाबासाहेबांच्या हवालीं करून लगोलग परत यावें, पुढें काय व्हायचें असेल तें होवो, अशा निर्धारानेंच ती निघालेली होती.

रोजच्यापेक्षां तिचें आज जरा वेगळ्या प्रकारें तिथें स्वागत झालें.

"यमुनाताई, माधवची प्रकृति कशी काय आहे ?" तिला दारांत पाहिल्यावर अंगणांत असलेल्या सरस्वतीकाकूंनीं विचारलें.

"अजून कांहीं तापाला उतार नाहीं. विषम आहे म्हणतात!" तिनें सुस्कारा टाकीत उत्तर दिलें.

स्त्रीस्वभावानुरूप अंगणांतल्या फुललेल्या तांबड्या गुलाबाकडे तिची दृष्टि गेली. दोन गेंदबाज फुलें त्यावर उमललेलीं दिसत होतीं; पण त्या दृश्याचा तिला तिटकारा आला. त्या दोन फुलांऐवजीं, ते एखाद्या राक्षसाचे विस्तवाच्या ठिणग्या टाकणारे डोळे तर नाहींत ना– असाहि क्षणिक विचार तिच्या मनांत चमकून गेला.

"पडेल बरं उतार लवकर. विषम असला म्हणून काय झालं ? हं, सैंपाकघरांत चला लवकर; तेवढा चहा ठेवलाय् तो घ्या आधीं. अन् हें पहा, देवाच्या दयेनं आज सकाळींच परसांत केळीच्या झाडाखालीं ताट सांपडलं. झालं–गेलं–जाऊं द्या आतां; म्हणत नव्हतें मी की......"

पुढचे शब्द तिला ऐकूच आले नाहींत. तिला ते ऐकण्याची जरूरच वाटली नाहीं. ती तशीच तडक मागच्या पायीं घरीं परतली. रस्त्यांत तिला कोण भेटले, कोण नाही–याचा कांहींच विचार नव्हता. एखाद्या निर्जीव यंत्राप्रमाणे ती रस्ता कापीत चालली होती. ईश्वराचें एकनिष्ठेनें भजन करणाऱ्या प्रेमळ भक्ताला जसें त्याच्या ध्यानावांचून दुसरें कांहींच दिसत नाहीं त्याप्रमाणें वाटेमध्यें तिच्या मनांत सारखा एकच विचार चालला होता कीं—

'हरवलेलं चांदीचं ताट परत मिळालं, तसा माझा माधव मला परत मिळेल का ?'



# जांभळें लुगडें : : २९

"घणन्......घण ऽऽऽन्......घणन् घण ऽऽऽन्!"

"अरे ए, ती वळकटी राहिली बघ खालीं; फेंक लवकर आंत!"

"पा ऽऽन् विडी माचिस् सिगारेट........"

" रावसाहेब, आमच्या पोटाकड तरी बघा थोडसं......"

" हमाल, एऽऽ हमाल—"

" हिंदू चाय् गरमॉगरम !"

* * *

गाडी सुटावयाला अगदीं दोनच मिनिटांचा अवकाश उरला होता. माझ्या सेकंड क्लासच्या डब्यांत मी एकटाच असल्याकारणानें, प्रवासांतील आठ घटकांचें राज्य माझें, ह्या संपूर्ण डब्याचा स्वामी मीच, ह्या कल्पनेनें मी आनंदांत सिगारेटचे झुरके घेत डब्याच्या दारांत उभा होतों; इतक्यांत प्लॅटफॉर्मवर कोणाचें तरी रागारागाचें बोलणें ऐकूं आलें.

" नाहीं—नाहीं; मी अगोदरच पत्र लिहून माझ्यासाठीं स्वतंत्र बर्थ रिझर्व्ह करण्यासाठीं कळविलं होतं. माझ्या पत्राप्रमाणं व्यवस्था झालीच पाहिजे." हा स्वर एका स्त्रीचा असून, तिच्या आवाजांतील मूळच्या तीक्ष्णपणाला असंतोषाच्या उद्दीपनानें अधिकच तीव्रता आल्यासारखें वाटत होतें.

" पण आपलं पत्र आम्हांला मिळालं नाहीं; मीं आतांच सांगितलं नाहीं का ?"

" तर मग दुसरा एखादा डबा जोडण्याची व्यवस्था तुम्हांला करायला पाहिजे."

" तें आतां शक्य नाहीं—गाडी सुटायला आतां फारसा अवकाश नाहीं."

" तर मग, माझ्यासाठीं कुठं तरी......"

" ह्या डब्यांतच काय तो एक बर्थ रिकामा आहे......"

" हमाल,—चल टाक सामान लवकर......"

असें म्हणत ती तरुणी माझ्या डब्याकडे आली. आंत पाऊल ठेवतांच तिनें एकदां चोहोंकडे दृष्टि फेकली. माझ्याकडे पाहतांच ती किंचित् दचकल्यासारखें मला वाटलें. ती पुन्हा खालीं उतरली, व स्टेशनमास्तरकडे वळून म्हणाली, " पण ह्या कूपेमध्यें कोणी तरी इसम अगोदरच बसलेला आहे."

" हो, एक बर्थ रिझर्व्ह झालेला आहे. आतां फक्त एकच शिल्लक आहे. चला लवकर."

" ठीक आहे तर, मला ह्या गाडीनं जायचंच नाहीं ! "

" जशी तुमची मर्जी. तर मग मी गाडी सोडतों आतां......"

" थांबा, थांबा—ही गाडी चुकतां उपयोगी नाहीं. दुसरीकडे जागा नाहींच तर मग काय करायचं ?...पण पुढील स्टेशनवर तरी माझ्यासाठीं दुसऱ्या एखाद्या स्वतंत्र डब्याची व्यवस्था तुम्ही कराल का ? "

" हो, हो—चला, घाई करा."

" पुढच्या जंक्शनला स्टेशनमास्तरला तुम्ही तार कराल का ? "

" हो—"

" पुन्हा कांहीं घोटाळा तर होणार नाहीं ना ? "

" नाहीं—नाहीं. चला लवकर; गाडीला उशीर होत आहे."

" —हमाल......"

दुसऱ्या क्षणींच एकदोन सूट-केसेस् व इतर कांहीं सामान माझ्या डब्यांत येऊन धडकलें. हातांतील कातडी पिशवींतून काढलेले पैसे त्या सामानाच्या धनिणीनें हमालाच्या अंगावर टाकले, गाडी चालू झाली. अपेक्षेपेक्षां अधिक मजुरी मिळाल्याचा आनंद हमालाच्या मुद्रेवर स्पष्ट दिसत होता.

लवकरच तिनें आपलें सामान नीटपणें ठेवण्यास सुरवात केली. तिची प्रत्येक हालचाल मी निरखून पाहत होतों. ह्या सडपातळ आणि ठेंगण्याशा स्त्रीचें स्वरूप सुंदर आहे, हे पाहून मला समाधान वाटले. समाधान वाटण्याचें कारण एवढेंच कीं प्रवासांत कुरूपतेपेक्षां सौन्दर्याचा सहवास कोणालाहि अधिक आवडतो.

थंडी मी म्हणत होती. संध्याकाळच्या अस्तप्राय सूर्याचा प्रकाश तांबुस-पिवळसर दिसत असून, तो आमच्या दोन्ही बाजूंनीं विरुद्ध दिशेनें पळत असल्यासारखा भासत होता. त्या तरुणीने आपला ओव्हरकोट अंगाभोवतीं घट्ट आवळून घेतल्यासारखें केलें, व खिडकीच्या बाहेर दृष्टि रोंखून ती स्वस्थ बसून राहिली. मींहि स्टेशनवर विकत घेतलेल्या वर्तमानपत्रांपैकीं एक उघडलें, व त्यावर दृष्टि स्थिर केली.

गाडी वेगानें मार्ग कापीत चालली होती.

कांहीं वेळानें गाडीचा वेग कमी झाल्यासारखें वाटलें. त्या तरुणीचीहि हालचाल सुरू झाल्यासारखी दिसली. गाडी उभी राहतांच तिनें

डब्याचा दरवाजा उघडला व ती इकडे तिकडे पाहूं लागली. स्टेशनअधिकाऱ्याची स्वारी घाईघाईनें आमच्या डब्यासमोरून चालली होती. त्याकडे लक्ष जातांच ती म्हणाली, " स्टेशनमास्तर ! "

" काय ? "

" तुम्हांला नागपूरच्या स्टेशनमास्तरकडून आलेली तार मिळाली का ? " तिच्या इंग्रजी उच्चारांवरून व बोलण्याच्या लकबीवरून ती बरीच शिकलेली असून, इंग्रजी बोलण्याचा तिला सरावहि पुष्कळ असावा असें स्पष्ट दिसत होतें.

" तार ?––कशाबद्दल ? "

" माझ्यासाठीं डब्याची व्यवस्था करण्या...... "

" तें ह्या स्टेशनवर होणं शक्य नाहीं......पुढं जंक्शनवर तुम्हांला ती व्यवस्था करून घ्यावी लागेल...चलो, ए रामभरोसे, क्या देखता क्या है––सिग्नल देवू ऽ ऽ–– "

"––स्टेशनवर गाडी किती वाजतां पोहोचेल ? "

" ८–४५ ला. संभाळा, गाडी सुटते आहे ! "

ती पुन्हा रागानें फणफणत आपल्या जागेवर येऊन बसली. तिनें माझ्याकडे एकदां पाहिलेंसुद्धां नाहीं.

मीं पुन्हा वर्तमानपत्रांत आपलें तोंड खुपसलें, पण तें वाचण्याकडे माझें मुळींच लक्ष लागेना. त्या तरुणीशीं बोलणें चालणें सुरू करावें अशी माझी फार इच्छा होती, पण तसें करण्यास मला निमित्त कांहींच सांपडेना. ह्या असल्याच 'भवति न भवति'च्या फेऱ्यांत बराच वेळ निघून गेला असावा. कारण, लवकरच पुन्हा गाडीचा वेग कमी झाला, व प्लॅटफॉर्मवर गाडी थांबली. हें स्टेशन बरेंच मोठें असून आमची गाडी येथें दहाएक मिनिटें तरी थांबणार होती. ह्या अवधींत स्टेशनमास्तरला भेटून आपल्या जागेसंबंधीं व्यवस्था करतां येईल कीं काय तें पहावें, अशा हेतूनें तिनें आपल्या अंगावरील ओव्हरकोट खालीं टाकला व ती डब्यांतून खालीं उतरून झपाट्यानें एका विवक्षित दिशेकडे निघून गेली.

मीं एक सिगारेट पेटविली व प्लॅटफॉर्मवर उतरून डब्याच्या पुढेंच इकडेतिकडे हिंडूं लागलों. पांच मिनिटें झालीं, सात झालीं, आठ झालीं ––आतां गाडी सुटण्यास फारच थोडा अवकाश उरला होता. अद्यापिहि

ती परत येण्याचा कांहींच पत्ता नव्हता. मीं प्लॅटफॉर्मवर दोन्ही बाजूंना लांबवर दृष्टि फेकून पाहिलें; तिच्या लुगड्याचा तो हलका जांभळा रंग मला कोठेंच दिसेना !

गाडी सुटायला आतां अर्धेंच मिनिट उरलें होतें; सिग्नलहि दिला गेला...तर मग ती आतां बहुधा परत येत नाहींच! मीं स्टेशनमास्तरच्या ऑफिसकडे दृष्टि फेंकली. पलीकडच्या प्लॅटफॉर्मवर, बुकस्टॉलकडे तोंड करून ...होय, शंकाच नाहीं ! तीच ती ! पण गाडी सुटते आहे ह्याची तिला दादहि नाहीं वाटतें ! छेः ! छेः !--आणि तिचें सारें सामान हें इथें ?... मीं तिला उद्देशून हांक मारली...अहो ऽऽ..."

पण माझी हांक तिच्या कानीं पोहोंचलीसुद्धां नसेल. सर्व उतारू आपापल्या जागीं जाऊन बसले होते. इतक्यांत शिटी वाजली, आणि गाडी सुरू होण्यापूर्वीचा एक लहानसा धक्का बसला.--तर मग ती मागेंच राहिली एकूण ! आणि तिचें अंथरूण-पांघरूण व सर्व सामान ह्या डब्यांतच ?--थंडीचा हा असा कहर !--विजेप्रमाणें एक कल्पना माझ्या डोक्यांत चमकली. मीं लगेच प्लॅटफॉर्मच्या विरुद्ध दिशेकडील माझ्या डब्याचा दरवाजा उघडला. लाईनजवळच निळी बंडी घातलेला एक पोर्टर उभा होता. तिचा ओव्हर-कोट व सुटकेसेस् वगैरे सामान मीं त्याच्या अंगावर फेंकलें, व पलीकडील प्लॅटफॉर्मवर बुक-स्टॉलजवळ उभ्या असलेल्या त्या स्त्रीकडे बोट दाखवून, तें सर्व सामान तिच्या स्वाधीन करण्याविषयीं बजावलें. गाडी अगोदरच सुरू झाली होती.

पोर्टरला सूचना देऊन मीं डब्याचें दार बंद केलें; व आपल्या जागे-वर जाऊन बसण्यासाठीं परत वळलों, तों......अरे हा काय अनर्थ झाला ? डब्याचें दार उघडून माझी प्रवासांतील सोबतीण घाईघाईनें आंत शिरत होती ! तर मग माझ्या डोळ्यांनीं मला फसाविलें एकूण ! माझ्या छातींत धडधडाट सुरू झाला !

तिनें डब्यांत पाऊल ठेवलें व पाहते तों तिचें सामान कुठेंच दिसेना·! ती आश्चर्यातिशयानें, कांहींशा उच्च स्वरांत म्हणाली, "म्हणजे ? माझं सामान कुठं गेलं ?"

आतां पहिल्यांदा तिची दृष्टि माझ्याकडे वळली !--ती दृष्टि मी आजन्मांत कधीं विसरणार नाहीं.

प्रेरक देवता तूं पूर्वी जशी होतीस तशीच आजहि आहेस; आणि म्हणूनच माझ्या कार्याला, आणखी मला तूं हवी आहेस."

यानंतर त्या दोघांत बराच वेळ स्तब्धता होती. असावरी आपल्याच विचारांत मग्न होती; व बळवंतराव तिच्या उत्तराची अपेक्षा करीत आकाशांतल्या ताऱ्यांकडे पाहत बसले होते. शेवटीं त्या स्तब्धतेचा त्यांनींच भंग करून म्हटले, " मग काय, असावरी, तुझं उत्तर शेवटीं मी नाहीं म्हणूनच समजूं ना ? मला फार फार आशा होती; आणि त्या आशेवरच आजपर्यंतचे दिवस काढून तिच्या पायावर मी केवढं तरी मनोराज्य उभारलं होतं." बळवंतरावांचा आवाज गहिंवरून आला; ते आपल्या जागेवरून उभे राहिले, व पुढें जाऊन असावरीच्या पुढें दोन्ही हात पसरून म्हणाले, " असावरी, आज वीस वर्षें मीं जी मोठी आशा उराशीं बाळगून ठेवली, तिची तूं नसत्या शंका मनांत आणून शेवटीं अशी निराशा करणार ना ? "

असावरीच्या मनांतली खळबळ एकदम शान्त झाली; तिचा निश्चय झाला. तिनें बळवंतरावाचे दोन्ही हात एकदम आपल्या हातांत घेतले व त्यांच्याप्रमाणेंच गहिंवरून म्हटलें, " बळवंतराव, माझ्याच्यानं तुमची निराशा कशी करवेल ? या वयांत लग्न करणं कसं दिसेल, आणि तें केलं तरी मला तुमचं काय कार्य करतां येईल या विचारानं मी गोंधळून गेले होते. पण नाहीं, काळानं आपल्या शरिरावर सत्ता चालविली असली तरी ती तो मनावर चालवूं शकला नाहीं; आणि तीं अद्यापि पूर्वीप्रमाणंच तरुण आहेत हें मला आताच पटलं. परस्परांच्या सहकार्यानं आपण दोघं काय करूं शकणार नाहीं ? हा दिवस खरोखरीच मोठा भाग्याचा आहे. आज वीस वर्षं जी गोष्ट अशक्य म्हणून मी आपलं मन तयार केल होतं, ती आज देवानं, आपली तपश्चर्या सफल करून, शक्य करून दाखविली ! "

आपल्या मनावरील एक मोठे दडपण नाहींसें झालें असें तिला वाटलें. तिचा आवेग तिला आवरेना. आपल्या आरामखुर्चीच्या पाठीकडे तोंड वळवून तिच्यावर तिने आपलें डोकें टेकलें आणि ती स्फुंदस्फुंदून रडूं लागली. पण तें रडें दुःखाचें नसून आनंदाचें होतें.

बळवंतरावांस तिच्याजवळ जाऊन तिचें सान्त्वन करण्याचा मोह अनावर झाला; व ते जवळ जाणार तोंच बाहेरच्या माडींत पावले वाजलीं, आणि— " अग, असावरी, अजून गप्पा पुरे नाहीं का झाल्या ? " असे तिच्या

आईचे शब्द ऐकूं आले. त्याबरोबर तिनें चटूदिशीं अश्रु पुसले, आणि ती कांहीं उत्तर देणार तोंच बळवंतराव पुढें होऊन म्हणाले, " काकू, बाहेरच या. अगदीं वेळेवर आलांत! उद्यां सकाळीं जें काम करणार होतों तें आतां करून टाकतों."

" पुरे बाबा आतां तुझं काम." काकू बाहेर गच्चीवर येऊन कळकळीच्या स्वरानें म्हणाल्या, " तुझीं कामें तर सदाचींच आहेत! आज येवढा प्रवास करून आलास ती झोंप कशी येत नाहीं ? काय काम असेल तें करूं आतां सकाळीं, विसांवा तरी घे जरा."

" छे-छे, काकू, तें काम आतांच करण्यांत मजा आहे. असावरी–" बळवंतराव असावरीकडे वळून म्हणाले, " ऊठ. तुझ्या आईंना आतांच नमस्कार करून त्यांचा आशीर्वाद मागूं! "

रमाबाईच्या लक्षांत या वाक्याचा अर्थ येण्यापूर्वींच त्या दोघांनीं त्यांच्या पायांवर मस्तकें ठेविलीं; व तीं ठेवतांना बळवंतराव म्हणाले,

" वीस वर्षांपूर्वी असावरी न् मी विवाहाची जी परवानगी तुम्हांजवळ मागणार होतों ती आतां आज मागतों. काकू---आमच्या दीर्घ तपश्चर्येची सांगता करून पुढील कार्यांत यश येण्यासाठीं आम्हां दोघांना तुमचा आशीर्वाद द्या! "



# तिचा भाऊ : : ३२

तीं मूळचीं कांहीं आमच्या गांवचीं नव्हत. तिच्या पतिराजांनीं येथें दवाखाना उघडल्याला फार तर पांच-सहा वर्षें झालीं असतील. एवढ्या थोड्या अवधींतहि त्यांनीं या गांवांतील लोकांवर आपली चांगलीच छाप बसविली होती. उभयतां पतिपत्नी सुशिक्षित आणि त्यांची राहणीहि जरा थाटाचीच; लोकांना स्वाभाविकच त्यांच्याबद्दल कुतूहल वाटे. गांवांतील प्रतिष्ठित आणि घरंदाज लोकांची गिऱ्हाइकी त्यांना सहज जोडतां आली. लहानशा शहरांत डॉक्टरच्या गिऱ्हाइकींत केवळ धंद्याचे उसने संबंधच न

राहतां, घरोब्याची ये-जा सुरू होणें स्वाभाविकच असतें. माझेंहि तसेंच झालें होतें.

ती सर्वांशीं मिळून मिसळून वागे; पण तिच्या वागणुकींत असा कांहीं रुबाब आणि अलिप्तपणा असे कीं, सर्वांना ती हवीशी वाटावी; पण फाजील सलगी करण्याचें धाडस मात्र कोणासच होऊं नये. ती वाखाणण्या-इतकी सुंदर नव्हती. तिचा चेहरा मोहक आणि तरतरीत होता, पण तिच्या पाणीदार डोळयांत सरासरी ओळखतां येईल न येईल इतका किंचित् तिरवेपणा होता. तिचे कपडे तऱ्हेतऱ्हेचे, उंची आणि सुबक असत; पण त्यांत छचोरपणा नसे. तिच्या अंगावर एखादाच पण नवीन तऱ्हेचा झटकन् डोळयांत भरण्यासारखा दागिना असे. तिचें बोलणें-चालणें, सर्व कांहीं कसें नीटनीटकें, ठाकठिकीचें आणि रेखीव असे. बोलतांना अगदीं मोजके निवडक शब्दच ती बोले; आणि तेहि अशा रीतीनें उच्चारी, कीं कितीहि पाल्हाळिक बोलणाऱ्याशीं गांठ पडलेली असली तरी त्यालाहि आपल्या वाहत्या वक्तृत्वाला आळा घालण्याची आवश्यकता पटावी; पण आपला अपमान झाला असें मात्र वाटूं नये.

तीं दोघेंहि सार्वजनिक कामांत बराच पुढाकार घेत; पण तिची शिस्त फार कडक असल्यामुळें ती स्त्रीवर्गांत विशेषशी प्रिय नव्हती. नेकी आणि नीति यांबद्दलचे तिचे विचार मोठे करडे होते. चालढकल आणि ढिलाई तिला मुळींच खपत नसे. तिची स्वतःची वागणूक चोख असल्यामुळें इतरां-कडे पाहण्याची तिची दृष्टि फार कठोर आणि चोखंदळ असे. संशयास्पद वर्तनाच्या माणसांची तिला अत्यंत चीड असे; आणि ती उघड उघड बोलून दाखवायला ती केव्हांच मागेंपुढें पाहत नसे. यामुळें कांहीं मंडळीं-च्या अंतःकरणांत तिच्याबद्दल तेढ उत्पन्न झालेली होती. तिचा हा कठोर-पणा तिच्या उत्कट ध्येयवादित्वाचा निदर्शक आहे असें मी मानीत असल्यामुळें माझा तिच्याबद्दलचा आदर कमी होण्याऐवजीं तो उलट द्विगुणित मात्र होई.

त्यांच्या पूर्वेतिहासाबद्दल चार माणसें चार तऱ्हेनें बोलत, पण असल्या चौकश्यांचा मला कंटाळा आहे. मी तिकडे कधीं लक्ष देत नसे. त्यांच्याबद्दल चालचलाऊ मामुली माहिती मला मिळाली होती. तीं येथें आल्यापासून त्यांचा-माझा चांगलाच परिचय झाला होता; मग उगीच

कोण करीत बसतो नसत्या पंचायती ! तिच्या वडिलांना ती व तिचा एक भाऊ अशीं दोघेंच अपत्यें होतीं. तिचें शिक्षण तिच्या वडिलांनीं केलें, भावाचें शिक्षण मात्र त्याच्या गुणांमुळें कांहीं धडपणें पार पडलें नाहीं. आतां तो माथेफिरूसारखा कोठें तरी भटक्या मारीत असतो असें मीं ऐकलें होतें. तिच्या नवऱ्याच्या बोलण्यांत या गोष्टींचा एखादे वेळीं उल्लेख येई; पण तिच्या तोंडून चुकूनदेखील कधीं आपल्या कोणत्याहि नातलगाबद्दल शब्द निघालेला मीं ऐकला नाहीं; अगर इतके दिवस माझी तेथें रोज ये-जा असतांहि कोणी कधीं तेथें आलेला मीं पाहिला नाहीं.

* * *

रविवार असल्यामुळें नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणे आजहि तीन साडे-तीन वाजण्याच्या सुमारास मी त्यांच्याकडे आलों होतों. दिवाणखान्यांत त्या दोघांपैकीं कोणीहि नव्हतें. दिवाणखान्यांतील मेजाजवळच्या एका ठेंगण्या खुर्चीवर एक अनोळखी गृहस्थ रेललेला होता. त्याचे डोळे मिटलेले होते. वाचावयाला घेतलेलें वर्तमानपत्र त्याच्या छातीवर पडलें होतें. त्याचे कानाजवळचे केस पिकून पांढरे झाले होते. चेहरा उन्हानें करपून गेल्या-प्रमाणें काळवंडलेला होता. कपाळावर व गालांवर सुरकुत्या पडल्या होत्या. नाक मोठें आणि बांकदार होतें. श्वसनक्रिया मंद आणि अनियमितपणें चालली होती.

मी क्षणभरच थांबलों. त्याचे झोपेला व्यत्यय न यावा म्हणून मीं कोणाला हांक मारिली नाहीं. कोणी तरी बाहेर येईपर्यंत वाचीत बसावें म्हणून मी मेजावरील एक वर्तमानपत्र उचललें व बसण्यासाठीं अगदीं हलकेच जरा खुर्ची पुढें ओढली.

खुर्ची ओढतांना अगदीं थोडासाच आवाज झाला; पण तेवढ्यानें त्याची झोपमोड झाली; त्यानें डोळे उघडले. कावऱ्याबावऱ्या नजरेनें इकडे तिकडे पाहत तो ताड्कन् खुर्चीवरून उठला.

“ माफ करा हं ! विनाकारण झोपमोड केली मीं आपली ! ” मीं ओशाळून म्हटलें.

माझ्या बोलण्यावरील क्रमप्राप्त औपचारिक उत्तर त्यानें दिलें नाहीं. एक क्षणभरच पण भेदक स्थिर नजरेनें त्यानें माझ्याकडे पाहिलें. हातांतील वर्तमानपत्राची घडी करून तें त्यानें टेबलावर ठेवलें; तो आंत निघून गेला.

जातांना त्याची पाठ माझ्याकडे होती. तिला किंचित् पोंक असून त्याची मान पुढें झुकलेली होती. हात शरिराला चिकटून समान्तर राहण्या-ऐवजीं ते खांदे गळून लुळे झाल्यासारखे अंगापासून अलग लोंबकळत होते. त्याची गोंधळलेली मुद्रा आणि ती चालण्याची पद्धति पाहून मला कसेंसेंच वाटलें. त्याचा चेहरा कुठें तरी पाहिल्यासारखा वाटून मी आठवण करूं लागलों. झटक्यासरशीं माझ्या मनांत कल्पना येऊन गेली--हा गृहस्थ तिचा भाऊ तर नसेल ?

बहिणीकडे येऊन त्याला आतां एक आठवडा उलटून गेला होता. आम्ही चार मंडळी गोष्टी करीत बसलों असतां तो फारसा कधीं तेथें बसत नसे. मुलांचा मात्र त्याला फार लळा होता. शेजारपाजारची मुलें जमवून त्यांच्याशीं बोलत बसावयाचें, त्यांना गोष्टी सांगावयाच्या, त्यांची थट्टा करा-वयाची, त्यांच्याशीं खेळावयाचें हा त्याचा आवडीचा कार्यक्रम. चिमुकल्या मीनाशीं तर त्याची फारच गट्टी जमली होती. तासन्ते तास तो तिच्याशीं बोलत बसे; आणि तिनें कितीहि वेडेवांकडे उलट प्रश्न विचारले तरी न कंटाळतां तो त्यांचीं उत्तरें देई.

" लग्न झालं म्हणजे खूप दागिने मिळतात का हो ? " बोलतां बालतां मीनानें त्याला एकदां अचानक प्रश्न केला.

" हो, खूपच ! " त्यानें हसत हसत उत्तर दिलें.

" अन् छान् छान् कपडेसुद्धां ? "

" हो तर ! कपडे मिळतात, दागिने मिळतात, गोड गोड खायला मिळतं ! खूप खूप गंमत असते लग्न झाल्यावर ! "

" सुमनताईला मिळतील दागिने तिचं लग्न झाल्यावर ? "

" हो ! आणखी तुझं लग्न झालं कीं तुलाहि मिळतील कीं ! "

" पण लग्न झाल्यावर नवऱ्याच्या घरीं जायला लागतं ना हो ? "

" हो तर ! अग, लग्न झाल्यावर नवऱ्याचं घर तेंच तुझं घर."

" मग बाबा अन् आई येतील का तिथं राह्यला ? "

" छट् ! वेडे, तीं कशीं येतील ? त्यांना त्यांचं घर नाहीं का ? आणि तीं राह्यला आलेलीं तुझा नवऱ्याला कसं आवडेल ? "

त्याचें हें उत्तर ऐकून मीनाचा चेहरा अगदीं गोरामोरा झाला.

" मग मी नाहीं लग्न करायची. मी आपली बाबांजवळच राहीन ! " ती गाल फुगवून म्हणाली.

तो मीनासाठीं कागदाची नाव तयार करीत होता. त्याचा हात मध्येंच थांबला. मीनाचे प्रश्नांची सरबत्ती थोडा वेळ बंद होती. त्यानें एक दीर्घ निःश्वास सोडला व होडी करण्याचें काम सुरू केलें.

" तुमचं नाहीं का हो लग्न झालं ? " मीनाची प्रश्नमालिका पुन्हा सुरू होण्याचा रंग दिसूं लागला.

त्यानें कशीबशी होडी पुरी केली. जणूं काय आपण तिचा प्रश्न ऐकलाच नाहीं असा बहाणा करीत तो म्हणाला, " चला, मीनाताई, झाली पुरी तुमची नाव. घ्या ही; पळा आतां, अन् जा नेऊन सोडा पाण्यांत ! "

होडी मिळाल्याच्या आनंदांत तिला आपल्या प्रश्नाचा विसर पडला. होडी धरलेला हात मागें-पुढें नाचवीत मीना उडत-बागडत आपल्या मित्र-मंडळींत जाऊन मिसळली.

ती जात असतां तो तिच्याकडे स्थिर नजरेनें पाहत होता. त्याचे डोळे पाण्यानें भरून आले होते.

* * *

किती तरी वेळ तो तसाच स्तब्ध बसला होता. कांहीं वेळानें त्यानें मला विचारलें, " तुमची या मंडळींशीं किती दिवसांची ओळख ? "

" त्यांचा दवाखाना इथं आल्यापासून; सुमारें पांच-सहा वर्षांची."

" माझी माहिती तुम्हांला ताईनं कधीं सांगितली ? "

" छे ! विषयच निघाला नाहीं कधीं."

तो खिन्नपणें हसला. राखेखालीं झांकलेल्या निखाऱ्याप्रमाणें नेहमीं मंद आणि निस्तेज वाटणाऱ्या त्याच्या डोळ्यांत कांहीं विलक्षण चमक दिसत होती.

" मी इथं आल्यावरदेखील माझ्याबद्दलची माहिती मिळविण्याची इच्छा नाहीं झाली कधीं तुम्हांला ? "

" असं कसं होईल ? पण दुसऱ्याच्या खाजगी बाबतींत डोकावण्याचा प्रयत्न करणं शिष्टाचाराचं लक्षण नव्हे ! "

माझे हे शब्द ऐकून तो मघांपेक्षांहि मोठ्यानें हसला ! " शिष्टाचार ?

मी एक पांच वर्षे कैदखान्याची हवा खाऊन बाहेर आलेला गुन्हेगार आहें, याची कल्पना आहे आपल्याला ?" विचित्र नजरेनें माझ्याकडे पाहत त्यानें प्रश्न केला.

माझ्या डोळ्यापुढें एकदम काजवे चमकले. तिचा भाऊ—अन् पांच वर्षांची सजा भोगून आलेला गुन्हेगार!

"आणि ठेवलेले आरोप तरी असे भयंकर, कीं ऐकून अंगावर कांटाच यावा! 'कायद्यानें स्थापन झालेलें सरकार उलथण्याचा कट, हत्यारांची चोरी, खुनाचा प्रयत्न'—"

माझा जीव जरासा खालीं पडला. "राजकीय गुन्ह्यांबद्दलच्या तुरुंगवासाला समाजांत आतां अप्रतिष्ठा समजत नाहींतच कुणी; उलट एक प्रकारं अभिमानानं सांगण्याची गोष्ट आहे ती!" उसनें अवसान आणून मीं म्हटलें.

"असेल! ज्यांना त्या भांडवलावर दुकानदारी करायची असेल त्यांना असेल!" त्यानें आवेशाने उत्तर केलें. त्याचे डोळे विस्फारले होते. कपाळावरील शिरा ताठ फुगल्या होत्या. "मला मात्र तसं वाटत नाहीं. राजकीय आणि इतर गुन्हेगारांत मी तरी कांहींच भेद करीत नाहीं."

"छे-छे! असं कसं म्हणतां येईल?" मी म्हणालों, "देशासाठीं सर्वस्वाचा होम करणारे हुतात्मे आणि स्वतःच्या पोटाची खळगी भरण्यासाठीं किंवा विकारपूर्तीसाठीं समाजस्वास्थ्यावर निखारे ठेवायला निघालेले नराधम यांना एका मापानं कसं मोजतां येईल?"

"कां येऊं नये बरं? समाजस्वास्थ्य म्हणजे कुणाचं स्वास्थ्य?"

"अर्थात् समाजांतील पापभीरु, सद्वर्तनी माणसांचं!" मीं आवेशानें उत्तर दिलें.

"हे सद्गुण मोजण्याचं परिमाण कुणीं ठरवायचं?"

"समाजांतील प्रतिष्ठित विचारी माणसांनीं."

"ठीक! आणि त्याची अंमलबजावणी कुणीं करायची?"

"राजसत्तेनं!"

"म्हणजे राजसत्ता आणि समाजस्वास्थ्य हीं परस्परावलंबी आहेत तर! तुम्ही म्हणतां त्याप्रमाणं समाजस्वास्थ्य जर राजसत्तेच्या आधारावर

अवलंबून असेल तर तिच्याविरुद्ध बंड करणारा पर्यायानं समाजस्वास्थ्यालाच धक्का देत नाहीं का ?"

"वरवर पाहतां जरी असं वाटलं तरी दोघांच्या हेतूंत फरक आहे. एकाचा हेतु स्वार्थी असतो, तर दुसऱ्याचा निरपेक्ष आणि उदात्त असतो!"

"हा हेतूचा प्रश्न नुसता आभास आहे; वास्तविक हा हितसंबंधाचा प्रश्न आहे. तुमचे हितसंबंध आज राजसत्तेच्या विरुद्ध आहेत म्हणून तिचा विरोध आज तुम्हांला आदरणीय वाटतो, तर उलट तुमच्या वर्गहिताच्या व प्रतिष्ठेच्या कल्पनांच्या विरुद्ध ज्यांचे हितसंबंध असतात त्यांना तुम्ही नराधम म्हणतां—त्यांच्या कृतींना गुन्हे ठरवितां."

"तुमच्या या विचारसरणीनं समाजांत अनवस्थाप्रसंग माजल्यावांचून राहणार नाहीं!"

"मी तर उलट असं म्हणतों कीं, तुमच्या शासनपद्धतीमुळं तो अनवस्थाप्रसंग आगाऊच उत्पन्न झाला आहे."

"म्हणजे कायदे आणि शिक्षा यांची आवश्यकताच नाहीं असं तुमचं म्हणणं कीं काय ?"

"होय! गुन्हेगारीची उत्पत्ति सामाजिक वैषम्यांत असल्यामुळं ती विषमता नष्ट केली म्हणजे गुन्हेगारी आपोआप नष्ट होईल, असंच माझं म्हणणं!"

"हे नुसते कल्पनेचे किल्ले आहेत झालं! गुन्हेगारीची प्रवृत्ति कांहीं व्यक्तींत स्वाभाविकच असते! ती नष्ट करण्याचा शिक्षेशिवाय दुसरा मार्ग नाहीं."

"तुम्ही कधीं तुरुंगांत गेलां नाहींत म्हणून तुम्हांला तसं वाटतं; मी स्वानुभवानं सांगतों कीं, तुमचे कायदे आणि तुरुंग गुन्हेगारी नष्ट करण्याचे मार्ग नसून गुन्हेगार तयार करण्याचे कारखाने आहेत. मी तुरुंगांत असतांना, तेथें कायद्यानं गुन्हेगारीचा शिक्का बसून आलेल्या माणसांत मला किती तरी माणसं अशीं आढळलीं कीं, त्यांच्या ठिकाणीं त्यांना शिक्षा सांगणाऱ्या न्यायाधिशापेक्षां अधिक माणुसकी होती; त्यांना गुन्हेगार ठरविणाऱ्या वकिलांपेक्षां अधिक सरळपणा होता."

" असतील बुवा ! " मी अविश्वासदर्शक स्वरांत म्हणालों.

" निखालस होतीं ! " तो आवेशानें म्हणाला, " पन्नाशी उलटलेला एक म्हातारा तेव्हां तेथें शिक्षा भोगीत होता. त्याच्या चेहऱ्याकडे पाहतांच त्याच्या अजातशत्रुत्वाची जाणीव कुणालाहि पटली असती. मानवी कायद्यानं त्याला भयंकर ठरवून त्याचं स्वातंत्र्य हरण केलं होतं. निसर्गाच्या उदात्त दृश्यांना त्याला पारखं केलं होतं. दररोज संध्याकाळीं अंधार पडण्यापूर्वींच अंधारकोठडींत कोंडून टाकायची व्यवस्था करून आकाशांतील ताऱ्यांचेंहि कधीं त्याला दर्शन होऊं नये अशी व्यवस्था केली होती; पण कावळे, चिमण्या, कबुतरं, खारी, उंदीर यांसारखी निसर्गाचीं लेंकरं मात्र त्याच्याशीं निर्भयपणें मैत्री करायला कचरत नव्हतीं.

तो तुरुंगांत कसा आला असेल याचं बरोबरच्या कैद्यांना मोठं आश्चर्य वाटे; पण त्यांत गूढ असं कांहींच नव्हतं. त्याच्या बिल्ल्यावर त्याचा ललाटलेख लिहिलेला होता; त्याला सहा वर्षांची सक्त मजुरीची सजा झालेली होती. इतकी भयंकर शिक्षा असतांहि त्याची वृत्ति शान्त आणि समाधानी असे. आपण गुन्हा केला असल्याची जाणीव त्याला असल्याचं कधीं दिसलं नाहीं. देशकार्यासाठीं कारावास स्वीकारलेले कित्येक राजबंदी खाजगी व्यवस्थेनं अनेक सवलती मिळवीत, सहचरांशीं प्रतारणा करून चोरून चैनी करीत; पण नैतिकदृष्ट्या अधःपतित ठरलेल्या या गुन्हेगारानं कधीं त्यांच्याप्रमाणं कुरकूर केली नाहीं, कीं आपल्या वैशिष्ट्याचा टेंभा मिरविला नाहीं.

गुन्हेगार ठरलेला हा म्हातारा त्याला शिक्षा होण्याच्या दिवसापर्यंत एक प्रतिष्ठित मनुष्य म्हणून गणला जात होता. गुन्हेगारीची प्रवृत्ति त्याच्यामध्यें असल्याचा कधीं कुणाला संशयदेखील येणं अशक्य होतं. त्याच्या नेकदारीची चारचौघांत ख्याति होती. त्याच्या स्वतःच्या न्यायान्यायाच्या व नीतिअनीतीच्या कल्पना उच्च वर्गीयांना साजेशाच होत्या. खालच्या वर्गांतील कंगालांच्या नीतिकल्पना, चालीरीति व व्यवहार यांना तो रानटी, अशिष्ट समजत असे. स्वभावतःच त्यांची प्रवृत्ति गुन्हेगारीची असते असं त्याचंहि आपल्यासारखंच मत होतं.

तो घरंदाज होता. त्याला बायकामुलं होतीं. उपजीविकेचं साधन म्हणून तो नोकरी करीत असे.

हलक्या लोकांच्या मुलांशीं आपल्या मुलांचा संबंध येऊन त्यांच्या जंगलीपणाचा आणि अशिष्टतेचा संपर्क आपल्या मुलांना लागूं नये म्हणून त्यानं आपल्या मुलांना एका खास उच्च वर्गीयांच्या मुलांसाठीं काढलेल्या अतिशय खर्चाच्या शाळेंत आपली ऐपत नसतांहि शिकायला ठेवलं होतं. आपलं जन्मासिद्ध उच्चत्व त्यानं आपल्या मुलांच्या मनावर इतक्या दृढपणं बिंबविलं होतं कीं, त्याच्या मुलीला दरिद्री माणसाशीं नुसतं बोलणंहि आपल्या दर्जाला आणि सुसंस्कृततेला शोभत नाहीं असं वाटे.

मुलांचं शिक्षण आणि त्याहूनहि त्यांच्या अभिजात अभिरुची यांमुळं कुटुंबाच्या खर्चाची तोंडमिळवणी करतां करतां म्हाताऱ्याच्या नाकीं नऊ येत; पण कांहीं झालं तरी इभ्रत सांभाळणं भाग होतं. त्याच्या मनाला एक मोठी आशा असे कीं; मुलाचं शिक्षण संपलं म्हणजे त्याला कुठं तरी चांगल्याशा नोकरीवर चिकटवून देतां येईल. पण फिरलेला काळ तो! तरुणांचीं डोकीं भडकायला दहा माणसं दहा गोष्टी सांगत, आणि अर्धकच्चीं भडक पोरं त्या ऐकून स्वार्थत्यागाच्या आणि देशभक्तीच्या नांवावर आत्माहुति द्यायला तयार होत. या वृद्ध गृहस्थाचा मुलगा अशांतलाच निघाला. नौकरीच्या घाण्याला जुंपलं जाण्याचं त्यानं साफ नाकारलं. तो राजकीय चळवळींत पडला. घास कसा अगदीं हातातोंडाशीं आला होता; पण मुलाच्या कृतीनं म्हाताऱ्याच्या पदरीं निराशा पडली. मुलगा माथेफिरू निघाला; पण मुलीची त्याला खात्री होती. ती असला आततायीपणा करणारी नव्हती. ती मोठी विदुषी होती. ललितकला, ललितवाङ्मय यांचा तिला फार नाद होता. सौंदर्यहीन जडवस्तु, नीरस व्यावहारिक प्रश्न, अरसिक माणसं तिला अगदीं दृष्टीपुढंसुद्धां नको असत. तिचे वडीलसुद्धां तिला बरेच वेळां अरसिक आणि व्यावहारिक वाटत. बड्याबड्या सुशिक्षित व रसिक मंडळींत तिची चहा होती.

याच सुमाराला तिचं तिच्याच कॉलेजांतील एक-दोन वर्षं तिच्यापुढं असलेल्या एका तरुणावर प्रेम बसलं. दोघंहि परस्परांना अगदीं अनुरूप होतीं! अनर्जित संपत्तीवर चैन करायची, अभिरुचीच्या अभिजातत्वाच्या गप्पा छाटायच्या, काव्य-नाटकांवर चर्चा करायची, श्रमजीविकांच्या जीवन-क्रमाला गलिच्छ, अनैतिक आणि जंगली म्हणून त्यांची चेष्टा करायची, आणि स्वतः, कधींच आचरणांत आणण्याची इच्छा आणि तयारी नसलेल्या

ध्येयवादाचे गोडवे गायचे! इतके परस्परसाधारण कार्यक्रम असल्यावर अंतःकरणं जुळायला काय उशीर!

प्रेम जुळलं; पत्रव्यवहार झाले; आणाभाका झाल्या; पण तेवढ्यानं लग्न कसं होणार? लग्नाचा प्रश्न निघाला तेव्हां व्यवहाराचा, दर्जाचा, इभ्रतीचा मुद्दा पुढं आला. प्रिया-प्रियकर बाजूला राहून दोघांच्या पूर्वजांना तोंडमिळवणी करणं प्राप्त झालं. मुलाच्या बापानं हुंड्याची अट घातली. मुलीच्या बापाला ती आपल्या आटोक्याबाहेरची वाटली. प्रियकरानं आपली कांहींएक करण्याबद्दलची असमर्थता तोंडभर दिलगिरी प्रदर्शित करीत व्यक्त केली. वडिलांच्या मर्जीविरुद्ध गेल्यास चालू चंदीच बंद होईल म्हणून त्याला कांहींहि करणं अशक्य होतं. प्रियकरानं हातपाय गाळल्यावर प्रियतमेनं आपल्या वडिलांना गळ घातली. तिनं विचारलं, 'बाबा, माझ्यापेक्षां पैसा अधिक वाटतो ना तुम्हांला?' परिस्थिति अशी कीं, वास्तविक वाटत होता, पण 'होय' कसं म्हणणार! 'नाहीं' म्हणणंच भाग होतं. पांढरपेशांच्या इभ्रतीचा प्रश्न होता तो. पुन्हा वाटाघाटी सुरू झाल्या. लग्न ठरलं, झालं. हुंड्याची रक्कम पटली. मुलीच्या अंगावर हिऱ्यामोत्यांचे दागिने चमकले. बापाच्या डोळ्यांचं पारणं फिटलं. शेजाऱ्यापाजाऱ्यांना मत्सर वाटला; आणि वधूवरांना कृतकृत्यता वाटली.

"वर्ष-सहा महिनेहि गेले नसतील. मुलीच्या अंगावरचे भाड्यानं आणलेले दागिने निजधामास गेले. तिच्या बापाच्या हातांत मात्र लोखंडाचीं सलकडीं झळकलीं. हुंडयाची रक्कम उभी करण्यासाठीं केलेली बनावट सहीची कारवाई किती दिवस दडून राहणार? आणि ती दडून राहील अशी त्याची तरी कुठं अपेक्षा होती? तुरुंगांत जावं लागेल हें ठरलेलंच होतं; पण गुन्हा केला तो स्वतःच्या सुखासाठीं थोडाच केला होता? पोटच्या गोळ्याचं जन्माचं कोटकल्याण साधतं तर तुरुंगाचा कोण केवा? माल पाहिजे, मग मोल नको का द्यायला, अशी त्याची विचारसरणी होती. सहा वर्षांची सक्त मजुरीची सजा, पण बिचाऱ्यानं सुखासमाधानानं सहन केली!"

* * *

हें वाक्य उच्चारून त्यानें सुटकेचा दीर्घ निःश्वास सोडला. बराच वेळपर्यंत तो कांहींच बोलला नाहीं. शून्य नजरेनें समोर पाहत तो स्तब्ध बसला होता.

हकीकत सांगण्याची त्याची विचित्र पद्धति, त्याचा व्याज स्वर आणि अखेरीस त्याचें हें अशा रीतीनें स्तब्ध बसणें, यामुळें न राहवून मीं विचारलें, "मग पुढं काय झालं त्याचं?"

चमत्कारिक नजरेनें माझ्याकडे पाहत तो उद्गारला, "पुढं काय झालं? दुसरं काय होणार पुढं? शिक्षा संपल्यावर सुटला कीं तो तुरुंगांतून!"

"त्याचं हें उत्तर ऐकून माझा विरस झाला; तरी पण मी पुन्हा म्हणालों, "पण त्याच्या मुलीनं काय केलं पुढं?"

"तुम्हांला काय वाटतं? काय केलं असेल तिनं?" त्यानें मलाच उलट प्रश्न केला.

आपलें अनुमान तंतोतंत जुळणार अशा पूर्ण खात्रीनें आत्मविश्वासाच्या स्वरांत मी म्हणालों, "जिच्या कल्याणासाठीं त्यानं आपल्या शीलावरहि निखारे ठेवण्यास अनमान केलं नाहीं, ती त्याची लाडकी मुलगी त्याच्या सुटकेच्या दिवशीं त्याला भेटायला गेली असेल आणि—"

आणि माझें वाक्य पुरें होण्यापूर्वींच तो हसूं लागला. त्याच्या हास्यांत मूर्तिमंत तिरस्कार भरला होता.

"खरोखरच गेली होती त्याचे सुटकेचे दिवशीं ती त्याला भेटायला; पण तुम्ही म्हणतां तशी कृतज्ञताबुद्धीनं नव्हे, तर न जाणो सुटका झाल्याबरोबर कदाचित् तो सरळ आपल्या घरीं येईल या भीतीनं! आपला बाप एक तुरुंगांत जाऊन आलेला गुन्हेगार आहे, याचा चारचौघांत बभ्रा होईल तो टाळावा म्हणून! बाप झाला म्हणून काय झालं? त्याच्या नैतिक अधःपाताकडे काणाडोळा करणारी ती नव्हती. तिचं शिक्षण, तिचं ध्येयप्रवण विशुद्ध वर्तन, तिच्या सभोंवारचं उदात्त, पवित्र विचारांचं वातावरण तसल्या व्यक्तीकडून दूषित होणं तिला कधींच सहन झालं नसतं.

एकदां तरी आपल्या नातवंडांना डोळे भरून पाहावं अशी म्हाताऱ्याची फार इच्छा होती. पण आपले आजोबा जिवंत असून तुरुंगांत गेले आहेत, हें मुलांना न कळूं देण्याची आपण खबरदारी घेतली आहे व पुढंहि घेणार आहों, असं त्याच्या मुलीनं त्याला सांगितलं. त्याला कदाचित् तें पेटलं असेल, कदाचित् नसेलहि; पण त्यावर तो कांहीं बोलला नाहीं एवढं खरं!

एका दूरच्या अनोळखी गांवीं त्याची राहण्याची व्यवस्था करण्यांत आलेली होती. महिन्याचे महिन्याला आपण न चुकतां पंचवीस रुपयांची

पोंच करण्याची व्यवस्था करूं असं त्याच्या मुलीनं त्याला पुनःपुन्हा आश्वासन दिलं होतं. त्याची त्या गांवाकडे रवानगी करून देण्यांत आली. आश्वासनाप्रमाणं पैसेहि गेले; पण मालक सांपडत नाहीं म्हणून थोडयाच दिवसांनीं पहिलीच हुंडी परत आली!"

"अरेरे! गरीब बिचारा!" मी सुस्कारा टाकून म्हणालों, "काय कृतघ्न मुलगी तरी!"

"कशी काय बुवा?" त्यानें खोंचक आवाजांत विचारलें, "आपलं कर्तव्य करायाचं कांहीं तिनं टाळलं नाहीं! हा तिच्या तत्त्वनिष्ठेचा प्रश्न आहे! स्वतःशीं बेतलं म्हणजे योग्यायोग्याच्या कल्पना गुंडाळून ठेवण्याचा उपक्रम जर सुरू झाला तर तुमचं समाजस्वास्थ्याचं जूं कोण वाहणार!"

"हे पहा," मीं जरा गोंधळून म्हटलें, "मीं कांहीं या प्रश्नाचा फारसा खोल विचार केलेला नाहीं—"

"कांहीं नवल नाहीं त्यांत. मलाहि तुरुंगांत जायची पाळी न येती अन् मी तिचा भाऊ नसतों तर कदाचित् मींहि केला नसता!" त्यानें उत्तर केलें.



## त्यानें मांजर कां पाळलें? : : ३३

गेन्याचें दुकान माझ्यासमोरच होतें. गेन्या, गेन्याचें दुकान आणि त्या दुकानावरची पाटी हीं परस्परांना शोभण्यासारखींच होतीं. गेन्यानें ज्या दिवशीं आपल्या दुकानाचा संसार थाटला त्याच दिवशीं त्यानें पाटीचीहि प्राणप्रतिष्ठा केली होती. त्या पाटीवरचीं बरींचशीं अक्षरें गेंदबाज झेंडूच्या फुलांच्या माळांआड दडून बसल्यामुळें त्या अक्षरांचा परिचय व्हायला मला माळांचीं फुलें सुकून जाईपर्यंत थांबण्याशिवाय गत्यंतर नव्हतें. चार-आठ दिवसांच्या आंतच झांकून गेलेलें एकएक अक्षर सुकलेल्या फुलांमागून बुरख्यांतल्या मारवाडणीसारखें हळूच डोकावून पाहूं लागलें. अक्षरबोध झाला तरी पण अर्थबोध होईना! बिगारी यत्तेंतल्या मुलासारखा किंवा दाखवायला

आणलेल्या मुलीसारखा त्या पाटीवरचीं अक्षरें रोज मीं जुळवून वाचण्याचा प्रयत्न चालू ठेवला होता; तरी माझी तपश्चर्या फळाला यायला तब्बल तीन आठवड्यांचा अवधि लागला. एखाद्या इतिहाससंशोधकाला एखाद्या दुर्बोध शिलालेखाचा साद्यंत अर्थ लागून जसा आनंद व्हावा तसा आनंद मला गेन्याच्या दुकानावरच्या पाटीचा अर्थ लागतांच अनुभवायला मिळाला. होतीच ती पाटी अजब तशी ! तिच्यावरचीं अक्षरें हाताच्या बोटानेंच लिहिलीं असावींत बहुतेक. कारण प्रत्येक अक्षराच्या पायथ्याशीं, जळक्या मेणबत्तीच्या मेणासारखा रंगाचा एक एक ओघळ गोठून गेल्यामुळें सबंध पाटीला 'क्रिजिडेर'च्या जाहिरातीची शोभा आली होती. पाटीच्या वरच्या बाजूला मध्यभागीं जटाधारी शंकराचें चित्र काढलें होतें, आणि शंकराच्या जटेंतून गंगा डोकावत होती. डोईजड झालेली गंगामाई कशीबशी तोलून धरण्यासाठींच कीं काय, चित्रांतल्या शंकरानें 'हिज मास्टर्स व्हॉइस'च्या जाहिरातींतल्या कुत्र्यासारखी वांकडी मान केली होती; आणि जिनतानच्या जाहिरातीतल्या ओकणाऱ्या माणसासारखा एक भला थोरला पाण्याचा फवारा गंगाकाकूंच्या तोंडांतून उडत होता. नंतर पाटीवरच्या मुख्य मजकुराला सुरवात झाली होती. पाटीवरच्या मजकुरांत, गेन्यानें स्वतःच्या धंदे-कौशल्याचें रसभरित वर्णन तर केलेंच होतें; पण त्याबरोबर इतर व्यवसाय-बंधूंच्या हलगर्जीपणाचीहि भरपूर नालस्ती केली होती. आधुनिक 'अचूक गुणकारी' औषधांच्या जाहिराती प्रतिज्ञेप्रमाणें 'तीन दिवसांच्या आंत मोगऱ्याच्या फुलावानी पांढरेशाफ कपडे धुवून' देण्याच्या काव्यमय प्रतिज्ञेवर 'अक्षि डामरावानीं काले कुलकुलीत—पन रंगवूनशान् कपडे तैय्यार करून' देण्याच्या हमीचा विरोधाभासाचा अलंकारहि चढविला होता. दुसऱ्यांच्या दुकानांत कपडे देण्यापासून होणाऱ्या भयंकर नुकसानीच्या धोक्याच्या सूचने-बरोबर स्वतःच्या दुकांनात 'येक वेळ तरी कपडे देन्याची णम्र इणंती' करून पाटीच्या शेवटीं उपाहारगृहांतल्या फराळाच्या जिनसांच्या किंमतीसह दिलेल्या याद्यांप्रमाणें, गेन्यानें, त्याला माहिती होते नव्हते तेवढ्या कपड्यां-च्या याद्या धुणावळीच्या दरांसह नमूद करून ठेवल्या होत्या.

गेन्याच्या 'नू सायंड्रिफिंग वाशिंग कंपणी'चा मुहूर्ताचा नारळ फुटल्यापासून अवघ्या तीन दिवसांतच त्याच्या दुकानासमोर एक भला मोठा पंचरंगी कपड्यांचा उकिरडा दिसूं लागला. कारण दोनच दिवसां-

पूर्वी रंगपंचमी होऊन गेली होती. गेन्यानें खरोखरच आपलें दुकान अगदीं मुहूर्तावर उघडलें होतें. 'न्हाव्याला पर्वणी आणि धोब्याला रंगपंचमी' म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं. गेन्याच्या एकादशांतून उच्चीच्या गुरूचेंच परिभ्रमण सुरू झालें असावें. वाळविलेल्या कपड्याच्या पाठी जळजळीत इस्तरीनें 'शाप' करतां करतां गेन्याच्या कमरेचा कांटा खिळखिळाच होत असे. खूपच येत असे काम त्याच्याकडे. डोकें वर काढायलासुद्धां त्याला फुरसद मिळत नसे.

चार घटका शेजारच्या शिद्बा 'सलूणवाल्या' शीं शिळोप्याच्या गप्पा मारायलासुद्धां बनत नसे त्याला. त्याचें आवडतें दैनिक म्हणजे पैशाची, "ताजी बातमी!" पण तिच्यावरूनसुद्धां नजर फिरवायला फावत नसे त्याला. शिद्याच वाचून दाखवायचा त्याला त्यांतल्या निरनिराळ्या बातम्या. शिद्बाचें 'जंट्लम्याण हेर कटिंग सलूण' किती तरी दिवसांचें जुनें दुकान! पण शिद्बाची गिऱ्हाइकी दिवसाकाठीं चार-दोन डोक्या अन् एक-दोन दाढ्या यापलीकडे जातच नसे कधीं. बिचारा शिद्बा! 'ताज्या बातमीं'तल्या शिळ्या बातम्यांवर, विशेषतः 'नवऱ्यानें बायकोचा कान कापला' किंवा 'बायकोनें नवऱ्याचें नाक कापलें' असल्या वैचित्र्यपूर्ण बातम्यांवर मल्लीनाथी करून भिंतीला तुमड्या लावण्याच्या महत्कार्यांत रिकामपणचा वेळ तो खर्च करीत असे. परीक्षेच्या मंडपांत आपण बसावें, आजूबाजूचे उमेदवार खूप झपाट्यानें लिहीत बसलेले असावेत आणि आपल्याला कांहींएक लिहितां न आल्यामुळें ज्याप्रमाणें आपल्याला शेजारच्या उमेदवारांचा अकारण हेवा वाटतो तसाच हेवा शिद्बाला गेन्याकडे पाहून कधीं कधीं वाटत असे. इतकें गेन्याच्या धंद्याचें बस्तान चांगलें जमलें होतें. दर भट्टीला गेन्या पांचपन्नास रेशमी 'डाग' सुद्धां घालूं लागला होता; इतकेंच काय, पण अलीकडे अलीकडे तर दररोज गुजरीच्या वेळीं तो रेशमी कपड्यांशिवाय बाहेरहि पडत नसे.

एक दिवस असाच गेन्या आपल्या कामांत गढून गेला होता. जवळच त्याचा दोस्त शिद्बा 'ताजी बातमी' वाचीत बसला होता; इतक्यांत एक गिऱ्हाईक हातांत रेशमी 'खमीस' घेऊन तावातावानें गेन्याच्या दुकानांत शिरलें. गेन्याचा चेहराच उतरला तें गिऱ्हाईक पाहिल्याबरोबर. त्यानें बरोबर हेरलें होतें कां तें गिऱ्हाईक आलें होतें तें! तळहाताएवढा

खमिसाच्या पाठीवरचा चकंदळा दाखवून त्या गिऱ्हाइकानें गेन्याची चांगलीच पूजा बांधली. शिमग्याचा मंगल सण नुकताच पार पडला होता. तरी खास फाल्गुन पंधरवडयांतला जातिवंत शब्दसमुच्चय त्या गिऱ्हाइकाच्या जिभेवर थैमान घालीत होता; त्यामुळें यंदाच्या पंचांगांत अधिक फाल्गुन महिना आला असावा असेंच वाटलें मला.

वेदांच्या ऋचा अनुक्रमानें पाठ म्हणणाऱ्या दशग्रंथी ब्राह्मणाच्या अस्खलित वाणीनें त्या गिऱ्हाइकानें तोंडानें शिव्यांचा सपाटा चालू ठेवला होता. एखाद्या जगद्विख्यात पशुसंग्रहालयांतसुद्धां जितकीं जनावरें एका वेळीं पाहायला मिळणार नाहींत, तितक्या निरनिराळ्या जनावरांचा आणि गेन्याच्या निरनिराळ्या नातेवाइकांचा एकत्र नामनिर्देश करून तें गिऱ्हाइक शिव्या मोजीत होतें. शिव्यांच्या निमित्तानें ज्या जनावरांचा नामनिर्देश झाला होता तीं सगळीं जनावरें जरी गेन्याच्या दुकानांत एकदम शिरलीं असतीं तरी गेन्या इतका भेदरला नसता; पण त्या गिऱ्हाइकाच्या वर्तनानें गेन्या गारच झाला! "अहो, पण उंदरानें तुमचें खमीस खाल्लें त्याला आम्ही काय करणार?" गेन्यानें बचावादाखल भाषण करण्याकरितां तोंड उघडलें.

पण तें गिऱ्हाइक फारच वस्ताद होतें. "काय करणार? कांहीं करतां येत नसेल तर त्या शेजारच्या न्हावगंडाची पाटी लाव आपल्या दुकानावर!" असें म्हणून तें गिऱ्हाइक निघून गेलें! शिदबाच्या हातांतला ताज्या बातमीचा अंक गळूनच पडला खालीं हें अभद्रचें वाक्य ऐकून! आतांपर्यंत झालेल्या संभाषणांतले सारे शब्दप्रयोग त्याच्या परिचयाचे होते. त्यांत विशेष असें कांहीं त्याला वाटलें नाहीं. गेन्यालासुद्धां कांहीं विशेष वाटलें असावें असें दिसलें नाहीं. पण जातांजातां त्या गिऱ्हाइकानें उच्चारलेल्या वाक्यानें एका धोंडयानें दोन पांखरें एकदम घायाळ झालीं. एक वेळ त्या गिऱ्हाइकानें गेन्याच्या हातांतली तापलेली इस्तरी हिसकावून घेऊन, गेन्याचें टाळकें टक्कल पडेपर्यंत हुळहुळें केलें असतें तरी गेन्याला त्याचें इतकेंसें वाईट वाटलें नसतें. पण हें काय बोलणें का बोलण्याची तऱ्हा? शिदबा त्याचा दोस्त खरा; पण भलत्याच कामांत कसली दोस्ती! त्याच्या दुकानावरची पाटी आपल्या दुकानावर लावण्याच्या सूचनेची नुसती कल्पनासुद्धां गेन्याला असह्य झाली. अपमानाला कांहीं तरी सीमा असतेच.

कुठें परीट अन् कुठें न्हावी ! तें गिऱ्हाइक गेल्यापासून गेन्याची चित्तवृत्ति अगदींच प्रक्षुब्ध झाली. एका उंदरापायीं आपल्याला या अपमानाचे मूग निमूटपणें गिळून बसावें लागलें या विचाराने सुन्न झालें त्याचें डोकें अगदीं. सूडाचा संदेश त्याच्या मेंदूंत भिनून गेला होता. तावडतोच दुकान बंद केलें त्यानें; आणि एकदम तो म्युनिसिपालिटीच्या हेल्थ ऑफिसांतून एक उंदराचा पिंजरासुद्धां घेऊन परत आला.

सात जन्मांचा वैरी ऐन सांदरींत सांपडून आनंद व्हावा तसा आनंद गेन्याला दुसऱ्या दिवशीं सकाळीं झाला होता. कारण एक खूपच मोठा उंदीर त्यानें लावून ठेवलेल्या पिंजऱ्यांत सांपडला होता. आपल्या अब्रूच्या खोबऱ्याची खिरापत भर रस्त्यावर वांटायला कारणीभूत झालेला गनीम अनायासें आपल्या तावडींत सांपडला या विचारानेच गेन्या अगदीं बेहोष झाला होता. किती तरी लोकांना त्यानें तो उंदीर दाखविला ! पण पुढें काय ? करायचें काय त्या उंदराचें ? त्याला चांगली अद्दल घडली पाहिजे त्याच्या पाजीपणाबद्दल, म्हणजे पुन्हा नाहीं तो करणार असलें बेशरमपणाचें वर्तन ! शेवटीं गेन्याच्या डोक्यांत एक युक्ति आली. 'अंद्रोक्लीज् आणि सिंह' हा धडा त्यानें एका क्रमिक पुस्तकांत वाचला होता, तो त्याला आठवला. त्या उंदाराचा अंद्रोक्लीज् करून टाकावा, डोळ्यांदेखत सूड घ्यावा; ही कल्पना गेन्याला पसंत पडली. पण मांजर कोठून आणावें ? हरकत नाहीं. शहरच्या रस्त्यांतून बिनकामटेकडीं कुत्रीं, माणसें आणि मांजरें पुष्कळ फिरतात. कुठेंहि सांपडेल एखादें मांजर. असा विचार करून गेन्या पिंजरा घेऊन बाहेर पडला. बाहेर पडतो तोंच गेन्याला एक मांजर आडवें गेलें. आडव्या गेलेल्या मांजरानें कार्यहानि होण्याऐवजीं कार्यसिद्धि होण्याचा हा अजब प्रसंग होता गेन्याच्या आयुष्यांत! वाढलेली दाढी खाजवीत खाजवीत खुंटाकडे जायला निघालेल्या माणसाला न्हावी आडवा जाण्यासारखाच प्रसंग हा ! पण कसलें मांजर होतें तें ! पायांच्या चार कामटयांवर चापटलेल्या नळयांच्या चतुःसीमेंत उरल्यासुरल्या जिवाचें जतन करीत रस्त्यानें कोलमडत जाणारें तें एक मांजराचें जिवंत मढेंच होतें. थोडक्यांत सांगायचें झालें तर त्या मांजराच्या प्रकृतीचा अगदीं दिवाणबहादूरच झाला होता. गाडीला उशीर झालेला प्रवासी कोणत्याहि भिकार टांग्याकडे बघतो त्या दृष्टीनें किंवा अगदीं गळयाशीं आलेल्या उपवर मुलीचा बाप कोणत्याहि

फाटक्या तुटक्या 'स्थळा'कडे बघतो त्या दृष्टीनें गेन्यानें एकदां त्या मांजराकडे पाहिले. जरा निराशच झाला तो त्या मांजराचा अवतार पाहून! पण कसेंहि झालें तरी मांजर आहे! अगदींच वांया नाहीं जायचें तें. मेलेलें मांजरसुद्धां जिवंत उंदराला भारीच असतें अशा विचारानें, 'गोएद' Go ahead (गो अहेड चें विकृत स्वरूप) म्हणून शंटिंग लाईनवरचा 'पुटर' ज्याप्रमाणें हातांतला हिरवा कंदील आडवा तिडवा झुकवितो, त्याप्रमाणें गेन्यानें हातांतला पिंजरा त्या मांजराकडे बघून एकदां-दोनदां झुकविला. स्वतःच्या अस्थिपंजरांत आपल्या जिवाचें जडजोखीम जतन करतांकरतां आधींच मेटाकुटीला आलेलें तें मांजर पिंजऱ्यांतल्या उंदराचा जीव घेण्याच्या भानगडींत पडण्याचें यत्किंचितहि लक्षण दाखवीना. वाळलेल्या शेवग्याच्या शेंगेसारखी झालेली शेपटी ताठ करून तें मांजर एखाद्या स्थितप्रज्ञासारखें गटाराच्या बाजूनें धिम्या चालीनें चाललें होतें. एक लहानसेंच दृश्य; पण ते पाहण्याकरितां लहानांपासून थोरांपर्यंत तमासगिरांचें एक भलें थोरलें भरीव कडें गेन्याभोंवतीं केव्हांच जमा झालें होतें. तमासगिरांच्या मजलशींत एक पोलीस शिपाई, एक जाहिराती चिकटविणारें पोरगें (हातांत चिंचोक्याच्या खळीची चादली, कांखोटींत जाहिरातींचीं पुडकीं आणि खांद्यावर शिडी या थाटांत), शेजारचा शिदबा आणि गेन्याच्या दुकानाच्या वळचणीलाच स्वतःचें दुकान दाटीवाटीनें थाटून बसणारा चांभार इतके लोक प्रामुख्यानें चमकत होते. रस्त्यावर गर्दी जमवायला फार मोठेंसें कारण लागतें अशांतला भाग नाहीं. दोन बांबू आणि एक कडब्याची पेंढी इतकी सामुग्री एखाद्या घरासमोर दिसायचा अवकाश, कीं त्या घरासमोर अगदीं ललिताची किंवा संगीत सत्यनारायणाची गर्दी लोटायचीच! मग गेन्याच्या हातांतल्या पिंजऱ्यांत तर एक मोठा जिवंत उंदीर होता. किती तरी मनोवेधक दृश्य होतें तें! रस्त्यावरची गर्दी मोडण्याकरितां म्हणून मुद्दाम 'तिकीटी'वरून धांवून आलेला पोलीस शिपाईसुद्धां त्याच गर्दीत सामील झाला होता.

त्या उंदराला मांजराकरवीं 'देहान्त प्रायश्चित्त' देण्याबद्दल सर्वांचेंच एकमत होतें. फक्त कोणत्या पद्धतीनें, याबद्दलच वादविवाद चालू होता.

निसर्गाच्या विविधतेनें भरलेला होता. विशेषतः उजव्या बाजूला म्मुस्सई नदी एका मोठ्या डोंगराला खिंड पाडून एकदम कृष्णावेणीला मिळत असल्यामुळें ती जागा विशेषच रमणीय व भयप्रद होती. वसतीमध्यें उंचवट्यांवरून लहानमोठ्या पर्णकुटिका बांधलेल्या असून लोक नदीच्या कांठीं पिकणारें एक प्रकारचें धान्य, वन्य फळेंमुळें आणि रानांतील प्राणी यांवर उपजीविका करीत. वसति आणि संगम यांच्यामध्यें ताडासारख्या उंच वाढणाऱ्या कल्लुसंज्ञक मद्यार्क देणाऱ्या झाडांचें वन माजलें होतें. लोक मातीच्या भांड्यांत हा मद्यार्क सांचवून पीत, आणि धुंद होऊन नाचूं-गाऊं लागत. रोज सायंकाळीं हें रान तरुण दस्युकन्यांचें विहारवन होत असे.

"ती पाहिलीस का नीलम् येते आहे." अशाच एका दस्युकामिनीच्या समूहांतील एक म्हणाली. त्यांच्या सर्वांच्या हातांत मद्याचीं भांडीं होती. त्यांचे घोट घेत घेत त्या आपापसांत कलकलत होत्या. पलीकडे ठिकठिकाणीं पुरुष आणि स्त्रिया खात-पीत, ओरडत-गात, शुद्धीवर आणि बेशुद्ध, अस्ताव्यस्त आणि सावरून पडल्या होत्या.

अशा त्या संस्कृतिपूर्वकालीन अपूर्व मद्यालयात ती नीलम् उड्या मारीत आली. तिचे केस मोकळेहि नव्हते, आणि ती वेणी घालणेंहि जाणत नव्हती. तिचे अनावृत बाहू कृष्णसर्पाप्रमाणें इकडून तिकडे हालतांना शोभत होते. तिच्या अंगावर केळीच्या सोपटांनीं चटईसारखें विणलेलें, डाव्या खांद्यावरून सोडलेलें, कमरेभोंवतीं घट्ट बांधलेलें वस्त्र होतें. तिच्या वेणीपेक्षां तिच्या नीटसपणाचेंच वर्णन करावें. तिच्या नाजुकपणापेक्षां तिच्या अंगसौष्ठवावर काव्यें करावीं. तिच्या तारुण्यापेक्षां तिच्या डोळ्यांतील पाणीदारपणाचें कौतुक करावें.

ती दस्युकुमारी आपल्या मैत्रिणींच्या घोळक्यांत येऊन पोंचली. तेव्हां त्यांपैकीं एकीनें तिच्यापुढें कल्लूचा लोटा केला. तिचे डोळे आधींच लाल झाले होते. तिनें एकीकडे तोंड केलें, दुसरीला हातानें नको म्हटलें आणि तिसरीला हसत म्हणाली, " आपल्या गांवापाशीं यर्रा लोक आले आहेत बरं का ग ! " ( यर्रा म्हणजे आर्य किंवा गोरे. )

" मग आम्हांला काय त्यांचं भय घालतेस ? " त्यांपैकीं एक हातपाय आणि डोळे ताणून म्हणाली.

" ते म्हणे दस्यूंच्या पोरी उचलून नेतात आणि आपल्या देशांत कोंडून ठेवतात."

दुसरी म्हणाली, " मग मल्ली, तूं सांभाळ हो; नाहीं तर--"

पण नीलम्‌ला पुरती बोलूं न देतां मल्ली म्हणाली, " माझ्यापेक्षां तुलाच जास्त भीति आहे. तुझ्यावर तर सगळ्यांचा डोळा आहे ! "

" तिला ग कशाची भीति ? पल्लीपतीच्या पोराची ती आवडती आहे ! " मल्ली म्हणाली.

" पण हिला कुठं तो आवडतो ? " कोणशी म्हणाली.

" तो तर इच्या मागंमागं फिरत असतो." पेंटी म्हणाली.

इतक्यांत तो जवळच झाडाआड एकीला दिसलाच.

" तो समोर पहा, तो तिथं आहेच तिच्या मागं तो ! "

तो समोर आला; पण त्यांपैकीं कुणीच त्याला लाजली नाहीं किंवा उठली नाहीं किंवा सावरली नाहीं. उलट्या सगळ्या त्याच्याकडे पाहून खोखो हसूं लागल्या. " तुला यायचं आहे का नाहीं पलीकडल्या तीराला ? " तो ओरडून नीलम्‌ला म्हणाला, " नदी भरली आहे, पुन्हा कुणी तुला पलीकडे नेणार नाहीं मी नाव घेऊन गेलों म्हणजे."

" पलीकडे काय करायचं आहे ? तिकडे यर्श आले आहेत ना ? तुला माहीत नाहीं का ? " मल्ली खरीच भिऊन म्हणाली. ती त्या सर्वांत लहान होती.

" यर्शांना कुणीहि द्रव्वी भीत नाहीं." तो छाती फुगवून आणि आपल्या हातांतील कोयत्यासारखें हत्यार सावरून म्हणाला. द्रव्वी हा शब्द बलवान् या अर्थाचाच वाचक आहे. " तिला आवडणारीं उसरीचीं फळं पलीकडच्या तीरावर आहेत तीं आम्ही घेऊन येणार आहोंत." असें म्हणून त्यानें येऊन तिचा हात धरला. त्याच्या उंच धिप्पाड बांधेसूद देहाकडे दुसऱ्या पोरी पाहत राहिल्या.

" मी नाहीं येत तुझ्या नावेंत ! " तिनें आपला हात सोडवून घेतला. " तूं माझ्या अगदीं जवळ बसतोस आणि मला अडचण करतोस. तूं आपल्या नाव चालविण्याकडे लक्ष देत नाहींस म्हणून ती कुणीकडे तरी वाहत जाते आणि उशीर झाला म्हणजे आई करते पूजा ! " ती डोळे मिचकावीत म्हणाली.

" आणि पलीकडे यरीं आले आहेत, तूं जाऊं नको अक्का ! " मल्ली तिच्याजवळ येऊन तिला ओढूं लागली.

" तूं यरींना भितेस काय ? "

" हो, भ्यायला बसलें आहे ! हवं तर त्यांतल्या एखाद्याशीं लग्नसुद्धां करीन." नीलम्‌नें पाठमोरी होऊन मान वळवून त्याला खिजवण्यासाठीं म्हटलें.

त्यानें कोयता कमरेला खोचला; मल्लीच्या गालावर एक टिचकी मारली आणि नीलम्‌ला दोन्ही हातांनीं उचलून तो नावेकडे चालूं लागला.

" पाहिलंस का नीलम्‌चं भाग्य ? " त्यांतली एक कल्लूचें बोळकें ढोसून म्हणाली.

दुसरी एक उंच सुरांत गाऊं लागली:—

यरीं आले बाइ गांवांत
रत्नम्माची सुंदर बेटी
चोरुन नेली मेल्यांनीं
गांवामधले वीर धावले
रक्ताचे बाइ सडे सांडले

* * * *

कोण ग काळ्या केसांची
लाल लाल डोळ्यांची
दिला देवीनं नवस तिला
केव्हां ग आलीस रानांतून ?
पाणी का ग डोळ्यांतून
कुठं ग बाई नीलम् गेली
पल्लीपतिपुत्राच्या गळयांत—

ती जेव्हां हाताने ताल धरूं लागली तेव्हां तिसरी तिला म्हणाली,

" पुरे झाली तुझी कटकट ! मला एक चांगलं स्वप्न पडत आहे."

नीलेच्या प्रियकरानें जेव्हां तिला उचलून नेलें तेव्हां ती त्याच्या गालावर चापट्या मारूं लागली. त्यानें तिला नावेंत ठेवलें आणि नाव दूरपर्यंत नेली तेव्हां ती त्याला म्हणाली, " तूं मला कां त्रास देत आहेस ? मी कांहीं झालं तरी तुझ्याशीं लग्न करणार नाहीं ! "

“ कां बरं ? मी तुझी कितीतरी सेवा करीत नाहीं का ? हा पहा मी एखाद्या सेवकासारखा दूर बसतों.”

“ पण मी तुझ्याशीं लग्न करणार नाहीं.”

“ मी तुला आवडत नाहीं का ? ”

तिनें उत्तर दिलें नाहीं. नाव संगमाच्या मध्यावर आली होती. तो कांहीं तरी बोलणार इतक्यांत एक बाण येऊन त्या दोघांच्या मध्यें तळांत घुसला !

“ अय्ययो ” ती विवळली.

त्यानें वल्हें बाजूला ठेवलें, इकडेतिकडे पाहिलें आणि म्हटलें, “ तें पहा, त्या पलीकडच्या झाडावरून एका यर्रानं तो बाण मारला आहे. तुला लागलं काय ? ”

“ नाहीं, पण त्याचीं कुसळं पायाला बोचत आहेत.”

त्यानें जोरानें तो बाण उपटून नदींत फेकला, पण तो भोंक पाडून गेला असल्यामुळें पाणी आंत येऊं लागले. त्यानें टाचेनें पाणी अडविलें आणि वल्हें मारूं लागला, पण दुसऱ्या बाणानें त्याच्या हातांतलें वल्हें उडालें, त्यामुळें त्याचा झोक जाऊन तो नदींत पडला; आणि त्यानें नावेला धरण्याचा प्रयत्न केल्यामुळें नाव उलटली.

दुसरे दिवशीं सकाळीं पलीकडच्या तीरावर उतरलेल्या आर्यकुलाच्या पर्णागर्तेवर एका दस्युकन्येला आणून उभें केलें. कुलपति उच्चासनावर बसले होते. कुलगुरु कांहीं लोक बरोबर घेऊन समिधा आणण्यास गेले होते. ती दस्युकन्या नीलम् आपल्या अविहित मांड्यांमध्यें हात जोडून खालीं मान घालून उभी होती. पुष्कळसे तरुण तिच्याभोंवतीं जमले होते. त्यांतला एक तरुण तिच्या मागे उभा राहून विजयी मुद्रेनें तिच्याकडे व इतरांकडे पाहत होता. “ वाहवा प्रवीर, वाहवा प्रवीर ” असें कांहीं म्हणत होते. कांहीं तिच्या निरानिराळ्या अंगांना स्पर्श करीत होते. त्यांतील एक कुलपतींकडे जाऊन म्हणाला, “ कुलपतींच्या चरणीं प्रवीराची अशी विनंति आहे, कीं त्यानं जिंकलेली ही दस्युकन्या, इंद्र देवतांना यजन करून, त्याच्या स्वाधीन तिला करावी.”

“ प्रवीरा, ही तुला कशी मिळाली ? ” कुलपतींनीं विचारलें.

"एक दस्युहत हिला आपल्या नौकेंत घालून नेत होता. मीं बाणानें त्यांच्या नौकेला बुडविलें, आणि ही वाहत नदीतीराला आली."

इतक्यांत कुलगुरु आले. त्यांना सर्व हकीकत सांगण्यांत आली. त्यांनीं मान्यता देऊन यजनयोग्य अशी तिची स्नानादि शुद्धि करण्यासाठीं आपल्याबरोबरच्या शिष्यांपैकीं देवव्रत भार्गव नांवाच्या शिष्याच्या स्वाधीन केले, आणि सायंकाळीं होमाच्या वेळीं यज्ञस्थळीं उपस्थित करण्याची आज्ञा दिली.

इकडे मदनपल्लीतील मधल्या पटांगणांत बरीच मंडळी जमली होती. पल्लीपति स्वतः झाडाला टेकून बसला होता. त्याचे अजस्र शरीर, लांब दाढी, उग्र चेहरा आज जास्तच चढलेला दिसत होता. त्याच्या पाठीमागें त्याचा पुत्र खालीं मान घालून उभा होता. समोर कांहीं मंडळीच्या घोळक्यांत एक पोक्तशी बाई मोठमोठ्यानें बोलत व पुष्कळशा शिव्या देत आणि बोटें मोडीत होती. पलीकडे कांहीं तरुण आपापल्यांत कुजबुजत होते. कांहीं बायका एकीकडे जमून पाहत राहिल्या होत्या. नीलम्च्या मैत्रिणी त्यांत होत्या. कडकडत होती ती नीलेची आई. तिला तेवढीच मुलगी होती. तिचा नवरा पूर्वी पल्लीपति होता, आणि आर्यांच्या हातून मेला होता. सर्वांत शक्तिमान् असेल त्याला पल्लीपति करण्याची वहिवाट होती. तो कल्लूचे झाड हातांनीं हालवून उपटीत असे. आणि डाव्या हातांनीं मानगुटी दाबून शत्रूला मारीत असे. तें सगळें आठवून ती शोक करीत होती, आणि भोंवतीं जमलेल्या द्रव्वी तरुणांची निर्भर्त्सना करीत होती.

पल्लीपतीचा पहाडी आवाज वायूवर प्रतिध्वनित होतांच सर्वत्र शान्तता झाली.

"तूं तिला लगेच हात न देतां कशी वाहूं दिलीस?" त्याने मुलाला विचारिलें.

"ती बुडतांच दिसेनाशी झाली. आणि पुढं अंधार पडेपर्यंत मी तिला पाण्यांत शोधली. पुन्हा सकाळीं मी शोधण्यास गेलों तेव्हां ती शत्रूच्या हातीं दिसली." त्यानें खिन्नपणें उत्तर दिलें.

पल्लीपतीनें करकरां दांत खाल्ले आणि गर्जून म्हटलें, "जा, त्यांचा निःपात करा."

"माझ्याबरोबर कोण येईल?"

"मी येईन, मी नीलेसाठीं जीव वाहीन." आणि सर्वांनीं त्याचा अनुवाद केला.

इतक्यांत एक ओरडला, "ते पहा पलीकडच्या तीरावर यर्री तिला घेऊन आले आहेत" आणि सर्वांचें लक्ष तिकडे वेधलें.

मध्यें नदी अथांग भरून वाहत होती. दस्यूंना आर्यांच्या तिरंदाजीचें फार भय होतें; नाहीं तर आतांच पोहून जाऊन त्यांनीं आपली ठेव हस्तगत करून घेतली असती. नीलेच्याबरोबर देवव्रत होता, आणि इतर सशस्त्र तरुण संरक्षणार्थ होते. प्रवीर नव्हता.

देवव्रताला दस्यूंची भाषा येत होती. नदीच्या वाटेला लागतांच त्याने नीलम्‌ला विचारलें, "तुझं नांव काय ?" ती स्तिमितच झाली. तिला कुणी असे विचारील अशी कल्पनाहि नव्हती.

"भिऊं नको, सांग तुझं नांव."

तिनें त्याच्याकडे डोळे भरून पाहिलें आणि म्हटले, "नीलम्."

तोहि तिचें अथांग निरीक्षण करीत होता. नदीवर नेल्यावर तिला गोमयमृत्तिकादिकांनीं अभ्यंग स्नान घालण्यांत आलें. शेवटीं तिला राहवेना. तिनें देवव्रताला विचारले,

"माझं तुम्ही करणार तरी काय ?"

"हवन करणार."

"म्हणजे काय, विस्तवांत टाकून देणार ?"

"तुला अग्नीभोंवतीं फिरवणार आणि मंत्र म्हणणार."

"आणि पुढं—"

"ज्याला तूं सांपडलीस त्याला देऊन टाकणार."

"मग तो माझं काय करणार ?"

"उपभोग घेणार."

"लग्न करणार नाहीं ?"

"दस्युकन्येशीं कुणी लग्न करतं का ?"

"मग मला त्याची सगळी सेवा करावी लागणार ?"

"होय."

"पण आम्ही दस्युकन्या आपल्या इच्छेविरुद्ध कुणाला देह अर्पण करीत नाहीं."

" पण ते तुला भाग पाडतील."

यावर नीलम् कांहीं बोलली नाहीं. ती दीन झाली. परत येतांना ती सारखी त्याच्याकडे सतृष्ण पाहत होती, पण तिला बोलायला धीर होत नव्हता. झालें, दुपारचा वेळ तसाच गेला. तिच्या रक्षकांना यांपैकीं एक अक्षरहि समजलें नाहीं. सायंकाळीं देवव्रत तिला वेदीच्या स्थळीं नेण्यासाठीं आला तेव्हां ती त्याचे पाय धरून म्हणाली, " मला एक भिक्षा घाला."

" काय ? "

" मला या विटंबनेंतून वांचवा. इच्छेविरुद्ध भोग मरणाहून जास्त आहे. मला तुमच्या अग्नींत द्या."

देवव्रताला आश्चर्य वाटलें, दुःख झालें, आणि तिची दया आली. दया ही प्रीतीचीच बहीण नव्हे का ? त्याच्या डोळयांत पाणी उभें राहिलें. आणि तिच्या पाण्यानें भरलेल्या डोळयांकडे पाहून त्याला कसेंसेंच वाटलें. यज्ञानंतर प्रवीर तिला घेऊन चालला तेव्हां पूर्वी दिलेल्या वचनाची आठवण देऊन दक्षिणा म्हणून ती दासी त्यानें मागून घेतली. ब्राह्मण आणि दासीशीं व्यवहार करणार ! सर्वांच्या दृष्टीनें तो हीन, पतित ठरला. प्रवीर तर जळफळूं लागला; त्यानें ब्राह्मण्याला दूषणें दिलीं. त्याला ती फार आवडली होती, तिच्याबरोबर करावयाच्या अनेक विलासांची त्यानें मनांत कल्पना केली होती. त्या काळीं दासीगमन ब्राह्मणांना अगदीं निषिद्ध होतें; पण—

देवव्रतानें तिचा हात धरून तिला नदीतीरावर आणिलें आणि सांगितलें, कीं " तूं स्वतंत्र आहेस. आपल्या गांवीं जा." ती त्याला सोडून जायला तयार होईना. तिला जवळ ठेवण्यांत आपल्याला केवढें पातित्य आहे हें त्यानें सांगितलें, आणि तिला मुक्त करण्यासाठीं आपल्याला लोकदृष्टया केवढें हीनत्व स्वीकारावें लागलें हेंहि सांगितलें; पण जायला तयार होण्याऐवजीं ती त्याला जास्तच बिलगूं लागली; कारण आपल्यासाठीं इतका त्याग करणारें तिला कुणीच भेटलें नव्हतें. शेवटीं मोठ्या कष्टानें त्यानें परत जाण्यासाठीं तिचें मन वळवलें. ती जायला निघाली. तिनें पाण्यांत उडी टाकली, पोहून परतीर गांठलें, असें पाहून तो परत गेला. पण ती गांवांत गेली नाहीं. ती परत नदी तरून आली; आणि तें अरण्य तिच्या पूर्ण माहितीचें असल्यामुळें प्रियेप्रमाणें देवव्रताच्या मागोमाग राहूं लागली.

दिवसां लढाई करून आपल्याला आर्यांच्या तिरंदाजीपुढें यश मिळणार

नाहीं असें पाहून पल्लीपतीनें रात्रीं छापा घालण्याचें ठरवलें. मध्यरात्रीच्या सुमारास असंख्य धाडसी द्रव्वी वीर, कोयते कमरेला बांधून नदी तरून आले. आर्यांच्या तळावर कांहीं जागे होते पण बाकीचे निजलेले होते. मध्यें मात्र संध्याकाळीं पेटविलेले पांच अग्नी धडधडत होते. द्रव्वी आले ते आर्यांना जागे होण्याचीसुद्धां फुरसद न देतां त्यांनीं जो दिसेल त्याला कापून काढण्याचा किंवा अग्नींत फेकून देण्याचा धडाका चालविला. या टोळीचा पुढारी पल्लीपतीचा मुलगा होता. तो या संहारामध्यें रुद्रासारखा तापत होता. त्यानें दोन आर्य फरफटत आणले आणि अग्नींत टाकून म्हटले, " ज्या अग्नींत तुम्हीं माझ्या नीलेला टाकून दिलंत त्यांतच तुमची सर्वांची आतां आहुति देतों." हें कृत्य नीलम् लपून पाहत होती. तिनें धांवत जाऊन देवव्रताचें कुटिर गांठलें.

एका बाजूच्या झाडींत देवव्रताचें कुटीर होतें. त्याच्या आंत गवनाच्या शय्येवर एक सुंदर तरुणी निजलेली होती. दाराशीं देवव्रत पहारा करीत बसला होता. नीलम् त्याच्याजवळ धांवत आली आणि म्हणाली, " चला, माझ्याबरोबर चला, नाहीं तर तुमचं रक्षण होणं शक्य नाहीं. आमच्या लोकांनीं तुमच्या यरांचा संहार केला आहे. उठा लवकर—"

देवव्रताचा या गोष्टीवर विश्वास बसेना. त्यानें खात्री करून घेण्यासाठीं एका उंच झाडावर चढून पाहिलें. तों बहुतेक लोक मृत्युमुखीं पडले होते आणि उरलेले सैरावैरा पळत होते. तो खाली येऊन म्हणाला, " मी येऊं शकत नाहीं, मजजवळीचा ठेवा कुठें ठेवूं ? " त्यानें कुटिरांत निजलेल्या तरुणीकडे बोट दाखविलें. त्याच वेळीं अग्नींतील एक कोलीत पेटलें आणि त्याचा प्रकाश तिच्या तोंडावर पडला.

नीलम् तिचें लावण्य पाहून चकित झाली. क्षणभर ती विचारांत पडली. तिनें तिच्याकडे व देवव्रताकडे पुनः पुनः पाहिलें; आणि शेवटीं ती म्हणाली, " तुमचा हा ठेवा आपण घेऊन जाऊं." त्यांचें हें बोलणें होत आहे तो जवळच माणसांची चाहूल ऐकू आली. त्यासरशीं तिनें जाऊन त्या सुप्त तरुणीला उचललें आणि देवव्रताला आपल्या मागें येण्यास सांगून ती चालती झाली. देवव्रत एखाद्या मंत्रमुग्धाप्रमाणें तिच्यामागें गेला.

नीलम्च्या घरीं रक्षिलेलीं हीं दोनच आर्य माणसें त्या प्रदेशांत राहिलीं. या संहाराचें भय बसून पुन्हा आर्यकुल या बाजूला आलें नाहीं. केवळ

नीलम्‌च्या आग्रहास्तव त्यांना जीवदान आणि स्वातंत्र्य देण्यांत आलें. तीं उभयतां तिच्यापाशीं राहिलीं. या गोष्टीला किती तरी काळ लोटला.

नीलम्‌च्या घरी राहिलेली ती गौरांगी त्या सर्व दस्युसंघांत अभिलाषविषय होऊन बसली; त्यामुळें तिचें रक्षण करणें देवव्रताला अतिशय कठीण होऊं लागलें होतें. पल्लीपति मरून त्याच्या जागीं त्याचा मुलगा सर्वांत बलवान् म्हणून पल्लीपति झाला होता. त्याच्या आधीं त्यानें एका मोठ्या सुसरीच्या दाढा धरून तिला नदींतून बाहेर ओढून काढलें होतें. नीलेवरची त्याची निष्ठा कायम होती. तिला प्रसन्न करण्यासाठीं तो सारखा झटत असे; पण ती शक्य तो त्याला टाळी.

देवव्रताचा तो जीवरक्ष्य ठेवा, ती मोहक तरुणी—ती अतुललावण्य आर्यकन्या—तिचें नांव ऋता होतें. तिच्या रक्षणासाठी त्याला सदैव धनुष्य बांधून तिच्याभोंवतीं भोंवतीं राहावें लागे. तिला बोलण्याचालण्याला, जीवाभावाला त्या पल्लीमध्यें तो एकटाच होता. त्याच्याशिवाय तिला क्षणभरहि राहवत नसे. दस्यूंची भाषा शिकेना, त्यांच्या बायकांतून वागेना, त्यांचें कल्लु संज्ञक मद्य पिईना; झोंपडींत बसून असे, किंवा रानांत हिंडे, फुलेफळें तोडी, बोलली तर देवव्रताशींच बोले, त्याच्याबरोबर जाई. त्यालाच आपल्या लीलांनीं रंजवी, आणि नीलम्—जिच्यासाठीं स्वतः महाबली पल्लीपति अधीर होता, जिच्यासाठीं एका सबंध आर्यकुलाचा संहार झाला, जिच्या लावण्याची सबंध द्रव्वीमंडलांत ख्याति होती—ती नीलम् देवव्रताला एक क्षणभरहि विसंबत नसे. जणुं काय तिचा तो बंदीच होता; आणि त्याच्यावर नजर ठेवली नाहीं तर तो पळून जाईल.

एके दिवशीं सूर्योदयाच्या वेळीं देवव्रत नदीकांठीं भगवान् सूर्यनारायणाला अर्घ्यादि समर्पून संध्यावंदन करीत होता.

त्यानें प्रातःसंध्येचें ध्यान केलें—

**प्रातःसंध्यां बालां बालादित्यमंडलमध्यस्थां रक्तवर्णां रक्ताम्बरां रक्तानुलेपनस्रगाभरणाम्॥** पण त्याच्या समोरच्या पाण्यांत त्याला वेगळेंच प्रतिबिंब दिसूं लागलें. त्याला पाण्यांत दिसूं लागलेली मूर्ति श्यामा, अल्पांबरा, श्वेतपुष्पस्रगाभरणा अशी होती. तिनें हसत येऊन त्याचे डोळे झांकले. जणूं काय माझें ध्यान करूं नको असेंच तिनें सांगितलें. त्यानें वळून पाहिलें तों तिनें आपले ओठ त्याचे ओठांवर ठेवले. अजून उजाडलें

नव्हतें; प्रकाश आणि अंधःकार यांचा संगमच झाला. तिनें आपले बाहू त्याच्या गळ्याभोंवतीं घातले. प्रकाशानें नीलवलयाचें आवरण घेतलें.

" हे काय केलंस ? मी देवकार्य करीत होतों."

" मग हें तरी देवकार्यच आहे. आपण काय करीत होतां ? "

" मी संध्या करीत होतों. "

" संध्या म्हणजे काय ? "

" संध्या म्हणजे--म्हणजे--एकत्र येणं, मिळणं, संगम."

" मग मी तरी तेच केलं."

" तूं माझ्या धर्मकृत्यांत अडथळे करूं नकोस."

" मला आपलीं धर्मकृत्यं शिकवा."

" तुझी जात वेगळी, धर्म वेगळा; देव वेगळे, उपासना वेगळी; तुझं आमचं कसं जुळेल ? "

" तुमच्या जातींत बायकापुरुष नाहींत का ? "

" आहेत."

" तुमच्या धर्मांत, संस्कृतींत, प्रेम करीत नाहींत का ? करतात ना ? "

" होय."

" तुमच्या कुलांत लग्न करीत नाहींत का ? "

त्यानें उत्तर दिलें नाहीं. तिनें त्याचें पुन्हा एकदां चुंबन घेतलें आणि ती पळून गेली.

त्या दिवशीं संध्याकाळीं त्याला आपलें पर्णशय्यास्थान शृंगारलेलें दिसलें. त्याला वाटलें हें त्या नीलम्‌चेंच कार्य आहे. चांदणे पिठासारखें पडलें होतें, पण त्यामुळेंच देवव्रताला झोप येईना. कदाचित् काळाकुट्ट अंधार असता तर त्याला झोप आली असती ! नीलम्‌नें त्याला संकट घातलें होतें.

त्याचें एक मन त्याला म्हणत होतें, 'जर तूं नीलम्‌वर प्रेम करतोस तर तिला सुखी कर.' पण त्याचा उच्चकुलाचा अभिमान म्हणत होता, 'काय, दस्युकन्येशीं विवाह ! अब्रह्मण्यम् ! दुसरें मन म्हणत होतें, 'मग ऋतेची काय वाट होईल ? तिच्या संरक्षणाची जबाबदारी तुझ्या हातून नीट पाळली जाणार नाहीं.' त्याच्या डोळ्यांसमोर नीलम्‌च्या उपकारांचीं चित्रें येऊं लागलीं. ऋतेला घेऊन ती नदी तरून आली कुणासाठीं ? त्या संहारांतून आपलें तिनें संरक्षण केलें कशासाठीं ? अनेक प्रसंगीं ऋतेची अब्रू

तिनें पराक्रमानें दस्यूंच्या हातून वांचविली ती कां ? आतां त्याला जागेपणीं स्वप्नें पडूं लागलीं. नीलम् एका झाडावर चढली असून आपण खालीं उभे आहों. तिन कसलींशीं फळं गोळा केलीं असून तीं ती आपल्याला देत आहे. ती स्वतः अर्धें फळ तोडून खाऊन उरलेलें अर्धें आपल्या तोंडांत घालीत आहे. आणि आपल्याला दस्यूंच्या देवतांची एक फार मनोरंजक कथा सांगत आहे. "एकदां भवदेवानीं भवानीला सोडून दिलें आणि विरक्त होऊन ते तपाला बसले. आमची देवी जातीची द्रव्वीच आहे. तेव्हां तिच्या-साठीं आमचा जो कामदेव, जो मनुष्याला स्त्रियांविषयीं आसक्त बनवितो त्या वनांत जाऊन महादेवांना मोहित करण्याचा प्रयत्न करूं लागला-- आम्ही देवाच्या लिंगाचें पूजन करितों--कामाची बायको रति--वेलाचें पान देवाला आवडतें--त्या स्वप्नांत त्याला झोप लागूं लागली. इतक्यांत कुणाचा तरी मऊ स्पर्श त्याच्या शरिराला झाला; त्यानें त्याला अतिशय सुख झालें. खास ती नीलम् असली पाहिजे. त्या सौख्याचा कदाचित् भंग होईल म्हणून त्यानें डोळे उघडले नाहींत. त्यानें आपले बाहु पसरले आणि तिला हृदयाशीं घट्ट धरणार--इतक्यांत ती त्याच्या कानांशीं लागून म्हणाली--"उपोप मे परामृश न मे दभ्राणि मन्मथा."

देवव्रत हे शब्द ऐकून चमकला. खास ती नीलम् नव्हती. आर्यांची भाषा बोलणारें त्या ठिकाणीं ऋतेशिवाय दुसरें कोण होतें ? त्यानें डोळे उघडून पाहिलें तों ऋताच त्याला बिलगून होती. तो चटकन् उठून बसला आणि म्हणाला, "हें काय ऋते ?"

"मला आतां राहवत नाहीं."

"म्हणतेस तरी काय तूं ?"

"माझा जायात्वानं स्वीकार कर."

"शान्त हो, तूं माझी बहीण आहेस; आपण एका गोत्रांतले आहों."

"मग आतां मी काय करूं ?"

देवव्रताला या प्रश्नानें सुन्न करून सोडलें. तिनें काय करावें ? ऋतेनें काय करावें ? एखाद्या दस्यूशीं तिनें लग्न करावें ही कल्पनासुद्धां त्याच्या आर्यमनाला सहन होईना. स्वतः दस्युकन्येचा स्वीकार करण्याच्या कल्पने-हून ती उग्र होती. तरी पण त्यानें म्हटलें,--

"एखाद्या दस्यु--"

तिनें अत्यंत तिरस्कारानें म्हटलें, " एखादा पशु—"

देवव्रताला काय करावें सुचेना. तो म्हणाला, " बहिणभावांचा संबंध ! शीः शी—"

" सृष्टीच्या आधीं नाहीं का बहीणभावांचा संबंध झाला ? यमीनें नाहीं का यमाचं आराधन केलं ? नाहीं तर मला मारून टाक ! " ती म्हणाली.

जिवापलीकडे जिचें जतन केलें तिचें आतां काय करावें हें त्याला समजेना. " तूं इथं नीज, मी पुन्हा परत येतों." असें सांगून तो निघून गेला. उरलेली रात्र त्यानें कशी बशी घालविली. सकाळीं त्याला संध्यावंदन सुचलें नाहीं. नीलेचें काय करावें ? ऋतेचें काय करावें ? का स्वतःचें कांहीं तरी बरेंवाईट करावें ? मग ऋतेचें काय होईल ? नीलम् काय करील ? स्वसेशीं विवाह करावा कीं अनार्यापाणिग्रहण करावें ? का स्त्रीहत्या, आत्महत्या आणि वंशक्षयाला कारण व्हावें ? काय करावें ? काय करावें—— ?

त्यानें नदीतीरीं जाऊन स्नान केलें, नित्यकर्म संपवून वरुणाचें आराधन केलें.

" जिथें-तिथें, हे वरुणा, तुझे दूत तुझे नियम लोकांकडून पाळविण्यासाठीं लोकीं लोकीं फिरत असतात."

" मला सोडूं नको, नाहीं तर तुझ्या आज्ञा न मानल्याबद्दल जे लोकांचा नाश करतात त्यांच्या रागाला बळी जाईन."

" माझें मन दुष्कृतीपासून वळव, जसा रवि आपल्या अश्वाला वळवितो; माझ्या वंशाचें रक्षण कर, आणि माझ्या व्रताचें रक्षण कर. तूं जसा शासन करणारा आहेस तसा क्षमा करणाराहि आहेस."

" तूं जर आपल्या भक्तांना दुर्धर डोंगरांतून मार्ग दाखवितोस तर मला या संकटांतून कां मार्ग दाखवीत नाहींस ?"

वरुणानें त्याची प्रार्थना ऐकली कीं नाहीं कुणास ठाऊक, पण कांहीं दिवस त्याला व ऋतेला एकमेकांपुढें लाजिरवाणे असे गेले. ऋतेची अधीरता सारखी वाढत गेली, आणि ती तिच्या वागणुकींत आणि चेहऱ्यावर प्रतीत होऊं लागली. देवव्रत आतां आपला झाला म्हणून जितकी ती दस्युकुमारी नीलम् निश्चिंत होती तितकीच जास्त अशान्तता त्याच्या मनाशीं वाढत गेली होती. आतां ती पल्लीपतीला टाळीनाशी झाली. केव्हां तरी त्याला हें गोड सत्य सांगून टाकण्याचें तिनें ठरवलें.

एके दिवशीं संध्याकाळीं नदीच्या कांठच्या वेळूच्या बेटाच्या बाजूला देवव्रत आपलें धनुष्य घेऊन निभ्रान्त फिरत होता. त्या बाजूला कोणी सहसा येत नसे. त्यामुळें तो स्वस्थपणें आपल्या भवितव्यासंबंधीं विचार करीत होता आणि संध्याकाळ होत होती. त्या वेळूच्या बेटांत चाहूल लागली म्हणून त्यानें आपलें शस्त्र सावरलें. आणि थोडा पुढें होऊन काय श्वापद आहे हें पाहूं लागला. तों त्याला पल्लीपति व नीलम् दोघे आपापसांत मोठ्यानें बोलतांना दिसले. चोरपावलीं जवळ जाऊन तो ऐकूं लागला.

" आतां यापुढं मी जास्त वाट पाहणार नाहीं."

" पाहूंच नको, मीं दुसऱ्याला वरलं आहे."

" तूं माझ्यावर प्रेम केलं नाहींस काय ? "

" मुळींच नाहीं. मी तुला आधींपासून सांगत आलें आहे. तूं उगीच कष्टलास ! "

" असा तो आहे तरी कोण ? "

" सांगत नाहीं."

" तुला सांगितलं पाहिजे."

" ज्या आर्याला मीं तुझ्या हातून वांचाविलं तोच."

" तो वैरी तो तस्कर ! त्याच्यांत तूं काय पाहिलंस ? "

" जें तुमच्यांत नाहीं ते. पुण्य आणि प्रेम ! "

" मग मी प्रेम करीत नाहीं काय ? "

" पुण्यमय प्रेम ! "

पल्लीपति लाल झाला. तो म्हणाला,

" मी तें कांहीं जाणीत नाहीं. मला तूं हवी आहेस, आणि आतां या क्षणीं–" असें म्हणून त्यानें एक हिसडा देऊन तिचें वस्त्र फाडून दूर फेकून दिलें, आणि तिला धरणार इतक्यांत त्याच्या पाठींत एक बाण येऊन घुसला व तो उताणा पडला. तो बाण त्याच्या छातींतून बाहेर आला.

ती दस्युकन्या नीलम् घाबरली, गोंधळली, लाजली आणि आनंदित झाली. पल्लीपतीनें तिचें नांव घेत तिच्याकडे पाहत तिचीच अभिलाषा धरून प्राण सोडला. देवव्रत पुढें येतांच तिनें चटकन् तें फाटकें वल्कल स्वतःभोंवतीं धरलें. बाण मृताच्या छातींतून उपसला, आणि त्याला मागें येण्यास सांगून तिथून पाय काढला.

झोपडींत येऊन पोंहोंचेपर्यंत रात्र झाली होती. घरांत येतांच त्याच्या पायाला विळखा घालून ती म्हणाली,

" जा, कुठं तरी दूर जा; रात्रींतल्या रात्रींत इथून दुसरीकडे जा. पल्लीपतीला बाणानं मृत्यु आलेला पाहतांच दस्युसंघ तुम्हांला जिवंत ठेवणार नाहीं."

" तुला सोडून कुठं आणि कसा जाऊं ? "

" इतकं माझं भाग्य आहे का ? "

" पण तूं आपल्या आप्तेष्टांना सोडून कशी येशील ? "

" मला इथं कोण आहे ! एकटी आई होती तीहि मरून गेली."

" तूं आमच्यासाठीं वनवासाचे कष्ट सोसणार ? "

" मला वनाची फार माहिती आहे. मी आपल्याला सुरक्षित दूर नेऊं शकेन."

" ऋतेचं कसं होणार ? तिला कष्ट होतील. आणि.........."

त्याला कसली आठवण झाली. तो एकदम विचारांत कां पडला हें तिला कळेना. तिनें जरा धीट होऊन विचारलें,

" मग माझा स्वीकार केला ना ? "

तिला उत्तर मिळालें नाहीं; पण काय हवें होतें तें मिळालें. मध्यरात्रीला त्या तिघांनीं तें मदनपल्लीचें वसतिस्थान सोडलें. ताऱ्यांच्या प्रकाशांत त्यांना वाट दिसली आणि वनांतील देवतांनीं त्यांचें रक्षण केलें.

थोडया वेळानें चंद्र उगवला. एकाएकीं आपण अपरात्रीं कुठें आणि कां जातों हें ऋतेला कळलें नाहीं. तिच्या पायांना नीलेनें वनस्पतींचीं खोपटें बांधलीं होतीं त्यामुळें त्यांना इजा झाली नाहीं. पण चालण्यामुळें तिला शीण आला. झाडीतून उघडयावर येईपर्यंत देवव्रताला तिला उचलून घ्यावी लागली. ऋतेला त्या वेळीं किती तरी बरें वाटलें. भीतीमुळें जणुं काय ती त्याला अगदीं चिलगली. पण त्याला कसेंसेंच वाटलें. नीलम् त्याच्याशेजारीं चालत होती. तिला काय वाटलें हें पाहणारें त्या गर्द झाडींत कोण होतें ?

त्या रात्रीं त्या उघडया मैदानावर त्यांनीं वसति केली. दुसरे दिवशीं सबंध त्यांना चालावें लागलें. संध्याकाळपर्यंत त्या वनाच्या सीमाप्रान्तावर

त्यांना पोंचणें भाग होतें. वाटेंत त्यांना एकदां पल्लीपतीची हत्या करणाऱ्या आर्यनष्टाच्या शोधांत निघालेले लोक भेटलेच; पण नीलेनें एक अगदींच आडवाट धरून त्यांना चकविलें. एक भरलेली नदी तरून जायचें होतें. तर ऋतेला एका ओंडक्याला बांधून नीलम्‌नें पैलतीरीं नेलें. संध्याकाळीं तें वन ओलांडून ते विंध्यगिरीच्या दक्षिण पायथ्याला आले. नीलम्‌नें एक दीर्घ निःश्वास सोडला व म्हटलें, "आपण आतां द्रर्व्वींच्या हातांतून सुटलों. पण यापुढं मला माहिती नाहीं." त्या रात्रीं तेथें विश्रान्ति झाली. दुसरे दिवशीं उजाडतांच देवव्रताला आपण पूर्वी आर्यकुलाबरोबर इथून गेल्याचे आठवलें, व त्या अनुरोधानें तो त्या दोघींसह डोंगर चढूं लागला. वन्य फळेंमुळें भक्षण करावीं, झाडाखालीं रहावें, हळुहळू मार्ग आक्रमावा असें चाललें होते.

अशीच एक खिंड चढून ते वर आले होते. सूर्य अस्ताच्या बाजूला फार कलला असल्यामुळें पुढें जाणें शक्य नव्हतें. एका जलाशयाच्या शेजारीं त्यांनीं राहण्याचें ठरविलें. नीलम् जवळपासचीं फळें गोळा करण्यास गेली. देवव्रत तिथेंच बसून राहिला. ऋता जलाशयावर पाणी पिण्यास गेली.

चढण्याच्या श्रमानें तिला फार थकवा आला होता. पाणी पिऊन आल्यावर ती त्याच्याजवळ आली आणि म्हणाली "पल्लीपतीला कशासाठीं मारलं ?"

देवव्रतानें उत्तर दिलें नाहीं. ती तिथेंच आडवी झाली व आळोके पिळोके देऊं लागली.

"नीलम् किती तरी चांगली आहे, नाहीं ? आपल्यासाठीं ती किती श्रम करते ?"

देवव्रतानें उत्तर दिलें नाहीं.

"आतां तिला आपली भाषा येऊं लागली. मला ती म्हणत होती, ऋते, तूं किती गोड आहेस." देवव्रत खळखळणाऱ्या ओढ्याच्या पाण्यावर उन्हानें जी चमक उत्पन्न केली होती तिकडे पाहत होता.

"ती मला फार आवडते."

देवव्रतानें एकदां तिच्याकडे वळून पाहिलें. ती त्याच्या जवळ सरकून म्हणाली, "मी तुझ्या अंकावर डोकें ठेवून निजूं का ?"

त्यानें कांहीं उत्तर दिलें नाहीं; पण तिनें जेव्हां त्याच्या अंकावर

डोकें ठेवलें तेव्हां त्यानें तिच्या केसांवरून हात फिरवला. थोडया वेळांत तिला गाढ झोंप लागली.

अस्ताला जाणाऱ्या सूर्याचे किरण तिच्या डोळयांवर आले म्हणून ती जागी झाली. तिच्या कानावर कांहीं शब्द आले; पण त्यांचा तिला अर्थ समजला नाहीं. तिनें किंचित् मान वळवली, डोळे उघडले आणि पाहिलें, कीं नीलम् धांवत येऊन त्याच्या दुसऱ्या अंकावर बसली. तिनें कांहीं फळें त्याच्या तोंडांत घातलीं व तें बंद केलें. " हीं तुसरीचीं फळं बरं का, मला फार आवडतात तीं!"

तो तिच्या गालावर कुजबुजला,

" ऋता माझ्याजवळ निजली आहे ना?"

त्या दोघांचीं मुखें आपल्याकडे वळत आहेत असें पाहून ऋतेनें डोळे मिटून घेतले. देवव्रतानें तिचें डोकें हलकेंच उचलून चर्माच्या घडीवर ठेवलें. नीलम्नें तिच्या गालांवर हात फिरवून म्हटलें,

" किती नाजुक आणि सुंदर आहे नाहीं, ऋता? हिच्या जवळ नेहमीं रहावंसं वाटतं."

यानंतर तीं दुसरीकडे कुठें निघून गेलीं. ऋतेनें त्यांना हातांत हात घालून जातांना पाहिलें. अस्ताला जाणाऱ्या सूर्यानें तिच्या गालांवर मोत्यांचे सर पाहिले.

दुसरे दिवशीं सकाळीं एक कडा चढून जायचा होता. ऋता आज मोठ्या उत्साहानें चढत होती. एकदां ती नीलम्चा हात धरी, एकदां देवव्रताचा धरी. एखादे वेळीं दोघांचेहि हात धरी. " अवघड वाट असली म्हणजे कोणाचा तरी आधार लागतो, नाहीं?" ती म्हणाली.

" जपून चाला; खालीं फार भयंकर दरी आहे." नीलम् म्हणाली.

ऋतेनें वांकून पाहिलें व म्हटलें, " अग बाई ग!" थोडा वेळ चालल्या-नंतर म्हणाली, " मला ही भयंकर दरी पाहून घेरी येत आहे. तुम्ही दोघं मिळून मला सावरा."

त्या दोघांनीं एकमेकांच्या हातांत हात घातले आणि त्यावर रेलून दोघांच्या खांद्यांवर हात ठेवून ती जात होती. एका अति अवघड स्थळीं तीं आलीं तोंच नीलम्च्या हाताला हिसका बसला. त्यासरशीं ती देवव्रताच्या

वक्षःस्थळावर जाऊन पडली आणि त्यांच्या कानांवर वाणी आली, "तुम्ही उभयतांनीं सुखी व्हावं यासाठीं ऋतेचं जीवित होतं."

देवव्रत व नीलम् स्तिमित होऊन पाहूं लागलीं तों त्या दरींतून वाहणाऱ्या निर्झरांत कांहीं पडल्याचा आवाज सातवार प्रतिध्वनित झाला! पुढें त्यांचें काय झाले ही हकीकत त्या वनाइतकी, त्या रात्रीइतकी, आणि त्या कालाइतकीच अज्ञात आहे.



# दिलरुबा : : ३५

दादा ज्या दिवशीं आले त्या दिवसाची मला चांगली आठवण आहे. सूर्य नुकताच कलला होता. मी निजून उठलों होतों, तरी मन निद्रेच्या तंद्रींतून बाहेर पडलें नव्हतें; आणि अर्धवट पडलेलें स्वप्न मी पुन्हा उघडया डोळयांनीं पाहत होतों. इतक्यांत ताई पुढें येऊन म्हणाली, "भाऊराव, दादा आले!" मी दचकून उभा राहिलों; व तिच्याकडे न बघतां घाईघाईनें वाडयाच्या पायऱ्या उतरून टांग्याजवळ गेलो. दादा टांग्यांतच होते. त्यांच्याबरोबरचा मनुष्य सामान काढीत होता. त्यानें वळकटी, पुस्तकें, पाण्याचा तांब्या उचलला. दादांच्या खांद्याला लागून उभा असलेला, गवसणींत गुंडाळलेला दिलरुबा तेवढा टांग्यांत राहिला होता. तो मी उचलणार तोंच दादा म्हणाले, 'राहूं दे, मीच घेईन तो.' मी त्यांना हात दिला व ते टांग्यांतून खालीं उतरले. त्यांनीं एका हातांत दिलरुबा घेतला व दुसऱ्या हातांतील काठीनें वाट चाचपीत ते हळुहळू घरांत आले.

त्याच दिवशीं मीं त्यांना प्रथम पाहिलें. ते आमच्या बाबांचे परम स्नेही. त्यांच्या बहुश्रुतपणाची ख्याति मीं बाबांच्या तोंडून पुष्कळ ऐकली होती. बाबा वेदान्ताचे फार भोक्ते होते. दादांच्या गीतेवरील व्यासंगाची ते अतिशय वाखाणणी करीत; व नेहमीं म्हणत कीं, "देवानें दृष्टि हिरावून नेली तरी दादांची श्रद्धा ढळली नाहीं; आणि तूं पहा, नुसतीं 'मिल'चीं पुस्तकें वाचून झालास कीं नाहीं संशयात्मा!" पण दादांना प्रत्यक्ष पाहण्याचा योग मात्र आजवर आला नव्हता. ते श्रावणाच्या सुमारास आमच्या घरीं

यावयाचे; त्या वेळीं मी पुण्यास असें. यंदा दसरा झाल्यावर येण्याची त्यांची लहर लागली. कॉलेज बंद असल्यामुळें मी घरींच होतों; व म्हणून त्यांना पाहण्याचा योग आला.

त्यांना पहातांच मी क्षणभर स्तब्ध झालों. आपण आंधळे आहों याचें भान त्यांना मुळीं नव्हतेंच. मी नांव सांगतांच ते हसले व म्हणाले, 'अखेर आज भेटीचा योग आला तर; देवाची कृपा !' त्यांच्या श्रान्त मुद्रेवरील संतोषाचें स्मित पाहून मला बरें वाटलें. त्यांची ती भव्य शरीरयष्टि, काळा-सांवळा पण सतेज वर्ण, चिंतेचे कंगोरे पडलेलें उंच कपाळ व डोक्याला बांधलेला शुभ्र फेटा बघून माझें मन किंचित् हरपलें. त्यांच्या तोंडावर देवीचे वण खोल व दाट पसरले होते; आणि दोनहि डोळ्यांच्या अगदीं खांचा झाल्या होत्या. आटून मोकळें पडलेले सुंदर सरोवर जसें दिसावें, तसे त्यांचे ते विशाळ डोळे दिसत होते. त्या डोळ्यांकडे नजर जातांच मी अगदीं थिजून गेलों. माझा सगळा आनंद नष्ट झाला व मला त्यांची दया आली.

पण त्यांचे सर्व व्यवहार संथपणानें चालले होते. जणुं कांहीं त्यांच्यांत व इतरांत फरक कसा तो नव्हताच! सूर्य अस्तास गेल्याचे समजतांच त्यांनीं विहिरीवर जाऊन पाय धुतले व संध्या केली, आणि स्तोत्रें गुणगुणत शिष्याच्या मदतीनें ते माडीवर गेले. जेवणाची वेळ होतांच बाबा म्हणाले, 'दादांना खालीं बोलाव रे.' मी अंगणांत गेलों व माडीकडे नजर फेकली, तिथें पूर्ण अंधार होता. मला वाटलें दादा तिथें नसावेत, खालीं बागेंत असतील म्हणून मी तिकडे गेलों; पण बागेंतहि ते नव्हते. इतक्यांत माझी चाहूल ऐकून बाबा म्हणाले, 'अरे, माडीवर आहेत; लवकर हांक मार!' मी मुकाट्यानें अंगणांत जाऊन हांक मारली. ते खरोखर वर होतो त्यांना गॅलरींत आलेले पाहतांच मीं मनांत म्हटलें, 'खरेंच, यांना दिव्याची काय जरूर?' आणि मला त्यांच्या आंधळेपणाची एकदम जाणीव झाली.

* * *

त्या रात्रीं मला झोप येईना. माझें मन आधींच अति तल्लख; अंथरुणा-वर पडतांक्षणींच झोप आली, असें सहसा घडत नसे. नाहीं नाहीं ते विचार व नाना तऱ्हेच्या आठवणी अंथरुणावर पडल्याबरोबर माझ्या मनाला घेरून टाकीत. दिवसा कामांत असल्यामुळें अगर मनाला रिकामपण नसल्यामुळें जे विचार, ज्या कल्पना कधीं सुचावयाच्या नाहींत त्यांची बिछान्यावर अंग

टाकतांच अगदीं गर्दी उडे; व भ्रमिष्टासारखी माझ्या मनाची स्थिति होई. भोंवऱ्यांत सांपडलेल्या मनुष्याला जसें गिरक्या खातां खातां थकून मरण यावें, तसें माझें मन विचार करून अगदीं टेंकीला आलें म्हणजे डोळा लागे. निजून उठल्यावर मी अगदीं गळून जात असें. डोळ्यांवर अर्धवट झांपड घालून, निद्रा ही मोहिनीविद्येंत पटाईत असलेल्या चेटकिणीप्रमाणें माझ्या मनाला कल्पनेच्या व स्मृतीच्या प्रदेशांतून दूर दूर हिंडवून आणीत असे; व मग सकाळीं अंथरुणांतून उठण्याचेंहि माझ्या जिवावर येई.

त्यांतून त्या दिवशीं तर मी अगदीं अकल्पित पाहिलेलें. आजपर्यंत रस्त्यांतून जातांना आंधळीं माणसे कांहीं थोडीं दृष्टीस पडलीं नव्हतीं. पण त्यांना पाहून मी इतका विचारांत कधींच पडलों नाहीं. आंधळेपण प्रत्यक्ष समोर उभें राहिलेलें बघण्याचा प्रसंग त्याच दिवशीं पहिल्यांदा आला. दुःख पाहिलें म्हणजे त्याला चुकविण्याकरितां तोंड फिरविणें, हा माझा स्वभावच बनला होता. पण आज जगांतील मोठ्यांतलें मोठें दुःख माझ्या-पुढें साक्षात् येऊन उभें राहिलें. आणि आतां त्याला चुकविणेंहि शक्य नव्हतें.

घरांतील सगळीं माणसें निजलीं होतीं. माझ्या खोलीला लागून असलेल्या दिवाणखान्यांतच दादा निजले होते. त्यांचा श्वासोच्छ्वास मधूनमधून कानां-वर पडे. बागेंतील फुलांचा सुवास वाऱ्याच्या झुळुकेबरोबर खिडकींतून आंत येत होता. त्या दिवशीं अष्टमी होती; खिडकींतून आंत आलेले चंद्रकिरण माझ्या अंगावर पडले होते, डोळ्यांवर पडलेले चंद्राचे किरण चुकवावे म्हणून मी वारंवार कपाळावर हात ठेवीत होतों. त्या चंद्रकिरणांतून वर आकाशाकडे दृष्टि लावली म्हणजे मला वाटे, 'दादांना हा चंद्र उगवला काय आणि मावळला काय, सारखाच!' त्या चंद्राकडे बघतांबघतां मला आमच्या राजारामाची आठवण झाली. तो असाच गॅलरींत उघडयावर निजे. आपण निजलों असतां चंद्राचे किरण आपल्या अंगावर सारखे पडलेले असावेत, वाऱ्याच्या मंद झुळुका हळूच वाहत असाव्यात, फुलांचा सुवास सभोंवतीं दरवळत असावा, आणि गाण्याचीहि लकेर कानांवर पडावी याची त्याला फार आवड; व म्हणून, थंडी किंवा पाऊस नसला कीं तो बेलाशक उघडयावर निजावयाचा. बाबा नेहमीं म्हणत, 'अरे, हें वारें

तुला बाधेल ना ? ' पण त्यानें तें कधींच मनावर घेऊं नये. 'चांदण्यांत निजून मरण यावें', असें तो म्हणे; आणि अखेर चांदणेंच त्याला भोंवलें.

संस्कृत काव्यें वाचून वाचून तो अगदीं वेडा झाला होता. कालिदासाच्या श्लोकांची संगति लावून त्यांतून नवे नवे अर्थ हुडकण्याची त्याला फार हौस. त्याचें ते वेड पाहून बाबा म्हणावयाचे, 'या राजाला दादांच्याजवळ ठेवला पाहिजे. कालिदास त्यांना मुखोद्गत आहे. दादा मेघदूताचे असे सरस अर्थ लावतात, कीं ते ऐकून त्यांच्या कल्पनेचें नवल वाटतें. पण ज्यानें सौंदर्य कधींहि प्रत्यक्ष पाहिलेलें नाहीं त्याला कालिदास कसा कळावा, अशी शंका मला नेहमीं येई. कलावंतांचा राजा, सौंदर्याचा कलानिधि जो कालिदास त्याच्या उपमा वाचून, ज्यानें सृष्टि कधीं डोळे भरून पाहिलेली नाहीं, ज्याला सौंदर्याचा साक्षात्कार कधीं घडलेला नाहीं त्याला कसला आनंद होणार ? कालिदासाच्या सुंदर शब्दांशीं झोंबी खेळून, कोमल कल्पनांचा कीस काढून दादा कांहीं तरी अर्थ बसवीत असतील. सौंदर्याची प्रतीति त्यांच्यासारख्या दृष्टिहीनास कशी व्हावी ? त्यांचें जीवित नीरस, निस्सार असलें पाहिजे. नाहीं तर गीतेंतील क्षराक्षराच्या शुष्क तर्कटांत ते कशाला रमते ? मला त्यांची कींव आली; व त्यांच्या दुर्दैवाचा विचार करतांकरतांच माझा डोळा लागला.

* * *

त्या रात्रीं मला स्वस्थ झोंप तर मुळींच आली नाहीं. पहांटेचा गार वारा खिडकींतून आंत शिरतांच डोकें थंड होऊन जो कांहीं विसांवा मनाला मिळाला असेल तेवढाच. त्या झोंपेच्या गुंगींत मी असतांना अत्यंत मधुर असे सूर माझ्या कानांत घुसले; व मी हळुहळू जागा झालों. ते सूर कोठून येत आहेत हें मला प्रथम कळेना. खोलीचें दार अर्धवट लोटलेलें होतें; त्यांतून सूर आंत येतात कीं खिडकींतुन येतात, कांहीं समजेना. उत्सुकता तर वाढत होती, पण उठून बघावें असेंहि वाटेना. अंथरुणावर पडल्या पडल्याच डोळे मिटून पण सावध मनानें ते सूर मी ऐकत होतों. त्यांत अशी कांहीं जादू होती कीं, डोळ्यांवर गुंगी असतांहि मला झोंप येईना. शेवटीं मी धडपडत उठलों, व बाहेर जाण्याकरितां दार उघडलें, तों समोरच दादा दिलरुबा वाजवीत बसलेले माझ्या दृष्टीस पडले. उषःकालच्या अंधुक

उजेडांत त्यांची दिलरुबा मांडीवर घेऊन भूपाळ्या आळवीत बसलेली ती भव्य मूर्ति पहातांच मला अचंबा वाटला.

मला खालीं जाण्याचें भान उरलें नाहीं. मी भिंतीला टेकून तिथेंच उभा राहिलों. दादा हातांतील गज दिलरुब्याच्या तारांवरून सफाईनें फिरवीत होते; व त्यांतून अत्यंत सुरेल असें संगीत बाहेर पडत होतें. मधून मधून त्यांना स्वतःलाहि गाण्याची लहर येई. आणि जे पद ते दिलरुब्यावर वाजवीत, तेच थोडया खालच्या आवाजांत ते गुणगुणत. त्यांचा आवाज गोड नव्हता, पण त्यांत एक प्रकारची झील होती. शिवाय, ते तल्लीन होऊन म्हणत असल्यामुळें अंतःकरणांतील करुणरसाचा ओलावा त्यांत उतरे; व तें गुणगुणणेहि मोठें गोड वाटे.

पुरें उजाडतांच, दादांनीं गवसणी चढवून दिलरुबा आपल्या डोक्या-वर असलेल्या खुंटीला लटकाविला. त्या क्षणापर्यंत आपल्या शेजारीं कुणी असेल अशी कल्पनाहि त्यांना शिवली नव्हती. त्यांचें वाजविणें थांबतांच त्या नादसमाधींतून मी जागा झालों; व कांहीं तरी बोलावयाचें म्हणून म्हटलें, 'दादा, खालीं चला; वेळ झाली.' त्यावर ते म्हणाले, 'काय रे, तूं इतका वेळ इथेंच होतास तर! बोलला नाहींस कुठें? बराच नादी दिसतोस'! मीं त्यांना उत्तर दिलें, 'दादा, तुम्ही फारच उत्तम वाजवतां, त्यावर ते किंचित् हसून म्हणाले, 'छे रे, उगीच जिवाला कांहीं तरी करमणूक.' इतकें बोलून ते उठले, व जिना उतरणार तोंच आठवण केल्यासारखें करून म्हणाले, 'काय रे' आज आभाळ आहे वाटतें? ऊन पडलेलें दिसत नाहीं.' मीं त्यांना 'होय' म्हणून लगेच उत्तर दिलें. पण ऊन न पडलेलें पाहून मला नवल वाटल्याशिवाय राहिलें नाहीं.

आम्ही खालीं आलों. बाबा नित्याप्रमाणें बागेंत फिरत होते. मी तोंड धुऊन घरांत जातों तोंच पुढें येऊन ते म्हणाले, " हीं बघ गुलबाशीचीं फुलें. एकाच झाडावर फुललेलीं, पण प्रत्येकाचा रंग वेगवेगळा." त्यांनीं फुलझाडांवर रंगाचे प्रयोग चालविलेले होते, त्यामुळें ते कौतुकानें स्वतः फुलें पाहत व इतरांनाहि दाखवीत होते. इतक्यांत दादा आले. तेव्हां त्यांना बेसावधपणानें बाबा म्हणाले, 'हीं पहा फुलें, दादा! झाडांनासुद्धां वर्णसंकर भोंवतो.' मला जिरल्यासारखें झालें. पण दादांनीं त्यावर अगदीं सहज,

'अहो ! हा वर्णसंकर फुलांचेंमुद्धां नैसर्गिक सौंदर्य नष्ट करतो,' असें उत्तर हसत हसत दिलें. जणुं कांहीं त्यांना तीं फुलें दिसतच होतीं.

* * *

मीं तो सबंध दिवस दादांच्या सहवासांत घालविला. त्यांनाहि बोलावयाला फार हवें असे. त्यांतून संस्कृत कवितेविषयीं ते एकदां बोलूं लागले, कीं त्याला इतके फाटे फुटत कीं मूळ त्यांत बेपत्ता होऊन जाई. करुणरस त्यांना विशेष प्रिय. त्याच्याविषयी ते बोलूं लागले, म्हणजे चंद्रावरून झिरझिरीत ढग जसा झटकन निघून जावा, तशी त्यांच्या समाधानी चर्येवरून विषादाची छटा उमटून गेली, असा पुष्कळ वेळां भास होई. त्यांचें सर्वच बोलणें मला पटे असें नव्हे; पण तें मोडून अगर खोडून काढण्याच्या फंदांत मात्र मी मुळींच पडलों नाहीं. रात्रीं त्यांना बागेंत नेऊन, आपल्याला आवडणारीं कांहीं पदे त्यांच्याकडून वाजवून घ्यावयाचीं, असें मीं ठरविलें होते.

जेवण झाल्यावर मीं त्यांना हळूच म्हटलें, 'दादा, बागेंत चलतां का ? आज चांदणें कसें सुंदर पडलें आहे.' 'चल ! पण दिलरुबा आणला पाहिजे. तूं आणशील का नीट ?' असें त्यांनीं विचारलें. मीं लगेच जाऊन दिलरुबा आणला व आम्ही बागेंत गेलों. बाकावर बसल्याबरोबर दादांनीं दिलरुबा गवसणींतून बाहेर काढला, व खुंट्या पिळून तारांवर हात फिरवावयास सुरुवात केली. चंद्र डोक्यावर आला होता. आकाश अगदीं निरभ्र असल्यामुळें वाऱ्याच्या झुळुकाहि मधूनमधून येत होत्या. झाडाच्या पानांतून आमच्या अंगावर चांदण्याचे चिमुकले कवडसे पडले होते. रात्रीचें तें उज्ज्वल व गंभीर सौंदर्य पहावयाला दादांना डोळे नाहींत हें मनांत येऊन मला वाईट वाटलें; आणि मी त्यांना तसे बोलून दाखविणार, तोंच ते मला म्हणाले, ' अशा चांदण्यांत गाणें-बजावणें करण्यांत खरी मजा आहे. बोल, भाऊ , तुला काय हवें तें पद मी वाजवून दाखवितों ! '

ते त्यांचे उद्गार कानांवर पडतांच मी थक्क झालों; व त्यांच्या चेहऱ्याकडे निरखून पाहिलें. देवीच्या वणांनीं डागळलेल्या व वार्धक्यानें किंचित् सुरकुतलेल्या त्या उदास मुद्रेवर आनंदाचें सौम्य स्मित झळकत होतें. त्यांचीं बोटें दिलरुब्याच्या तारांवरून फिरत होतीं; त्यांनीं खालचा ओठ किंचित् दाबून धरला होता; व दोन्हीहि डोळे सारखे थरथरत होते. त्यांना

अतिशय सुख, अनिर्वचनीय आनंद झालेला दिसत होता. त्यांच्या डोळ्यांची ती धडपड पाहून मला मोठें नवल वाटलें. कोणताहि भाव व्यक्त करण्याची शक्ति त्या डोळ्यांत उरली नव्हती. तरीहि, नुकत्याच मारलेल्या सशाच्या, जोरानें उडणाऱ्या काळजाप्रमाणें, किंवा जिव्हारीं जखम झाल्यावरहि उडण्याच्या ईर्षेनें भुईवर पंख आपटणाऱ्या पक्ष्याप्रमाणें त्या डोळ्यांची उघडझाप सारखी चालू होती. अत्यंत खोल अशा विहिरींतील प्रतिबिंब पाहून मन जसें भयचकित व्हावें, तसेंच आनंदानें वारंवार स्फुरणारे त्यांचे ते भयाण डोळे पाहून मला झालें.

त्यांना कोणतें पद वाजवावयास सांगावें, कांहीं समजेना. गाण्याचें ज्ञान तर मला मुळींच नव्हतें. पण गंधर्वाचीं पदें मला फार आवडत, व म्हणून 'गंधर्वांचें एखादें पद वाजवितां का ?' असें मीं त्यांना हलकेंच विचारलें. पण पुन्हा लगेच माझ्या मनांत विचार आला, यांनीं कशाला गंधर्वांचीं पदें ऐकलीं असतील ? या भ्रमांत मी होतों, तोंच दादा हंसत हंसत म्हणाले, 'अरे ! एखादी चीज, एखादा राग वाजवायला सांगायचा सोडून तूं हें गंधर्वांचें नाटकी गाणें कुठून काढलेंस ? तुम्हां अलीकडच्या विद्यार्थ्यांना गंधर्वांशिवाय कुणी दुसरा गवई दिसतच नाहीं का रे ?' हे त्यांचे उद्गार ऐकून मी थोडा वरमून म्हणालों, 'दादा, तसें नव्हे. मीं आपलें सहज म्हटलें. तुम्हांला कुठून गंधर्वांचें पद ऐकण्याचा प्रसंग येणार ? तुम्ही वाजवा तुम्हांला वाटेल तें.' त्यावर लगेच ते उद्गारले, 'मींहि गंधर्वांचीं पुष्कळ नाटकें पाहिलीं आहेत. तूं असें समजूं नकोस, कीं त्याचीं पदें मला वाजवितां येणार नाहींत. मग पहाच तर आतां. हं, कोणतें वाजवूं ?'

हें उत्तर ऐकून मी अगदीं खजील झालों. त्यांचा आंधळेपणा कशांत आहे हेंच मला समजेना. पण मुकाट्याने मन आवरून मीं त्यांना 'मधुमधुरा तव गिरा' हें पद वाजवावयास सांगितलें. मला तें पद अतिशय आवडे; व तें वाजवावयास सांगतांच दादाहि म्हणाले, 'फार छान पद निवडलेंस बुवा !' लगेच त्यांनीं तारांवरून गज फिरवावयास सुरवात केली. आतां चंद्र किंचित् कलला होता. त्याचे किरण दिलरुब्याच्या तारांवर पडून त्या चमकत होत्या. दादांच्या हातांतील गज त्यांवरून फिरतांच, वल्हें मारतांच सळसळून उठणाऱ्या पाण्याच्या लाटांवर चांदणें जसें चमकावें, तसा भास होई. सरोवराच्या संथ पाण्यावरून ज्याप्रमाणें वाऱ्याच्या मंद झुळुका वहाऱ्या

आणि अगदीं मृदु तरंग त्यावर जलदीनें उठावे, त्याप्रमाणें त्यांच्या हातांतील गज त्या तारांवरून चपळाईनें फिरे आणि नादाचे तरंग उचंबळून येत. तारांच्या कंपाबरोबर त्यांचे ओठ कांपत व डोळेहि सारखे थरथरत. जणुं कांहीं, बोलून दाखवितां येणें अशक्य असे आपल्या अंतःकरणांतील गूढ भाव त्या तारांच्या कंपनांतून ते प्रकट करीत होते. सौंदर्याची प्रतीति जशी त्यांना दृष्टिशिवाय घडे, तसें मनांतील भावहि ते शब्दावांचून व्यक्त करतात, असे मला वाटलें. तें पद संपतांच त्यांनीं 'उगिच कां कान्ता' हें पद वाजविलें; आणि मग हिंदुस्थानी चिजा वाजवावयास आरंभ केला. त्या चिजा मला मुळींच समजत नसत; पण त्यांचे सूर मोठे मोहक वाटत. त्यांतून दादांचें वाजविणें इतकें लपेटदार, सुरेल व सूक्ष्म होतें कीं, अर्थ न कळतांहि माझें मन व्याकुळ होई. कोणत्या फुलाचा वास आहे हे माहीत नसलें तरी मन सुवासाला भुलतें, तसेंच गाण्याच्या लकेरीचेंहि आहे. पण नुसत्या नादाला— मानवी कंठांतून निघणाऱ्या आलापांना नव्हे— तारांच्या कंपनामुळें उद्भूत होणाऱ्या स्वरलहरींना मन भुलणें, हा अनुभव मला आजवर आला नव्हता. अर्थ न कळतांहि हरिण कसा नादाला लोभावतो हें मला त्या दिवशीं समजलें.

दादांची या वेळीं अगदीं समाधि लागली होती. ते कोणता राग वाजवीत होते कोण जाणे, पण त्यांनीं आपला ओठ घट्ट दाबून धरला होता; त्यांचा श्वास जोरानें येत होता; आणि डोळे अतिशय थरथरत होते. ते भरून आले आहेत, असाहि मला भास झाला. मला वाटलें, त्यांना एकसारखें वाजवल्यामुळें त्रास होत असेल. पण त्यांची ती अवस्था पाहून बोलण्याचाहि धीर होईना. इतक्यांत त्यांचा हात एकदम थांबला, व ते कांपऱ्या आवाजानें म्हणाले,

"भाऊ, काय सांगूं तुला ? हा दिलरुबाच आतां या संसारांत मला दिलासा देऊन राहिला आहे. नाहीं तर माझ्यासारख्या फटिंगानें दुसऱ्या कशावर आतां जीव धरून दिवस काढावे ? तूं म्हणत असशील, या आंधळ्यानें ही कला कुठून पैदा केली ? गुडघ्याएवढा असेन नसेन, तेव्हां देवी येऊन डोळ्यांच्या खांचा झाल्या. सूर्य मावळला म्हणजे दिवस बुडाला असें म्हणतात. माझा आंधळ्याचा दिवस सदाच बुडालेला. तो कधींच वर येण्याची आशा नाहीं. माझ्यासारख्या अभाग्याचें आयुष्य म्हणजे अवसेची

घोर रात्र. मात्र अवसेच्या रात्रींहि नक्षत्रांचे नंदादीप सारखे तेवत असतात. पण माझ्या कपाळीं लागलेल्या या काळोख्या रात्रींत प्रकाशाचा किरण कुठून पडणार ? तुम्ही डोळस माणसें मनाला येईल तिथें जातां, हिंडतां, फिरतां, वाटेल तसे वागतां. मी कुठें जाणार ? मला कुणी हात देईल तेव्हां माझें पाऊल पुढें पडावयाचें. एकटें तासच्या तास स्वस्थ बसून रहावें, तर स्वतःचेंच मन स्वतःला खायला उठतें. म्हणून ही कला शिकलों. ज्यांनीं मला संस्कृत विद्या पढविली, त्यांनींच ही कलाहि दिली. आणि आज पंचवीस वर्षें तीच या पोळलेल्या जिवाला विसांवा होऊन बसली आहे.

"फुलाला आपल्या सुवासाने आनंद होतो कीं नाहीं देव जाणे. पण या कलेचा आनंद मात्र ज्याचा त्याला लुटतां येतो. हा दिलरुबा मांडीवर घेतला, कीं माझें देहभान हरपतें. आज दहा वर्षें झालीं, पोराची आठवण माझ्या जिवाला पोखरून खाते आहे. तो तुझ्यासारखाच नादी होता. या दिलरुब्याची तार छेडली, कीं पुढ्न तास न् तास हालत नसे. देवानें एकच मूल दिलें. ' आम्ही रामदासी. मीं त्याचें नांव मोठ्या हौसेनें 'रामचंद्र' ठेविलें. शेजारीपाजारी म्हणत, 'दादा, तुमचा मुलगा खरोखरी चंद्रासारखा आहे. पण माझ्या चंद्राला मीं कधींच पाहिला नाहीं ! चांगला शिकून कॉलेजपर्यंत गेला, तापाची सांथ आली त्यांत तो सांपडला, व मी म्हातारा मागं राहिलों. त्याची आई त्याच्या मागोमाग गेली आणि आतां या जगांत मी एकटा, असहाय उरलों आहें.

"आज माझा पोरगा असता, तर हा गांवोगांव पुराण सांगत फिरण्याचा प्रसंग कशाला ओढवता ? पण नाहीं देवाची मर्जी ! त्याला आपण काय करणार ? देवानें दृष्टि हिरावून नेली आणि जगांतून मी उठल्यासारखा झालों. पण मुलाच्या मायेनें माझा जीव संसारांत रमे. म्हणून तोहि पाश देवानें तोडला. मर्जी त्याची ! आतां मी आणि हा दिलरुबा. याचा सूर कानांवर पडला, कीं मनाच्या सगळया वेदना शमतात. जिवाला कांहीं तरी विरंगुळा असावा, मनाला थोडी तरी करमणूक वाटावी म्हणून हा, रिकामपण सांपडतांच घटका घटका घेऊन बसतों. देवानें घडीभर दृष्टि दिली असती, तर माझ्या चंद्राला एकदां डोळे भरून पाहिला असता व त्याचें रूप मनांत सांठवून ठेवलें असतें. पण दयाघनानें तेवढाहि मोह

ठेवला नाहीं. आतां, डोळे न मिटतांहि सदा सर्वकाळ त्याच्याच रूपाचें ध्यान घडतें! बाळा. तुला काय सांगूं— इतकी गीता वाचली, सांगितली, पण जिवाची तळमळ कमी होत नाहीं. हा दिलरुचा साक्ष,—" बोलतां बोलतां म्हाताऱ्याच्या डोळ्यांतून टिपें पडूं लागलीं.

आणि राजाची आठवण होऊन माझेहि डोळे पाण्यानें भरून आले!



## देवदत्त : : ३६

अन्नपूर्णेनें सोप्यावरची खिडकी उघडून बाहेर नजर फेकली. आकाश काळ्या ढगांनीं भरून गेलें होतें. अंगाला झोंबणारा गार वारा सुटला होता. लवकरच पावसाची जोराची सर येईल अशीं चिन्हें दिसत होतीं. आधींच मावळतीस कलल्यामुळें निष्प्रभ झालेल्या सूर्याचीं किरणें अभ्राच्छादनामुळें लुप्तप्राय झाल्यासारखीं दिसत होतीं. पृथ्वीवर एक प्रकारची उदास अवकळा आल्याचें अन्नपूर्णेच्या दृष्टीस पडलें.

हा देखावा पाहतांच तिच्या मनांत कांहीं एक विचार येऊन, शिवतांना मध्येंच बोटाला सुई टोंचून अंग शहारतें, तसें तिचें अंग रोमांचित झालें.

"अगबाई, आतां देवदत्त पावसांत सांपडून भिजणार—"

तिच्या तोंडून अस्फुट शब्द निघाले आणि तिच्या चेहऱ्यावर चिंतेचें पटल पसरलें. देवदत्त पावसांत न सांपडतां सुखरूप घरीं कसा येईल या विचारांत ती असतां सहजगत्याच तिची नजर उजव्या बाजूला दिसणाऱ्या राजरस्त्यावर गेली; आणि कोंडलेलें पाणी मुक्तता होतांच विस्तारावें तद्वत् तिचे डोळे आनंदानें विस्तार पावले. त्या राजरस्त्यावरून अन्नपूर्णेच्या बिऱ्हाडाकडील बोळाच्या वळणाकडे एक बालमूर्ति खालीं मान घालून हळूहळू येत असलेली तिच्या दृष्टीस पडली; आणि एकाच दृष्टिक्षेपांत मोत्याचें पाणी ओळखणाऱ्या कसबी जवाहिऱ्याप्रमाणें तिनें देवदत्तास तात्काळ ओळखलें.

ती खिडकी सोडून उत्सुकतेनें झटकन दाराकडे धांवली. न जाणो,

कदाचित् इतक्यांत पाऊस आला तर हलकें हलकें पावलें टाकीत येणाऱ्या देवदत्ताला चार थेंबांचा तरी प्रसाद मिळावयाचा. म्हणून धांवत येण्याबद्दल त्याला सूचना द्यावी या उद्देशानें ती दाराशीं गेली. पण देवदत्ताच्या अवताराकडे पाहतांच ते इशाऱ्याचे शब्द तिच्या ओठावरच जिरले.

नेहमीं अवखळ आनंदानें उड्या मारीत येणारा देवदत्त आज जड पावलांनीं मार्ग कंठीत येत असलेला तिला दिसला. पाठीवर धान्याचीं जड पोतीं वाहणाऱ्या हमालासारखीं त्याचीं पावलें भाराक्रान्त पडत होतीं. गुलाबाच्या फुलावर सदैव विलसणाऱ्या मोहक तेजाप्रमाणें देवदत्ताच्या चेहऱ्यावर नेहमीं खेळणारें मधुर स्मित आज अंवसेच्या चंद्राप्रमाणें लोप पावलें होतें. हातांतून गळूं पाहणाऱ्या पुस्तकांची जणुं त्याला शुद्धहि नसावी असें दिसत होतें. नेहमींची संवय म्हणून केवळ त्याचीं पावलें त्याला घराकडे वाहून नेत होतीं!

आपल्या लाडक्या देवदत्ताची ही अवस्था पाहतांच अन्नपूर्णेचें हृदय पिळवटून गेलें. क्षणार्धांत किती तरी कुशंका तिच्या मातृहृदयास तरवारीच्या ओझरत्या वाराप्रमाणें चाटून गेल्या. ती हतबुद्ध होऊन देवदत्ताच्या उदास मूर्तीकडे पाहतच राहिली. देवदत्त घराजवळ येतांच ती आवेशानें त्याच्याकडे धांवली.

"कां रे बाळा, काय झालं तुला आज?"

असें करुणापूर्ण स्वरानें विचारून देवदत्ताला हृदयाशीं कवटाळण्यासाठीं तिनें उडत्या विमानाच्या पंखाप्रमाणें आपले हात परसले.

परंतु देवदत्तानें तिचे ते प्रेमळ हात रागानें दूर ढकलून दिले, आणि तिच्याकडे क्रुद्ध दृष्टिक्षेपाबरोबरच हातांतील पाटी-दप्तर फेकून तो तेथून मुसमुसत तडक घरांत निघून गेला.

विद्युत्प्रवाह बिघडलेला फोन हातांत धरतांच झटका बसावा तसें अन्नपूर्णेस झालें. क्षणमात्र या घटनेचा अर्थ तिच्या लक्षांत आला नाहीं. दारांतून रागानें पाय आपटीत घरांत शिरणाऱ्या देवदत्ताच्या पाठमोऱ्या आकृतीकडे ती पाहत राहिली, पण देवदत्त पलीकडच्या खोलींत शिरून दृष्टीआड होतांच एखाद्या स्वप्नांतून जागृति यावी तद्वत् अन्नपूर्णा भानावर आली. आपल्या डोक्यांतील उधळलेल्या विचारांबरोबर रस्त्यांत पडलेल्या देवदत्ताच्या पुस्तकांचा पसारा तिनें सावरून घेतला. रस्त्यांत पडून फुटलेल्या

पाटीच्या तुकड्यांकडे एक सकरुण दृष्टिक्षेप टाकून ती जड पावलानें घरांत गेली.

झोपण्याच्या खोलींत एका वळकटीवर दोन्ही हातांत तोंड खुपसून देवदत्त स्फुंदून स्फुंदून रडत होता. अंगावरील कोट-टोपी काढून त्यानें अस्ताव्यस्त फेकून दिली होती. अन्नपूर्णेनें हातांतील पुस्तकें कोनाड्यांत ठेवलीं व इतस्ततः पडलेले देवदत्ताचे कपडे उचलून नीट ठेविले.

नंतर ती देवदत्ताजवळ जाऊन बसली व त्याच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाली—

"बाळा, देवदत्ता, आज काय होतंय् तुला? मला नाहीं का सांगणार?"

पण देवदत्तानें आईचा हात पुन्हा झिडकारून आपलें तोंड दुसऱ्या बाजूस वळविलें व रडणें पूर्ववत् सुरूच ठेविलें.

अन्नपूर्णेचे डोळे पाण्यानें भरून आले. आज दहा वर्षांच्या अवधींत देवदत्तानें तिच्याशीं इतकें कठोर वर्तन कधींच केलें नव्हतें. अन्नपूर्णेच्या हृदयाचा तो एकुलता एक ठेवा होता. तिचें देवदत्तावर निस्सीम प्रेम होतें; आणि त्या प्रेमास देवदत्त पात्रहि होता. वेलीमुळें फुलाला अवश्य त्या जीवनरसाचा लाभ व्हावा आणि सुकुमार फुलामुळें वेलीची जीवन-शोभा वृद्धिंगत व्हावी, तद्वत् अन्नपूर्णेच्या प्रेमरसाचा प्रवाह देवदत्ताचें जीवनपुष्प बहरवीत होता आणि देवदत्ताच्या मधुर सहवासामुळें अनाथ अन्नपूर्णेच्या अभागी जीवनांत सुखचंद्र विलसत होता. तिच्या त्या जीवनचंद्राला दुःख-राहूनें ग्रासिलेलें पाहून अन्नपूर्णेचें अंतःकरण तिळतिळ तुटल्यावांचून कसें राहील?

रडत्या देवदत्ताला अन्नपूर्णेनें बळेंनेंच आपल्या मांडीवर उचलून घेतलें. देवदत्त प्रतिकार करीत असताहि तिनें आपल्या लुगड्याच्या पदरानें त्याचे वाहते डोळे व म्लान झालेलें तोंड पुसलें, आणि त्याचें मस्तक आपल्या हृदयाशीं दाबीत तिनें करुणकंपित आवाजांत विचारलें—

"काय झालं बाळ, तुला आज? मास्तरांनीं मारलं का माझ्या बाळाला?...डोकं दुखतं—चेपूं का जरा? ...माझ्याशीं बोलायचं नाहीं?"

पण देवदत्तानें तिचे हात दूर करण्याचा वृथा प्रयत्न करीत तुटक आवाजांत म्हटलें,—

" जा, मी नाहीं तुझ्याशीं बोलणार ! "

" असं का बरं वेड्यासारखं करावं ? देवदत्ता, मी तुझी आई ना ? "

" नकोस तूं मला आई ! "

देवदत्त रागानें म्हणाला. त्याला त्या वाक्याचा अर्थहि कळला नसेल. पण त्यानें न कळत उच्चारलेल्या या एकाच वाक्यानें अन्नपूर्णेच्या हृदयाला शेंकडों सुया टोंचल्यासारख्या वेदना झाल्या. तिला आलेला हुंदका आवरणें अशक्य झालें, आणि जागृत ज्वालामुखींतून वाहणाऱ्या लाव्हा-रसाप्रमाणें तिच्या डोळ्यांतून कढत कढत अश्रु टपाटप बाहेर पडूं लागले.

" असं काय बरं बोलावं बाळ ? " अन्नपूर्णा रडत रडत म्हणाली, " शहाणा ना तूं ? तुला काय हवं आहे, मला सांग; मी तुला देतें. पण राजा, असा रागावूं नकोस रे माझ्यावर......बाळा, देवदत्ता—"

" मला देवदत्त म्हणूं नकोस. मला नाहीं तें घाणेरडं नांव आवडत." देवदत्त उसळून म्हणाला.

आतां मात्र देवदत्ताच्या दुःखाचें खरें कारण अन्नपूर्णेच्या लक्षांत आलें. गेले सात-आठ दिवस आपलें देवदत्त हें नांव बदलण्याविषयीं देवदत्तानें अन्नपूर्णेजवळ निकडीचा हट्ट धरला होता. शाळेंतून आला, कीं त्यानें आपलें नांव बदलण्याबद्दल आईला विचारावें व 'उद्यां, उद्यां' अशी तिनें त्याची समजूत काढावी असा प्रकार चालला होता. देवदत्ताचा हा हट्टच असा होता, कीं तो पुरा करणें अन्नपूर्णेच्या शक्तीबाहेरचें काम होतें.

आणि देवदत्ताच्या या हट्टाचा उगम त्याच्या शाळेत झाला आहे हेंहि देवदत्ताच्या सांगण्यावरून अन्नपूर्णेस समजून चुकलें होतें. आज तीन वर्षे देवदत्त त्या शाळेंत जात होता. नुकताच मराठी दुसरीच्या परीक्षेंत नंबर मिळवून तो तिसरींत गेला होता. आणि याच वर्गांत त्याच्या या विचित्र हट्टाला कारण मिळून वाचा फुटली होती.

तिसरीचा वर्ग प्रथमतःच भरला त्या दिवशीं तिसरीच्या मास्तरानें वर्गांत नवीन आलेल्या मुलांचीं नांवें विचारून घेतलीं. सर्वांनीं आपापलीं नांवें सांगितलीं. देवदत्ताची पाळी आली तेव्हां त्यालाहि मास्तरांनीं विचारलें—

" काय रे मुला, तुझं नांव काय ? "

" देवदत्त, मास्तर."

" अरे देवदत्त काय ? सगळं नांव सांग."

" देवदत्त शंकर कुळकर्णी."

" काय रे, तुझी जात कोणती ? "

" ब्राह्मण, मास्तर. "

" छत्, कांहीं तरीच सांगतोस. तूं बाटगा ख्रिश्चन असला पाहिजेस. अरे, तुझं नांव ख्रिश्चन आहे, देवदत्त. इतर मुलांचीं नांवं बघ कशीं राम, लक्ष्मण, नारायण, विष्णु अशीं आहेत. तुझं देवदत्त नांव मात्र ख्रिश्चन आहे. आतां घरीं जाऊन नांव बदलून घे आईबापांकडून."

मास्तरांनीं केलेल्या या 'विनोदा'मुळें कापराच्या ढिगाऱ्यावर जळती काडी पडावी तसें झालें. एवढी साधी गोष्ट इतके दिवस आपणा कोणाच्याच कशी लक्षांत आली नाहीं याचें वर्गांतील सर्व मुलांना मोठें नवल वाटलें. आणि मास्तरांनीं ती त्यांच्या नजरेस आणून देतांच त्यांच्या हातीं केवळ कोलीत दिल्यासारखेंच झालें. तीं मुलें देवदत्ताला 'बाट्या', 'ख्रिश्चन' 'गाईचें मांस खाणारा' म्हणून चिडवूं लागलीं. मुलेंच तीं ! एकानें कल्पना काढली, कीं तिचा प्रसार बिनतारी तारायंत्रांतील बातम्यांपेक्षांहि झपाट्यानें होतो. तीं मुलें देवदत्ताला नुसतीं नांवें ठेवूनच थांबलीं नाहींत, तर त्यांनीं त्याला शिवावयाचें नाहीं असेंहि आपसांत ठरविलें !

आणि शाळेंत होणाऱ्या या जाचाचा देवदत्ताच्या कोवळ्या मनावर परिणाम झाल्यावांचून कसा राहील ?

आपलें नांव बदलण्याचा त्यानें अन्नपूर्णेजवळ हट्ट धरला तो यामुळेंच !

पण तो कसा पुरा करतां येईल हें बिचाऱ्या अन्नपूर्णेस काय माहीत ? वर्गांत आचरट 'विनोद' करणाऱ्या त्या मास्तराचा तिला मनस्वी संताप आला. पण ती अनाथ, गरीब विधवा त्या मास्तराचें काय करूं शकणार होती ? मास्तराला मनांतल्या मनात लाखोली वाहात स्वस्थ बसणें तिला भाग होतें.

गेले चार-सहा दिवस तिनें देवदत्ताची कशीबशी मिनतवारीनें समजूत घातली होती. पण आज त्याचा पारा चांगलाच चढलेला दिसत होता. तरीहि अन्नपूर्णेनें समजुतीच्या स्वरानें म्हटलें—

" असं काय बरं वेड्यासारखं करावं बाळ ? एकदां ठेवलेलं नांव

कसं बरं बदलतां येईल ? तुझंहि नांव देवाचंच आहे. देवदत्त, तूं देवानं दिलेला आहेस म्हणून तुझं नांव देवदत्त ठेविलं आहे. तें काय वाईट आहे बरं—?"

"तें नांव खिश्चन आहे !" देवदत्त धुश्शानें म्हणाला, "बाटग्या म्हणून सारीं मुलं मला चिडवतात त्या नांवामुळं—"

"अरे, तीं खुळीं आहेत मुलं."

"हं खुळी ! आणि मास्तरसुद्धां वाटतं—?"

देवदत्ताच्या या खोचक प्रश्नाचें तसेंच निर्भीड उत्तर अन्नपूर्णेच्या अगदीं ओठांवर आलें होतें, पण ती तें बोलूं शकली नाहीं. शिवाय तिचें तें उत्तर देवदत्ताच्या बालबुद्धीस पटण्यासारखें नव्हतें. त्याच्या भावनापूर्ण बालहृदयाचें शंकासमाधान तर्कनिष्ठ युक्तिवादानें करूं पाहणें म्हणजे फुलाच्या अंगीं फत्तराचें काठिण्य शोधूं पाहण्यासारखेंच खुळेपणाचें होतें. म्हणून तो विचार सोडून अन्नपूर्णा कांहीशा अजीजीच्या स्वरानें म्हणाली,

"अरे, मास्तर उगीच थट्टेनं म्हणाले असतील. मी उद्यां त्यांना नीट समजून सांगेन अं. मग नाहीं कुणी तुला कांहीं वाईट-साईट बोलणार. मग तर झालं ? चल तर आतां जेवायला. अंधार बघ किती पडला तो— ! मी दिवा लावतें, तंवर तूं हातपाय धुवून ये जेवायला हं."

असें म्हणून चालू प्रकार तेथेंच थांबविण्याच्या उद्देशानें अन्नपूर्णा तेथून उठली. तिनें दिवा लावला व ती स्वैंपाकाच्या तयारीस लागली. तापलेली कांच आपोआपच थंड होईल अशा कल्पनेनें तिनें नंतर देवदत्ताशीं कांहीं अधिकउणा संवाद केला नाहीं. फक्त मध्यंतरीं एकदां पावसाची सर आली तेव्हां तिनें खोलींत जाऊन देवदत्ताच्या अंगावर गरम पांघरूण घातलें.

स्वैंपाक तयार झाल्यावर देवदत्तास हांक मारण्यासाठीं अन्नपूर्णा पुन्हा खोलींत आली त्या वेळीं रडून रडून देवदत्त झोपीं गेला होता. पाकळ्या कुसकरलेल्या फुलासारखा त्याचा चेहरा निस्तेज दिसत होता. भरती निघून गेल्यावर अर्धवट वाळलेल्या वाळूवर ठिकठिकाणीं पाण्याचे चरे उमटलेले दिसावेत तद्वत् देवदत्ताच्या गालांवर अश्रूंचे कोरडे वण पडून त्याचा चेहरा अधिकच कळाहीन दिसत होता. तें उद्वेगपूर्ण दृश्य पाहून अन्नपूर्णेला पराकाष्ठेचा खेद झाला.

तिनें देवदत्ताला हलकें हलकें हालवीत हांका मारण्यास सुरवात केली,
"देवदत्ता, देवदत्ता,—जेवायला उठतोस ना?"

देवदत्त जागा झाला. पण आईच्या तोंडचें 'देवदत्त' हें नांव ऐकतांच फुंकर मारलेल्या निखाऱ्यासारखा त्याचा राग पुन्हा प्रज्वलित झाला. तो रागानें उसळून म्हणाला,

"पुन्हा देवदत्त? मला नाहीं आवडत तें नांव म्हणून तुला इतक्यांदा सांगितलं तरी तेंच. मी नाहीं जा तुझ्याशीं बोलणार. जा, मी जेवतहि नाहीं. आधीं माझं नांव दुसरं ठेव."

असें म्हणून डोक्यावरून पांघरूण लपेटून घेऊन देवदत्त फुरंगटून निजला. अन्नपूर्णेला आपली चूक कळून आली; पण धनुष्यावरून सुटलेला बाण परत थोडाच येणार होता? तिला आपला स्वतःचा राग आला. तिनें चिडून स्वतःलाच चारदोन शिव्याहि हांसडून घेतल्या.

देवदत्तानें जेवायला उठावें म्हणून नंतर तिनें आपल्या प्रयत्नांची शिकस्त केली; पण त्याचा परिणाम इष्टसिद्धीच्या अगदीं उलट झाला. देवदत्त शान्त होण्याऐवजीं उलटा चिडला मात्र. आणि रागानें लाल होऊन त्यानें ताड्कन् अन्नपूर्णेच्या हातावर एक जोराची लाथ मारली आणि तो सोप्यावर जाऊन अंधारांतच उघड्या जमिनीवर जाऊन पडला!

देवदत्ताच्या लाथेनें अन्नपूर्णेच्या बांगड्या वाढवल्या गेल्या.

तिच्या डोळ्यांतून अश्रुवर्षाव सुरू झाला! बाहेर पावसाची सरहि जोराने पडूं लागली होती!

अन्नपूर्णेचें विचारचक्र सुरू झाले—

देवदत्त—!

आणि हें नांव बदलण्याचा आपल्या लाडक्या प्राणाधिक पुत्राचा विचित्र हट्ट!

अन्नपूर्णेच्या मनापुढें अत्यंत बिकट प्रश्न येऊन पडला होता.

देवदत्त—तिचा सारा सांसारिक इतिहास, तिच्या अपत्य-वात्सल्याचा अवघा भाव-पट, तिच्या देवसदृश उपकारकर्त्या डॉक्टराची एकमेव इच्छा, या साऱ्या गोष्टी देवदत्त या एका नांवाशीं स्मृतिबंधांनीं घट्ट निगडित झाल्या होत्या. तिच्या स्मृतिबंधांनीं विणलेला इतक्या वर्षांचा हा हार्दिक

जीवन-पट देवदत्ताचें नांव बदलून तोडून टाकण्यास तिची तयारी नव्हती. आणि तशी तिच्या अंगीं शक्तीहि नव्हती.

एखाद्याचें नशीबच असें असतें कीं, पुष्कळ धनलाभ होऊनहि त्याच्या कपाळाचें दारिद्र्य कांहीं चुकत नाहीं. तशीच कांहींशी अवस्था अन्नपूर्णेची झाली होती. तिला अपत्यलाभ झाला त्याची मोजदाद करण्यास दोन्ही हातांचीं बोटेंहि अपुरींच पडतील; पण बिचारीचें दुर्दैव असें कीं, त्यांपैकीं एकानेंहि आपला पहिला वाढदिवस साजरा करविण्याचें सौभाग्य आपल्या आईस लाभूं दिलें नाहीं. अन्नपूर्णेनें अनेक नवस-सायास, देवधर्म, व्रतवैकल्यें वगैरे झाडून सारे बायकी उपाय करून पाहिले; पण रामा शिवा गोविंदा! त्यांपैकीं एकाचाहि उपयोग न होतां तिचीं मुलें जन्मास आलीं तशींच तीं हातोहात स्वर्गलोकीं निघून गेलीं. बिचारी अन्नपूर्णा! प्रत्येक खेपेस तिनें पुत्रसौख्यलाभाचीं मनोराज्यें करीत प्रसूतिवेदनांचा पर्वत चढून जावें आणि अपत्यलाभाच्या माथ्यावर पाय स्थिर झाला न झाला तोंच मृत्यूच्या झंझावातानें तिला दुःखाच्या खोल दरींत निर्घृणतेनें फेकून द्यावें, असा प्रकार दहा वेळेस घडून आला होता. बँकेच्या कॅशियरसारखीच तिची अवस्था होती. हजारों रुपये कॅशियरच्या हातांत असे येतात आणि असे जातात; पण त्यांपैकीं एकावरहि त्याचें स्वामित्व नसतें! फक्त चोख हिशेबाची दगदग व पैशाच्या सुरक्षिततेची जोखीम यांचा मात्र तो बिचारा धनी! तीच स्थिति अन्नपूर्णेची होती. ती फक्त प्रसूतीच्या कष्टांची तेवढी धनीण होती!

याच 'दुर्दैवाचे दशावतार' पाहिल्यामुळें अन्नपूर्णेचें अंतःकरण कमालीचें हळवें व भावप्रवण झालें होतें. अप्राप्य वस्तूविषयीं मनाला वाटणारी तृष्णा तिच्या बाबतींत दसपटीनें वाढली होती. आणि तिची इच्छा केवळ देवदयेनेंच पुरी झाली होती.

अकराव्या खेपेस अन्नपूर्णा अपत्यवती होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं तेव्हां पूर्वीच्या अनुभवानें शहाणे झालेल्या शंकररावांनीं—अन्नपूर्णेचे पतिराज—तिला एका निष्णात गोऱ्या डॉक्टरला दाखविलें. त्यांचा अभिप्राय असा पडला कीं, अन्नपूर्णेच्या कांहीं शारीरिक विकृतीमुळें प्रसूतीचे वेळीं अडथळा उत्पन्न होतो; व म्हणून मूल जिवंत बाहेर यावयास हवें असेल तर ऑपरेशनखेरीज दुसरा कांहीं इलाज नाहीं.

आणि ऑपरेशनसंबंधीं अज्ञानामुळें मनांत दृढावलेल्या विचित्र समजुती व तज्जन्य भीति, धर्मभावना, असल्या उपायांबाबत बायकांना नेहमींच वाटणारी स्त्रीस्वभावसुलभ लज्जा, गरिबीच्या संसारांत या ऑपरेशन-मुळें येणाऱ्या खर्चाची आंच, यांसारख्या मनश्चक्षूंसमोर उघड उघड दिसणाऱ्या अडचणींकडे पुत्रप्राप्तीच्या आशेनें अन्नपूर्णेनें डोळ्यांवर कातडें ओढून व मन कठोर करून दुर्लक्ष केलें. आणि अग्निदिव्यांतून बाहेर पड-लेल्या सीतेप्रमाणें ती या ऑपरेशनच्या दिव्यांतून पार पडण्यास तयार झाली.

सीतेला तिचें पावित्र्य प्राप्त झालें तद्वत् अन्नपूर्णेला इतक्या दिवसांचें तिचें ईप्सित प्राप्त झालें.

तिला वाटलें स्वर्गच आपल्या हातीं आला!

तिच्या आनंदास आकाश ठेंगणें झालें असल्यास आश्चर्य कसलें?

मूल सुखरूप बाहेर आलें आणि तोहि मुलगा! यामुळें साहजिकच त्या गोऱ्या डॉक्टरास आनंद झाला. अन्नपूर्णेचा पूर्वेतिहास त्याला ठाऊक झाल्यामुळें तिच्याविषयीं त्याला एक प्रकारची अनुकंपा उत्पन्न झाली होती. म्हणून तिची अपत्यलालसा आपल्या हातून पूर्ण झाली याचें त्याला मोठें समाधान वाटलें. अन्नपूर्णा त्याच्या हॉस्पिटलमध्यें होती तोंपर्यंत तो जातीनें तिची पूसतपास करून काळजी घेई. अशा या 'देव माणसा'बद्दल अन्न-पूर्णेला किती आदर व कृतज्ञता वाटत असेल याची कल्पना करणेंच उचित!

अखेर अन्नपूर्णा हॉस्पिटल सोडून निघाली तेव्हां निरोप देतांना तो गोरा डॉक्टर तिला व शंकररावांना उद्देशून म्हणाला,

"बाई, मुलाबद्दल आतां तुम्हांला कांहीं काळजी करण्याचं कारण नाहीं. तो खात्रीनं दीर्घायु होईल बरं. देवानंच तुमची प्रार्थना ऐकून तुम्हांला हा मुलगा दिला आहे; म्हणून त्याचं नांव देवदत्त ठेवा, देवदत्त."

आणि साहेबाची ही इच्छा त्या उभय पतिपत्नींनीं कृतज्ञ अंतः-करणानें अमलांतहि आणली.

मुलाचें 'देवदत्त' हें ख्रिश्चन भासणारें नांव ठेवण्याच्या मागें अस-लेला हा इतिहास अन्नपूर्णेच्या नजरेसमोर पुन्हा प्रत्यक्ष घडत असल्याप्रमाणें दिसत होता. 'देवदत्त' या नांवाशीं निगडित असलेल्या या जिव्हाळयाची साक्ष ती देवदत्ताच्या बालबुद्धीस कशी पटवूं शकणार? 'देवदत्त' या नांवा-वर तिचें किती हार्दिक प्रेम होतें हें देवदत्तास समजून सांगणें तिला किती

अशक्य होतें बरें? आणि म्हणूनच त्याचें 'देवदत्त' हें नांव बदलणेंहि तितकेंच अशक्य झालें नव्हतें काय?

पण तिच्या या हार्दिक स्मृतिमय भाव-पटाचें देवदत्ताच्या चिमकुल्या मनास काय होय? त्याला शाळेंत मुलें नाना तऱ्हेनें चिडवीत होतीं, त्याचें दुःख आईच्या या इतिहासापेक्षांहि त्याला जास्त वाटावें हें स्वाभाविकच होतें.

अन्नपूर्णेपुढें पेचाचा प्रश्न होता तो हाच!

आणि त्याचे समाधानकारक उत्तर मिळणें तिला तरी अशक्य वाटत होतें.

एका मास्तरानें सहज म्हणून ओढलेल्या 'विनोदा'च्या काडीनें एका अनाथ मातेच्या सौख्यसदनास आग लावली जाईल याची कोणास तरी कल्पना असेल का? अन्नपूर्णेला आजच्या देवदत्ताच्या वागणुकीवरून आतां निराळीच भीति वाटूं लागली होती. आपण त्याचें नांव बदलूं शकत नाहीं हें पाहून देवदत्त आपल्यावर रागावून आपणाशीं बोलणें तर सोडून देणार नाहीं! त्याच्या बालहृदयांत यामुळें प्रत्यक्ष आपल्या आईविषयीं न कळत कां होईना पण तिरस्काराचें, द्वेषाचें तर बीं पेरलें जाणार नाहीं! आणि—आणि मग?—कसली आई न् कसला मुलगा......!!

या एकाच विचाराभोंवतीं तिचें मन आतां घोटाळूं लागलें. भावी काळाचें भेसूर चित्र तिच्या हळव्या मनाला घेरे पाडीत होतें. तिला ती कल्पनाहि असह्य झाली. ती ताड्‌कन् उठली आणि हातीं दिवा घेऊन धांवतच सोप्यावर गेली. रडण्याच्या श्रमाने व भुकेनें म्लान होऊन देवदत्त जमिनीवर उघड्यावर गाढ झोपीं गेला होता. तो करुण देखावा पाहून अन्नपूर्णेचें हृदय विदीर्ण झालें. तिनें झटकन् देवदत्तास हलकेच उचलून मांडीवर घेतलें. त्याच्या अंगावर गरम शाल घातली. आणि त्या गंभीर शान्ततेंत त्या एकाच भयाण प्रश्नाचा आपल्या मनाशीं विचार करीत देवदत्ताच्या उदास चेहऱ्यावर आपली अश्रुभरित दृष्टि लावून अन्नपूर्णा बाह्यतः स्वस्थ बसून राहिली होती. पण तिच्या अंतरंगानें मात्र लाक्षागृहासारखा पेट घेतला होता!



# धंदेवाईक मंडळी : : ३७

बी. ए. झाल्या दिवसापासून दोन वर्षांत वकील झाल्याचीं उदाहरणें अपवादात्मक समजलीं जातात.

नियमाला अपवाद म्हणून प्राण गेला तरी दोन वर्षांत वकील व्हायचें नाहीं हा माझा निर्धार परमेश्वरकृपेनें बिनधोक तडीस गेला.

वरील सर्वसाधारण नियमांतलें पोटकलमसुद्धां मीं तंतोतंत पाळलें. जून महिन्यांत बी. ए.च्या परीक्षेचा निकाल, तर मी मे महिन्यांतच 'मम' म्हणून हक्कानें हाताला हात लावणाऱ्या सरस्वतीला भावी वकिलीणबाई म्हणून घरांत आणून मोकळा झालों. स्वजनांचें ऋण फेडल्याबद्दल मनाला थोडेंसें बरें वाटलें. पण थोडाबहुत परिचय वाढला, आणि सरस्वतीनें सहजच माझ्या वकिलीच्या परीक्षेविषयीं पृच्छा केली. एक वेळ वाटलें, कीं सांगून टाकावें झालें हिला, कीं आतां वकिली फक्त तुझ्यापुढें! पण पुन्हा विचार केला कीं, पुरुषजातीनेंच असे हातपाय गाळले तर बायकांनीं कुणाच्या आधारावर दिवस काढावेत? अर्थात् थोड्याशा निष्काळजीपणाच्या झाकींत मीं विनोदानें उत्तर केलें, "होईन, होईन! अग आतां काय उशीर? अर्धाअधिक नियम पाळलाच आहे. आतां बाकीचा—तो गवळी आला वाटतं—"

आम्हां वकिलांचा नियम त्या बिचारीला काय कळणार!

नाना खटपटी लटपटी करून बरोबर सहा वर्षांनीं—मधू नुकताच 'माऽऽमा' करूं लागला होता. मला वाटतं—मी एल्एल्. बी. झालों त्या दिवशीं मी धांवतच घरांत शिरलों. माजघरांत सरस्वती ओणव्यानें केर काढीत होती. काय बोलूं, कसें बोलूं, केव्हां बोलून टाकूं असें होऊन गेलें होतें मला.

"आज काय झोकून आलां कीं काय कुठनं?" ती जरा रागानेंच म्हणाली.

"काय बिशाद आहे? म्हणे आळशी—अभ्यास करण्याचा कंटाळा काय मला? बायकोच्या नादानं मी बिघडलों काय? हुरळून गेलों काय—" धोतराच्या सोग्यानें कपाळावरचा घाम पुशीत मी म्हणालों.

" एक शब्द स्पष्ट उमटेल तर शपथ! अन् मघांपासून पाहतें आहें, सारखी फुगडी खेळणं चाललं आहे." अर्धवट आपल्याशींच पुटपुटत तिनें केरसुणी कोपऱ्यांत भिरकावली.

" मध्या कुठं आहे ? " मी पटकन् म्हणालों.

" आज हें काय-मांडलंय् आहे तरी काय ? वेडबीड तर नाहीं ना लागलं ? अन् आज निकाल होता ना परीक्षेचा ? दर वर्षाचीच रडकथा असेल अन् काय ! माझंच नशीब खोटं त्याला तुम्ही तरी काय करणार ? " माझ्या उत्तराची वाट न पाहतां सरस्वतीनें डोळ्यांना पदर लावला.

मीं जरा कुऱ्यांतच उत्तर केलें, " मधूला सांग, कीं लेका, तुझा बाप वकील झाला आहे ! "

डोळ्यांवरचा पदर एकदम खालीं गळला.

" खरं ! खरं ? अगदीं खरं ? " सरस्वती कांपऱ्या आवाजांत ओरडली.

" खरं ! खरं ! अगदीं खरं ! " मीं उत्तर केलें.

" मला नाहीं वाटत खरं ! "

" तुला विश्वास कुठं आहे ? जा मधूला सांग, कीं तुझा 'माऽऽऽमा' आजपासून वकील झाला आहे, वकील." मी सावकाश पण चढत्या आवाजांत म्हणालों.

" वकीऽऽल ? " अजून तिच्या ध्यानांतच येईना.

" हजाम झाला आहे म्हणून सांग जा ! " मी थोडासा चिडून म्हणालो.

सरस्वती मोठ्यानें हसली. जसें कांहीं आतां सांगितलें या गोष्टीवर येईल विश्वास ठेवतां, पण वकीऽऽल ? कांहींच्याबाहींच बोलणें. म्हणे वकील झालों आहें. अहाहाहा ! दिवे ओवाळा !

काय असेल तें असो; जरा वेळानें सरस्वती मुकाट्यानें अश्रु गाळूं लागली. मला तिच्या रडण्याचें कारणच न उमजल्यानें थोडेंसें गोंधळल्या-सारखें झालें. मीं घाबरून 'काय झालं ?' म्हणून प्रश्न केला. सरस्वती कांहींच बोलली नाहीं. डोळ्यांतील अश्रु तळहातानें पुशीत ती देवघरांत गेली. मी तिच्या पाठोपाठ गेलों. ट्रंकेंत वरच्या बाजूस पडलेलें एक पत्र काढून तें तिनें माझ्या हातांत दिलें. पत्रावरच्या रफाट्यांवरून मीं तात्काळ

ओळखलें, कीं हा पितृराजांचा निर्वाणीचा संदेश असावा किंवा दर महिन्याच्या कांठीं नियमानें येणारे उपदेशामृताचे चार वळसे असावेत. मजकूर बहुतेक तुम्ही खुशाल, आम्ही खुशाल, वगैरे होता; पण जातां जातां मारकी गाय जशी हुंदाडून जाते, त्याप्रमाणें एके ठिकाणीं टोमणा मारलेला होता—

"आतां तुम्ही सुज्ञ आहांत. तुम्हांला आम्हीं शिकवावें यांत कांहींच अर्थ नाहीं. तरी पण आमचा जीव राहत नाहीं म्हणून सांगायचें, इतकेंच. बायकापोरांच्या नादांत फारसें न गुरफटतां एकदां या परीक्षेंतून पार पडलांत म्हणजे तुमच्या व आमच्या दोघांच्याहि हिताचेंच होणार आहे—"

सरस्वतीला वाईट वाटलें. नवऱ्याच्या परीक्षेच्या आड आपण येतों अशी लोकांची खात्री आहे हे पाहून तिला अतिशयच वाईट वाटलें. मला स्वतःला कांहीं वाटलें नाही.

मला वाईट वाटूं नये या समजुतीनें सरस्वतीनें तें पत्र माझ्यापासून लपवून ठेवलें होतें.

त्या दिवशीं फक्त मीठमोहरी घेऊन माझी दृष्ट काढण्याचेंच काय तें बाकी ठेवलें होतें तिनें. ज्याप्रमाणे माहीमचा हलवा ही काय चीज असते हें चाखून पाहतां येतें, त्याप्रमाणें हलव्यासारखें जरी शक्य नाहीं तरी तीन-तीनदां तिने माझ्याकडे पाहावें, मीं सहजच तिच्याकडे पाहावें; आणि लाजून तिने दुसरीकडेच पाहावें. बस्स, नवरा वकील ! वकील अं ? असें ? आता घ्या म्हणावें !

— २ —

मागणी असेल तर पुरवठ्याची तेजी हा जगाचा नियमच आहे.

एक वेळ असाहि विचार आला कीं, आपण होऊनच कुरापती काढाव्यात; खुशाल एखाद्याच्या मोटारीखालीं जाऊन पडावें, अन् त्या प्रसंगांतून सहीसलामत सुटल्यास आपणच आपला खटला चालवावा.

फावल्या वेळांत काव्यनिष्पत्तीसारखे उद्योग सुचूं लागल्यास आश्चर्य मानण्यासारखें कांहींच नाहीं ! पद्य-काव्याची गुंतागुंत सोडवायला हात हलके असावे लागतात, आणि त्याची उणीव असल्याकारणानें मी गद्य काव्याच्या सडेतोड मार्गांत शिरलों.

थोडक्याच दिवसांत मी एक नवशिक्या चोर म्हणून ओळखला

जाऊं लागलों. चार-दोन धंदेवाईक चोरांनीं कौतुकानें माझी पाठ थोपटली, आणि असेंच स्वीकृत कार्य नेटानें चालूं ठेवण्याबद्दल प्रोत्साहनहि दिलें.

बऱ्याचशा तत्कालिन उदयोन्मुख ग्रंथकारांना गणिकांच्या उद्धाराची विलक्षण तळमळ लागून राहिली होती. जो उठेल तो अगदीं आत्मौपम्य-बुद्धीनें समाजाला पटवून देण्याचा प्रयत्न करीत होता. मलाहि आली लहर. समाजावर कोरडे ओढले तरी समाज म्हणजे कांहीं एक अमुकच व्यक्ति आहे असें नाहीं; तेव्हां दोषी जर कुणाला ठरवायचें असेल, तर समाजाच्या नांवानें खडे फोडायला कांहीं हरकत नाहीं. पुन्हा वर समाज-सुधारक म्हणून गौरव होणारच ! मीं एक गोष्ट लिहिली. जवळजवळ दहा हजारांवर शब्द लिहून काढले. आतां सांगायला कांहींच हरकत नाहीं, त्या गोष्टींत मीं जीं मतें प्रतिपादन केलीं आहेत त्या मतांवर माझा बिलकुल विश्वास नाहीं. गणिकेच्या प्रेमाची जी एक विलक्षण लाट उसळली होती त्या लाटेंतला एक अणुरेणु भाग म्हणून ती गोष्ट एक वेळ वाचल्यास हरकत नाहीं; पण शब्द न् शब्द खोटा आहे हें मात्र ध्यानांत ठेवावें !

दुसरें एक कारण आहे. कर्मधर्मसंयोगानें आमच्या समोरच्याच घरांत एक गणिका राहत होती. पुण्यांत घर असावें ह्या बुद्धीनें वडिलांनीं घर घेतलें पण घराबाहेरच्या घाणीकडे कानाडोळा केला. वकिलाच्या घरासमोर वेश्या ! योगायोग म्हणतात तो हा !

माझ्या डोक्यांत विचार आला. कदाचित् लोक म्हणतात तें खरें कशावरून नसेल ? असला किळसवाणा धंदा त्यांना तरी कसा पटत असेल ? वेश्या झाल्या म्हणून माणुसकी कांहीं मरत नाहीं. त्यांनाहि हृदय म्हणून कांहीं तरी परमेश्वरानें दिलें असेलच कीं नाहीं ! नाइलाज म्हणून पोटा-करितां धंदा करणाऱ्या जिवाला तुच्छ लेखणें बरें नव्हे. मी लगेच कागदा-वर भरकटूं लागलों.

गोष्टीचा सारांश हा कीं, एक गणिका—कॉलेजपर्यंत तिचें शिक्षण; (ठेवलें आहे तिच्या काकोबांनीं !) कॉलेजचें शिक्षण म्हणजे उत्तमोत्तम कवींशीं परिचय आलाच; नंतर मग त्याच कॉलेजांतल्या स्त्रियांच्या उद्धारा-करितां शिरा ताणताणून ओरडणारा सुधारणावादी नायक; समाजाशीं भांडण; लग्न; शेवट—सुखाचा संसार !

लिहिण्याचा एकंदर रोख हा कीं, गणिका म्हणून तुच्छ लेखिल्या

जाणाऱ्या स्त्रियांमध्येंसुद्धां उच्चतम विचारसागरामध्यें अथांग पोहणारे जीव असूं शकतात. पण समाजांतल्या धंद्यांत सर्वनिकृष्ट असा तो धंदा पडला म्हणून सर्वजण त्यांना हीन समजतो. तरी ज्यांना म्हणून समाजोन्नतीकडे लक्ष पुरवणें असेल त्यांनीं या निष्कारण व्यर्थ जाणाऱ्या जीवांकडे एकवार पाहून त्यांचा उद्धार करणें.

आमच्या संपादकांना वाटलें गोष्ट चांगली आहे. दर पानागणिक प्रेम आहे. भाषाशैली ?—सुंदर. विवेचनपद्धति ?—बिनतोड. विषय ?—बेमालूम. मी इतका बांका लेखक असेन अशी मला स्वप्नांतसुद्धां कल्पना आली नाहीं. त्यानंतरच्या पुढच्या सगळ्या गोष्टींत मी गणिकांचा कैवारी बनलों.

— २ —

त्या दिवशीं घरांतल्या सरस्वतीशीं आमची गट्टी तुटली होती.

भांडणाला कारणीभूत प्रवेश नं. १:—

“ मधु रडतो आहे.” सरस्वती.

“ हें तूं सांगण्याची जरूरी नाहीं. तुझ्यापेक्षां तो जास्त चांगलं ठसवून देतो आहे.” मी.

“ त्याला जरा घेतला तर नाहीं का होणार ? ” सरस्वती.

“ तोच प्रश्न मला तुला विचारावा असं मघांपासून वाटतं आहे. ” मी.

“ मला ऐकत नाहीं तो.” सरस्वती.

“ नाहीं ऐकत तर अंगणांत ठेवून दे.” मी.

इत्यादि झाल्यावर मध्याच्या पाठींत दोन रपके आणि ‘माझंच नशीब खोटं—रडा, तरफडा. आई मेली म्हणजे मग तुम्हांला बरं वाटेल...’ वगैरे वगैरे. ‘तुझा बाप नाहीं तर तूं लेका’ या न्यायानें मधूच्या बोडक्यावर वाक्पुष्पांजलि.

प्रवेश नं. २:—

“ चहा सरला आहे.” सरस्वती.

“ हूं.” कारण चूक माझी होती. चार दिवस सांगून झाले होते; पण स्मरणशक्तीच फार धड.

“ आतां मी का बाजारांत जायला पाहिजे ? ” सरस्वती.

उत्तर नाहीं.

" ऐकायला आलं का मी काय म्हणतें तें ? " सरस्वती.

" आवाज जरा लहान केलास तर—? "

पुन्हा पूर्ववत् प्रकार. " बोलायची चोरी, सांगायची चोरी, देवा—नारायणा—नको हा ताप ! " वगैरे निराशावादाची वाक्यमालिका.

आधींच धंदा फार जोरांत चाललेला ! अन् त्यांतून ही कटकट. आल्या-गेल्याची वर्दळ ! 'छेः-हो ! अगदीं शहरांत मध्यभागीं घर असून वर्दळ बिलकुल नाहीं.' म्हणून आश्वासन देणाऱ्या पूर्वीच्या घरमालकाचे शब्द अजून माझ्या कानांत गुणगुणत आहेत. ह्या विधानाची सत्यता पटविण्याकरितांच कीं काय, एकसुद्धां अशील चुकून आमचा उंबरठा ओलांडीत नव्हता. जगांत खरें बोलणारीं माणसें असतात एकंदरींत !

गुडघाभर पाण्यांत जाळें टाकून गळाला मासा लागण्याची वाट पाहत बसणाऱ्या धीरवीर कोळ्याप्रमाणें मी टेबलावर पाय ठेवून पडलों होतों. इतक्यांत खालीं कुणी तरी बोलत असल्याचा भास झाला.

" कोण, वकीलसाहेब ? या जिन्यानं वर जा."

अर्थात् मी अगदीं कामाच्या गर्दींत होतों. छेः-हो, इतर केसेस घ्यायला मला फुरसतच नव्हती ! आतां तुमचा शब्द मोडणें अगदीं जिवावर आलें आहे म्हणून—

मी स्वप्नांत तर नव्हतों ना ? मीं डोळे चोळून पाहिलें.

इतक्या दिवस दुरूनच दिसणारी रूपसुंदरी गंगामाई आज माझ्या दारांत उभी होती.

'घोडा घोडा म्हणतात तो हाच प्राणी' म्हणून वाल्मीकिऋषींच्या आश्रमांतील बाळगोपाळ ज्याप्रमाणें कौतुकानें एकमेकांना माहिती पुरवीत होते, त्याप्रमाणें माझे डोळे माझ्या मेंदूला समजावून सांगत होते कीं, 'गणिका, गणिका म्हणून ज्यांच्या उद्धाराकरितां तुम्ही टाहो फोडीत होतां तें हेंच रत्न.' पण मेंदूची समजूत कांहीं केल्या पटेना. एखाद्या फाजील चौकस कार्ट्याप्रमाणें त्याचे दुसरेच कांहीं प्रश्न होते. डोळे सांगत होते, 'अरे हीच ती बाई'. मेंदू विचारीत होता, 'हें काय कंत्राट ? ही कशाला इथें आली ? हिचें काय काम ?'

एखादा संकोच मानणारा गृहस्थ असता तर माझी अवस्था पाहून 'बरें आहे; अच्छा, पुन्हा कधीं तरी येईन—' म्हणून मुकाट्यानें आल्या

पावलींच पळून गेला असता. पण बाईंना संकोच फारसा नव्हतासें दिसलें. कारण माझ्या आदरातिथ्यदर्शक शब्दांची वाट न पाहतां बाई मुकाट्यानें भिंतीशीं टेंकून ठेवलेल्या हातमोडक्या बाकावर विराजमान झाल्या. अर्थात् मीहि मुकाट्यानें अंगठ्याचें नख कुरतडीत खुर्चीत बसलों. खुर्चीवर बसण्याचें धैर्यच नव्हतें माझ्या अंगांत.

"काय काम आहे?" म्हणून किंचित् रागानें विचारावें असें सारखें वाटत होतें; पण शब्द बाहेर उमटविण्याचें धाडशी कार्य एवढ्याशा चिमुकल्या जिभेकडून पार पडेलसें मला वाटेना.

बराच वेळ आम्ही एकमेकांकडे पाहत होतों आणि नव्हतोंहि..

"राग आला का आपल्याला?" बाईनें आपण होऊन सुरवात केली.

मी उत्तरादाखल मानेला हिसके देऊन 'गर्दन घुमाना' म्हणून जो एक मानेच्या व्यायामाचा प्रकार आहे त्याची थोडीशी कवाईत केली.

"मी यायला नको होतं खरं म्हटलं म्हणजे-" बाकाच्या पाठीशीं खेळत ती म्हणाली.

इतकें समजत होतें तर मग खरें म्हटलें म्हणजे आलांतच कशाला?

"आपण रागावणार नाहीं म्हणून मीं हें धाडस केलं—" ती म्हणाली.

छान केलेंत. असेंच करीत जावें म्हणजे लोक शहाणे म्हणतात!

"तुम्ही कांहींच बोलत नाहीं?" अर्धवट माझ्याकडे पाहत ती पुढें म्हणाली.

"ऊं—बोलतों कीं न बोलायला काय झालं?" म्हणून पुन्हा मी गप्प बसलों.

"तुम्हांला जर माझं येणं योग्य वाटत नसेल तर—" म्हणून ती उठूं लागली. मला एकदम आशा वाटूं लागली; पण तोंडानें जा कसें म्हणावें?

"छे, छे! तसं कांहीं नाहीं—" म्हणून मी दरवाजाकडे आशाळभुतासारखा पाहत म्हणालों.

"मग हरकत नाहीं." म्हणून पुन्हा बाईनें आसन ठोकलें.

बराच वेळ कोणी कांहींच बोललें नाहीं. घरांत मधूचा आवाज स्टोव्हच्या आवाजाशीं समरस होत होता. मध्येंच सरस्वती त्याच्या पाठीवर

ताल धरीत होती. मला भीति वाटत होती तिचीच. आली बाहेर तर काय घ्या!

" मी आपल्याकडे कांहीं कारणानं आलें आहें. 'फुलवन्ती' मासिकांत नारायण वा. आपटे ह्यांच्या गोष्टी येतात ते आपणच ना?" तिनें सुरवात केली.

" हो—कां बरं?" मी म्हणालों.

" आपल्या नांवावर आतांपर्यंत मला वाटतं दोनतीन गोष्टी ह्या मासिकांत आल्या आहेत. तिन्हीहि गोष्टींतून तुम्हीं आमच्या धंद्याविषयीं थोडंफार लिहिलं आहे. मला आश्चर्य वाटतं, कीं आमच्या धंद्याविषयीं आम्हांला तिटकारा वाटतो असं तुम्हांला कुणीं सांगितलं?" ती म्हणाली.

" मला नाहीं समजलं तुम्ही काय म्हणतां ते." मी गोंधळून म्हणालों.

" जास्त स्पष्ट सांगायचं म्हणजे तुमच्या नायिका सगळ्या आमच्या पंथांतल्या आहेत; पण त्यांचे स्वभाव आमच्या पेशाला बिलकुल जुळत नाहींत! मला जें वाटतं तें मी सांगतें हो. तुमच्या सगळ्या नायिका अगदीं शुद्ध गरती बाया दिसतात. तुम्ही म्हणतां म्हणूनच केवळ त्यांना वेश्या म्हणायचं. सगळे आचारविचार आमच्या धंद्याला शोभणारे नाहींत!"

हिनें तर बोलतां बोलतां मला अप्रबुद्ध ठरविण्याचाच घाट घातला होता. आम्हां लेखकांच्या स्वाभिमानावर असा घाव घातलेला आम्हांला बिलकुल पसंत पडत नाहीं. मी किंचित् ताठर आवाजांत म्हणालों,

" आम्ही लिहितों तशा गोष्टी घडलेल्या तुम्हीं स्वतः पाहिलेल्या नसल्या म्हणजे त्या घडल्या नाहींत, किंवा घडणं असंभवनीय आहे, असा आरोप करणं धाडसाचं नाहीं का होणार? आम्ही लिहितों म्हणजे उगीच काळ्यावर पांढरं अ ऽऽऽ—पांढऱ्यावर काळं करतों असा का तुमचा समज आहे?"

" मी पुन्हा सांगतें ना, कीं माझं कांहीं म्हणणं नाहीं; मला वाटलं कीं तुमची कदाचित् थोडीशी गैरसमजूत झालेली असावी. आम्हांला ज्याप्रमाणं तुमच्या धंद्यांतलं कांहीं कळत नाहीं त्याप्रमाणं मला वाटलं तुम्हांलाहि आमच्या धंद्यांतलं फारसं कळत नसावं." म्हणून बाई अर्धवट हसून माझ्याकडे पाहूं लागली. मला तिचें म्हणणें पटूं लागलें. खरें सांगायचें

म्हटलें तर मला काय माहीत होतें ? पण लेखनाच्या व्यवसायांत भ्रमण करणारा श्री. आपटे, बी. ए., एल्‌एल्‌. बी. आपल्याला सर्व कांहीं माहिती आहे ह्याच कल्पनेंत होता ! त्याची समजूत करणें कठीण होतें.

"पण हा निंद्य धंदा वंद्य कसा वाटेल ?" लेखक श्री. आपटे, बी. ए., एल्‌एल्‌. बी. म्हणाले.

"कां बरं ? धंदा निंद्य कां होईल ? जो धंदा पैसा मिळवून देतो तो धंदा निंद्य कां ? तसं म्हणायचं तर जगांतले सगळेच धंदे निंद्य ठरतील ! महिन्याकांठीं साठ रुपये मिळण्याच्या लालुचीनं दररोज आठ-दहा तास 'साहेब, साहेब' करीत साहेबाची थुंकी झेलणारा नोकर काय वंद्य समजायचा ? राग मानूं नका,—पण वकिलीच्या धंद्याविषयीं तुम्हांला काय अनुभव आहे ?" ती हसून म्हणाली.

मी दचकलों. बाई माझ्या गरीब स्वभावाचा फाजील फायदा घेऊं लागली. भरमसाट विधानें ठोकूं लागली.

"वकील सुशिक्षित असतात." मी शिक्षणाच्या पाठीमागें दडून म्हणालों.

"म्हणूनच त्यांना जास्त दूर ठेवणं फायद्याचं आहे. आमच्यासारख्या अडाणी लोकांना निदान एखादे वेळेला तरी तसं वाटतं; पण शिकलेल्या माणसाचे विचार फार भयंकर असतात. माझा स्वतःचा अनुभव—" म्हणून ती कांहीं तरी पुढें बोलणार होती; पण तिचे अनुभव ऐकण्याची माझी इच्छा नव्हती. सुशिक्षित समाज नेहमीं अशिक्षित समाजाच्या दोषारोपांना पात्र असतो. अशिक्षित माणसानें दहा पापें केलीं तरी खपतें पण सुशिक्षित माणसानें एक पाप केलें तरी दृष्टीसमोर येतें. जणुं काय सुशिक्षित माणूस म्हणजे भावनाशून्य, चेतनारहित दगडाचा तुकडाच !

"पण त्याच्याशीं तूर्त आपल्याला कांहींच कर्तव्य नाहीं." मी मध्येंच म्हणालों.

"मला मुख्य सांगायचं तें हेंच, कीं पैसा कोणत्याहि रीतीनं मिळाला तरी तो पाहिजेच आहे. तुम्ही शिकलेले लोक पैसा हा रोग समजतां. पैशाचा मोह कुणाला सुटला आहे ? तुम्ही वकिलीच्या धंद्यांत जेव्हां प्रथम शिरलांत त्या वेळेला ह्या धंद्याची आवड म्हणून का शिरलांत ? पैसा मिळविण्याचं साधन म्हणूनच कुणी झालं तरी कोणत्याहि धंद्याला हात घालतो ना ?

पैशाचा तिटकारा येण्याचं कारण काय? पैसा आहे तर सर्व आहे. पैसा नाहीं तर विचारतो कोण? तुमच्या नायिका पैशाचा तिटकारा करणाऱ्या आहेत! धंद्याबद्दल तिटकारा वाटण्याचं कारण पैसा हेंच ना? तिथंच तुमचं चुकलं. कोणतीहि गणिका पैसा नको म्हणून जीव गेला तरी म्हणणार नाहीं. गणिका बाजूला केली तरी बाकीचे लोक तरी काय पैसा नको म्हणून म्हणतील? गोष्ट कशाला! धंद्याबद्दल प्रेम कुणालाच नसतं; पण धंद्यापोटीं पैसा असतो त्या पैशाबद्दल प्रेम; आणि म्हणूनच धंदा निंद्य नाहीं!"

मी 'आ' करून तिच्याकडे पाहूं लागलों. या महामायेला एवढें ज्ञान आले कोठून? का ज्ञान शिकायला रोजच्या घडामोडी पुरे होतात. आणि मी आपली फसवणूक करून घेत होतों का? मी या वकिलीच्या धंद्यांत कां शिरलों? पैशाची आवड म्हणूनच मीं धंद्याला हात घातला. मग या बाईला नांवें ठेवून काय उपयोग?

"पण पैशाकरितां नीतिमत्तेवर घाव घालणं जरा—" मी बोलतांना थांबलों. कारण एवढे लठ्ठ शब्द हिला समजतात का तरी? माझी कल्पना चुकीची झाली.

"नीतिमत्ता बिघडते? आश्चर्य आहे बाई. सिनेमाकंपन्या आणि रेसेस यांनीं नीतिमत्ता अगदीं टिकून राहत असेल, नाहीं? सिनेमासारख्या हलकट धंद्याला तुम्ही उत्तेजन देतां. रेसेसमध्यें पैसे मिळविणाऱ्या एखाद्या शुंभाचे वर्तमानपत्रांतून फोटो देतां, आणि त्याच्याभोंवतीं गोंडा घोळतां! तें सगळं चालतं; आणि वेश्यांच्या उद्धाराविषयीं कळकळ दाखवतां! मला वाटतं, तुम्हीं शिकलेल्या लोकांनीं आमच्या धंद्याकडे इतक्या चौकस बुद्धीनं पाहण्याची कांहीं जरूरीच नाहीं! समजा, तुम्ही सगळ्या वेश्या पावन करून घेतल्यात—शक्य नाहीं तें—पण घटकाभर तसं धरून चालूं—तुम्हांला काय वाटतं, कीं यामुळं समाजाची नीतिमत्ता सुधारेल? माझं एका वेडीचं ऐका, वकीलसाहेब! लपंडावी खेळापेक्षां उघडउघड शिवा-शिवी केव्हांहि उत्तम! आज लोकांमध्यें लपून-छपून जे प्रकार चालतात त्यांना आमच्यामुळं पुष्कळच आळा बसतो आहे; आणि आम्हीच जर तिथं नाहीं तर? जगामध्यें सगळी माणसं एकाच मताचीं नसतात. जग सुधारण्याची तुमची कल्पना कधींहि फळाला येणं शक्य नाहीं. समाजांतल्या

पशूंना वाट करून देणं तुम्हांला भाग पडेल; आणि त्यांची सोय काय करणार ? मी उघड बोलतें, राग मानूं नका."

तिनें आपलें भापण थांबवल्याबरोबर माझ्या जिवांत जीव आला. तिचें म्हणणें खरोखरीच सार्थ असूं शकेल काय ?

" या गोष्टी इतक्या नाजुक असतात, कीं उघडपणं बोलणारा मूर्ख ठरतो. ज्या वेश्येला आपला धंदा आवडत नसेल आणि पैशाची सोय निराळ्या संभावित रीतीनें होत असेल तिला मार्ग मोकळा आहे. ज्याचा त्यानं उद्धार करून घ्यावा." ती म्हणाली.

" तें मला कबूल आहे; पण असं पहा, कीं समजा—एक बाई आपला उद्धार करूं पाहते आहे. म्हणजे तिला कोणाचा तरी आश्रय लागणारच. एखाद्याशीं लग्न करण्याची तिनं इच्छा दर्शविली तर समाज त्या लग्नाला संमति देईल का ?" मी म्हणालों.

ती थोडा वेळ विचारांत पडल्यासारखी दिसली.

" असं पहा,—समाज, समाज म्हणजे काय ? चारदोन आजूबाजूचे लोक हाच कीं नाहीं ? त्या पुरुषानं खुशाल तिच्याशीं लग्न लावावं. चार दिवस लोक नांवं ठेवतील, नाहीं असं नाहीं; पण पैसा असेल तर ती अडचण येणारच नाहीं. आपणहि चार दिवस फटकून राहावं. मला त्यांतलं फारसं समजत नाहीं; पण मला वाटतं, एखाद्या मुलीनं जर दुसऱ्या जातींतल्या मुलाशीं लग्न लावलं तर आपण काय करतों ? 'बरं नाहीं असं करणं' म्हणून म्हणतों; पण त्यांचं कांहीं नडतं का ? कांहीं नाहीं. इच्छा असेल तर मार्ग हजारों सांपडतात. तुम्ही लोक लोक म्हणून ओरडतां. लोकांना कुठं तुमची गरज आहे ? त्यांना त्यांचेहि उद्योग असतातच कीं ! मुख्य सांगायचं हें, कीं वेश्यांना त्यांचं हित चांगलं कळतं आहे. त्यांना दुसऱ्याच्या उपदेशाची कांहीं गरज नाहीं !"

पुन्हा बराच वेळ आम्ही दोघेंहि स्तब्ध होतों. घरांत स्टोव्हचा आवाज बंद झाल्याबरोबर मी खुर्चीवरून उठलों. ती बाई समजून तत्काळ उठली.

" वकीलसाहेब, माझ्या अजाण बुद्धीला जें वाटलं तें मी बोललें; त्याचा राग मानूं नका. तुम्ही धंदेवाईक आहांत, मीहि धंदेवाईक ! धंदे-

वाइकानं धंदेवाइकाला मदत करायची असते, एकमेकांच्या उद्धाराची काळजी बाळगायची असते; आणि शेजारी या नात्यानं मी चार शब्द बोललें." असें म्हणून ती जाऊं लागली.

मी विचार करूं लागलों, कीं अशीं अजाण बुद्धीचीं दहा माणसें निघालीं तरी दहा हजार सुजाण माणसांना पळ काढावा लागेल. 'शेजारी या नात्यानें !' खरें आहे.—काय शेजार आहे पण ?

"हो ! राहिलंच एक. आमच्या घर-मालकाचं ह्या महिन्याचं भाडं बुडवून मी आज मुंबईला पळून जाणार आहे. माझ्यावर खटलाबिटला कांहीं करतां येणार नाहीं ना त्याला ?" म्हणून दरवाजांत ती थबकून उभी राहिली.

"मुंबईला जाणार ? छान ! आधीं पळा, नाहीं तर खटला होईल तुमच्यावर !" म्हणून मी शान्तपणानें म्हणालों. बरी पीडा जाते आहे. आपल्या ज्ञानाचा हिला फायदा देऊन काय उपयोग ? ती जिन्यांत पाऊल टाकणार इतक्यांत मला आठवण झाली, कीं या बाईचें शिक्षण कोठपर्यंत झालें आहे ह्याची तरी चौकशी करावी. कारण माझ्या सगळ्या नायिका कॉलेजांतल्या !

"थोडं थांबतां का ? काम नाहीं कांहीं. फक्त मला तुम्हांला विचारावंसं वाटतंय्, कीं तुम्ही कुठपर्यंत शिकलां आहांत ?" मी म्हणालों.

"गायला का ?" म्हणून तिनें प्रश्न केला.

"छे: छे: ! मी म्हणतों किती वर्षे शाळेंत किंवा कॉलेजांत—?" मी थांबलों. ती मोठ्यानें हसूं लागली.

"माझ्या आतांच्या बोलण्यावरून म्हणतां होय ? मी आणि शिक्षण ? वकीलसाहेब, ह्या गोष्टी शिकायला शाळेंत जावं लागत नाहीं. आज या जगांत माझीं उणींपुरीं पंचवीस वर्षे झालेलीं आहेत. शाळेचं आणि आमच्या धंद्याचं वाकडं आहे—" इतकें बोलून ती निघून गेली.

मुंबईला पळून गेली का आणखी वाटेंत ॲक्सिडेंट होऊन मेली—दोन्हीहि गोष्टी मला सारख्याच !

कपबश्या वाजूं लागल्यामुळें मी दरवाजाला आंतून कडी घालून आंत गेलों. सरस्वतीनें चहा गाळतां गाळतां माझ्याकडे पाहिलें.

"कोणी आलं होतं ?" म्हणून तिनें प्रश्न केला.

“ हूं—धंदेवाईक मंडळी ! तो चहा जमिनीवर चालला आहे बघ—” मीं उत्तर केलें.

—४—

ज्यांना निव्वळ करमणूक पाहिजे असेल त्यांनीं खालील भाग वाचण्याची तसदी घेऊं नये. ज्यांना गोष्ट वाचल्यानंतर लेखकाच्या मनांत कांहीं नसलें तरी उगीचच तत्त्वशोधन करण्याचा छंद असतो किंवा ज्यांना सबंध गोष्ट वाचण्याची सवड अगर इच्छा नसते त्यांच्याकरितां सोयः—

( श्री ) धंद्याची आवड अशी कुणालाच नसते. पण धंद्यापोटीं पैसा असतो, आणि पैशाबद्दल प्रेम—म्हणून धंदा असा कोणताच निंद्य नाहीं !

( आ ) पैसा अनिष्ट म्हणणें चूक आहे. पैसा आहे तर सर्व कांहीं आहे. कोणाच्याहि पैसा मिळविण्याच्या मार्गांत आड येणें पाप आहे !

( प ) गणिका वगैरे धंदेवाईक मंडळींच्या उद्धाराची तळमळ बाळगण्याची आपल्याला कांहींच गरज नाहीं. ज्याचें त्याला हित छान कळतें. आपलें शहाणपण दाखविण्याच्या नसत्या फंदांत पडूं नये !

( टे ) गोष्ट सबंध वाचावी, म्हणजे इतर किरकोळ गोष्टी चांगल्या समजतील !



# निष्प्रेम आयुष्य : : ३८

आमच्या भाईची खोली म्हणजे लहानशा प्रमाणावर एक अजब-बंगलाच होता. आजकालच्या तरुणाला लागणारे सर्व जिन्नस खोलींत असूनहि ते लागतील त्या वेळेस सांपडतील असा भरंवसा मात्र नव्हता. एका कोपऱ्यांत टेबल असून त्यावर खादीचा रुमाल असे. त्यावर एकदोन फोटो असून घड्याळ ठेवण्यासाठीं कथलाचा नाग होता. तो नाग भाईच्या मृत आप्तापैकीं एकाचा असून, त्याचें प्रेमळ स्मृतिचिन्ह म्हणून भाईनें तो जिवापलीकडे जतन करून ठेवला होता. भिंतीवर दोनचार सुंदर स्त्रियांचीं चित्रें असलेलीं कॅलेंडरें असून सर्वांवरील तारखा मात्र मुंबईतील लोकांप्रमाणें एकमेकींशीं फटकून वागतांना दिसत. भिंतीवर ठिकठिकाणीं कांहीं तरी

लिहिलेलें असे. एका भिंतीवर दूध सुरू केल्याची तारीख तर दुसरीवर गडी सुटल्याचा दिवस. तिसरीवर धुण्यास दिलेल्या कपड्यांची याद तर चौथीवर आठवड्याच्या 'एंगेजमेंट्स' व खाणावळीचे खाडे. असल्या घोटाळ्याच्या चक्रव्यूहांतून भाईच्या हिशेबाची गाडी सुरक्षितपणें थेट पल्ल्यापर्यंत कशी जात असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. अर्थात् वाजवीपेक्षां जास्त पैसे सर्वांना मिळून त्याची दाद या 'शेठ'ला कधींच नसे.

असल्या बेबंदशाहींतसुद्धां भाई दोन गोष्टींबद्दल अतिशय दक्ष असे. त्यांपैकीं पहिली गोष्ट म्हणजे चहा व दुसरी विडी. या दोन्ही 'खात्यां'तील टापटीप व स्वच्छता खोलीच्या इतर व्यवस्थित अंदाधुंदीला बट्टा लावण्या-सारखी असे. चहासाठीं कपबश्यांचा एक मौल्यवान् 'सेट' असून त्यावर एकहि डाग सांपडणें अशक्य होतें.

शनिवारचा दिवस. भाई अडीच वाजतां ऑफिसांतून येऊन आपल्या चहाच्या खात्याकडे प्रेमानें पाहत होता. हातांत सिगारेट असून तोंडानें हुशूहुशू करीत खोलींत त्याच्या खेपा सुरू होत्या. हळुहळू त्यानें कपडे काढण्यास सुरवात केली. टाय्-कॉलर पलंगावर फेकून कोट खुर्चीवर लटका-वला, आणि बूट काढून मध्येंच ठेवून त्यांतच पायमोजे कोंबले व स्वारी हातपाय धुण्यासाठीं मोरींत गेली. सर्व व्यवस्थितपणें झाल्यावर त्यानें स्टोव्ह पेटवून आधण ठेविलें, व तो शेजारच्या खोलींत जाण्यासाठीं निघणार इतक्यांत एक भला मोठा कुत्रा व एक आठ-नऊ वर्षांची सुंदर मुलगी त्याच्या खोलींत शिरली.

"वा रे दोस्त, किती उशीर केलास!" असें म्हणून भाईनें कुत्र्यास आपल्याजवळ ओढलें व तो त्याच्याशीं प्रेमानें खेळूं लागला. या दोघांचा खेळ चालूं असतांना ती बिचारी बालिका पलंगावर जाऊन बसली. कांहीं वेळानंतर तिच्यानें राहवेना. ती पाय आपटीत भाईजवळ आली व कुत्र्यास दूर सारून त्याला म्हणाली, 'हें काय भाई, तुझा आपला जेव्हां तेव्हां रोव्हर. तुझा आवाज ऐकून मी धांवत आलें तें राहिलं एकीकडे, अन् तूं त्या मेल्या रोव्हरशीं गप्पा मारतोस! मी नाहीं अशानं तुझ्याशीं बोलायची. पण भाई, तुला रोव्हरच कां आवडतो इतका? तो शाळेंत जातो, का तुझ्या खोलींतलं सामान आवरतो? हे पहा तुझे बूट, कसे मध्येंच दिलेस ते टाकून. तसाच हा तुझा कोट अन् टाय. खुर्चीवर अन् पलंगावर कपडे

ठेवल्यावर खुंटीवर निजायबसायचा बेत आहे वाटतं ?" ही वटवट तोंडानें चालू असतांना गुलाब सर्व वस्तु जागच्याजागीं ठेवीत होती.

"ओहो, ओहो, आजीबाई! माफ करा बुवा आमची चूक. पण काय ग गुलाब, तुझ्या आधीं रोव्हर आला, आणि मी जरासा त्याच्याशीं बोललों त्यांत तुझं काय बिनसलं ग ? मी पहिल्यानं तुझ्याशीं बोलावं असं वाटत होतं तर तूं त्याच्याआधीं कां आली नाहींस ?" असें म्हणून भाईनें तिला जवळ ओढलें व तिचा मुका घेतला.

"पण भाई, तूं आंत आलास तेव्हां बाहेरच्या पाटीवर 'इन्' करण्याचं विसरलास, तें मी करीत होतें. इतक्यांत हा मेला रोव्हर आंत आला त्याला मी काय करूं ?"

हें त्यांचें बोलणें चाललें असतांना बिचारा रोव्हर हिरमुसलें तोंड करून कोपऱ्यांत जाऊन बसला--जणुं काय गुलाबचें बोलणें त्याला समजतच होतें. तें पाहून गुलाब त्याच्याजवळ गेली व आपले चिमुकले हात त्याच्या गळ्यांत घालून म्हणाली, "रोव्हर, तूं रागावला आहेस वाटतं ? अरे, मीं तुझी थट्टा केली. वेडा कुठला! अजून तुला एवढंसुद्धां कळत नाहीं ना? शुद्ध जनावर आहे नुसता. भाई, याला बोलाव ना रे तिकडे. पहा कसा फुरंगटून बसला आहे तो!"

रोव्हर लगेच उठला आणि आपण गुलाबला कसें 'बनविलें' अशा दृष्टीनें तिच्याकडे पाहत भाईच्या खुर्चीकडे गेला. गुलाबचें लक्ष कॅलेंडरकडे गेलें. तेव्हां ती खदखदां हसून म्हणाली, "शाबास! भाई, तूं जगाच्या किती तरी मागं आहेस रे ? थांब, मी तुला जगाच्या बरोबर आणतें. यावर हें रे काय लिहिलं आहेस ? हिशेब वाटतं--दोन रुपये सिगरेट, चोवीस रुपये पाईप, इश्श! मी नाहीं वाचत हें. सव्वा रुपया चहाचा डबा......"

हें ऐकतांच भाई ताड्कन् उठला व स्टोव्हपाशीं जाऊन म्हणाला, "ए गुलाब, पाणी उकळून करपूनसुद्धां गेलं." असें म्हणून त्यानें आधण चहादाणींत ओतलें व गुलाबला लक्ष देण्यास सांगून तो कुणाला तरी बोलावण्यास निघून गेला.

— २ —

भाईचे वडील मूळचे वाईचे, पण पोटापाण्याच्या उद्योगासाठीं ते दक्षिणेंतील एका संस्थानांत येऊन राहिले होते. पूर्वीच्या मानानें त्यांचें शिक्षण

बरेंच झालें असल्यामुळें त्यांना नोकरीसाठीं फारशी दगदग पडली नाहीं. संस्थानांतली नोकरी असूनहि त्यांचीं नोकरीचीं पंचवीस वर्षें नीटपणें भरून अखेरीस सरकारांतून त्यांना बरीचशी जमीन चांगल्या कामाबद्दल इनाम मिळाली होती ! पंधरा रुपयांपासून वाढत जाऊन पेन्शनच्या वेळेस त्यांना पांचशें रुपये पगार झाला होता. जिल्ह्याच्या न्यायाधिशापासून तों तालुक्याच्या सिव्हिल सर्जनचें कामसुद्धां त्यांना करावें लागलें—करतां कसें ? एकदां सरकारी हुकूम आल्यावर तें काम केलें नाहीं तर आजपर्यंतच्या नोकरीवर पाणी पडावयाचें. असा विचार करून ते कामावर रुजू तर झाले. पण न्यायाधिशाचा डॉक्टर झाल्यावर त्यांनीं ताबडतोब पेन्शन घेतलें आणि स्वतःबरोबर इतरांच्या जिवांवरचें संकट टाळलें.

बाबासाहेबांची पहिली बायको स्वर्गस्थ होऊन आज वीस वर्षें झालीं होतीं. आपला कथानायक भाई हा त्या वेळीं सारा तीन वर्षांचा होता. आईच्या चेहऱ्याच्या पुसट रूपरेषासुद्धां त्याच्या स्मृतिपटलावर आज राहिल्या नव्हत्या. जगरहाटीप्रमाणें भाईला लवकरच सावत्र आई आली. पहिल्यानें उमाबाई भाईवर बरेंच प्रेम दाखवूं लागल्या. पण लवकरच सर्व प्रेमाचा ओघ स्वतःच्या मुलीकडे साहजिकपणेंच वळून भाईच्या खऱ्या जाचाला सुरवात झाली. भाई प्रेमानें पाळण्याकडे गेलाच, तर 'चल, दूर हो कारट्या' म्हणून उमाबाई दोन धपाटे घालीत; त्यामुळें ताईचें कौतुक भाईला बहुतेक लांबूनच करावें लागे. त्याच्या टाळया ऐकून ताई हसली तर भाईला अतोनात आनंद होई. सख्ख्या-सावत्राचा दुष्ट भेदभाव चिमुकल्या ताईस माहीत नसल्यानें ती बरेच वेळां हात लांब करून त्याच्याकडे जाण्याची धडपड करी, आणि जवळपास उमाबाई नाहींत असें पाहून भाईसुद्धां एखाद्या वेळेस ताईला जवळ घेऊन तिचे यथास्थित मुके घेई. असली पर्वणी बरेच दिवसांनीं येत असल्याकारणानें पुष्कळ महिने पुरतील इतक्या मुक्यांचा सांठा घेऊन ठेवण्यासाठीं कीं काय भाईला ताईचे खूपसे मुके घेणें भाग पडे; आणि अशा वेळेस एखादे वेळीं ताई त्रासून रडली तर उमाबाई ताबडतोब येऊन भाईच्या दोन मुस्कटांत मारून सर्व मुक्यांची किंमत वसूल करीत. 'आतां पोरीला हात तर लाव, कीं चटकाच देतें गाढवा!' असें त्या म्हणत. ताईचा 'पापा' ही जिन्नस इतकी महाग झाली असूनहि भाईनें एके दिवशीं तिचा मुका घेतला, आणि उमाबाईनीं खरोखरीच त्याच्या

कोमल हाताला चटका दिला. त्यापुढें मात्र असा 'चटकदार' पापा घेण्याच्या भानगडींत भाई कधींच पडला नाहीं.

अशा रीतीनें आयुष्य चाललें असतांना भाई मराठी शाळेंतील शिक्षण संपवून इंग्रजी शाळेंत जाऊं लागला. उमाबाईचा दोन वर्षांचा पाळणा असल्यामुळें ताईच्या वयाबरोबर तिची भावंडेंहि वाढूं लागलीं. ताई हळू-हळू आईच्या तालमींत तयार होऊन भाईला त्रास देण्यांत आईला हातभार लावूं लागली. ताईचें वळण गिरवून तिचीं लहान भावंडेंहि या पवित्र कार्यांत मदत करूं लागलीं. भाई हें सर्व कांहीं सहन करी; पण जन्मभर दुनियेचा न्याय करीत असलेल्या बाबांकडे आपल्या अन्यायाची गंधवार्तासुद्धां त्यानें नेली नाहीं.

परंतु या त्रासाचा परिणाम भाईवर झाल्याशिवाय राहिला नाहीं. नेहमीं मनांत कुढल्यामुळें त्याच्या शरिराची वाढ व्हावी तशी झाली नाहीं— आणि मनानें तर तो अतिशय उदास झाला. घरचा त्रास असह्य झाल्यावर एकीकडे जाऊन रडतांना त्याला कुणीं पाहिलें असतें तर त्याचें-सुद्धां अंतःकरण द्रवलें असतें. घरीं सुखाचा शब्द दुर्मिळ झाल्यामुळें तो बाहेरच असे.

हळूहळू भाईचें बालपण संपून तो पुण्याच्या हायस्कुलांत आला. पण इतर मुलांप्रमाणें त्याला घरून खाऊचा डबा येत नसे, किंवा बोटभर चिठ्ठी त्याच्या वाटेस जात नसे. सुट्टी आली, कीं सर्व मुलें घरीं जाण्यासाठीं उत्सुक होत, पण भाई तेवढा खिन्न मनानें आपल्या खोलींत बसे. भाईची सख्खी आई असती, तर सुट्टीच्या दिवशीं टांग्याच्या घरघरीकडे तिचे डोळे लागून राहिले असते; भाई घरीं आल्यावर आपल्या आवाजांतील स्वर्गीय संगीतांत तिनें 'खुशाल आहेस ना बाळ ?' असें म्हणून भाईच्या मस्तकावर आपला प्रेमळ हात फिरवून त्याच्या सात्त्विक स्पर्शानें भाईचा ललाटलेख किती तरी उज्ज्वल केला असता; पण—!

कांहीं वर्षांनीं भाई बी. ए. झाला. पण घरीं कांहीं ओढा नसल्यानें वकिली करून उमाबाईच्या सहवासांत त्यानें यापुढें राहणें अगदीं अशक्य होतें. संस्थानांतील नोकरी करून जन्मभर महाराजांची हांजी हांजी करणें तर त्याला नकोच होतें. तेव्हां कोणाचेंच न ऐकतां नोकरीच्या निमित्तानें तो मुंबईस गेला. 'आतां कशाला रहाल घरीं बी. ए. झाल्यावर ? आमची

कशाला पर्वा कराल ? नको ग बाई हें शिक्षण ! यानं पोरं बिघडून आई-बापांविषयीं त्यांचं प्रेमच मुळीं कमी होतं. आतांपर्यंत ममतेनं वागवलं–कुणाला खरंसुद्धां वाटलं नसेल, कीं मी याची सावत्र आई आहे म्हणून–शिकवलं, तऱ्हेतऱ्हेचे लाड केले, पण त्याचं फळ काय– तर म्हातारपणीं आम्हांला टाकलं. म्हणे मी व्यापार शिकणार आहे ! आपण काय वाणी कीं मारवाडी आहों ?–जा मेल्या–कधीं तुझं चांगलं व्हायचं नाहीं.'

उमाबाईचा हा 'आशीर्वाद' (?) घेऊन भाई निघाला तो त्यानें थेट मुंबई गांठली. कुणाची ओळख नाहीं, कोणी मदत करायला नाहीं, अशा स्थितींत भाईला काय वाटलें असेल याची कल्पना वाचकांनींच करावी. दिवसभर वणवण हिंडावें, पांच-पंचवीस ऑफिसांत जावें, आणि रिक्त हस्तें संध्याकाळीं परत यावें. हळूहळू खिशांतले पैसे संपुष्टांत येऊं लागले. घरून होतां होईतोंपर्यंत पैसे मागवावयाचे नाहींत, ही भाईची प्रतिज्ञा असल्यामुळें तो फारच बेतानें खर्च करी. एक वेळेला जेवून तो पैसे वांचवूं लागला. वाटेल तितकें लांब जावयाचें असले तरी तो ट्रॅमनें न जातां पायींच जात असे. पण जवळ असलेले पैसे दोन दिवसांनीं संपण्याची वेळ आली. तेव्हां आपल्या वडिलांच्या स्नेह्यांकडे जाऊन त्यांच्याकडे कांहीं जमलें तर पहावें, म्हणून तो कांहीं स्नेह्यांकडे गेला. पण मुंबईचे लोक ते ! ते भाईला काय दाद देतात ? त्यांपैकीं एकानेंहि भाईला मदत केली नाहीं. इतकेंच नव्हे तर त्याला तसेंच घरीं परत जाऊन वकिलीचा अभ्यास कर म्हणून सांगितले.

आणखी आठ दिवसांनीं भाईनें आपल्या वडिलांस एक पत्र लिहिलें. पहिल्यानें बराच मजकूर झाल्यावर खालीलप्रमाणें त्यानें लिहिलें होतें,

"...आठ दिवसांपूर्वी मी संध्याकाळीं फिरायला निघालों होतों. मन अतिशय खिन्न असून डोकें विचारांनीं फुटून जाण्याची वेळ आली. महालक्ष्मी बॅटरीवरून रेसकोर्सकडे जात असतां रस्त्यावरून एक आठ-नऊ वर्षांची सुंदर मुलगी मला दिसली. तिचा पोषाख साधा असून, ती रडत असावी असें मला वाटल्यावरून मी तिच्याजवळ गेलों. ती शेजारच्या बंगल्यांत राहणारी मुलगी असून, रुसून एकटी जात आहे असें मला पहिल्यानें वाटलें; पण जवळ जाऊन पाहतों तों तिचे कपडे फाटलेले अगर फाडलेले दिसले. मी जवळ येतांच तिनें मला एकदम मिठी मारून मोठ्यानें रडण्यास आरंभ केला. मुलगी लहान असली तरी चुणचुणीत व बरीच धीट होती. बराच वेळ

तिच्या तोंडांतून अक्षर निघेना. पण तिला खाऊ वगैरे दिल्यावर तिनें आपली हकीकत सांगितली, व आपल्या ठिकाणाचा बिनचूक पत्ता सांगितला. ती मुलगी सर्व मंडळीबरोबर बाबुलनाथाच्या जत्रेला गेली असतांना मंडळीची व तिची चुकामूक झाली. आणि तिच्या अंगावर थोडेसे दागिने होते त्यांच्या लोभानें एका भामट्यानें तिला घरीं पोंहोचवितों असें सांगून तिला महालक्ष्मीच्या बाजूला नेऊन सोडली.

"मी तिला घरीं घेऊन गेलों त्या वेळेस रात्रीं नऊ वाजून गेले होते. आम्हांला पाहतांच तिच्या आईबापांना किती आनंद झाला असेल याची कल्पना आपणांवरच सोंपवितों. मला रात्रीं तेथेंच जेवावे लागलें. तोंपर्यंत मीं माझी कहाणी त्यांना सांगितली नव्हती; पण जेवतांना मला ती सर्व सांगावी लागली; व त्यानंतर त्यांनीं मला आपल्या घरींच राहवून घेतलें. गुलाब—हरवलेली मुलगी—तर माझा गळा सोडीना. त्यांचें घर मुंबईच्या मानानें मोठें असून त्यापैकीं एक खोली मला मिळाली. शिवाय शामरावांच्या—गुलाबच्या वडिलांच्या— वशिल्याने मला ताबडतोब एका इंग्रजी कंपनींत नोकरी मिळाली. त्या कंपनीचा रंग व औषधें वगैरेंचा मोठा व्यापार आहे. शामराव एका सॉलिसिटरकडे असून माझ्या कंपनीचे सर्व कज्जे त्यांच्याकडे जातात. आणि म्हणूनच ही नोकरी मला इतक्या सहज रीतीनें मिळाली. मुंबईमध्यें वशिल्याशिवाय पान हालत नाहीं."

शामरावांच्या घरांत अगदीं मोजकीं माणसें होतीं. ते, त्यांची पत्नी मालतीबाई, वडील मुलगी रतन व धाकटी गुलाब. त्यांना पशु व पक्षी यांचा नाद असल्यानें त्यांच्या येथें दोनतीन कुत्रीं व एखादा पोपट, हे नेहमीं असावयाचेच. कुत्र्यांमध्यें रोव्हर नांवाचा एक लठ्ठ व धिप्पाड कुत्रा होता. त्या शहाण्या जनावराच्या अकलेवरून त्याचीसुद्धां जमा शामरावांच्या घरच्या 'माणसां'त करण्यास कांहींच हरकत नाहीं.

ज्या दिवसाची हकीकत आम्ही वाचकांना आरंभीं सांगितली त्या दिवशीं भाईच्या खोलींत सर्वांनीं मिळून चहा घ्यावयाचा असें आधींच ठरलें होतें. आणि म्हणूनच मालतीबाई, रतन वगैरे मंडळींना भाई बोलाविण्यास एवढ्या घाईनें गेला.

— ३ —

भाई खोलींतून गेल्यावर गुलाब एखाद्या प्रौढ बाईप्रमाणें खोलींत

व्यवस्था करूं लागली. टेबलावरील धूळ झाडून त्यावरचीं पुस्तकें तिनें नीट करून टेवलीं. भाईच्या विजारीची घडी करून ती तिनें त्याच्या उशीखालीं ठेवली, आणि सर्व कॅलेंडरांच्या तारखा नीट करून आतां कांहीं करावयाचें उरलें नाहीं असें पाहून ती रोव्हरकडे गेली व त्याचें तोंड आपल्या पुढ्यांत घेऊन त्याला म्हणाली, " रोव्हर, तूं शहाणा ना ? मग कां बरं माझ्यावर रागावलास ? वेडा कुठला !" इतकी लाडीगोडी करूनसुद्धां तो दाद देत नाहीं असें पाहून तिला अतिशय वाईट वाटले, व ती पुनः त्याची मनधरणी करण्याच्या इराद्यानें म्हणाली, "हें रे काय रोव्हर, तूं खरोखरच का अबोला धरलास माझ्याशीं ? पण मी लहान नाहीं का तुझ्यापेक्षां ? भाईसुद्धां मला क्षमा करीत नाहीं का ? तूं शहाणा ना भाईपेक्षां ? मग हास ना गडे ! एकदां बोल ना रोव्हर !" स्वारी वठणीवर आली असें पाहून कीं काय, रोव्हर आपली विशाल शेपटी हालवूं लागला, व आपले तोंड तिच्याकडे करून व तिच्या दृष्टीशीं आपली दृष्टि भिडवून तो तिच्याशीं 'बोलूं' लागला. वाचक हो, निर्व्याज प्रेमाचें यापेक्षां सरस असें दुसरें दृश्य असूं शकेल काय ?

गुलाब व रोव्हर अशा ब्रह्मानंदांत बेहोष असतां त्यांच्या सुखसमाधीचा भंग भाई, मालतीबाई व रतन यांच्या येण्यानें झाला. स्त्रीदाक्षिण्य असलेल्या एखाद्या कॉलेजच्या तरुणाप्रमाणें सर्वांचें स्वागत करून रोव्हरनें आपला मोर्चा कोपऱ्यांतल्या खुर्चीकडे वळविला.

खोलींत आल्याबरोबर रतन साहजिकच चहाखात्याकडे गेली व सर्व तयारी करूं लागली. ती चहा गाळीत असतांना भाई म्हणाला, " काकी, चैन आहे बुवा एका माणसाची ! पण काय ग रतन, तूं उद्यां कुणाकुणाला बोलविलं आहेस ? खोलीच भाड्यानं घेतली पाहिजे एखादी. नाहीं तर बाबांना सांगून दे मला चोवीस तासांची नोटीस म्हणजे बरं! बाबा बांगड्या देणार, काकी नाकांत चमकी घालणार. मग आमच्यासारख्या भावाला कान धरण्याखेरीज मार्गच नाहीं म्हणायचा ! मग मीं 'इअर रिंग' दिले तर तुझी हरकत नाहीं ना ? .पण रतन, त्या तुझ्या वर्गातल्या चॅटरबॉक्सेस् काय ग देणार आहेत तुला ? एक मनुष्य तर अंगठी देणार आहेच; पण त्या माणसाला बोलावणार काय ग ? दे चाट नाहीं तर बेट्याला! त्याच्यावांचून आपलं काय अडलं आहे एवढं तें ? खरं ना गुलाब हें ? पण तूं काय ग देणार आहेस ताईला ?"

" चल, चावट कुठला! भाई बोलायला लागला कीं त्याला सुमार नसतो अगदीं! पण भाई, गुलाबची प्रेझेंट पाहिलीस का तूं? ही अशी प्रेझेंट जन्मभर मिळाल्यावर दुसऱ्याची काय पर्वा?" गुलाबचा मुका घेत रतन म्हणाली.

" हें काय ग ताई, मी आतां लहान का आहे माझा मुका घ्यायला? मी नाहीं जा अशानं--" असें म्हणून ती ताणाताणानें आईकडे गेली. मुलींचें प्रेम पाहून मालतीबाईंच्या डोळ्यांत आनंदाश्रु उभे राहिले, व त्या भरांत त्यांनीं गुलाबचे लागोपाठ मुके घेऊन तिला हृदयाशीं घट्ट धरून ठेविलें. " काकी, तुम्हीसुद्धां गुलाबला लहान समजतां का? ती आणखी सहा सात वर्षांनीं रतनएवढी होईल. मग आपण तिचं लग्न करूं, खरं ना गुलाब?" असें म्हणून भाईनें गुलाबला आपल्याजवळ ओढून तिचे मनसोक्त मुके घेतले. गुलाबनें कशीबशी आपली सुटका करून घेतली, व आपल्या गालावरचे मुके 'पुसून' ती रोव्हरपासूनहि लांब जाऊन बसली. रोव्हरसुद्धां आपले मुके घेईल कीं काय अशी तिला भीति वाटत असावी.

अशा थट्टामस्करींत चहापान चाललें असतां शामराव भाईच्या खोलींत आले व म्हणाले, " माफ करा बुवा भाई, झाला खराच थोडासा उशीर." असें म्हणून एक हातरुमालाची पुरचुंडी मालतीबाईंच्या हातीं देऊन त्यांनीं रतननें आणलेला चहाचा पेला घेतला.

एका डबींत दोन चमक्या असून दुसरींत एक 'इअर रिंग'चा जोड होता. शिवाय नवीन तऱ्हेच्या बांगड्यांचाहि एक जोड होता. त्या सर्व जिनसा सुरेख असून रतनला फार शोभल्या असत्या.

" भाई, ती दुसरी चमकी गुलाबसाठीं बरं का!" गुलाबच्या कानांवर हे शब्द पडतांच तिचा राग पार मावळला, आणि ती उड्या मारीतच चमकी पाहण्यास गेली. तिला जवळ घेऊन शामरावांनीं तिचा मुका घेतला. तेव्हां भाई कुचेष्टेनें म्हणाला, " शामराव, गुलाबचा आतां मुका घेऊं नका बरं! ती आतां मोठी झाली आहे. आत्तांच केवढा राग आला होता बाईसाहेबांना!"

" पहा हो बाबा, भाई कसं करतो तें!" असें म्हणून गुलाबनें भाईची गट्टी 'फू' केली.

— ४ —

सर्व मंडळी निघून गेली खरी, पण भाईची मनःस्थिति मात्र अतिशय अस्वस्थच दिसत होती. त्या प्रेमळ कुटुंबांतल्या माणसांचें एकमेकांवरचें गाढ प्रेम पाहून त्याला आपल्या निष्प्रेम आयुष्याबद्दल अतिशय वाईट वाटूं लागलें. त्याला आपल्या घरच्या मंडळींची आठवण झाली, आणि आपलें सारे जेथल्या तेथें असतांनासुद्धां नुसत्या प्रेमालाच आपण पारखे कां झालों याचें त्याला नवल वाटूं लागलें. मागील कांहीं दुःखद आठवणी होऊन त्याच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले; आणि कांही वेळानें तर तो हुंदके देऊन रडूं लागला. प्रेम! प्रेम!! प्रेम!!! ईश्वरा, भाईनें असे कोणते पाप केलें होते कीं, त्याला प्रेमासाठीं शेंकडों कोस दूर असलेल्या शामरावांच्या घराचा आश्रय करावा लागला?

भाईची ही स्थिति पाहून रोव्हर आपल्या जागेवरून उठला व भाई-जवळ जाऊन त्याच्याकडे नीट लक्षपूर्वक पाहूं लागला. भाईची मनःस्थिति माहीत नसल्यानें त्यालाहि जरा चमत्कारिक वाटले व शेपूट हालवून, उड्या मारून व असल्याच इतर चेष्टा करून त्यानें भाईचें मनोरंजन करण्याचा प्रयत्न केला. पण व्यर्थ! शेवटीं, शोकाचा भर कमी झाल्यावर भाई आपोआप शान्त होईल, असा विचार करून रोव्हर कांहींहि न बोलतां शेजारच्या खुर्चीवर जाऊन बसला. त्याची दृष्टि मात्र सारखी भाईवर होती.

भाईचे विचार जोरांत होते. आयुष्यांतील सर्व वाईट प्रसंगांची त्याला आठवण होत होती. आपण कोणत्या दिवशीं उपाशीं राहिलों, अपराध नसतांना गडीमाणसाच्या देखत आपली कशी संभावना झाली, दुसऱ्याच्या रागावरून भाऊबीजेसारखा मंगल सण, एकुलती एक बहीण असूनहि, ओवाळणीशिवाय कसा गेला,—अरेरे! ज्याला बहीण नाहीं अशा दुर्दैवी माणसाची भाऊबीज अशीच जात असेल नाहीं?—दोनदां आत्महत्येचे प्रयत्न कसे फसले—पुनः आत्महत्या करावी काय? पण बाबांना काय वाटेल? जगण्यासारखें बाबांच्याशिवाय जगांत कोण आहे? आणि त्यांना मी म्हातारपणीं टाकून जाऊं? अद्याप मी कुणाच्या ऋणांतून मुक्त झालों नाहीं, तेव्हां भ्याडपणानें जगांतून जाऊं? बाबा, मालतीबाई, गुलाब, रोव्हर आणि र-त-न यांचा प्रत्येकीं आपल्या एकेका प्राणावर हक्क असतां माझे पंचप्राण देहांतून जातील का? गुलाबला माझ्यामागें कोणता भाई खाऊ देईल? व

रतन–तिचें माझ्यावर खरोखरीच का बहिणीसारखें प्रेम असेल ? कीं बिचारी भलत्याच कल्पनेनें स्वतःला फसवून घेत आहे ? माझें तरी आजकाल भावासारखें प्रेम कुठें आहे तिच्यावर ? माझें खरें प्रेम हृदयांत दाबून टाकून माझी जबाबदारी ओळखून मला वागलें पाहिजे. बहीणभावासारखें प्रेम नुसतें 'दादा-ताई' म्हणून उत्पन्न होतें का ? बिचारीचें लग्न मी येण्या-पूर्वीच ठरल्यामुळें मला माझें प्रेम उघड दाखवतां येत नाहीं. लग्न ठरलेल्या किंवा विवाहित अशा मुलीवर अगर बाईवर प्रेम करणें पाप आहे का ? पण त्यांत कसलें पाप ? त्या प्रेमाला वैषयिक वळण लावलें नाहीं म्हणजे झालें. रतनचें प्रेमसुद्धां कोणत्या तऱ्हेचें आहे हें मला केव्हां तरी समजेलच. खरें प्रेम बाटलींतल्या अत्तरासारखें असते. तें हृदयांत कितीहि बंदोबस्ताने ठेवलें तरी त्याचें अस्तित्व जाहीर झाल्याशिवाय राहत नाहीं—"

भाईचे असे विचार चालू आहेत, डोळ्यांतून अविरल अश्रुधारा सुरू आहेत व हें चित्र रोव्हर पाहत आहे, अशा वेळेस गुलाब हळूच खोलींत येऊन भाईजवळ गेली तरी त्याला समजलें नाहीं. भाई रडतो हें पाहून गुलाबला फार चमत्कारिक वाटलें– जणुं काय रडण्याचा हक्क ईश्वरानें लहान मुलांसच दिला आहे असें तिला वाटले; आणि म्हणूनच भाईला आपण रडतांना पाहूं असें तिला कधींच वाटलें नव्हतें. आल्या पावलींच परत जावें असा विचार करून ती न बोलतां फिरणार इतक्यांत भाईचें लक्ष तिच्याकडे गेलें, व तो तिला म्हणाला, "केव्हां आलीस गुलाब तूं ? आणि ही चौपाटीची तयारी वाटतं ? थाटमाट तर खूप केला आहेस आज"—

"पण काय रे भाई," त्याला मध्येंच थांबवून गुलाब म्हणाली, "तूं कां रडत होतास तें सांग ना गडे ? मी तुझी गट्टी फू केली म्हणून तर नाहीं ना ?" असें म्हणून तिनें आपले चिमुकले हात भाईच्या गळ्यांत घातले.

मन उदासीन असतांना एखाद्या गोड, अजाण आणि प्रेमळ बालिकेचा करपाश गळ्यांत पडल्यावर कोणाच्या दुःखाला भरती येणार नाहीं ? भाईला पुनः भडभडून आलें व गुलाबला हृदयाशीं घट्ट आवळून तो म्हणाला, "गुलाब, पोरी तूं कित्ती कित्ती लहान आहेस ग ! तुझ्यासारखीच माझी एक चिमकुली बहीण आहे. तिची मला आज सारखी आठवण होते आहे. ती इथं असती तर तिची व तुझी खूप गट्टी जमली असती. तुम्ही

बरोबर शाळेंत गेला असतां, चौपाटीवर खेळलां असतां, आणि दोघींनीं मला असंच सतावलं असतं—"

"इश्श! हें रे काय भाई? मी कधीं तरी तुला त्रास देतें का रे? या रोव्हरलाच विचार. पण भाई, तूं आपल्या बहिणीला केव्हां आणशील इकडे? ती आली नाहीं तर मी अन् रोव्हरच तुझ्याकडे येऊं, खरं ना रे रोव्हर?"

"पण गुलाब, आजची आमची जम्मत कुणाला—ताईलासुद्धां सांगायची नाहीं अं?" असें बोलत असतां भाईनें झटकन् चौपाटीची तयारी केली व एक सिगरेट शिलगावून तिचा धूर गुलाबच्या तोंडावर सोडला. गुलाबनें भाईच्या हातावर एक थप्पड मारून त्याची सिगरेट उडवली, व रोव्हरला घेऊन ती हसत हसत निघून गेली.

— ५ —

आज भाईला उदास वाटत असल्यानें तो खालीं मान घालून हळूहळू फिरत होता. त्या दिवशीं कर्मधर्मसंयोगानें रतन, गुलाब व इतर कांहीं मैत्रिणी यांचा घोळका त्याला वाळूंत भेटला. त्यांच्याबरोबर रोव्हर असून त्याची सांखळी चिमुकल्या गुलाबच्या हातांत होती. रतन व भाई यांची साहजिकच दृष्टादृष्ट झाली, व आपलें गौप्य रतनला खास कळल्याचा पुरावा भाईला तिच्या नजरेंत आढळला.

भाईला पाहतांच रोव्हर गुलाबला फराफरा ओढून त्याच्याकडे जाण्याची धडपड करूं लागला—जणुं काय मुलींच्याबरोबर चालण्याची त्याला लाजच वाटत होती. रागानें थप्पड मारून गुलाबनें रोव्हरला भाईजवळ दिला व आपण उडया मारीत मैत्रिणींबरोबर निघून गेली. भाईबरोबर रोव्हर अगदीं ऐटींत चालून, जाणाऱ्यायेणाऱ्या मुलींकडे मुंबईतल्या सोकाजीप्रमाणें पाहूं लागला.

भाई नेहमींच्या खड्डयांत जाऊन बसला. चार सिगरेट्स ओढल्या तरी त्याचे दोस्त-लोक येण्याचें चिन्ह दिसेना. शेवटीं कंटाळून तो घरीं जाण्याचा विचार करूं लागला. इतक्यांत काशिनाथाची स्वारी गजगतीनें येतांना दिसली.

"काय शेठ, आठवण झाली वाटतं गरिबाची! अरे गृहस्था, आज

मी केव्हांपासून तुझी वाट पाहतों आहें! पण तूं कसचा वस्ताद! बरं, त्या कामाचं काय केलंस?" काशीनाथ आल्याबरोबर भाईनें विचारलें.

"अरे हो, पण जरा दमानं घेशील का? आम्ही तुझ्यासारखे फटिंग थोडेच आहोंत घटकाघटका चौपाटीवर भटकायला! बाजारहाट करायला वेळ लागला. आम्हांला थोडीच आहे खाणावळ तुझ्यासारखी! संसार म्हणजे कांहीं थट्टा नव्हे बरं!"

"अरे हो, ठाऊक आहे संसार म्हणजे काय आहे तें! उगीच मिजास नको त्याची. लग्न केलं अन् दोन पैशांची भाजी आणली कीं झाला संसार. काशीनाथ, तूं आमच्या खाणावळीची थट्टा करतोस खरी, पण मागल्या वर्षी जर ती खाणावळ उघडली असती तर तूंसुद्धां या लग्नाच्या अन् भाजीच्या भानगडींत पडला नसतास. मीं माझ्या लग्नाचा बेत तहकूब केला तो एवढ्यासाठींच. अरे, आमच्यासारखे अविवाहित राहतील एवढंच नव्हे; तर लग्न झालेले लोक बायका टाकून तिथले मेंबर होतील कीं काय अशी मला भीति वाटूं लागली आहे! निदान बायकांना नेहमीं माहेरीं तरी पाठविण्याची टूम निघेल. हं, मग तूं केव्हां पाठवतोस वहिनींना माहेरीं!"

"ए पागल, तुझी ही बडबड पुरे कर आतां; आणि मी विचारीन त्या प्रश्नाचं उत्तर सरळपणानं दे. तूं लग्न केव्हां करणार हें मला या बैठकीला सांग. लग्न कर म्हणून तुला आजपर्यंत मीं लाख वेळां सांगितलं असेल, पण तुझं आपलं एक उत्तर, कीं स्वतः कमावल्याखेरीज लग्न करणार नाहीं. तुला नेहमीं उदास वाटतं, आत्महत्या करायची हुक्की येते—लग्नानंतर हें सारं नाहींसं होईल. कुठं प्रेम वगैरे असलं तर तसं सांग. पाहूं जमलं तर."

"अरे वारे मित्र! खूप आहेस बुवा. मी माझं कुठं प्रेम आहे कीं काय हें तुला सांगावं—आणि तूं तिथं जमवणार म्हणतोस— छान, चांगला आहे तुझा हिशेब! कां हो स्वारी, एक लग्न पुरत नाहीं वाटतं आपल्याला? बाकी शेठ लोकांना जास्त लग्नं आवश्यक असतात असं म्हणतात बुवा. मला कांहीं माहीत नाहीं. मी आपला गरीब मनुष्य, अजून एका लग्नाला-सुद्धां ठिकाण नाहीं आमच्या!"

"आतां तुला स्पष्टच विचारतों, तूं मला रतनसाठीं 'इअर रिंग' आणायला सांगितलेस. इतका खर्च करून तूं देणगी देतोस तेव्हां कांहीं तरी पाणी मुरतं आहे खास. महाराज, आजपर्यंत बहीण म्हणून मला थापा

मारल्यात, पण काय रे रतनच्या 'भाई', तूं आपल्या सख्ख्या बहिणीला एक तरी जिन्नस पाठवलीस का रे आजपर्यंत ? मुंबईच्या सर्व 'भाई'चं प्रेम मानलेल्या बहिणींवरच फार असतं. तुझ्या जातींतल्या सर्व भाई-लोकांना चाबकानं फोडून तरी काढावं, नाहीं तर ठाण्याला नेऊन अडकवून तरी टाकावं. काय आहे आपलं मत 'भाईसाहेब' ?"

"काशीनाथ, तूं मला या मुंबईंत इतकी मदत केली आहेस म्हणून तुझ्याबद्दल माझ्या मनांत किती आदर आहे याची तुला कल्पनाहि नसेल. तूं जी गोष्ट आज इतक्या मोकळेपणानं विचारलीस तिचं उत्तर मी तुला तितक्याच मोकळेपणानं देणार आहें. माझ्या आयुष्यांतील सर्व गोष्टी तुला ठाऊक आहेतच. आज मला इतकं उदास वाटतं आहे कीं, कदाचित् माझ्या हातून एखादा अविचार होईल कीं काय अशी भीति वाटते. आईचं प्रेम नाहीं, बाबांना माझ्यापासून मदत नाहीं, प्रेमाचा एक शब्द बोलणारा मित्र नाहीं, किंवा या वयाला अत्यंत आवश्यक असं स्त्रीप्रेम नाहीं. सांग काशीनाथ, संध्याकाळीं थकून आल्यावर या सर्व गोष्टी मनांत येऊन कुणाला वेड लागणार नाहीं ! माझं आईवर प्रेम आहे, बाबांच्या-बद्दल मला काय वाटतं तें एका परमेश्वरास माहीत. म्हातारपणीं त्यांना विश्रान्ति देण्यासाठीं रक्ताच्या प्रत्येक थेंबागणिक रुपये मिळाले तर आत्म-यज्ञ करण्याची आज माझी तयारी आहे. आजपर्यंत बाबांच्या प्रेमावर मी कसाबसा जगूं शकलों; पण आतां मात्र स्त्रीप्रेम—मग तें कोणत्या का रूपांत असेना—आवश्यक वाटायला लागलं आहे. पण ज्याला आईचं व बहिणीचं प्रेम हस्तगत करतां आलं नाहीं त्याला इतर मुलींचं प्रेम आपल्या-कडे कसं ओढून आणतां येईल ? मित्र पहावे, ते तसेच. त्यांच्यासाठीं प्राण देण्यास मी तयार असतांना त्यांचं माझ्याशीं वर्तन इतकं कठोर असतं, कीं कांहीं विचारूं नकोस. तशाच माझ्या मैत्रिणी. मला तशा कांहीं मैत्रिणी नाहींत, पण काय असेल तें असो, मला त्या तऱ्हेवाईक आणि जंगली समजून माझ्या अपेक्षेप्रमाणं माझ्याशीं नीट वागत नाहींत. मी त्यांच्या सौंदर्याची तारीफ करीत नाहीं खरा, पण माझं त्यांच्यावर फार प्रेम आहे. मी कधींच प्रेमाचं प्रदर्शन करीत नाहीं. त्यामुळं मी अरसिक आहें अशी त्यांची कल्पना झाल्यास सांगवत नाहीं. आतां रतनबद्दल एक. ती मात्र माझ्या मनासारखी मुलगी असून, तिच्यासारखी बायको मिळाली असती

तर माझ्यासारखा भाग्यवान् मीच असतों. पण तिचं दुसऱ्याशीं लग्न ठरून येत्या माघांत नक्की होणार आहे. तें समजल्यापासून मी तिच्याशीं जपून वागत असतों. या सबंध दुनियेंत माझ्यावर प्रेम करणारी मुलगी असेल असं मला स्वप्नांतसुद्धां वाटलं नव्हतं. त्यामुळं प्रेमावरचा माझा विश्वाससुद्धां उडाला होता. अपघात होऊन प्रेम, चहा घेतांना प्रेम, रडतांना प्रेम, हंसतांना प्रेम, या सर्व गोष्टी—मासिकांतील गोष्टींत किंवा कादंबऱ्यांतून सांपडतील—तरी पण रतनच्या मार्गांतून मला बाजूला सरलंच पाहिजे. तिचं आज माझ्यावर बहिणीसारखं प्रेम असेल; पण सहवासानं त्या प्रेमाचं रूपान्तर रमणी-वल्लभाच्या प्रेमांत खात्रीनं होईल. तरुण स्त्रीपुरुष एकमेकांशीं फटकून वागतील किंवा प्रेम तरी करतील—त्यांना मधली स्थितीच ठाऊक नसते. सांग काशीनाथ, या स्थितींत मी दुसऱ्या मुलीशीं लग्न करावं असं तुला वाटतं का ?"

"पण भाई, रतनचं लग्न बाळासाहेबांशीं तूंच ठरविलंस कीं नाहीं ? मग त्याच वेळेस तूं तिच्याबद्दल मागणी कां घातली नाहींस ? तुझ्यासारखं स्थळ घरबसल्या चालून आलं असतां शामरावांना आनंदच झाला असता."

"तें सगळं खरं आहे." भाईनें खिन्नपणानें हसून उत्तर दिलें, "पण त्या वेळीं माझी स्थिति खरोखरीच अतिशय वाईट होती. माझं कुठंच बस्तान बसलं नव्हतं. तेव्हां माझ्यासारख्या फटिंगानं कोणत्या बळा-वर रतनला मागणी घालावी ! आज माझी आई जिवंत असती तर तिच्या मध्यस्थीनं मला रतनचा लाभ सहज झाला असता. पण आमचं नशीबच खोटं, त्याला कोण काय करणार ! बरं, चला आतां आमच्या अन्नदात्या-कडे ! वेळ झाला तर पुनः इराणी गांठावा लागेल."

"भाई, आज तूं माझ्याकडेच जेव. तुझी मनःस्थिति आज ठीक नाहीं. जरा शान्त झाल्यावर तूं घरीं जा. तुझ्या वहिनींचाहि यांत आपण सल्ला घेऊं."

भाईनें सिगरेट काढली व ती ओढीत असतां तो म्हणाला, "काशी-नाथ, मी दोन वर्षांपूर्वी विड्या ओढीत नव्हतों. पण माझ्या एकलकोंड्या आयुष्यांत या सिगरेटनं मला फार मदत केली आहे. विडी ओढणं वाईट आहे, तें व्यसन आहे, याची मला जाणीव आहे. पण समजून-उमजूनच मी

बिडी ओढतों. सर्व व्यसनांच्या मुळाशीं प्रेमाचा अभाव हेंच खरं !"
शेवटीं काशीनाथानें जबरदस्तीनें भाईला आपल्या घरीं नेलें.

— ६ —

रतनच्या वाढदिवसापूर्वी तीनचार दिवसांची गोष्ट. ऑफिस उरकून रतनच्या भावी यजमानांना आमंत्रण देण्याकरितां शामराव आज त्यांच्याकडे गेले होते. चहापाणी झाल्यावर शामरावांनीं औपचारिक आमंत्रण दिलें. पण जांवईचोवांनीं बराच वेळ कांहींच उत्तर दिलें नाहीं. अखेरीस मनाचा ठाम निश्चय करून ते म्हणाले, " शामराव, आज बरेच दिवस एक गोष्ट मी तुम्हांला सांगावी कीं नाहीं याचा विचार करतों आहें; पण आज सर्व गोष्टींचा सोक्षमोक्ष करून घ्यावा असं मनांत आलं आहे. तरी तुम्ही सर्व गोष्टींना आळा घालण्याचं वचन देत असाल तरच उद्यां जांवई म्हणून रतनच्या वाढदिवसासाठीं अवश्य येईन. नाहीं तर माझं ठरलेलं लग्न मला माझ्या इच्छेविरुद्ध मोडावं लागेल."

अनपेक्षित संकटाची ही दुष्ट बातमी ऐकून शामराव फारच गांगरून गेले; आणि बराच वेळ त्यांच्या तोंडांतून शब्दच फुटेना. शेवटीं ते म्हणाले, " बाळासाहेब, आपलं ठरलेलं लग्न मोडण्यासारखी एखादी चूक आमच्या हातून झाली असेल असं मला वाटत नाही. आम्ही गरीब, तेव्हां आमच्याहून भारी अशी सासुरवाडी तुम्हांला मिळणं शक्य आहे. तरी पण अडचण करून तुम्हांला हुंड्याची भरपाई कशीहि करून देऊं. अहो, मला तरी काय, इनमिन दोन मुली. तेव्हां आम्ही वाटेल तें करूं; पण तुमच्यासारखं स्थळ गमावणार नाहीं. शिवाय तुम्ही लग्न मोडलं तर रतनला दुसरं स्थळदेखील मिळणार नाहीं. आपल्या ज्ञातींत जरा कांहीं खट् वाजलं, कीं साऱ्या लोकांना ऐकूं जातं. मग हा तर लग्न मोडण्याचा प्रसंग. सांगा तुमच्या मनांत काय आहे तें. त्याप्रमाणं वागण्याची मी हमी घेतों."

" शामराव," बाळासाहेब म्हणाले, " तुम्ही घाबरलां तसं कांहीं नाहीं. ऐका तर आतां. तुमचा तो भाई आहे ना, त्याची रतनशीं सलगी मला आवडत नाहीं—थांबा, माझं ऐकून घ्या. रतन व गुलाब यांच्याबरोबर तो नेहमीं फिरायला जातो. रतन त्याच्याजवळ शिकते. आणि हें असंच वाढत गेलं तर त्याच्या मनांत भलतेसलते विचार येतील. अहो, हा नशीब काढायला आलेला मुलगा, याचा आगा ना पिछा माहीत तुम्हांला; असल्या

लोकांवर माझा बिलकुल विश्वास नाहीं. लग्नाची जबाबदारी न घेतां लग्नाची चैन करण्याची चटक लागलेली ही देशावरची मंडळी. अहो, परवांच आम्ही सर्व बसलों असतांना रतन व गुलाब यांचे चेहरे अगदीं सारखे दिसतात म्हणून भाई गुलाबचे मुके घेत होता. रतन नाहीं तर गुलाबच आमची बायको म्हणून तो माझ्याकडे पाहून हसला. लग्नानंतर आमच्याकडे राहण्याबद्दल सूतोवाच करून ठेवलेंच आहे. रतनच्या अंगसरपटीं नेहमीं जाणें हें सुद्धां मला पसंत नाहीं. मीं या सर्व गोष्टींचा विचार करून त्यांतून चांगला अर्थ काढण्याची पराकाष्ठा केली. पण स्त्री-पुरुषांनीं एकमेकांशीं फार सलगीनं वागणं इष्ट नाहीं असंच मला वाटतं. तेव्हां आजच्याआज भाईला तुम्ही आपल्या घरून काढलेत, तरच उद्यां मी तुमच्याकडे जांवई म्हणून येईन; नाहीं तर तुम्हांला माझा नाद सोडून द्यावा लागेल. तुम्हीं भाईची कितीहि तरफदारी केलीत तरी ती मला पटायची नाहीं."

शामराव म्हणाले, " बाळासाहेब, आम्हीं सर्व भाईला गेल्या दोन वर्षांपासून ओळखतों. तो तुमचासुद्धां मित्र आहे, हें तुम्ही जाणतां. तुमचं लग्नसुद्धां भाईच्याच मध्यस्थीनं ठरलं. तेव्हां भाई तुमच्याशीं असा पाजीपणा करील असं तुम्हांला कसं वाटलं ? त्याच्याविरुद्ध कुणीं तरी तुमचं मन खराब केलं आहे खास. नाहीं तर असला भलता संशयच तुम्हांला आला नसता. तरी पण मी हें भाईला समजावून सांगतों, आणि तो खास माझ्या म्हणण्या-प्रमाणं चालेल. मात्र तुम्ही वाढदिवसाच्या दिवशीं जरूर या." असें म्हणून शामराव जड अंतःकरणानें निघून गेले.

दुसऱ्या दिवसापासून घरांतल्या मंडळींच्या वागणुकींत एकदम फरक झालेला भाईच्या लक्षांत आला. संध्याकाळीं ऑफिसांतून परत आल्यावर गुलाब रोजच्याप्रमाणें येण्यास निघाली असतां, मालतीबाईंनीं तिला भाईला ऐकूं जाईल इतक्या मोठ्यानें, जाण्याची मनाई केली. शामराव, मालती-बाई वगैरे कोणीच नीट बोलेनात. रतन तर भाईला मुद्दाम टाळूं लागली. हें पाहून भाईला अतिशय वाईट वाटलें, व सर्वांचा संतापहि आला. आपल्या-विरुद्ध कांहीं शिजलें आहे अशी भाईची खात्री झाली. अशा स्थितींत भाईच्या नांवाचें एक पत्र आलें. तें पत्र रजिस्टर केलें असून त्यांत शामरावांनीं सर्व हकीकत भाईला कळविली होती. पोटच्या गोळयाच्या कल्याणाकरितां आपणास हा मार्ग नाइलाज म्हणून पत्करावा लागला असें त्यांत होतें.

रतनचें लग्न होईपर्यंत भाईनें त्यांचें घर सोडून दुसरीकडे जावें अशी विनंति त्याला करण्यांत आली होती. पत्राचा शेवट पुढीलप्रमाणें करण्यांत आला होता—

"भाई, आजपर्यंत मीं तुम्हांला मुलाप्रमाणें वागवलें; पण आज मला माझ्या मुलीच्या भावी कल्याणासाठीं तुमच्याशीं निष्ठुर व्हावें लागत आहे याबद्दल क्षमा करा. तुमच्याबद्दल माझ्या मनांत काडीचाहि संशय नाहीं; पण माझ्या लाडक्या रतनच्या सुखाची किल्ली एका मूर्ख व संशयी माणसाच्या हातीं असल्यामुळें मला आज त्याच्या कलानें घ्यावें लागत आहे. निदान रतनच्या सुखाकडे लक्ष देऊन तुम्ही कांहीं दिवस दुसरीकडे जा. तिच्या लग्नानंतर तुम्ही परत माझ्याकडे या. असो. झालेल्या गोष्टी-बद्दल वृथा गैरसमज करून घेऊं नका, ही विनंति."

त्याच रात्रीं दोन वाजण्याचा सुमार होता. चोर व पोलीस यांच्या-खेरीज सर्व लोक शान्तपणें निजले होते. भाईच्या खोलींत दिवा असून तो कांहीं तरी खरडीत होता. तोंडांत उंची सिगरेट असून तिचा धूर खोलींत कोंडला होता. भाई मधून मधून थांबे. लिहिलेलें पत्र पुनः वाची. मधूनच थोडेंसें हसे व पुनः लिहिण्यास सुरवात करी. शेजारीं रोव्हरचा खडा पहारा असून आज भाईला खास वेड लागलें असावें असें त्याला वाटत होतें. रोव्हरला जवळ घेऊन भाई म्हणाला, "रोव्हर, पाहिलीस दुनिया ? प्रेम असलेल्या माणसांच्या बरोबर राहतांसुद्धां येत नाहीं रे! म्हणे तूं दुसरीकडे जा. पण रोव्हर, रतनखेरीज मला दुसरीकडे क्षणभर तरी राहवेल का ? पण कुछ फिकीर नहीं. आपण काय डरतों या लोकांना ?"

भाई उठला. लिहिलेलीं सर्व पत्रें त्यानें पोस्टाच्या खांबांत टाकलीं, व खोलींत येऊन फोटोचें 'आल्बम्' काढून आपल्या प्रियजनांचें शेवटचें दर्शन घेतलें. रतन व गुलाब यांचे फोटो ठेवून बाकीचे त्यानें फाडून टाकले. रतनच्या फोटोजवळ इअर रिंगचा जोड व गुलाबच्या फोटोजवळ बँकेंत असलेल्या सर्व पैशांचा चेक ठेवून, भाईनें टेबलाच्या खणांतून एक बाटली काढली. पेला घेऊन तो स्वच्छ केला—विषांत घाण नसावी असेंहि कांहीं लोकांना मरतेसमयीं वाटावें ना ?—त्यांत सर्व विष ओतलें. दोन सेकंद पेला भाईच्या ओठांजवळ होता—भाईनें त्या जलाल विषाचे दोन घोट घेतले!

इतक्यांत रोव्हर भाईजवळ आला. भाईचा हात पाहिल्यानें त्याच्या गळयांत पडला—नंतर मान त्याच्या अंगावर पडली. इकडे रोव्हर पेल्यांत राहिलेलें विष शान्तपणें पीत होता. आणखी दहा सेकंदांत भाईच्या निर्जीव करपाशांत रोव्हरचें अचेतन शरीर मात्र राहिलें. भाईवरच्या प्रेमांत जनापवादाची पर्वा नसलेल्या एका पशूनेंच अखेर माणसावर ताण केली !



## नूरजा ! : : ३९

पहांटे चार-साडेचार वाजायची वेळ होती. ससून हॉस्पिटलच्याजवळील युद्धस्मारकाच्या पांढऱ्या खांबाजवळ इस्माइल तांग्यांत बसून विडी ओढीत होता. घोड्यावर शेजारच्या विजेच्या दिव्याचा उजेड होता. इस्माइलनें तोंडावरून फेट्याचा पदर गुंडाळला होता. इस्माइलला भोंवतालचें सगळें जग दिसत होतें. समोरील पोलीसचौकींत दोन पोलीस बसले होते. त्यांच्या तोंडांतील विड्यांचीं टोकें रेल्वेलाइनवर दिसणाऱ्या दिव्यांप्रमाणें दिसत होतीं. मध्येंच गाडीची शिटी ऐकूं आली, कीं झोप घेत असलेला घोडा एकदम दचके व पुन्हा मान खालीं घालून पेंगूं लागे. तांग्याचे दिवे मिणमिणत होते.

इस्माइलला त्या स्तंभाची जास्त माहिती नव्हती. धंद्यानिमित्त त्यानें शहरांतल्या ज्या कांहीं खुणा पाठ केल्या होत्या त्यांतली ती एक खूण होती. परंतु आज इस्माइल त्या दगडाकडे, त्यावरील अक्षरांकडे, पलीकडच्या हॉस्पिटलकडे, तेथील तांबड्या कांचेतून दिसणाऱ्या पाटीकडे जास्त रोखून पाहत होता. कारण आदल्या दिवशीं संध्याकाळीं त्याच हॉस्पिटलमधून त्यानें आपल्या मुलाला स्मशानांत पोंहोचविलें होतें.

इस्माइलचा चिरंजीव रोगाशीं लढतां लढतां मेला होता ! “ हे लढाईंतले लोक असेच मेले असतील ! कोणाला त्यांचें नांव माहीत आहे ! तसाच माझा अहमद ! पण तो नाहीं चिरंजीव होणार ! त्याच्या आठवणीसाठीं कोण दगड उभारणार आहे ! ”

विचार करतां करतां त्याच्या डोळ्यांसमोर लढाई दिसूं लागली! जरा वेळानें त्याला हॉस्पिटलमधील देखावा डोळ्यांसमोर दिसूं लागला. त्याचे डोळे पाण्यानें भरून आले. अश्रूंमधून त्याला सगळें जग अस्पष्ट दिसूं लागलें. हातांतली विडी तशीच धूर सोडीत होती व इस्माइल रडत होता. जरा वेळानें त्याच्या दाटलेल्या कंठांतून शब्द आले 'अ–ह–म–द!'

" ए–तांगा!" एक आवाज आला.

इस्माइलनें खडबडून लगाम खेचला. "जी साब!" पण कोण हांक मारतें आहे हें इस्माइलनें पाहिलेंदेखील नव्हतें.

"इदर मत खडा रहो" समोरच्या पोलीसचौकींतून आवाज आला.

निराशेनें सुस्कारा टाकून इस्माइलनें घोड्याचें तोड वळवलें व तो रस्त्याच्या बाजूला एक 'आनंद-भुवन' होतें तेथें थांबला. आंत विजेच्या दिव्यांचा उजेड होता, व दाराची एक फळी किलकिली होती.

"काय इस्मैल! बोहनी किती झाली?" हॉटेलवाल्यानें विचारले.

"कुच् नाय् भोनी!"

"पोराचं कसं आहे इस्मैल?" तितक्याच निर्विकार आवाजानें हॉटेलवाल्यानें विचारलें.

"दिली बाबा मूठमाती—"

"अँ?–केव्हां?"

"संध्याकाळीं—!"

"अरेरे!"

"पुन्हा पोटासाठीं इथं उभा आहें!"

"बरं! झालं तें झालं इस्माइल! आंत ये, चहा घे!"

एक सिंगल चहा घेऊन 'इस्मैल' बाहेर पडला. एकदां त्याला वाटे घरींच जावें. 'नूरजा' (म्हणजे त्याची नूरजहान!) रडत बसली असेल. पण घर असह्य होऊनच तो घराबाहेर पडला होता! अहमद गेला तरी पोट होतेंच मागें. स्टेशन गांठलें नाहीं तर जनावर उपाशी रहावयाचें! संध्याकाळीं अन्न खायला पैसे कोठून येणार? थोडीफार पुंजी होती ती अहमदच्या मोतीला खर्च झाली होती. अवेळीं तबेल्याकडे परत वळणें इस्माइल अशुभ समजत असे! पुन्हा तो घोडयाबरोबर रस्त्यांतून रेंगाळूं लागला. रेंगाळत रेंगाळत तो स्टेशनावरील तांगा-स्टँडवर आला. तेथें

कांहीं टांगे पेंगत उभे होते व टांगेवाले एक शेकोटी पेटवून शेकत बसले होते. इस्माइलचा टांगा येतांच ते एकदम स्तब्ध झाले व आपापसांत कांहीं कुजबुजूं लागले. त्यांच्यांत जाऊन बसावें असें इस्माइलला एकदां वाटलें; पण त्यांच्या स्तब्धतेचीच त्याला भीति वाटून तो टांग्यांतच बसून राहिला. इस्माइलला आज सगळें जग निराळेंच दिसत होतें. गेल्या महिनाभर तो अहमदची शुश्रूषा करण्यांत इतका गर्क होता कीं, एक क्षणभरहि त्याला विश्रान्ति मिळाली नव्हती. हॉस्पिटलकडे वारंवार यावयास मिळावें म्हणून तो गांवांतून मिळेल तें भाडें घेऊन येई. दोन आण्यांला त्यानें स्टेशनचें गिऱ्हाईक आणावें व ३-४ आण्यांला वाटेल तेथें गांवांत नेऊन सोडावें ! परंतु आज जणुं काय त्यानें पहिल्यानेंच टांगा जोडला होता असें त्याला वाटे; आज त्याला कशाचीच ओढ नव्हती ! जरा वेळानें गाडया येऊं लागल्या आणि इस्माइल हळूहळू गांवांत खेपा टाकूं लागला. परंतु आज तो ससूनला टाळून पलीकडल्या रस्त्यानें येत होता. दुपारच्या स्वारीला एक कुटुंब त्याला गिऱ्हाइक मिळालें होतें, व त्यांत एक आजारी मुलगा होता. एक वेळ इस्माइलला वाटलें, आपल्या ‘अहमद’ची आठवण करून देणारी ही स्वारी घेऊंच नये. परंतु टांगेवाल्याला अशी आवड-निवड दाखवतां येत नाहीं ! संध्याकाळपर्यंत ये-जा करून इस्माइल घरीं आला त्या वेळीं तो शुद्धीवर नव्हता. नूरजानें ओळखलें, कीं आज इस्माइलनें अम्मल केला आहे. तिनें मुकाट्यानें त्याला निजविलें व स्वतः घोडा बांधून त्याला चारा-पाणी देऊन खरारा केला. इस्माइलचे खिसे तिनें तपासले. तिला फक्त दहा आण्यांचे पैसे हातीं लागले. ते पैसे घेऊन गोडया तेलाची बाटली घेऊन ती बाजारांत गेली.

इस्माइलचा तबेला ज्या वाडयांत होता त्या वाडयाचे मालक एक मध्यम स्थितींतील वकील होते. त्यांच्या वाडयांत इस्माइल गेलीं बारा वर्षें होता; व त्यांची न् त्यांच्या बायकामुलांची आणि इस्माइल व नूरजा यांची फार चांगली ओळख होती. त्यांच्या मुलांना टांग्यांत बसवून इस्माइल नेहमीं फिरायला घेऊन जाई. इस्माइलचें मुसलमानी वागणें कोणाच्या दुरून लक्षांत येत नव्हतें. वकिलीणबाई अगदीं साध्या बाई होत्या. वकील कोर्टांत गेले, मुलंबाळें शाळेंत गेलीं व अहमद बापाबरोबर टांगा हाकायला शिकण्यासाठीं बाहेर गेला म्हणजे नूरजा वकिलीणबाईकडे जाऊन गप्पा-

गोष्टी करीत असे. कधीं कधीं नूरजाला इस्माइल दारूच्या धुंदींत मारीतहि असे; परंतु सकाळीं तिच्या चेहऱ्यावर त्याचा मागमूसहि दिसायचा नाहीं. या मैत्रींत आणखी एका घटनेनें जास्तच भर पडली होती.

अलीकडे वकीलसाहेब एका क्लबाचे सभासद झाले होते व दररोज रात्रीं १०-११ वाजतां इस्माइल वकीलसाहेबांना घरीं संभाळून आणीत असे. त्याचें हें दररोजचें ठरलेलें भाडें झालें होतें. रात्रीं १०-११ वाजेपर्यंत नूरजा व वकिलीणबाई गप्पा करीत बसत, व बोळांत टांग्याच्या चाकांचा आवाज येऊं लागला, कीं दोघीहि स्तब्ध होऊं लागत. दोघींचेहि चेहरे बदलूं लागत. एकीच्या नवऱ्यानें दारू प्यावयाची व दुसरीच्या नवऱ्यानें त्याला संभाळून घरीं आणावयाचें अशी त्या दोघींची विचित्र मैत्री होती! टांग्यांत कोण आलें आहे हें दोघींनाहि कळत असे. मुकाट्यानें नूरजा उठून खालीं जायची व जरा वेळानें इस्माइल वकीलसाहेबांना दंडानें धरून वर आणून पोंहोचवायचा. खालीं नूरजाला भेटल्यावरसुद्धां इस्माइल या प्रकाराबद्दल कांही बोलत नसे. जणुं काय इतर स्वाऱ्यांसारखीच ही वकिलाची स्वारी!

या रोजच्या प्रकारामुळें नूरजा व वकिलीणबाई यांचे संबंध कांहीं विचित्र झाले होते. त्यांतल्या त्यांत आपल्या पतीचें हे दुर्वर्तन नूरजाला व इस्माइलला कळल्यापासून तर वकिलीणबाईंना नूरजाच्या नजरेला नजर देण्याचीहि भीति वाटे! पण नूरजाला एकदां सगळें कळून चुकल्यावर आतां काय त्याचें, असा विचार करून वकिलीणबाई नूरजाशीं जरा जास्त प्रेमानें वागत! आपल्या नवऱ्याबद्दल एकमेकींनीं चर्चा करायची नाहीं असें दोघींनीं आपणहूनच ठरवलें होतें.

तसें पाहिलें तर त्या दोघींच्या आयुष्यांत व्यक्तिशः काय फरक होता? नवऱ्याचीं व घरांतलीं कामें करायचीं; दोघींचींहि कामें सारखींच! दुपारीं नवरे कामावर जायचे. एक टांगा हाकायचा, दुसरा कोर्टांत खटले चालवायचा. दोघेहि संध्याकाळीं दारू पीत असत. परंतु एक थोडी घ्यायचा, कारण त्याला दुसऱ्याला संभाळून आणण्याचें काम होतें! दोघीहि आपल्या दारूबाज पतीची वाट पाहत १०-११ वाजेपर्यंत बोलत बसत! एखाद्या वेळीं मधून मधून दोघींनाहि मारझोड होत असे, व आपली ही सांसारिक बेअब्रू दोघीहि एकमेकींपासून झाकून ठेवीत! नूरजाला वाटे, वकिलीणबाईंत व आपल्यांत तरी असा काय फारसा फरक आहे! परंतु एखाद्या वेळीं वकील

वकिलीण इस्माइलच्या तांग्यांतून बाहेर जावयास निघाली, कीं तें अंतर नूरजाच्या लक्षांत येई !

त्या दिवशीं अहमदच्या मृत्यूमुळें बेभान होऊन इस्माइलनें जरा लवकरच झोकली होती व तो लवकर घरीं आला होता.

" कां ग नूरजा, इस्माइल आज लवकर कां आला ? "

" आज जरा आजारी आहेत."

" मग आतां पुन्हा नाहीं का तांगा जोडणार ? " हा प्रश्न विचारतांना वकिलीणबाईचा चेहरा गोळा होत होता व आवाज थरथर कांपत होता. 'पुन्हा' हा शब्द उच्चारतांना त्यांचा आवाज जास्तच अडखळला.

नूरजाच्याहि ती गोष्ट लक्षांत आली.

" कसे जातील-बाई ? आज आतांच गुंगले आहेत ! "

वकिलीणबाई मनांत म्हणत होत्या, 'इचा दारुडा प्रियकर तर घरीं आला; आपले कसे घरीं येणार ? कोण आणणार त्यांना ? त्यांची काय अवस्था दिसेल आज रात्रीं ? पण नूरजाला हें कसें विचारावयाचें ?'

इस्माइलचा वकिलीणबाईंना रागहि आला होता. आपल्या नवऱ्याची बेअब्रू करणारा हा तांगेवाला पाहिजे कशाला आपल्या वाड्यांत ? असेहि विचार त्यांच्या मनांत आले.

९।-९॥ वाजले होते. आज इस्माइल घरीं असल्यामुळें नूरजा तबेल्यांतच होती. वकिलीणबाई एकट्याच घरांत खालींच बसून होत्या; 'नूरजाला सांगून एखादा तांगेवाला क्लबापर्यंत धाडतां येईल का ? तो आपल्या नवऱ्याला बरोबर ओळखून मुकाट्यानें आणील का ?'

शेवटीं १० वाजायला आले त्या वेळीं त्यांनीं नूरजाला हांक मारली. इस्माइल संध्याकाळपासून झोंपलाच होता. आत्तासा तो हळूहळू डोळे उघडीत होता. डोळे उघडल्याबरोबर त्यानें 'अहमद' म्हणून हांक मारली. ती वकिलीणबाईंना ऐकूं आली. त्यांना एकदम आशा वाटली. आतां इस्माइल तांगा जोडणार असेल !

" नूरजा-नूरजा ! "

" जी-बाईसाहेब."

" नूरजा, जरा वरती ये ग ! "

नूरजा वरती गेली. घरांत निजानीज झाली होती. वकिलीणबाईंनीं

नूरजाला घरांत वकीलसाहेबांच्या ऑफिसांत नेलें व हळूच त्या बोलूं लागल्या—

" नूरजा, तुला माहीत नाहीं मीं कशाला हांक मारली तें ? इस्माइल आज क्लबाजवळ गेला नाहीं तर—" वकिलीणबाईच्या डोळ्यांतून पाणी ओघळूं लागलें.

" बाई, अद्याप खान चांगले जागे झाले नाहींत. मी काय करूं तुमच्यासाठीं ? मी जाऊं का तांगा घेऊन ? मला आणतां येईल का वकीलसाहेबांना ? "

वकिलीणबाईना कांहींहि बोलवत नव्हतें. इतक्यांत इस्माइलची हांक ऐकूं आली–" नूरजा !–नूरजा !! "

" बाई, आज तुमच्या सुदैवानें खानांना फार चढलेली दिसत नाहीं. मी त्यांना विनंति करून पाहतें. नाहीं तर–नाहीं तर—बाई मी स्वतः तांगा जोडतें. मला माहीत आहे तो कलब !" घाईघाईनें बोलत नूरजा खालीं आली. तिला खानाचा स्वभाव माहीत होता. रात्रीची वेळहि तिच्या परिचयाची होती. परंतु त्यांत सुदैव एवढेंच, आज खान शुद्धींतच होता ! अहमदच्या आठवणीनें बावचळलेलें त्याचे मन दारूच्या नेहमींच्या डोसांत पुरेसें बुडालेंच नाहीं ! तो जागा होऊन तळमळत होता.

नूरजा खालीं तबेल्यांत आली व जरा वेळानें वकिलीणबाईहि खालीं आल्या. नूरजा इस्माइलला सांगतें कीं नाहीं, इस्माइल हो म्हणतो कीं नाहीं, या गोष्टी कळण्याची त्यांना इतकी तीव्र अधीरता वाटत होती; म्हणून त्या तबेल्याच्या आसपास कानोसा घेत उभ्या होत्या.

इस्माइल नूरजाच्या गळ्यांत गळा घालून रडत होता. नूरजा दिवसभर रडली होती. त्यामुळेंच जणुं काय तिच्या डोळ्यांत आतां पाणीहि उरलें नव्हतें. रात्रीं इस्माइलच्या हातचे तडाखे खाणारी नूरजा आज आपल्या पदरानें इस्माइलचे डोळे पुशीत होती. ' मेरा अहमद ! ' असें म्हणून इस्माइल विव्हळूं लागे. जरा वेळानें त्याचा दुःखावेग उतरला. दारू पिऊनहि आपल्याला गुंगी येत नाहीं व दुःखाचा विसर पडत नाहीं; तेव्हां अशा स्थितींत तळमळत पडण्यापेक्षां पुन्हा तांगा जोडावा, म्हणजे अहमदच्या वस्तु तरी डोळ्यांसमोरून जरा दूर होतील !

" नूरजा, तांगा जोड. चल आज माझ्याबरोबर ! "

" खान, आज वकीलसाहेबांना नाहीं का आणायचं ? "

" मरूं दे वकील! माझा अहमद गेला त्या वेळीं आला होता का वकील! मी धंदा करण्यासाठीं बाहेर पडत नाहीं. मला तबेल्यांत बसवत नाहीं म्हणून बाहेर पडतों आहें."

" वकिलीणबाईंनीं मला हात जोडून सांगितलं आहे. खान, तेवढ्यासाठींच त्यांनीं मला मघां बोलावून नेलं होतं. खान, आपल्या वकिलीणबाईसाठीं तुम्हीं जायला पाहिजे. तुम्ही गेलां नाहींत तर वकीलसाहेब कोठें तरी झिंगत पडतील. त्या बाईकडे तरी पहा; एका गरीब बायकोची अब्रू जाईल!"

इस्माइलला तें सर्व पटल्यासारखें दिसलें.

" बरं, वकिलाला आणून टाकतों. मग आपण पुन्हा जाऊं!"

वकिलीणबाईंना किती धन्य वाटलें. 'आपण एवढी मोठी वकिलीण आणि नूरजा यःकश्चित् एका तांगेवाल्याची बायको! आपण त्यांचे घरमालक! पण आपल्या नवऱ्याची अब्रू झाकण्याचें काम आज नूरजा व इस्माइल करीत आहेत. तिचा स्वतःचा नवरा दारुडाच नाहीं का! मीहि एका दारुड्याचीच--पण माझ्यापेक्षां नूरजा--!'

इस्माइल घराबाहेर पडला, वकिलीणबाईंनीं धांवत येऊन नूरजाचे हात हातांत घेऊन तिला धन्यवाद दिले. नवरा जरा वेळानें झिंगून परत येणार या गोष्टी इतक्या पुरेशा दुःखप्रद असतांहि तिला नूरजाबद्दल आनंद वाटला!

जरा वेळानें तांग्याचीं चाकें वाजल्याचा आवाज आला. वकील घरीं पोंहोचले. वकिलीणबाईंनीं त्यांना ताब्यांत घेतलें व नंतर इस्माइल नूरजाला अगदीं बळजबरीनें तांग्यांत घालून बाहेर पडला.

* * *

वकिलीणबाई आपल्या बेशुद्ध पतीजवळ बसल्या होत्या. त्या वेळीं त्यांच्या डोळ्यांसमोर नूरजा दिसत होती, व डोक्यांत नूरजाबद्दलचे विचार होते. 'आपण आणि आपले पति--नूरजा व इस्माइल चांदण्या रात्रीं तांग्यांतून फिरत आहेत!'



# पुनर्विवाह : : ४०

वसंतरावांच्या संसारांत आज एकाएकीं अगदीं निर्वाणीचा प्रसंग उपस्थित झाला होता. कारण त्यांची पुनर्विवाहित पत्नी सुलोचना ही एका क्षुल्लक कारणावरून त्यांजबरोबरचा आपला वैवाहिक संबंध तोडून टाकून फिरून स्वतंत्र होण्यास उद्युक्त झाली होती. याचें कारण दिसण्यांत अगदीं क्षुल्लक होतें खरें; पण दोन्ही पक्षांना जिव्हाळ्याच्या वाटतील अशा भावनांचा अभिनिवेश अंगीं संचारल्यामुळे ह्या वादविषयाला मोठें गंभीर स्वरूप प्राप्त झालें होतें. तें कारण असें—

वसंतरावांनीं आपली पहिली पत्नी इंदिरा हिचें तैलचित्र एका सुप्रसिद्ध चित्रकाराकडून रंगवून घेतलें होतें. त्यांच्या सूचनेप्रमाणें चित्रकारानें आपल्या मनुष्याबरोबर तें चित्र त्यांच्या गांवीं रवाना केलें. चित्र आलें त्या वेळीं सुलोचना घरीं नव्हती. तिच्या गैरहजेरींत वसंतरावांनीं आपल्या शयनमंदिरांत त्या चित्राची स्थापना केली. थोडक्याच वेळानें ती घरीं परत आली व लुगडें बदलण्यासाठीं माडीवर गेली. त्या वेळीं वसंतराव तेथेंच आरामखुर्चीवर पडलेले होते. दोघांची दृष्टादृष्ट होतांच त्यांच्या नजरेंतला मिस्किलपणा तिला दिसून आला. लगेच तिनें विचारलें, " कां ? आज कांहीं विशेष ? "

वसंतरावांनीं मोठ्या प्रसन्न मुद्रेनें इंदिरेच्या चित्राकडे बोट केलें. चित्र पाहतांच तिनें विचारलें, " कोणाचें हें चित्र ? "

" इंदिरेचं–माझ्या पहिल्या बायकोचं ! "

हे शब्द ऐकतांच तिची कळी कोमेजली; आणि असें होणें अगदीं साहजिक होतें. कारण सवतीचा मत्सर कोणत्या स्त्रीला वाटत नाहीं ?

हळूहळू तिचें कोमेजलेलें मुख आरक्त होऊं लागलें. सवतीचें चित्र पाहतांच थोडा वेळ ती स्तंभित झाली होती. हळूहळू तिचे मनोविकार जागृत होऊं लागले. दहापांच क्षण स्तब्धतेंत गेल्यावर तिनें विचारलें, " आणखी हें चित्र माझ्या खोलींत काय म्हणून ? "

वसंतराव कसलेले वकील होते. हिंदु कुटुंबांतील स्त्रीचा मालकी हक्क कोणकोणत्या वस्तूंवर पोंचूं शकतो याचें त्यांना पूर्ण ज्ञान होतें. सुलोचनेचा

प्रश्न ऐकतांच त्यांचें कायद्याचें ज्ञान जागृत झालें. त्यांनीं चमकून विचारलें, "माझ्या खोलींत ! आणखी ही खोली तुझ्या एकटीच्या मालकीची कधींपासून झाली ?"

त्यांच्या प्रश्नांतली कायदेशीर खोंच सुलोचनेला समजली नाहीं. दुसऱ्यांचीं भांडणें जणुं काय स्वतःचींच आहेत अशा आवेशानें भांडणें हा जरी वकिलांचा धंदा असला, तरी भांडावयाचेंच मनावर घेतलेल्या स्त्रीच्या बोलभांडपणाची सर त्यांच्या तक्रारीला कधींच यावयाची नाहीं. त्यांचा प्रश्न ऐकतांच सुलोचना उसळून म्हणाली, "हो-हो—माझीच खोली आहे ही; आणखी या खोलींत मी तें चित्र तुम्हांला कधींहि लावूं देणार नाहीं !"

प्रकरण चिरडीवर चाललें हें वसंतरावांनीं ओळखलें. पण उलट-पक्षाची हेटाळणी करण्याची धंद्यांत जडलेली संवय त्यांना येथेंहि नडली. खांदे उडवून तुच्छ मुद्रेनें ते म्हणाले, "चित्र तर लावलं---आतां तूं काय करणार ?"

"काय करणार !" तिनें संतापून विचारलें. पण खरें सांगावयाचें म्हणजे अशी परिस्थिति उत्पन्न झाल्यास काय करावयाचें याचा तिनें विचारच केला नव्हता. शिवाय बोलण्याला सुरवात झाली तेव्हां गोष्टी या थराला येतील अशी तिला कल्पनाहि झाली नव्हती. वसंतरावांच्या निर्वाणीच्या प्रश्नाला काय उत्तर द्यावें हें तिला सुचेना. क्षणभर ती हतबुद्ध झाली व हताश स्वरानें उद्गारली, 'काय करणार ?' पण नाहीं– तेवढ्यांत तिचा स्वाभिमान जागृत झाला. कसेंहि झालें तरी ती वाघिणीचें दूध प्यालेली होती. क्षणभरच स्तब्ध राहून ती निकराच्या स्वरांत म्हणाली, "काय करणार ! तुम्ही हें चित्र इथं लावण्याचा हट्ट सोडला नाहीं तर— तर मी हें घर सोडून जाणार !"

तिचे हे उद्गार ऐकून वसंतराव चरकले. मात्र आतां जास्त बोलण्यांत अर्थ नाहीं हें ओळखून ते आरामखुर्चीवरून उठले. आपण येथेंच बसून राहिलों तर हें भांडण अधिकच भडकेल व समेटाच्या शक्यतेपलीकडे जाईल असें वाटतांच ते आपल्या कामकाजाच्या खोलीकडे निघून गेले. ते दरवाजाच्या बाहेर पडले न पडले तोंच सुलोचनेनें धाड्कन् दार

बंद केलें आणि पलंगावरल्या उशींत तोंड खुपसून ती ओक्साबोक्शीं रडूं लागली.

इंदिरेच्या आठवणीसाठीं अगर तिजवरील आपल्या प्रेमाचें द्योतक म्हणून वसंतरावांनीं तिचें तैलचित्र काढविलें व तें आपल्या शयनमंदिरांत लाविलें; यांत जगाच्या दृष्टीनें वावगें असें कांहींच नव्हतें. किंबहुना पुष्कळसे विधुर याच मार्गाचा अवलंब करीत असल्यामुळें निदान विधुरांना तरी वसंतरावांचें हें कृत्य गैर होतें असें वाटणार नाही. शिवाय अशा प्रेम-चिन्हांची स्थापना करणारेहि हळूहळू आपल्या प्रेमविषयाला विसरून जातात व केव्हां ना केव्हां तरी त्या स्मृतिसाधनाची अडगळ वाटूं लागण्याइतके तेहि आपल्या द्वितीय अगर हयात पत्नीच्या मोहपाशांत गुरफटून जातात, असा साधारणतः सार्वत्रिक अनुभव आहे, हें लक्षांत आणून सुलोचनेनें ही गोष्ट मनावर घ्यावयास नको होती. एकत्र कुटुंबांत राहणाऱ्या अगर बिजवरांशीं लग्न करणाऱ्या स्त्रियांसारखें वागून तिनें हळूहळू आपल्या पतीचें हृदय व्यापून टाकावयास हवें होतें. पण नमते घेण्याच्या प्रवृत्तीचा तिच्या ठिकाणीं पूर्ण अभाव होता. कारण स्वतःचा चरितार्थ स्वतंत्रपणें चालविण्यास ती समर्थ होती.

बराच वेळ मनसोक्त अश्रु ढाळल्यावर ती उठून बसली. अश्रूंनीं थबथबलेली दृष्टी त्या चित्राकडे एकाग्र करून ती विचार करूं लागली. तें इंदिरेचें---आपल्या सवतीचें चित्र आहे. या एकाच भावनेनें तिनें आतांपर्यंत त्या चित्राकडे एकच दृष्टिक्षेप केला होता. आतां चित्रविषयाकडे अधिक सूक्ष्म दृष्टीनें न्याहळून पाहिल्यानंतर इंदिराबाईचें सौंदर्य किती अनुपमेय असलें पाहिजे याची तिला कल्पना येऊं लागली; आणि तिच्या अवयवांचें सौष्ठव दृष्टीस येऊं लागलें तसतसा तिचा संताप वाढूं लागला, व नाहीं नाहीं त्या कल्पना तिच्या मनांत येऊं लागल्या. इंदिराबाईच्या एकेका अवयवा-बरोबर ती आपल्या अवयवांची तुलना करून पाहूं लागली, तेव्हां आपण किती बेढब आहोंत हें तिच्या ध्यानांत येऊं लागलें. प्रियाराधनाचे काळांत वसंतरावांनीं वेळोवेळीं काढलेले उद्गार किती असत्यपूर्ण व मानभावीपणाचे होते हें तिच्या ध्यानांत येऊं लागलें. पत्नीच्या सद्गुणांची अगर तिच्या बुद्धिमत्तेची पतीला कांहींच किंमत वाटत नाहीं, सौंदर्याशिवाय दुसऱ्या कशाचीहि अपेक्षा पतीला नसते, असें तिला वाटूं लागलें. वसंतरावहि

याच मनोवृत्तींचे आहेत असें तिला एकेका प्रसंगाच्या आठवणीवरून वाटूं लागलें.

मन ही एक अजब चीज आहे. कृतीची दिशा ठरविण्याकरितां मनुष्य विचार करतो; पण विचार करून काढलेले सर्वच निष्कर्ष कोठें तर्कशुद्ध असतात ? शिवाय विचार व विकार यांचें मिश्रण नेहमीं इतकें बेमालूम होतें, कीं अशा निष्कर्षांमधील विचारांचा भाग कोणता व विकारांचा कोणता, त्यांमध्यें कल्पनांचा अंश किती व भावनांचा किती याचें अनुमान व पृथक्करण ते निष्कर्ष काढणारालाहि करतां येत नाहीं. सुलोचनेचीहि अशीच स्थिति झाली. ती जों जों विचार करूं लागली तों तों तिचा अधिकच गोंधळ उडूं लागला. समाजांत आपला दर्जा अगदीं कनिष्ठ आहे, आपण पुनर्विवाहित असल्यामुळें गृहिणींचा समाज आपल्याकडे साशंक व कुत्सित दृष्टीनें पाहतो, याबद्दल तिची पूर्वींच खात्री पटली होती; पण पतीच्या हृदयांत आपल्याला अढळ स्थान प्राप्त झालें आहे आणि या नव्या संसारांत पतीनें आपल्याला समान दर्जाचे हक्क दिलेले आहेत, असा आजवर तिला भरंवसा वाटत होता. आणि या निष्ठेच्या आधारावर तिनें समाजाच्या हेटाळणीकडे आजवर दुर्लक्ष केलें होतें. पण आज तें स्थान व तो दर्जा हीं नष्ट झालीं असें तिला वाटूं लागलें. तीं आपल्याला कधींच प्राप्त झालीं नव्हतीं, तरी आपण मोठ्या शिताफीनें तीं मिळविलीं आहेत अशी फुशारकीची कल्पना करून घेऊन तीं दिल्याबद्दल आपण आपल्या पतीचा व्यर्थ गौरव करीत होतों अशी आजच्या प्रसंगामुळें तिची खात्री पटली. आणि हें जर खरें तर अशा या नामुष्कीच्या संसारांत भाग घेण्यांत काय अर्थ ?

मनांत एकदां कल्पना आली किंवा तोंडांतून एकदां शब्द निघाला कीं तो खरा झालाच पाहिजे, अशीच तिची आजवरची वृत्ति होती. संसारांत जागोजाग समेट करावा लागतो, पावलोपावलीं अपमान गिळून दूरदृष्टीनें आनंदी मुद्रा धारण करावी लागते; गृहिणीची अशी वृत्ति असल्यावांचून कर्त्या पुरुषाला कुटुंबाची धारणा करतां येणार नाहीं, हें व्यवहारज्ञान तिला उमजलेलें नव्हतें. मनांत कल्पना आली, कीं ती पुरी झालीच पाहिजे, तोंडांतून शब्द निघाला, कीं तो खरा झालाच पाहिजे असा तिचा स्वभाव होता. वसंतरावांनीं आपल्या सांगण्याप्रमाणें इंदिराबाईंचें

चित्र आपल्या खोलींतून काढलें नाहीं ना ? चित्र काढून टाकलें नाहीं तर आपण यापुढें या घरांत राहणार नाहीं असें आपण त्यांना सांगितलें होतें ना ? मग आतां आणखी विचार करावयाचें कारण काय ? चित्राच्या अस्तित्वाकडे दुर्लक्ष करावें व माघार घ्यावी अशी कल्पना मधून मधून तिच्या मनांत येत होती; पण एवढ्या निकराचें बोलणें झाल्यानंतर माघार घेण्यांत अपमान आहे अशी समजूत झाल्यामुळें, व आतां माघार घेतली तर पुढें जन्मभर तेंच करीत रहावें लागेल अशी कल्पना झाल्यामुळें ती पलंगावरून तावातावानें उठली व आपल्या सामानाची बांधाबांध करूं लागली.

मुंबईस स्वतंत्रपणें राहत असतांना तिनें स्वतःच्या पैशानें जें कापडचोपड व सामानसुमान खरेदी केलें होतें तें बरोबर घेण्याकरितां तिनें निवडून काढलें. वसंतरावांनीं तिच्याकरितां मोठ्या हौसेनें अनेक दागदागिने करविले होते व नाना प्रकारचें भारी किंमतीचे कापडचोपड आणविलें होते; पण यापैकीं एकाहि वस्तूच्या मोहांत ती पडली नाहीं. बरोबर घ्यावयाच्या सामानाची निवड झाल्यानंतर ती आपली पेटी पुढें घेऊन सामान लावूं लागली. कपडे लावण्याकरितां पेटींतलें सामान बाहेर काढतांना एक जाडसें पाकीट तिच्या हाताला लागलें. त्याच्या आजूबाजूला असलेल्या कागदपत्रांतून तिनें तो लिफाफा ओढून बाहेर काढला. त्याकडे नजर जातांच तिच्या छातींत धस्स झालें !

त्या लिफाफ्यांत काय होतें ! थरथर कांपणाऱ्या हातांनीं तिनें तो उघडला, तेव्हां त्यांतून एक छायाचित्र निघून तिच्या मांडीवर पडलें. तो फोटो तिचे प्रथमपति बाळासाहेब यांचा होता. किती तरी दिवसांत तिनें तो लिफाफा उघडून पाहिला नव्हता. पुनर्विवाह झाल्यापासून किती तरी दिवसांत तिला बाळासाहेबांची आठवण झाली नव्हती ! त्यांचें दर्शन होतांच तिचे डोळे अश्रूंनीं भरून आले, आणि तिच्या मनांत सुखद व दुःखद आठवणींचा हलकल्लोळ उडाला !

त्या स्मृतिस्वप्नांत एकाग्र होऊन किती तरी वेळपर्यंत ती निश्चल बसली होती. बाह्यतः तिची ती निश्चलता एखाद्या योग्याच्या समाधीसारखी दिसत होती; पण तिचें अंतःकरण मात्र समाधिस्थासारखें शान्त नव्हतें. बऱ्याच वेळानें ती भानावर आली. आपल्याला या घरांतून शक्य तितक्या लवकर बाहेर पडावयाचें आहे हें तिच्या ध्यानांत आलें. लगेच तें

छायाचित्र पुन्हा त्या लिफाफ्यांत घालून ती आपल्या सामानाची आवरा-आवर करूं लागली. आवरण्याचें काम चाललें असतांना तिचें विचारचक्र सारखें भ्रमण करीत होतें. आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें आपण हें घर सोडून जात आहों व आपला शब्द खरा करीत आहों हें खरें, पण यांतही आपलाच पराजय होत आहे असें तिला वाटूं लागलें. वसंतरावांनीं आपल्या खोलींत इंदिराबाईचें तैलचित्र लावून आपला अपमान केला आहे व आपण त्याचें उट्टें काढलेंच पाहिजे, असें तिला वाटूं लागलें. पण आपली ही इच्छा कोणत्या उपायानें साध्य होईल याची मात्र तिला कल्पना येईना.

विचारांच्या ओघांत तिच्या हातून होणारें काम आपोआप थांबलें. हातावर हनुवटी ठेवून ती याच विषयाचा विचार करूं लागली. पेटीजवळ पडलेल्या बाळासाहेबांच्या छायाचित्राच्या लिफाफ्यावर तिची विमनस्क दृष्टि एकाग्र झाली होती. तिनें पुन्हा एकदां तें छायाचित्र बाहेर काढलें. चित्रविषयाच्या दृष्टीला दृष्टि भिडेल अशा अंशावर व अंतरावर तिनें तें छायाचित्र धरलें मात्र---तिच्या मनांत एक विलक्षण कल्पना संचारली.

त्या कल्पनेच्या आवेशासरसीं तें छायाचित्र हातीं घेऊन ती बसल्या जागेवरून उठली. इंदिराबाईचें तैलचित्र लावलें होतें त्याचेखालीं एक आरशाचें मेज होतें. सुलोचनेची वेषभूषा याच आरशासमोर होत असे. जवळच वसंतरावांच्या छायाचित्राची चौकट लावलेली होती. सुलोचनेनें ती चौकट काढली, तिच्या पाठीमागल्या फळीच्या चाव्या फिरवून आंतला वसंतरावांचा फोटो बाहेर काढला आणि त्याचे जागीं बाळासाहेबांचा फोटो बसवून चौकट पुन्हा खिळयाला लावून ठेवली. हें सर्व होईपर्यंत तिचे हात सारखे थरथर कांपत होते. हें कृत्य पुरें होण्यापूर्वीच वसंतराव येतील अशी तिला भीति वाटत होती; पण तसें कांहीं झालें नाहीं. थोडक्याच वेळांत तिचें चित्त स्थिर झालें व पुन्हा पेटीसमोर बसून ती आपले कपडे लावूं लागली.

थोडक्याच वेळानें वसंतराव आंत आले. त्यांचें जेवण झालें होतें व कोर्टांत जाण्याच्या तयारीनें ते पगडी चढवून आले होते. ते आंत आले तरी सुलोचनेनें त्यांच्याकडे वळून पाहिलेंसुद्धां नाहीं. हें पाहून वसंतरावांनीं हंसून विचारलें, " आज जेवायचें नाहीं का ? "

" नाहीं." सुलोचना म्हणाली.

" कां ? "

" पोटांत कळा येत आहेत म्हणून ! "

तिच्या बोलण्यांतला दुहेरी अर्थ ओळखून वसंतराव म्हणाले, " अस्सं ! "

आरशाच्या मेजावरल्या डब्यांतली एक सिगारेट काढून ती शिलगावीत असतांना त्यांची नजर समोरच्या फोटोकडे गेली. चित्र पाहतांच सुलोचनेकडे वळून त्यांनीं विचारलें, " कोणाचं हें चित्र ? "

सुलोचनेनें पुष्कळ धीर केला होता, पण वसंतरावांच्या प्रश्नाला उत्तर देतांना तिचें हृदय धडधडल्यावांचून राहिलें नाहीं. भीतीमध्यें लज्जेचीहि भर पडली होती. बाळासाहेब किती तरी वर्षांपूर्वी दिवंगत झाले होते व सुलोचनेनें पुनर्विवाह केला होता—तरी बाळासाहेबांच्या नांवाचा उच्चार करतांना तिला संकोच वाटल्यावांचून राहिला नाहीं. जीव मुठींत धरून ती उत्तरली, " बाळासाहेबांचं—माझ्या पहिल्या पतीचं ! "

तिचे हे शब्द ऐकतांच वसंतराव बेभान झाले. त्यांनीं विचारलें, " आणखी हें चित्र माझ्या घरांत काय म्हणून ? "

" माझं घर ? " सुलोचनेनें हेटाळणीच्या स्वरांत विचारलें, " आणखी हें घर आपलं एकट्याचं कधींपासून झालं ? "

डाव अंगावर आला हें तेव्हांच वसंतरावांच्या ध्यानांत आलें. त्यामुळें अधिकच खवळून जाऊन ते ओरडले, " हो-हो, माझंच आहे हें घर; आणखी या घरांत मी हें चित्र तुला कधींहि लावूं देणार नाहीं."

थोडक्याच वेळापूर्वी झालेलें बोलणें सुलोचनेला पूर्ण आठवत होतें. तेच शब्द उलट बाजूकडून उच्चारले जात आहेत हें पाहून तिला त्या स्थितींतहि हसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. ती हसून म्हणाली, " पण चित्र तर लागलं—आतां आपण काय करणार ? "

" मी त्याचे तुकडे तुकडे करून ते जाळून टाकीन." वसंतराव त्वेषानें उद्गारले, आणि बोलतां बोलतां त्यांनीं बाळासाहेबांचा फोटो बसविलेल्या चौकटीला हात घातला.

सुलोचनेचे डोळे तापलेल्या पोलादासारखे चमकूं लागले. पाशवी शक्तीच्या जोरावर वसंतराव आपल्याला हाणून पाडीत आहेत, हें तिला सहन झालें नाहीं. बाळासाहेबांचें छायाचित्र लावलें होतें तिकडे झेप टाकून

ती वसंतरावांच्या समोर उभी राहिली व म्हणाली, “ माझ्या जिवांत जीव आहे तोंपर्यंत मी ही गोष्ट होऊं देणार नाहीं.”

तिचा आवेश पाहून वसंतराव चरकले. चौकट उखडून काढण्याकरितां त्यांनीं तिजवर ठेवलेला हात काढून घेतला आणि हातांतली सिगारेट कोपऱ्यांत फेकून देऊन ते लगेच खोलींतून निघून गेले.

दरवाजासमोर उभ्या असलेल्या टांग्यांतून वसंतराव कोर्टांत गेले. हें रोजच्या संवयीप्रमाणें खिडकींतून पाहिल्यानंतर तिनें फिरून सामानाची बांधाबांध सुरू केली. अपमानाचें उसनें फेडून टाकल्यामुळें आतां तिची मुद्रा प्रसन्न दिसत होती. विजयाच्या उन्मादांत तिनें खालचा ओठ क्षणभर दांतांमध्यें दाबून धरला होता; पण तिचा तो उन्माद व ती प्रसन्नता हीं फार वेळ टिकलीं नाहींत. झाल्या गोष्टीचा विचार करूं लागल्यावर तिच्या मुद्रेवर पश्चात्तापाची व अस्वस्थतेची छटा दिसूं लागली.

— २ —

बिजवराचा पुनर्विवाह दक्षिणी समाजाच्या आंगवळणीं पडलेला आहे. पण विधवांच्या पुनर्विवाहाची स्थिति तशी नाहीं. सबब बिजवरांच्या ज्या कृत्यांची यथार्थता सहज पटूं शकते, तींच कृत्यें विधवांनीं केलीं असतां एकदम त्यांना अत्याचारांच्या सदरांत ढकलण्यांत येतें. सुलोचनेनें केलेलें कृत्य अशाच प्रकारचें होतें. इंदिरेबरोबर केलेल्या संसाराचें स्मारक म्हणून तिचा फोटो वसंतरावांनीं आपल्या शयनमंदिरांत लावला. त्याचें अस्तित्व सुलोचनेनें सहन करावें अशी जर त्यांची अपेक्षा तर तिच्या पहिल्या पतीच्या फोटोला आक्षेप न घेण्याइतकी सहिष्णुता त्यांचे अंगीं कां नसावी ? तुमचें तुमच्या पहिल्या पत्नीवर प्रेम होतें हें जाहीर करण्यांत जर तुम्हांला संकोच वाटत नाहीं, तर आपल्या पहिल्या पतीवर आपलें प्रेम होतें हें तिनें व्यक्त केलें तर त्याबद्दल तुम्हांला संताप कां वाटावा ? दोघांनींहि प्रथमसंबंधाचीं स्मारकें करण्यांत नीतीच्या दृष्टीनें गौण असें कांहींच नाहीं. पूर्वीच्या जन्मांची स्मृति योग्यालाच होऊं शकते. त्या आठवणी धारण करावयास योगाचेंच सामर्थ्य अंगीं असावें लागतें. कारण ज्याला पूर्वजन्माची स्मृति होते तो तत्क्षणीं विरक्त बनलाच पाहिजे. कारण या स्मृतीमुळें अहंकार नष्ट होऊन संसारांतील चढाओढीचा व यशापयशाचा फोलपणा निदर्शनास येतो, आणि यामुळें संसारांत आवेशानें भाग घेतां येत नाहीं. अपवादात्मक

परिस्थितीशिवाय असें होणें इष्ट नसल्यामुळेंच परमेश्वरानें मानवी स्मृतीचें क्षेत्र मर्यादित केलें आहे. इतकें कीं प्रत्यक्ष पाहिलेल्याच काय, पण स्वतः बुद्धिपुरस्सर केलेल्या कृत्यांचीहि मनुष्याला आठवण राहूं नये. या मर्यादेमुळेंच मनुष्य संसारांत रंगू शकतो. प्रणयी हृदयेंहि तेव्हांच एकजीव होऊं शकतात, कीं जेव्हां त्यांचा संयोग पूर्वप्रणयामुळें कलुषित झालेला नसतो. कारण उत्कट प्रेमाला अंगचोरपणा यत्किंचितहि सहन होत नाहीं; आरसा निर्मळ असला तरच त्यांत प्रतिबिंब स्वच्छ दिसूं शकतें हें उघड आहे. पण वसंतराव हे बोलून-चालून 'बिजवर' होते व सुलोचना ही त्यांची 'पुनर्विवाहाची' बायको होती. उघड्या डोळ्यांनीं केलेल्या या आडगिऱ्हाइकी व्यवहारांत एवढा चोखंदळपणा काय कामाचा ?

वैवाहिक जीवनक्रमाची संवय झालेल्या वसंतरावांना इंदिराबाईच्या मृत्यूनंतर सहचारिणीच्या अभावीं संसारांत स्वारस्य वाटेना, म्हणूनच ते पुन्हा लग्न करण्याला तयार झाले. पिंड देण्याला कोणी नाहीं या सबबीवर भर देण्याइतके ते पुराणमतवादी नव्हते. हल्लींच्या दिवसांत प्रौढ कुमारिका मिळत नाहींत असें नाहीं; पण ज्या कुमारिका प्रौढ असतात त्या बहुशः सुशिक्षित असतात, आणि त्यांची उडीहि मोठी असते. शिवाय बिजवराशीं लग्न करावयाला त्या साधारणतः प्रतिकूल असतात. वयस्क बिजवरानें अल्पवयी कुमारिकेशीं लग्न करून तिच्या आयुष्याचा उन्हाळा करूं नये; इतकेंच नव्हे, तर कुमारिकेशीं लग्न करावयाचा त्याला अधिकारच नसतो, असें वसंतरावांचें ठाम मत होतें. म्हणून एखाद्या सुंदर, सुशिक्षित व प्रौढ गतभर्तृकेशीं पुनर्विवाह जुळविण्याच्या खटपटीला ते लागले. एका निरपेक्ष व सुधारणेच्छु मध्यस्थामार्फत त्यांनीं मुंबईस बरींच स्थळें पाहिलीं. पुष्कळ दिवस प्रयत्न केल्यानंतर पुनर्विवाहाचा बेत सोडून द्यावा असेंहि त्यांना वाटूं लागलें; कारण जगाच्या चढाओढींत प्रत्यक्षपणें भाग घेतल्यामुळें कणखरपणा अंगीं आलेल्या जून विधवा कांहीं केल्या त्यांच्या मनास येईनात. विवाह हा एक धार्मिक संस्कार आहे, तर पुनर्विवाह हा एक व्यवहार मात्र आहे; तरीहि हा व्यवहार निवळ बाजारी सौद्यासारखा ठरवतां येत नाहीं. आणि तो तसा ठरला तर अंतीं सुखकारक किंवा हितकारक होत नाहीं. कारण पुनर्विवाह झाला तरी पुढील वैवाहिक जीवनांत परस्परांनीं स्वयंप्रेरणेनें परस्परांसाठीं झटावयाचें असतें, आणि प्रेरणेवर अवलंबून असणाऱ्या बाबतींत करार

करणें अशक्य असतें. वसंतरावांनीं आपल्या मध्यस्थ मित्राच्या मदतीनें पाहिलेल्या स्थळांपैकीं कांहीं विधवा अगदींच टाकाऊ नव्हत्या; पण मुलाचा बाप जेवढ्या बेमुर्वतखोरपणानें हुंड्याची गोष्ट काढतो तेव्ढ्याच निःशंकपणें स्त्रीधनाची आगाऊ तरतूद करण्याच्या गोष्टी त्यांचेपैकीं कांहींजणींनीं काढतांच वसंतरावांना पुनर्विवाहाची अगदीं शिसारी वाटूं लागली. हिंदु कायद्यामुळें विवाहित स्त्रियांची सांपत्तिक स्थिति किती परावलंबी झालेली आहे हें माहीत असल्यामुळेंच त्यांनीं स्वतःच्या सुरक्षिततेसाठीं ही आगाऊ खबरदारी घेतलेली होती. व्यावहारिक दृष्टीनें ह्या मागणीला आक्षेप घेतां येणार नाहीं हें खरें आहे; पण वसंतरावांना हें सहन झालें नाहीं, हेंहि तितकेंच खरें. आपल्या प्रामाणिकपणाबद्दल व औदार्याबद्दल शंका घेतलेली कोणाला आवडेल ? एकलकोंडेपणामुळें एककल्ली व चिडखोर बनलेल्या त्यांच्या मनाची अशी ओढाताण चाललेली असतांना सुलोचनेशीं त्यांचा परिचय होण्याचा योग एकाएकीं जुळून आला.

बराच वेळपर्यंत प्रयत्न करूनहि झोप येईना म्हणून वेळ घालविण्या-साठीं वसंतराव त्या दिवशीं रात्रीं सिनेमाच्या शेवटच्या प्रयोगाला गेले होते. प्रयोग सुरू होण्याला अगदीं थोडा वेळ राहिला होता. तेव्हां दोन विधवांना बरोबर घेऊन एक वयस्क इसम थिएटरांत आला. त्या दोघींपैकीं एक वयस्क होती व दुसरी तरुण होती. ही तरुण विधवा हीच आपली सुलोचना होय. ही मंडळी आंत आली तेव्हां ती वयस्क विधवा पुढें होती. ती तशीच खुर्च्यां-च्या रांगांमधून पुढें झाली. तिच्यामागें तो इसम व त्याच्या मागोमाग सुलोचना, या क्रमांत ती मंडळी आंत आली व वसंतरावांच्या पलीकडे मोकळ्या असलेल्या तीनच खुर्च्यांवर त्याच अनुक्रमांत बसली. अर्थात् सुलोचना वसंतरावांच्या अगदीं शेजारींच बसली.

सुलोचना आंत आली तेव्हां तिच्या डोळ्यांवर थिएटरांतील विद्युत्प्रकाश एकवटलेला वसंतरावांना दिसला. त्या प्रकाशाला प्रत्युत्तर देण्याइतकें प्रखर तेज तिच्या डोळ्यांत असलेलें त्यांना आढळून आलें. तिची शरीरयष्टि सडपातळ होती. तिच्या अवयवांत सौष्ठव भरलेलें होतें. तिचें तारुण्य टवटवीत होतें. तिची झुलती चाल अत्यंत आकर्षक होती. तिच्या वृत्तीवरून ती सुशिक्षित असावी व पुरुषांच्या समाजांत निर्भयपणें वावरण्याचा तिला सराव असावा असें दिसत होतें. इतक्या

गोष्टी तिला अनुकूल होत्या तरी तिची गणना सुंदर स्त्रियांमध्यें करतां येण्यासारखी नव्हती. कारण तिचा वर्ण फारसा उज्ज्वल नव्हता व नाकहि अगदीं सरळ नव्हतें. तरीहि प्रथमदर्शनींच तिनें वसंतरावांचें मन आकर्षून घेतलें. ती त्यांच्या अगदीं शेजारींच बसल्यामुळे त्यांना पुढे तिच्या-कडे रोखून पाहतां आलें नाहीं; पण ती आपल्या शेजारीं आहे एवढ्यानेंहि त्यांना समाधान वाटल्यावांचून राहिलें नाहीं.

लवकरच थिएटरांत अंधार झाला व चित्रपट सुरू झाला. चित्रपट पाहण्यांत सुलोचना अगदीं गर्क होऊन गेली. समोर दिसणाऱ्या हालत्या चित्रांपेक्षां शेजारीं चित्रासारख्या स्तब्ध बसलेल्या सुलोचनेकडेच वसंतरावांचें लक्ष एकाग्र झालें होतें. शेजारीं बसलेले अनोळखी गृहस्थ आपणांकडे निरखून पाहत आहेत याची तिला कल्पनाहि नव्हती. त्याचप्रमाणें ती ज्यांच्येबरोबर आली त्यांच्या हालचालींचीहि बिचारीला कल्पना नव्हती. मात्र ती गोष्ट अचानकपणें वसंतरावांच्या लक्षांत आली. आपल्या उजव्या खांद्याला कोणाचा तरी हात लागल्याचा त्यांना भास झाला, म्हणून त्यांनीं मुद्दाम मान वळवून तिकडे पाहिलें. दोघांची नजरानजर झाली. आपल्या डाव्या दंडाला चोरटा स्पर्श करणारा हात अनोळखी वसंतरावांचा नसून आपल्याबरोबर आलेल्या सद्गृहस्थांचाच आहे हें दिसून येतांच ती जराशी दचकली. तिच्या खुर्चीवर त्या इसमानें इतक्या विश्वासानें हात ठेवला होता, कीं त्यांत आपण कांहीं विशेष करीत आहों असें त्याला वाटत नसावें असेंच दिसत होतें. त्याला जर या गोष्टीचा सराव होता, तर मग सुलोचनेला एवढें दचकण्याचें काय कारण? हा काय प्रकार आहे तें वसंतरावांना कांहींच समजेना. मात्र ती दचकली तेव्हांपासून त्यांनीं त्या वयस्क इसमाच्या हालचालींवर बारीक नजर ठेवली. चित्रपटाचा चालू असलेला भाग संपून थिएटरांत पुन्हा लखलखाट होण्याच्या सुमारास त्यानें तिच्या खुर्चीवरून आपला हात काढून घेतला, आणि तो त्या वयस्क बाईबरोबर गप्पागोष्टी करण्यांत गर्क होऊन गेला. पुढील भाग सुरू झाल्यानंतर हात फिरविण्याचा प्रकार पुन्हा झाला. अंग शक्य तेवढें चोरून व पुढें वांकून ती चित्रपट पाहण्यांत आपण अगदीं दंग झालों आहों असें भासवीत होती. दरम्यान विश्रान्तीची वेळ आली, तेव्हां तीं तिघेंहि बाहेर गेलीं. वसंतरावहि त्यांचे मागोमाग बाहेर आले. बगीचांतल्या विश्रान्तिगृहांत जाऊन सर्वांनीं थंड पेयें

घेतलीं. खेळ सुरू होण्याची घंटा होतांच सर्व मंडळी परत निघाली. आंत जात असतांना त्या वयस्क बाईला तिचा एक स्नेही भेटला. दोघांचें बोलणें सुरू झालें. सुलोचनेला पुढे होण्याबद्दल तिनें खूण केली. लगेच आपल्या बरोबरच्या इसमाच्या मागोमाग ती निमूटपणें थिएटरांत आली. वसंतरावहि थोडक्याच वेळानें आपल्या जागेवर येऊन बसले. एक भाग झाला, दोन भाग झाले, तरी आपल्या मैत्रिणीचा पत्ता नाहीं, हें पाहून सुलोचनेनें त्या इसमाला चौकशी करावयास सांगितलें; पण तो जागचा हाललाहि नाहीं. कांहीं तरी उडवाउडवीचें उत्तर देऊन त्यानें वेळ मारून नेण्याचा प्रयत्न केला. यामुळें तिचें समाधान तर झालें नाहींच, उलट ती अधिक साशंक मात्र झाली. सर्व कार्यक्रम संपला तरी त्या बाईचा पत्ता नाहीं हें पाहून वसंतरावांनाहि जबरदस्त संशय आला. पूर्वींच ठरवून ठेवलेल्या व्यवस्थेनुसार सुलोचनेला मुद्दाम त्या इसमाच्या तावडींत सोडून ती वयस्क बाई आपल्या स्नेह्याबरोबर निघून गेली असावी असें त्यांना वाटलें. पुढें काय प्रकार होणार याचें त्यांना सहज अनुमान झालें. सुलोचनेची तशी इच्छा नसल्यास मर्जीविरुद्ध कोणतीहि गोष्ट करणें तिला भाग पडूं नये, म्हणून वसंतरावांनीं त्यांचा पाठलाग करावयाचें ठरविलें.

थिएटरांतून बाहेर पडल्यावर त्या गृहस्थानें एक गाडी ठरविली. आपली मैत्रीण कोठें दिसते कीं काय, हें ती अजून पाहतच होती. त्यानें तिच्याकडे पाहून मिस्किलपणें हसून म्हटलें, " पुरे आतां. चंपाबाई केव्हांच घरीं पोंचल्या असतील ! "

" म्हणजे काय ? आपण बरोबरच घरीं जायचं असं ठरलं होतं ना ? " सुलोचनेनें विचारलें.

" तसं ठरलं होतं खरं, पण त्या तर निघून गेल्या—आतां काय करायचं ? मीच तुम्हांला घरीं पोंचवतों म्हणजे झालं."

जरा वेळ विचार करून ती म्हणाली, " मग आपण ट्रॅममधूनच घरीं जाऊं या."

" छेः-छेः ! " तो चमकून म्हणाला, " रात्रीच्या वेळीं ट्रॅम लवकर मिळत नाहीं आणखी गर्दीहि फार असते. आपण गाडींतूनच जाऊं म्हणजे तुम्हांला त्रास होणार नाहीं, आणखी थेट घरापर्यंत लवकर जातां येईल."

त्यांचें बोलणें एका दृष्टीनें अगदीं खरें होतें. कारण सुलोचना ज्या

चाळींत राहत असे तेथून ट्रॅमचा नाका बराच दूर होता. शिवाय ते गाडीं-तून अगदीं घरापर्यंत पोचविण्याला येत असल्यामुळें तिला भीति वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें. पण तिच्या दृष्टीनें ही गोष्ट अगदीं गैर होत होती. थिएटरांतील अंधारांत तो हात टाकण्याचा प्रकार झाल्यापासून जगांतील सर्व बदमाष लोकांपेक्षां तिला त्याचीच अधिक भीति वाटूं लागली होती. पण त्याच्याबरोबर जाण्यावांचून दुसरा कांहींच उपाय नसल्यामुळें त्यानें बोलावलेल्या गाडींत ती निमूटपणें त्याच्या मागोमाग चढून बसली.

त्यांची गाडी चालूं लागल्यावर वसंतरावांनींहि एक गाडी ठरविली व ते त्यांचे मागोमाग निघाले. दोन्ही गाडयांमध्यें सुमारें पन्नास कदमांचें अंतर होतें, व हें अंतर कायम ठेवण्याविषयीं त्यांनीं आपल्या गाडीवाल्याला सांगितलें होतें. वसंतरावांनीं आपल्या गाडीचा टप पाडवून घेतला असल्या-मुळें पुढें चाललेला सर्व प्रकार त्यांना स्पष्ट दिसत होता.

समुद्रालगतच्या रस्त्यानें दोन्ही गाडया जात होत्या. आजूबाजूला विशेष वस्ती नाहीं अशा जागीं पुढील गाडी एकाएकीं थांबली. गाडींतून तिनें लगेच खालीं उडी टाकली. तिच्या मागोमाग तो गृहस्थहि खालीं उतरला. पाठोपाठ येत असलेली वसंतरावांची गाडीहि थांबली. ते खालीं उतरून तिच्या मदतीला धावले. ती थरथर कांपत होती. तो खालीं मान घालून उभा होता. त्याच्याजवळ जाऊन वसंतरावांनीं त्याला विचारलें, "तुम्ही चांगले सभ्य इसम दिसतां, आणखी हा काय फाजीलपणा तुम्हीं मघांपासून चालवला आहे ?"

"कोणीं—मीं ? मीं काय केलं ?" त्या गृहस्थानें शरमिंद्या स्वरांत विचारलें. वसंतरावांकडे थोडा वेळ निरखून पाहिल्यावर त्यानें विचारलें, "थिएटरांत तुम्ही आमच्या शेजारींच बसलां होतां, नाहीं का ? माझी अब्रू घेण्यासाठीं तुम्हींच दोघांनीं कट केला असला पाहिजे असें मींच कां म्हणूं नये ? चला, मीच तुम्हांला पोलीसचौकीवर घेऊन जातों."

त्यानें वसंतरावांना एवढा दम दिला खरा; पण त्याचाच जीव थाऱ्यावर नव्हता. वसंतराव कांहींच बोलले नाहींत; आपल्या नांवाचें कार्ड खिशांतून काढून त्यांनीं त्याचे हातीं दिलें. कार्डावरील नांवगांव वाचून पाहतांच तो चरकला व मिटवामिटवीच्या गोष्टी बोलूं लागला. या बोल-ण्याला जोर देण्यासाठीं त्यानें आपलें कार्ड वसंतरावांचे हातीं दिलें.

त्यावरील नांव पाहतांच ते चमकले; कारण तें नांव त्यांच्या माहितीचें होतें. मुंबईच्या संपन्न दक्षिणी गृहस्थांमध्यें त्याची गणना होत असे, व स्त्रीशिक्षणाला सढळ हातानें मदत करण्याबद्दल त्याची मोठी ख्याति होती. शिवाय सुलोचना ज्या शिक्षणसंस्थेंत काम करीत होती त्या संस्थेचे आपण अध्यक्ष असल्याचें त्यानें आपण होऊन वसंतरावाना सांगितलें. अशा मनुष्याची बेअब्रू चवाट्यावर येणें इष्ट नाहीं हें त्यांना दिसून आलें. शिवाय हें प्रकरण पोलिसांत गेलें तर एका निरपराध विधवेच्या अब्रूवर शिंतोडा उडाल्यावांचून राहणार नाहीं, हें ओळखून त्या गृहस्थानें सुलोचनेची माफी मागावी व तिला पुन्हा केव्हांहि त्रास देऊं नये या अटीवर वसंतरावांनीं मिटतें घेतलें. आपल्या गाडीवाल्याचे पैसे चुकते करून ते पुढल्या गाडींत बसले, आणि माफीचा औपचारिक विधि झाल्यानंतर सुलोचनेला तिच्या बिऱ्हाडीं पोंचवून मग आपल्या मुक्कामावर ते माघारीं आले.

पुढील रविवारीं वसंतराव सुलोचनेच्या बिऱ्हाडीं गेले. तिनें मोठ्या कृतज्ञतेनें त्यांचें स्वागत केलें. चहा घेतांना त्यांच्या बऱ्याच गप्पागोष्टी झाल्या. तिच्या खोलींतली टापटीप, टेबलावर ठेविलेलीं तिचीं आवडतीं पुस्तकें, आंतल्या खोलींत लावलेली गोपालकृष्णाची तसबीर, तिला वाहिलेला ताज्या फुलांचा हार वगैरे गोष्टी पाहून त्यांच्या मनांत तिच्याविषयीं फारच अनुकूल ग्रह उत्पन्न झाला. तिच्या घरून वसंतराव निघाले ते तडक आपल्या स्नेह्याकडे गेले व त्यांच्याकडून सुलोचनेची बरीच माहिती त्यांनीं मिळविली.

सुमारें दोन वर्षांपूर्वी सुलोचना बी. ए. झाली होती. तेव्हांपासून मुलींच्या एका खासगी शाळेंत नोकरी धरून ती स्वतःचा चरितार्थ चालवीत होती. तिला सासरचे अगर माहेरचे जवळचे असे नातेवाईक कोणीच नव्हते. नवऱ्याच्या विम्याच्या पैशांतून व स्कॉलर्शिप्स् मिळवून तिनें आपला शिक्षणक्रम पुरा केला होता. सहाव्या इयत्तेंत असतांना तिचें लग्न झालें, व मॅट्रिकचा निकाल लागल्यानंतर लवकरच ती विधवा झाली होती. हें स्थळ आपल्याला पसंत आहे असें वसंतरावांकडून समजतांच त्यांच्या स्नेह्यानें तिचा ठाव घेऊन पाहिला, पण भावी पतीकडून मिळणाऱ्या स्त्रीधनाच्या आमिषानें हें कूळ बधणारें नाहीं असें आढळून आलें, तेव्हां त्यानें प्रियाराधनाचा राजमार्ग त्यांना सुचविला.

वसंतरावांची सुलोचनेशीं झालेली पहिली भेट प्रियाराधनाला अत्यंत अनुकूल अशी होती. या परिस्थितीचा त्यांनीं भरपूर फायदा घेतला. परिचयाचें पर्यवसान स्नेहांत व पुढें प्रेमांत होण्याला फारसा कालावधि लागला नाहीं. लवकरच त्यांचा पुनर्विवाह झाला व तिला बरोबर घेऊन ते घरीं आले. थोडक्याच दिवसांत आपल्याला झालेला वस्तुलाभ उत्कृष्ट असल्याबद्दलची त्यांची खात्री पटली; पण ही वस्तु सजीव आहे, पारतंत्र्याच्या बंधनांना अलंकार मानण्याइतकी निर्बुद्ध नाहीं, चरितार्थाची जबाबदारी परस्पर भागविण्यासाठीं स्वाभिमानावर पाणी सोडण्याइतकी निःसत्त्व नाहीं, हें लवकरच त्यांच्या प्रत्ययास यावयाचें होतें.

— ३ —

चित्रपटांतील देखाव्यांप्रमाणें पूर्वायुष्यांतील हे व इतर प्रसंग तिच्या चित्तचक्षूंसमोरून झरझर निघून जात असतांना किती वेळ गेला याचें तिला भानच राहिलें नाहीं. घरासमोरील शाळेला मधली सुटी झाली व मुलांचा कलकलाट सुरू झाला तेव्हां तिच्या स्वप्नसृष्टीचा भंग झाला. तिनें दचकून घड्याळाकडे पाहिलें. वसंतरावांच्या गैरहजेरींत मुंबईस जावयाचें असेल तर ताबडतोब निघालेंच पाहिजे असें तिला दिसून आलें. लगेच तिनें गड्याला टांगा आणावयास पाठविलें.

पुन्हा एकदां इंदिराबाईच्या तैलचित्राकडे तिची नजर गेली. त्या मोठ्या दिमाखानें आपल्याकडे पाहत आहेत, आणि माझ्या निर्जीव प्रतिमेनें तुझा पराभव केला आहे व पळ काढावयास लावलें आहे असें आपल्याला बजावीत आहेत, असें तिला वाटलें. खरोखरीच तिचा पराजय झाला होता. ज्या संसाराचा मालकी हक्कानें निरंतर उपभोग घेण्याकरितां ती आली होती त्यावर तिचा तो हक्क शाबीत झाला नाहीं; केवळ कांहीं काळपर्यंत ती त्या संसाराची वहिवाटदार मात्र ठरली, आणि आतां तर ती तोहि हक्क गमावून बसली होती. पराजयाच्या अवमानानें तिनें आपलें मस्तक नम्र केलें. तेव्हां तिची दृष्टि बाळासाहेबांच्या छायाचित्राकडे गेली. घाईघाईनें तिनें तो फोटो चौकटींतून काढून घेतला व पूर्वीच्याच पाकिटांत घालून ट्रंकेंत ठेवून दिला; इतक्यांत गड्यानें टांगा आल्याची वर्दी दिली. लगेच आपलें सामानसुमान बरोबर घेऊन ती स्टेशनकडे रवाना झाली.

दुसऱ्या वर्गाचें मुंबईचें तिकिट घेऊन ती प्लॅटफॉर्मवर गेली तेव्हां

गाडी तयारच होती. प्लॅटफॉर्मलगतचाच एक मोकळा कोपरा पाहून ती डब्यांत जाऊन बसली. ती मुद्दाम अलीकडील बाजूला बसली; कारण तिच्या वेड्या मनाला अजूनहि आशा वाटत होती, कीं आपल्या मागोमाग वसंतराव येतील आणि आपली क्षमा मागून व समाधान करून आपल्याला पुन्हा घरीं घेऊन जातील !

दुसऱ्या वर्गाचे उतारू आंत येण्याच्या दरवाजाकडे ती अगदीं डोळे लावून बसली होती. वसंतराव येतील अशी तिला आशा लागली होती. पण ज्या व्यक्ति आपल्याला येथें दिसतील अशी दुष्ट भीति स्वप्नांतहि तिला वाटली नसती त्याच नेमक्या दत्त म्हणून तिच्यासमोर आल्या. मात्र सुलोचनेला पाहतांच त्या व्यक्ति पुढील डब्यांत जाऊन बसल्या.

सिनेमाच्या रात्रीं तिच्या चारित्र्यावर संकट आणणारी चंपाबाई व तिचा साथीदार याच त्या व्यक्ति होत्या. त्यांना पाहतांच सुलोचनेच्या जिवाचा थरकांप उडाला. कारण पुन्हा लाधलेल्या संसाराचा त्याग करून ज्या जगांत उतरण्याचा तिचा मानस होता तेथील संकटांचें मूर्तस्वरूपच त्या दुक्कलीच्या रूपांत तिच्यापुढें प्रकट झालें होते. हल्लींच्या परिस्थीतींत स्त्रियांना स्वातंत्र्य व स्वावलंबन हीं हवीं असतील तर---कांहीं वंद्य अपवाद खेरीज करून---त्यांनीं शारीरिक व मानसिक पावित्र्याची फारशी मातब्बरी बाळगतां कामा नये, हें बोलण्या-ऐकण्यांत कडू भासणारें पण व्यावहारिक सत्य तिला अनुभवानें पटलें होतें.

वसंतरावांनीं आपली क्षमा मागितली नाहीं तरी चालेल, इंदिराबाई-च्या प्रतिमेची रोज पूजा करावयाची अट घातली तरी हरकत नाहीं, फक्त त्यांनीं यावें व आपला हात धरून घरीं ओढून न्यावे, एवढीच ती मनांतल्या मनांत परमेश्वराची प्रार्थना करूं लागली.

पण परमेश्वर जणुं तिचा अंतच पाहत होता.

गाडीची शिटी झाली तरीहि वसंतराव आले नाहींत. गाडी सुटण्या-पूर्वीं आपणच उतरून जावें अशी तीव्र इच्छा तिच्या मनांत उत्पन्न झाली व त्यासरशीं ती उठलीहि !

इतक्यांत वसंतराव धावतधावत प्लॅटफॉर्मवर आले. घाबऱ्या घाबऱ्या ते एकेका डब्यांत डोकावीत धावूं लागले.

एका खिडकींत सुलोचनेचें मुख त्यांना दिसलें ! तिच्या. डोळ्यांतून

अश्रु ओघळत असलेले त्यांना दिसले. लगेच त्या डब्यांत घुसून ते तिच्या-जवळ आले व तिचा हात धरून गद्गद स्वरांत म्हणाले, "काय हा वेडेपणा— अन् कोण हा आततायीपणा ! चल घरीं."

त्यांच्या मागोमाग सुलोचना डब्याच्या दरवाजाशीं आली, तेव्हां गाडी नुकतीच सुटली होती. त्यांच्या हातांचा आधार घेऊन ती प्लॅटफॉर्मवर सुरक्षितपणें उतरली.

आपलें सामान गाडींतच राहिल्याची तिला तांग्यांत बसल्यानंतर आठवण झाली. पण पूर्वायुष्यांतील आठवणींचीं तीं चिन्हें पुन्हा दृष्टीसमोर येऊन मनाची चलबिचल होऊं नये म्हणून तिनें सामानाची गोष्टहि काढली नाहीं.

वसंतरावांच्या मागोमाग ती आपल्या शयनमंदिरांत गेली. इंदिराबाईचें तैलचित्र लावलें होतें तिकडे तिची दृष्टि तिच्या पापी मनानें ओढून नेली— पण आतां तें चित्र तेथें नव्हतें !



# ब्रह्मविद्येचा अभ्यास : : ४१

—नाहीं तर मी कोठला पुनः अभ्यास करायला ? हजार खटपटी-लटपटींनीं कसा तरी त्या यंत्रांतून सुटलेला गडी मी ! वडिलोपार्जित उत्पन्न, आणि सांठविलेलें द्रव्य यांच्या भरवंशावर, वडिलांनीं गांवाबाहेर बांधिलेल्या बंगल्यांत शांततेनें आयुष्य कंठावयाचें असा माझा खास निश्चय झालेला. अभ्यासक्रमांतून रिकामा झाल्यावर माझ्या आप्तेष्टांनीं माझ्या पायांत बेडी ठोकण्याचे नाना प्रयत्न केले; परंतु एकाकी राहण्याच्या माझ्या तोंपर्यंत-च्या संवयीनें, अथवा कोमल आणि सुंदर सोबतीची आवश्यकता अगदींच न भासल्यामुळें म्हणा, लग्नमालेच्या नाजुक बंधनानें निबद्ध व्हावें, असें मला वाटेचना. म्हणून, माझ्यावर तांदळाच्या मंगल अक्षता उधळण्याची संधि माझ्या आप्तेष्टांना देण्याऐवजीं मीच त्यांना वाटाण्याच्या अक्षता देऊन वाटे-ला लाविलें होतें; पण माझ्या वयोवृद्ध आजींच्या वात्सल्यपूर्ण नेत्रांतून

अश्रूंची झिरपणी लागली, कीं माझ्या निश्चयाच्या पायाचे बंधारे खिळखिळे होतात कीं काय, अशी मला भीति वाटूं लागे. निःस्वार्थबुद्धीनें त्यांनींच माझें लालनपालन केलें असल्यानें, केवळ माझ्याच हितबुद्धीनें केलेल्या त्यांच्या आग्रहाच्या मागणीकडे कानाडोळा करणें म्हणजे जाणूनबुजून डोळ्यांवर कातडें ओढून, कृतघ्नता पदरीं बांधून घेणें होय, असें मला अलीकडे वाटूं लागलें होतें. कालाची एकेका दिवसानें झालेली प्रगति, वृद्धांच्या थोड्या उरलेल्या आयुष्यांत फारच महत्त्वाची असल्यानें, जर आपल्या डोळ्यांदेखत यानें लग्न केलें नाहीं तर हा खात्रीनें जन्माचा संन्यासी राहून याचे हालहाल होणार, या खात्रीनें तर त्या माउलीनें अन्नपाणी जवळजवळ वर्ज्यच केलें होतें. माझ्या वांटणीचा असा, कोंवळ्या प्रेमाच्या जिवाटीचा झरा तेवढाच काय तो परमेश्वरानें मला दाखविला होता; आणि माझ्या हटवादीपणामुळें तो कायमचा आटणार अशीं चिन्हें स्पष्टपणें दिसूं लागतांच मी माझा तो निश्चय बदलूं घातला.

माझा निश्चय बदलण्याला आणखी एक चांगलेंच कारण झालें. आमच्या समोरच्या बंगल्यांत, खाऊनपिऊन सुखी व संततीनें समृद्ध अशा गृहस्थाचें एक बिऱ्हाड नुकतेच आलें होतें. या दोन घरांच्या मध्यंतरीं काय तो रस्ताच असल्यानें, जातां-येतां बंगल्याच्या फाटकावर 'अनंत योगेश्वर ब्रह्मे' या नांवाची पाटी दिसूं लागली. स्वतः घरचे मालक, त्यांची पत्नी, तीन कन्या, आणि तीन वर्षांचा एक मुलगा अशीं त्या कुटुंबांतील माणसें होतीं. त्यांच्या पहिल्या मुलीचें पूर्वींच लग्न झालें असून दुसरी माझ्या गळ्यांत बांधण्याच्या बेतानें त्यांनीं आमचा शेजार संपादिला होता, अशी बायकाबायकांत कुजबूज सुरू झाली. आजींबद्दलच्या माझ्या भावनांसंबंधीं ब्रह्मयांनीं माहिती मिळवून त्यांच्या मार्फत अनंतरावांनीं महत्त्वाचें बोलणें सुरू केलें देखील. मुलीचें सोळा-सतरा वर्षांचें वाढलें वय, तिचें शिक्षण आणि सुरूपसंपदा यांनीं तर आजींच्या आग्रहाला अधिकच जोर मिळाला. लग्न करणें झालेंच, तर वधूच्या स्वभावाचें पूर्ण परीक्षण, आणि तिनें संतोषित मनानें दिलेलें अनुमोदन हीं साध्य झालींच पाहिजेत, अशी मीं अट घातली. निरुपायानें आजींनीं ती अट मान्य केली. बंगल्याच्या व्हरांड्यांत, फुलपांखरांच्या स्वैर वृत्तीनें वावरणाऱ्या ज्येष्ठा मोहिनी,—हीं नांवें मला नंतर समजलीं— मध्यमा मायावती आणि कनिष्ठा आत्मानंदा, माझ्या वरचेवर

नजरेस पडूं लागल्या. मुली वाढविण्यांत हाच तर मोठा तोटा असतो, कीं ज्येष्ठा, कनिष्ठा अथवा मध्यमा यांच्यांतील भेदभाव पार विलय पावतो. त्यांतून अनंतरावांच्या कन्या उंचीनें आणि वर्णानें बहुतेक सारख्याच असल्यानें मायावतीला हुडकून काढणें मला प्रथम जरा जड गेलें; परंतु अननुभूत अशा प्रेमानें मला ती दिव्य चांदणी लौकरच दाखविली. तो ठेंगणाठुसका किंचित् स्थूल प्रकृतीचा बांधा, उगवत्या अगर मावळत्या सूर्यप्रकाशानें रंगलेल्या मेघांचा तो तिचा तोंडवळा, पिवळट—तेजस्वी गौरवर्ण, ते भावनानिदर्शक बोलके डोळे, ते लाल हसरे अचुंबित ओठ यांनीं माझ्या मनावर असा कांहीं विलक्षण परिणाम केला, कीं अविवाहित राहण्याचा माझा निश्चय मी स्वतःच्या मनाजवळ देखील कबूल करावयास नाखूप होतो. माझ्या आयुष्याची नौका कोणत्या वाऱ्याने आणि कोणत्या दिशेनें चालली होती, हें जाणण्याची फिकीर त्या वेळपर्यन्त मीं कधींच केली नव्हती; परंतु मायावतीच्या दर्शनापासून, अज्ञात भविष्याच्या काळ्याकुट्ट आकाशांत चमकूं लागणाऱ्या त्या चांदणीच्या दिशेनें, प्रयत्नाच्या वाऱ्यांवर आयुष्याची नौका हांकारावयाची असें मीं न कळतच ठरविलें. आयुष्याचें धोरण व ध्येय मायावतीनें मला दाखविलें. लग्नाची भाषा सुरू होतीच, तेव्हां आजींना घातलेली अट परत घेऊन मी लग्नाला कबूल झालों. पण—

अनंत योगेश्वर ब्रह्मे हे महाराष्ट्रांतील ब्रह्मविद्येचे एक विख्यात विद्यार्थी होते. कुटुंबांतील कर्त्या पुरुषाच्या स्वभावांतील व उद्योगांतील रागरंगांच्या मिश्रणानें इतर माणसें थोडींथोडीं रंगतात. म्हणूनच ब्रह्मविद्येच्या अभ्यासांतील नव्यानव्या मतांचा पगडा अनंतरावांच्या कुटुंबावर म्हणजे ज्ञानेश्वरीबाईवर आणि तीन कन्यांच्या मनांवर बसला होता. अनंतराव उदारमतवादी असूनहि लग्नासारख्या महत्त्वाच्या बाबतींत मायावतीचें अनुमोदन घेण्याचें महत्त्व त्यांना कसें जाणवलें नाहीं, याचेंच मला राहूनराहून आश्चर्य वाटतें. अनंतरावांनीं तिचें अनुमोदन घेतलें नाहीं म्हणून काय झालें ? स्वतंत्र विचारांच्या वातावरणांत वाढलेल्या त्या प्रौढ कन्येनें, विवाह निश्चित झाल्याचें कळतांच माझ्यासारख्या निरीश्वरवादी पाखंड्याबरोबर प्राण गेला तरी विवाहित होणार नाहीं, असें स्पष्टपणें आपल्या पित्याच्या तोंडावर सांगितलें. मीं ब्रह्मविद्येच्या तत्त्वाचा अभ्यास करावा, मतें बदलून ईश्वरवादी व्हावें आणि मग तिचें पाणिग्रहण करण्याचें बोलणें सुरू करावें, अशी

तिनेंहि अट घातली. अभ्यास करून मतें बदलण्याचा जणुं काय तिनें पणच लाविला!

मायावतीनें पण लावल्याबरोबर, लग्नाचा नाद सोडून मी आपल्या पूर्वीच्या निश्चयाला अधिक चिकाटीनें चिकटलों असेन, असें जर कोणी अनुमान बांधील तर तें साफ चुकीचें ठरणार आहे. कारण, दुष्प्राप्य वस्तूच हस्तगत करून घेण्याच्या मार्गांत अक्षय्य प्रयत्न करीत राहणें यांतच खऱ्या कर्तृत्वान् पुरुषांना सार्थक आणि समाधान वाटतें. मायावतीच्या मनोहर मूर्तीच्या तेजानें माझा अभिमान जणुं काय भस्म होऊन गेला. तिच्या नेत्रांतून येणाऱ्या किरणांची कादंबरी पिऊन मी धुंद झालों होतों. त्यामुळें, मायावतीशिवाय मला जगांत कांहींच दिसेनासें झालें, आणि म्हणूनच संवय सुटली होती तरी मी ब्रह्मविद्येच्या अभ्यासाला सुरवात करून, त्या विद्येंत पारंगत होण्याच्या इराद्याला पडलों. खरेंच,

"सहज कशी खेळविते ललना!"

—२—

ब्रह्मविद्येच्या अभ्यासाला मीं सुरवात केल्याची वार्ता त्या मनोहारिणीला लागावी म्हणून मी लागणारीं प्राथमिक पुस्तकें अनंतरावांच्याच संग्रहांतून आणूं लागलों. मायावतीला मी आपला गुरु मानूं लागलों; कारण, तिनें लाविलेल्या पणानेंच मला ब्रह्मविद्येची आराधना करावयाला उद्युक्त केलें होतें. अनंतरावांच्या अनुशासनानें तिची त्या प्रांतांत चांगलीच प्रगति झाली होती, हें मला समजलें होतें. ती तिची प्रगति पुस्तकी ज्ञानापुरतीच नसून, तिच्या आचरणांतहि ती पूर्णपणें बिंबली होती. सर्व भूतांठायीं ईश्वरी अंशांचें अस्तित्व, आत्म्याचें अविनाशित्व वगैरे गोष्टी तिला इतक्या कळल्या होत्या, कीं तितक्या एखाद्या वेदांत्यालाहि समजल्या नसतील.

मीं अभ्यासाला सुरवात करतांच मायावती माझ्याशीं मोकळ्या मनानें व सलगीनें वागूं लागेल, असें जें मला वाटलें होतें तें अगदीं भ्रामक ठरलें. तिनें शिकविलेले पारिभाषिक शब्द मी बोलण्यांत पेरूं लागलों तरी इष्ट कार्यसिद्धि होईना. फक्त मला शिकविण्यापुरतें ती माझ्याशीं बोले, आणि इतर वेळीं तोंडदेखील दाखवीत नसे. अशा या अर्धवट स्थितीमुळें मला वेड

लागण्याची पाळी आली. माझ्या विरही मनाला फसवावें म्हणून मी गांवा-शेजारच्या उपवनांत जाऊं लागलों; पण निशिगंधाच्या फुलत्या फुलवंती-वरून वाहत येणाऱ्या संध्यासमीरानें मन शांत होऊन विश्राम पावण्याऐवजीं " बघुनि उपवना विरहाग्नीची ज्वाला भडके उरीं " असा परिणाम होऊन उलट अंगाचा दाहच होऊं लागला. पुष्करणींतील जलाशयावर खेळणाऱ्या मंद लहरी, मंद स्मितामुळें मायावतीच्या गालांवरील लहरींची मला आठ-वण करून देत. तडागांत वाढलेल्या कमलपुष्पांमुळें तिच्या मुखकमलाची आठवण होऊन, निराशेनें सनिःश्वास आकाशाकडे पहावें तर तारका तिच्या तेजस्वी नेत्रांची स्मृति उत्पन्न करीत. गुलाब तिच्या गुलाबी गालांची आठवण करून देत. कंठस्नान घालण्याकरितां काढलेल्या बलीच्या कंठांत घालण्याच्या उपयोगी, किंवा फार तर देवाला वाहण्याच्या उपयोगी म्हणून मीं हेटाळलेली निर्गंध जास्वंदी, सूड म्हणून मला त्रास देत आहे असें मला वाटूं लागलें. जास्वंदीच्या लाल कलिका पाहून त्या मुग्धेच्या ओष्ठद्वयाची आठवण झाल्याखेरीज राहत नसे.

तेव्हां ब्रह्मविद्येचा अभ्यास करून भागत नाहीं, अशी माझी खातर-जमा झाली. स्वतःच पुस्तकें विकत घेऊन मला वाटणाऱ्या आस्थेचा अधिकपणा मी दाखवूं लागलों. आमच्या बंगल्याच्या दिवाणखान्यांत सर्व पुस्तकांची मांडणावळ करून भिंतींवर प्रमुख ठिकाणीं, सर्वांच्या नजरेला सहज येतील अशा— जवानमर्द अर्काट, माता त्रिचनापल्ली, बेटा मद्रास इत्यादींच्या तसबिरा लटकावून दिल्या. चेहरा नेहमीं गंभीर आणि उदास रहावा म्हणून, पुरुषभर उंचीच्या आरशापुढें उभा राहून, त्याला तालीम देऊं लागलों. इतकी तयारी झाल्यावर धीर करून अनंतराव, ज्ञानेश्वरीबाई, मोहिनी, माझी मायावती, आणि आत्मानंदा यांना चहापानाचें आमंत्रण दिलें. नेमल्या वेळीं निमंत्रित पाहुणे आले. इतरांविषयीं कांहींच न बोलतां—कारण दुसऱ्या कोणाकडे माझें लक्ष्यच नव्हतें— मी माझ्या जिवाच्या राणीविषयींच कांहीं सांगू शकेन. गळ्यापासून घोट्यापर्यंत असलेली काळी चंद्रकळा, आणि मस्तकावरील केश, यांमध्यें असणाऱ्या तिच्या मुखाला, दोन कृष्णमेघांमध्यें सांपडलेल्या चंद्राची उपमा द्यावी असें मला वाटलें. तिच्या नाकांतील हिऱ्याच्या चमकीकडे पाहून, मला तर चंद्राशेजारच्या रोहिणीचीच आठवण झाली. भिंतीवरच्या तसबिरींकडे पाहतांना पाठमोरी

झाल्यामुळें, मायावतीच्या डौलदार बुचड्याच्या डाव्या अंगास खोंवलेल्या चमकत्या प्राचीचा तारा ( Star of the East ) पाहून माझ्या काळजांत लक् झालें, माझें भान हरपलें, आणि पुरतेपणीं मी मायामोह-पाशांत सांपडलों.

ती माझी तयारी मायावतीला कांहीं बेहोषपणें खूष करूं शकली नाहीं. तिच्या चेहऱ्यावर समाधान दिसत होतें इतकेंच. माझी कल्पना अशी, कीं माझ्या प्रयत्नांना यश येऊन वाङ्निश्चय त्याच बैठकीला होईल; पण मायावतीच्या स्थिर गांभीर्यामुळे ती कल्पना ढासळून पार मातीला मिळाली ! माझे सारे प्रयत्न व्यर्थ गेले !! पुनः निराशेचा अम्मल सुरू झाला !!! मीं काय केलें असतां माझी हृदयदेवता माझ्यावर प्रसन्न होईल, याचा गुरुमंत्र मला कांहीं केल्या गवसेचना. चहा आला. चहा तयार करून प्रत्येकापुढें मीं पेला ठेवला. कर्मधर्मसंयोगानें– असें मी कां म्हणतों तें समजेलच–एक डोंगळा साखरेंतून मायावतीच्या पेल्यांत गेला. हिंदुसमाजांतील विधवेच्या निःश्वासांतलि उष्णतेला लज्जा आणणाऱ्या गरम चहाच्या सपाटीवर डोंगळ्याचें प्रेत तरंगतांना पाहून परमेश्वराला माझी दया येऊनच कीं काय, मला पाषाणकठिण वाटणाऱ्या मायावतीच्या हृदयाला पाझर फुटून तें तिच्या डोळ्यांवाटे बाहेर झिरपूं लागलें. दुःखमग्न मायावतीला चहा पिण्याची आठवण राहिली नाहीं. तोंडाजवळ नेलेला पेल्याचा हात तेथेंच थांबल्यानें तिच्या अश्रुधारा चहाशीं संगम पावत होत्या. अहाहा ! त्या सुंदरीच्या बाष्पोदकानें पुनीत झालेला तो अमृततुल्य चहा मला प्यावयास मिळता तर !—– पण दुःख आवरून मायावतीनेंच तो चहा संपविला. तो मंगल, महन्मंगल चहा प्यावयाला मिळाला नाहीं म्हणून मला दुःख मात्र झालें नाहीं. कारण, एकतर तो त्या सुंदर पोटांत सांठविला गेला; दुसरें असें, कीं त्या चहानें, मायावती कशानें वश होईल याची गुरुकिल्ली माझ्या हातीं दिली होती. ब्रह्मविद्येच्या फक्त बहिरंगावरच माझें लक्ष्य होतें हें माझ्या जीवितेश्वरीनें ओळखिलें होतें; म्हणूनच ती मला वरचेवर निराश करी. डोंगळ्याच्या प्रेताकडे पाहून तिला रडतांना बघून मला या गोष्टीचा उलगडा झाला. माझी चूक माझ्या पदरांत पडली. सर्व भूतांठायीं ईश्वरी अंश आहे; तस्मात् सर्व भूतांवर सारखें प्रेम करावें, हा पहिला धडा गिरविण्याचें

मीं ठरविलें. होतां होईल तो हा धडा मायावतीच्या नजरेखालीं गिरवावयाच्या हेतूनें मी प्रसंगाची वाट पाहूं लागलों.

इच्छित प्रसंगाकरितां मला फार वेळ तिष्ठावें लागलें नाहीं.—" चंद्रबिंब बिंबित कासारिं निर्मळीं" झालें असतां पाणोठ्याभोंवतीं घिरट्या घालणाऱ्या टिटवीप्रमाणें, माझ्या प्रणयचंद्रिकेच्या निवासस्थानाला प्रदक्षिणा घालीत असतां, तांदळानें भरलेलें पोतें पाठीवर घेऊन जाणारा एक हमाल मला दिसला. त्या हमालाचें ओझें हलकें करून भूतदयेचें प्रदर्शन करतां येईल तर उत्तम असें वाटून, त्या हमालाला तांदळाचें पोतें माझ्या पाठीवर लादावयास मीं विनवून सांगितलें. माझी प्रार्थना विक्षिप्तपणाची वाटून तो म्हणाला, " छे, रावसाहेब, असें कोठें झालें आहे का? तें पोतें घेऊन आपल्याला दोन पावलें देखील जातां यायचें नाहीं."

" जातां येवो अगर न येवो. तुला ओझ्याखालचा रिकामा करून भूतदयेचा पहिला धडा मी गिरविणारच. अरे, तूंच कां नेहमीं ओझ्याखालीं वांकावेंस? तुझ्याहि ठायीं परमेश्वरी अंश आहेच ना?"

" रावसाहेब, आपण काय म्हणतां तें मला समजत नाहीं. परंतु अशीं ओझीं पाठीवरून वाहिल्याशिवाय आमच्या पोटाला कोण देणार? आणि रावसाहेब, कोणीं दिलेंच तर आयतें बसून खाणें आपल्या बापाच्यानंहि व्हायचें नाहीं. मांडीवर मांडी घालून दिवस घालविणें हें आपल्यासारख्या पांढरपेशा लोकानाच साधतें. बरें, मला उभा केलातच तर, जरा पान खातां का?"

कॉलेजच्या अभ्यासक्रमांत शिकलेल्या तर्कशास्त्रपद्धतीचें अवलंबन करून मीं त्या हमालाला माझें म्हणणें कबूल करावयाला भाग पाडलें.

शेवटीं निरुपायानें त्यानें विचारलें, " रावसाहेब, हें ओझें पाठीवर घेऊन तुम्हांला काय मिळणार?"

" अरे बाबा, हें तुझें ओझें पाठीशीं घातल्यानें माझ्या जिवावरचें निराशेचें दडपण बरेंच हलकें होणार आहे."

आमचा संवादशब्द ऐकून मायावतीचा मुखचंद्रमा बंगल्याच्या व्हरांड्यांत उगवला. त्याच्या योगानें चेव आल्यासारखें होऊन मीं तें तांदळाचें पोतें पाठीवर घेतलें. परंतु खरेंच, त्या हमालाच्या भविष्याप्रमाणें मला पुरतीं दोन पावलें देखील टाकतां आलीं नाहींत. भरलेलें पोतें पाठी-

वर घेऊन मी तोंडघशीं पडलों. माझें अंगन्अंग ठेंचाळून निघाल्यानें त्याच इमालानें मला पाठीवरून घरीं आणून पोंहोचविलें.

त्या रात्रीं माझें सर्वांग म्हणजे कोण ठणकत होतें! पण माझ्या अंतः-करणाला निराळ्याच इंगळ्या लागल्यानें मला त्या वेदनांचें कांहींच वाटलें नाहीं. केल्या प्रयत्नांसारखें यश आलें असतें तर काय मजा झाली असती! मी करावयास गेलों एक आणि झालें भलतेंच. जानकीप्राप्तीच्या ईर्षेनें संचारित होऊन छाताडावर शिवधनुष्य घेऊन पडणारा रावण, आणि मायावती-मनहरण करण्याच्या मोहांत गुंतून, तांदळाचें पोतें पाठीवर घेऊन तोंड फोडून घेणारा मी, समदुःखीच म्हणावयाचे. पाठ, छाती, पोतें आणि धनुष्य येवढ्यांचाच काय तो फरक! कोठून मी त्या फंदांत पडलों असें मला झालें. शारीरिक आणि मानसिक यातनांमुळे मला त्या रात्रीं अर्थात्च झोप लागली नाहीं. पहांटे मात्र ग्लानीमुळें डोळ्यांवर झांपड पडली.

मला जागें करणारी मायावतीच होती. मायावती, माझ्या घरीं, आणि माझ्याकरितां, मग कसलें आलें दुःख, आणि कसल्या आल्या आहेत यातना! मी ताठ उभा राहिलों.

मायावती म्हणाली, "हें काय, आज इतकी कशी झोप लागली? अभ्यास नाहीं का करायचा? यायला उशीर झाला म्हणून मीच आलें."

मी प्रातर्विधि उरकतों आहे तोंच नोकरानें चहा आणला. (मी हे चहाचे प्रसंग खुलवून सांगतों आहे याचें कारण, आजकालच्या प्रणयी जोडप्यांचे विवाह चहाच्या पेल्यांत अगर बशींतच लागलेले दिसून येतात.) चहा घेतांना मायावती म्हणाली, "कालचा आपला प्रयत्न फारच स्तुत्य होता. मानसिक शक्तीप्रमाणें शारीरिक शक्ति नसल्यानें तो प्रयत्न सिद्धीला गेला नाहीं म्हणून आपल्या निर्मळ अंतःकरणाची साक्ष पटायची थोडीच राहते?"

माझे बाहु स्फुरण पावताहेत असा मला भास झाला. माझ्या हातांत त्या वेळीं धनुष्य असतें तर टणत्कार करावयास मी चुकतों ना.

रस्ता ओलांडून ब्रह्मयांच्या बंगल्यांत जात असतां भूतदयाप्रदर्शनाची मला दुसरी संधि मिळाली. रस्त्यावर दोन गाढवें लाथांचा खेळ खेळत होतीं. त्यांपैकीं एक मोठा गद्धा असून दुसरें बिचारें एक गोजिरवाणें गाढव होतें. त्या गधड्याच्या लाथा, या बिचाऱ्या गाढवाला लागत होत्या.

आपत्तीपासून त्याचें संरक्षण करावें म्हणून मीं त्या मोठ्या गाढवाला हाकलण्याचा प्रयत्न केला. पण, मला माझ्या प्रियेच्या देखत, विजयमाला अर्पण करण्याऐवजीं ते राजेश्री अधिकच लाडांत येऊन, त्या छोट्या गाढवा-वर दुगाण्यांचा वर्षाव करूं लागले. तो प्रकार पाहून मायावती कळवळली; आणि तिला हुंदका आलेला पाहून तर मी गांगरलोंच.

मला दिङ्मूढ झालेला पाहून मायावती रडतच म्हणाली, "अहो, असे पाहत काय उभे राहिलां आहांत? मला कोण दुःख होत आहे त्या छोट्या गाढवाकडे बघून, याची थोडीतरी कल्पना असूं द्या. त्या बाळ-गाढवाबद्दल थोडी तरी भूतदया दाखवा. हुसकून जात नसला तर त्या बड्या गाढवाची शेपूट धरून खेंचा, म्हणजे तें लहान गाढव लाथांच्या तडाख्यांतून सुटेल."

आमच्या बंगल्यांत मायावतीकडून मिळालेल्या ताज्या प्रोत्साहनामुळें माझे बाहु आधीं स्फुरतच होते, त्यांतून आतां तर तिनें आज्ञाच केली. मी धांवत जाऊन त्या मोठ्या गाढवाच्या शेपटीचा कबजा घेतला, आणि मागें खेंचूं लागलों. आतां त्या गाढवानें माझ्यावर लत्तावृष्टि केली. वल्लभेच्या देखत आणि तिची आज्ञा पाळीत असतां झालेली गर्दभलत्ताप्रहारवृष्टि मला अप्सरापुष्पवृष्टीप्रमाणें वाटली. तो देखावा विचित्र वाटूनच कीं काय, तें छोटें गाढव कधींच पळून गेलें होतें. मीहि मग त्या बड्या गाढवाचें शेपूट सोडून दिलें. माझें तें अलौकिक शौर्य पाहून माझी प्राणेश्वरी अपरंपार खूष झालेली दिसली. बक्षिस म्हणून, घामानें डवरलेलें माझें तोंड तिनें आपल्या शेलारीच्या पदरानें पुसलें. त्यामुळें माझे निम्मेअधिक श्रम परिहार पावले. नंतर त्यांच्या घरीं गेल्यावर मायावतीच्या वडील बहिणीचा–मोहिनीचा–स्नेहास्निग्ध हात अंगावरून फिरतांच, मीं गाढवाच्या लाथा कधीं खाल्या होत्या कीं नाहीं असें मला वाटूं लागलें.

त्या प्रसंगामुळें, मायावतीसकट ब्रह्मयांच्या घरांतील सर्वांच्या आदराला मी पात्र झालो. ब्रह्मविद्येचा खरा कर्मसंन्यासी असें तीं माणसें मला उघड-पणें म्हणूं लागलीं. पुढें लूद भरून सडल्यामुळें केसन् केस गळालेल्या कुत्र्याला अगदीं उघड्या अंगानें आलिंगन देतांना पाहून मायावती तर विवाह होण्याआधींच मला गाढ आलिंगन द्यावयाला उत्सुक झाली. पण मीच तिला 'कुंवारपणाला न शोभेलसें' कांहीं करूं दिलें नाहीं, आणि रोज

दोन प्रहरीं, नित्यनियमानें महारवाड्याशेजारीं जाऊन, चिखलानें व इतर घाणीनें भरलेल्या डुकरिणींच्या पोरांना पकडून मांडीवर घेऊन प्रेमानें खेळवितांना, थोपटतांना पाहून तर ती माझ्या " अंकित पदांबुजांची दासी " झाली. कांहीं का असेना, माझ्या भगीरथ प्रयत्नांना यश येऊन माझी प्रणयगंगा माझ्याकडे आपण होऊन वाहत येऊं लागली. अनंतरावांनीं तर तिथिनिश्चय सुद्धां केला; पण—

—३—

पंचांग उघडलें असतां वाटेल तितक्या लांबवरच्या भविष्यकालाकडे आपल्याला पाहतां येऊन आपण आजकालच्या खूपच पुढें जाऊं शकतों, परंतु आपली इच्छित दिवसगत प्राप्त करून घ्यावयाला आपल्या अहोरात्रींचें नेमकें आयुष्य कंठावें लागतेंच. पंचांगाचीं पानें उलटलीं असतां कालचक्र थोडकेंच उलटलें जाणार आहे ? पंचांगाचीं पानें चाळून अनंतरावांनीं आमच्या लग्नाची तिथि पाहिली खरी, परंतु त्या तिथीला जाऊन पोंहोचावयाला चातुर्मास्याचा महिना उरला आणि मार्गशीर्षाचा पहिला आठवडा कंठणें आम्हांला भागच होतें. तुळशीचें लग्न झाल्याखेरीज माणसांच्या लग्नाला परवाना मिळत नाहीं.

माझी आणि मायावतीची दिलजमाई होऊन प्रेम वाहूं लागतांच, सहवासानें त्याला लोंढ्याचें स्वरूप यावें म्हणून बहुतेक सारा वेळ मी ब्रह्मयांच्याच घरीं घालवूं लागलों. लग्नाआधीं कोणी घरजांवई झाला नसेल, पण मी झालों होतों. सकाळच्या वेळीं ब्रह्मविद्येचे धडे घेण्याचा समारंभ होत असल्यानें रामपाऱ्यांत रमणीचा सहवास आयताच घडत होता. प्रेम वृद्धिंगत व्हावयाला जोडीनें फिरावयास जाणें अत्यावश्यक असून, सायंकाळची वेळ त्या कार्याला मंगलमय असते असा प्रीतिविवाहशास्त्रांतील किंवा समाजसुधारणाशास्त्रांतील— कोठचें तें मला पक्कें स्मरत नाहीं— महत्त्वाचें तत्त्व मला माहीत होतें. तेव्हां मी आणि मायावती रोज सायंकाळीं उपरिनिर्दिष्ट गांवाशेजारच्या बागेतच फिरावयास जात असूं.

त्या दिवशीं मायावतीनें लपून बसावयाचें आणि मी तिला शोधून काढावयाचें ठरलें होतें. मीं तिला हुडकून काढल्यास मला एक गुलाबकळ्यांचा गेंदेदार गजरा मिळावयाचा होता. प्रथम कांहीं वेळ, या कुंजांतून त्या कुंजांत जातांना मायावती विद्युल्लतेच्या चापल्यानें चमकत होती.

पुढें जी ती गडप झाली ती कांहीं केल्या सांपडेचना. बहुतेक साऱ्या बगीचाभर मीं पायपीट केली; पण जवळ आहेशी वाटून मायावती हातींच लागेना. सूर्यास्त होऊन वसुंधरेवर अंधःकाराचें आवरण पडूं लागलें, तरी मायावती लपल्या जागेतून बाहेर येईना. "मायावती, मी हरलों, असशील तेथून तूं माझ्याकडे ये," असें स्वाभिमान मला म्हणूं देईना. पूर्ण अंधार झाल्यावर येईल आपोआप, असें वाटून मी हिरवळीच्या पटांगणावर कलंडलों. तरी गुलाबाचा गेंद मिळणार कीं नाहीं, याबद्दल विचार चालले होतेच. तितक्यांत जवळ कोठें तरी, जड, पसरट पावलांचा धप्धप् असा ध्वनि होत असल्याचें मला ऐकूं आलें. त्या कोमलांगीच्या पदाघातांचा तो आवाज खचित नव्हता. मग कोण असावें म्हणून मी पाहतों तों एक उंट माझ्याकडेच झपाट्यानें येत असतांना मला दिसला. त्या अजस्र भयंकर जनावराला पाहून माझी घाबरगुंडी उडाली. पायांवर भरंवसा ठेवून मी पळूं लागलों; पण उंटाच्या पायांपुढें माझ्या पायांचें काय चालणार! आपल्या त्या प्रमाणशीर (!) अंगाला अनेक झटके देतदेत तो उंट अधिकच वेगानें माझ्याकडे धांवत येऊं लागला. कोठेंतरी लपून बसल्या-खेरीज, त्या प्राणसंकटांतून सुटका होणें नाहीं हें ओळखून, लपण्याकरितां मी जागा शोधतों आहें, तोंच तो उंट माझ्या अगदीं जवळ येऊन भिडला. मला चावण्याकरितां त्याची ती लांबलचक मान माझ्या मानेवर ओळंबली देखील. ब्रह्मांडाला भेदून जाईल अशी एक किंकाळी ठोकून मी जवळच असणाऱ्या कोरंटीच्या दाट जाळींत घुसलों; तों काय! अहाहा! उंटाच्या पायांतून सुटून, गुंफेंत गजरा गुंफत बसलेल्या माझ्या मायावतीच्या बाहुपाशांत मी नेमका जाऊन पडलों. माझ्यावरील प्रसंगाची कल्पना असूनहि, घडल्या प्रकाराच्या अप्रासंगिकपणामुळें मी मायावतीपासून ताबडतोब दूर सरकलों. तिलाहि तें सारें अकल्पितच असल्यानें प्रथम ती घाबरली व नंतर, "इश्श, हें काय? कोणीं पाहिलं तर काय म्हणेल?" असें म्हणून झपाट्यानें तीं गुंफेच्या बाहेर पडली. मीहि तिच्या मागोमाग बाहेर पडलों, तो उंट तेथें उभाच होता. परंतु मायावतीला पाहूनच कीं काय तो त्रास न देतां दूर निघून गेला. त्याच्या जड पावलांवरून त्याच्या मनांतील निराशा व्यक्त होत होती. उंटाला भ्याल्यामुळें माझी काय स्थिति झाली होती, आणि मी न कळत कसा गुंफेंत शिरलों हें सावकाशपणें,

इरतऱ्हेनें मायावतीला सांगून तिच्या विनवण्या केल्यावर, सलगी करून अपमान करण्याचा माझा उद्देश नव्हता, अशी तिची खात्री झाली. गुलाबकळयांचा गजरा मला मिळाला, हें सांगावयास का हवें ?

त्या उंटाची मला इतकी धास्ती बसली, कीं दुसऱ्या दिवशीं बगीचांत जावयाला मन कांहीं केल्या तयार होईना. मायावतीला घेऊन मी नदी किनाऱ्यावर फिरावयाला गेलों. वाळवंटीला टेंकलेल्या बुरुजावर बसून, पाण्यांतील लाटांनीं वरचेवर मोडलें जाऊन एकमेकांना चिकटल्याप्रमाणें दिसणाऱ्या आमच्या प्रतिबिंबांकडे सकौतुक पाहत असतां कितीतरी वेळ निघून गेला. परतल्या सूर्यकिरणांचा आणि लाटांचा जो गोफ विणला जात होता, त्याची शोभा तर सांगतां पुरवत नाहीं. इतक्यांत सूर्य मावळला, आणि शांतता पसरूं लागली. अंतराअंतरावर, नाक धरून डोळे मिटल्यामुळें बगळयाप्रमाणें दिसणारे ब्राह्मण संध्या करितांना दिसूं लागले. आकाशमार्गानें जाणाऱ्या द्विजांच्या शब्दनादाच्या मधुरतेमुळें आमचीं भूलोकीचीं बंधनें तुटलीं. पुण्यतटिनी, महाराष्ट्रगंगा कृष्णाबाईच्या पवित्र तीर्थोदकावरून वाहत येणाऱ्या स्वर्गीय समीरणाच्या स्पर्शानें आमचीं मनें शांतरसांत पोहूं लागून धूसर, पिंवळया, आणि भडक अथवा काळसर तांबड्या, इत्यादि अनेक चित्रविचित्र रंगानीं माखून गेलेल्या पश्चिमदिशे-प्रमाणें शून्यवृत्तीचीं होण्याच्या तीं बेतांत होतीं. त्यामुळें चुकून झालेल्या अंगस्पर्शानें उद्भत झालेल्या रोमांचलहरींचीं ओळखसुद्धां पटत नव्हती. लौकरच आमचीं समाधि लागली असती, परंतु तितक्यांतच, आदल्या दिवशींचा उनाड उंट शेजारच्या मळींत चरत असलेला माझ्या दृष्टीला पडला. त्याची माझी दृष्टादृष्टहि झाली. मीं अधिक गडबड केल्यास माझ्या निसर्गाशीं समरस झालेल्या प्रणयलक्ष्मीची एकाग्रता मोडेल, या भीतीनें मी आपल्याशींच चुळबुळ करीत राहिलों. देह दोन, पण अंतःकरण एकच असल्यानें, माझ्या अंतःकरणांत खळबळ उत्पन्न झाल्याबरोबर मायावतीचें अंतःकरण गढूळ झालें.

निसर्गापासून विरस झाल्यावर, उंटाकडे पाहून न पाहिलेंसें करून तिनें विचारलें " नाथ ! ( या संबोधनानें तिनें मला त्याच वेळीं प्रथम हांक मारिली. ) ही नाव कुणाची ? आपल्याला कांहीं वेळ ही वापरतां येईल का ? "

उंटाला चुकवावयाचें होतें म्हणून उत्तर देण्याच्या भानगडींत न पडतां मी एकदम त्या क्रीडानौकेंत (Jolly boat) उडी टाकली. जलदेवतेप्रमाणें शोभणाऱ्या माझ्या त्रिभुवनसुंदरीला हात देऊन नौकेंत घेतल्यानंतर, प्रवाहाच्या उलट दिशेनें वल्हविण्यास मीं सुरवात केली. मायावती कर्णधाराचें काम करीत होती. त्या वेळीं जगांत आम्हांला कांहींच कमी नव्हतें. सौख्यच सौख्य ! लाडकीची हौस पुरल्यानंतर, नौका पैलतीराला लावून, दोन तीरांना सांधणाऱ्या पुलावरून आम्ही गांवांत आलों. याप्रमाणें त्या दिवशीं मीं उंटाला चुकविलें.

दुसऱ्या दिवशीं नदीवर तोडचें पाणी पळालें, म्हणून तिसऱ्या दिवशीं मीं ती बाजू कटापच केली. तिसरे दिवशीं आम्ही गांवच्या उत्तरेला असणाऱ्या डोंगरावर फिरावयाला गेलों. सर्वांत उंच ठिकाणीं गेल्यावर जणुं काय आमच्या दृष्टींतच फरक झाला. सपाटीवर हिंडत असतां कांहीं-कांहीं ठिकाणच्या झाडांझुडपांमुळे, उंचसखलपणामुळें, पांच हातांवरचें देखील दिसण्याची पंचाईत; तेंच आतां आम्हांला पांच मैलांपलीकडील सुद्धां प्रदेश दिसूं लागला. अज्ञानाच्या सपाटीवर सरपटत असतां, जवळच्या साध्या गोष्टींविषयींचें अज्ञान उच्चतम शिक्षणाच्या प्रभावानें नाहींसें होऊन दृष्टि दूरभेदक आणि खोल होऊन तिला तिन्ही लोकांतील वस्तु गोचर होतात म्हणतात त्यांतीलच हा प्रकार. गौरीशंकराच्या नांवानें पवित्र होऊन सर्व जगावर नजर टाकणाऱ्या शैलशिखरावर चिरसंमीलनाच्या महोत्सवांत बसलेल्या पार्वतीपरमेश्वरांना विश्वाच्या विस्ताराकडे पाहून काय वाटलें असेल याची थोडीबहुत कल्पना, त्या उच्च स्थानावर सखीसह विचारतांना आमचें गांव व आसमंतांतील प्रदेश यांकडे पाहून मला बांधता आली. वारा जरा सोसाट्याचा होता. त्यामुळें उडणारें वस्त्र व भुरभुरणारे केस यांची सावरासावर करतांकरतां विभ्रांत झालेल्या मायावतीची मोहकता खरोखरच अपूर्व होती. तें एक मनोहर दृश्य होतें. तें एक चित्तवेधक चित्र होतें. त्या चित्रावर माझी लोभी दृष्टि खिळली, तेव्हां प्रतिमेच्या गालांवर गुलाबी रंगाची नवीनच खुलावट होऊन दृष्टि लज्जावनत झाली. वाऱ्याच्या स्वैर लीलांमुळें दृग्गोचर होणाऱ्या मायावतीच्या अवयवसमूहावरून, मला ख्रिस्तपुराणांत वर्णिलेल्या आणि महाकवि मिल्टननें खुलवून रंगविलेल्या ईव्हची

आठवण झाली. त्या वेळीं मी आणि मायावती, नंदनवनांतील आदिपितरां-च्या अवस्थेंत असतों तर—!

भ्रमिष्ट होऊन, निर्हेतुकपणें मीं हांक मारली " माया ! "

" जीवा, मला अशी हांक कां मारलीत ? आपले डोळे असे कां दिसत आहेत ? आपण भ्यालां आहांत का ? "

" नाहीं—माया, मी भ्यालों नाहीं. या ठिकाणीं मी कोणाला भिणार ? "

" नाथ, तो पाहिलात का कालपरवांचा उंट, कशी लांब मान करून विस्तारलेल्या चिंचेच्या झाडाची डहाळी ओढतो आहे तो. मला वाटलें, आपण त्याला भ्यालांत."

उंट! अरे बाप रे ! माझा साता जन्मींचा हाडवैरी तो उंट त्या दिवशींहि डोंगराच्या पायथ्याशीं हजरच ! त्या उंटाचे मीं असें काय घोडें मारिलें होतें, कीं त्यानें माझ्या स्वर्गसुखाच्या अमोलिक क्षणांचा प्रत्येक दिवशीं असा विध्वंस करावा ?

" प्राणेश्वरा !" मायावती म्हणाली, " तो उंट अगदीं नियमानं आपल्या मागून रोज कां बरं येत असावा ? आपल्या स्नेहाची तर तो अपेक्षा करीत नसेल ना ? त्यानें आपल्याला शोधीत येण्यांत कांहीं तरी कार्यकारणभाव असला पाहिजे, असें मला वाटूं लागलें आहे. आपण त्याचा अव्हेर करूं नये. तो आपल्याला कांहीं अपाय करणार नाहीं; असं माझं मन मला ग्वाही देत आहे. आपण घाबरूं नये; अपायकारक असं मी आपल्याला कधीं सांगेन का ? देह जनावराचा असला म्हणून त्याचा आत्मा का जनावराचा आहे ? सर्वांचा आत्मा एकच ना ? सर्व भूतांच्या ठायीं परमेश्वराचा अंश आहेच. '**यो मां पश्यति सर्वत्र**' आणि '**आधारः सर्वभूतानाम्**' ही भगवद्वचनें लक्षांत आहेतच. आज आपण त्या उंटाला चुकवूं नये. तो काय करतो तें आपण पाहूं या."

मायावतीच्या बोलण्याचा परिणाम होऊन तिचा इष्ट पुरविण्याकरितां मीं धिटाई धारण केली, आणि डोंगरावरून खालीं आलों. आमचा हेतु ओळखूनच कीं काय, तो उंट आमच्या मागून बेगुमानपणें येऊं लागला. मी त्याला आमच्या परसांत जानोशाला जागा दिली. तोहि खुषीनें त्या

ठिकाणीं बसला. त्याच्या मूळच्या निर्विकार चेहऱ्यावर आनंदाची छटा उमटलेली दिसत होती.

रात्रीचें जेवण झाल्यावर 'उंट' या विषयावर माझें व मायावतीचें बरेंच बोलणें होऊन दोघांनीं मिळून उंटाच्या वर्तणुकीवर नजर ठेवावयाचें ठरलें.

— ४ —

एकंदरींत तो कांहीं भल्यापैकीं उंट नव्हे. ज्या मायावतीच्या सांगण्यावरून मीं त्याला आश्रय दिला, त्या मायावतीविषयीं तो उघडउघड द्वेष दाखवूं लागला. मी जवळ गेलों, कीं तो प्रसन्न झाल्यासारखा दिसे. तीच मायावती दिसली, कीं तो आपले फाटके ओंठ तीक्ष्ण दातांनीं खाऊं लागे. मी व मायावती एकमेकांशीं प्रेमळपणानें वागतांना दिसलों, कीं त्याच्या डोळ्यांतून दुःखाश्रूंचे पूर लोटत. अशा कृतघ्न उंटाला हांकलून द्यावा, असें वाटून मीं मायावतीला बोलूनहि दाखविलें. माझा विचार तिला पसंत पडला नाहीं.

गंभीर मुद्रा करून ती म्हणाली, " मला निराळाच संशय येतो आहे. माझा संशय खरा ठरल्याखेरीज मी कांहींच सांगूं शकत नाहीं. एकंदरींत पाहतां हा उंट कांहीं अशातशांपैकीं नव्हे. तिथं कांहीं तरी पाणी मुरतं आहे खास."

मध्यंतरीं अनंतरावच येऊन उंटाला पाहून गेले. नंतर एकदोन दिवस बापलेकीचें कांहीं खलबत चाललें होतें. मला पाहिलें, कीं तीं एकदम गप्प होत.

" बाबा, तुम्ही म्हणतां त्यापैकींच कांहीं तरी असलें पाहिजे. त्याशिवाय असें होणें नाहीं."

" बाकी मला तरी आज खात्रीनें तसें सांगतां येत नाहीं. एकदां पत्र घालून—"

माझी चाहूल लागल्यानें थांबलेल्या संभाषणांतील कांहीं शब्द मला ऐकूं आले नाहींत. त्या संवादाच्या सायंकाळीं उंट आणि मायावती यांसमवेत मी फिरावयाला जात असतां, एक भलें जाडें पाकीट मायावतीनें टपालांत टाकलें. पत्र सायंकाळीं टपालांत टाकलें गेलें यावरून त्याचा प्रवास दक्षिणेला व्हावयाचा होता, हें मीं तावडतोब ओळखलें.

उंटाची मान खाजवीत मी परसांत उभा होतों. उंटहि मोठा रंगांत

आला होता. तरी मायावतीला पाहून तो ताडकन् उठून उभा राहिला. शक्य तितक्या प्रकारांनीं त्यानें आपला असंतोष दाखविला. नेहमीं उत्सुकतेच्या जलद पावलांनीं माझ्याकडे येणाऱ्या मायावतीची गति विशेषच मंद दिसली. तिचें तोंड सुकून गेलें होतें. जवळ येतांच तिला हुंदका आला.

" मायावती, काय झालें ? तुझी अशी स्थिति कां झाली ? "

" जिवलगा, आपल्या सहवासाचं सुख या जन्मीं माझ्या नशिबीं लिहिलं नाहीं. सहा जन्मांच्या अंतरानं आपली गांठ पडली होती; पण आपल्या सहवासाची वांच्छा करून करून झुरणारा एक आत्मा एकसारखा ओळीनं सात जन्म निराशेनं भाजून निघत आहे. त्या आत्म्याची आणि आपली गांठ इतक्या जन्मांनंतर अगदीं सुलभ रीत्या पडत आहे."

" माझ्या प्राणा ! तुला एकाएकीं उद्विग्नता कां आली ? माझ्याकडून कांहीं अपराध घडला का ? साता जन्मांच्या कसल्या या गोष्टी सांगते आहेस ? आणि माझ्यासाठीं झुरणारी व्यक्ति कोण ? "

" ती व्यक्ति म्हणजे उंट होय. नाथ ! छे– पण या नांवानं मी आतां कशी हांक मारूं ? देवा, मनांत होतं काय आणि केलंस काय ? "

आतां तर मायावती रडूं लागली. भीडमर्यादा बाजूला ठेवून मीं तिला जवळ घेतली, आणि तोंडावरून हात फिरवून म्हटलें " लाडके, असें काय करावें बरें ! तुला काय वाटतें आहे तें मला नाहीं का सांगणार ? "

स्वतःला सोडवून न घेतां मायावतीने माझ्या हातीं एक लिफाफा दिला, आणि माझ्या हृदयावर डोकें ठेवून ती अश्रु गाळूं लागली. लिफाफ्यांत महत्त्वाचा मजकूर होताः––

" ॐ तत्सत् । आपण लिहिलेल्या मजकुरावरून मला खालील माहिती देतां येणें शक्य आहे. आपले भावि जामात सहा जन्मांपूर्वींच्या सातव्या जन्मीं एका राजाची सुंदर राणी होते. ( येथे मला भेदरल्यासारखें झालें. माझ्या राणीपणाची कांहीं उरली सुरली खूणगांठ आहे कीं काय हें पाहण्यासाठीं माझी दृष्टि शरिराकडे वळली. ) आपली कन्या तेव्हां राजा होती. तें मोठें प्रेमळ आणि आनंदी जोडपें होतें. हल्लीं जो उंट आहे तो राणीवशांत हुजऱ्या होता. त्याच्या मनांत राणीविषयीं सहेतुक प्रेम वसत होतें. राणी मोठी नामांकित पतिव्रता असल्यानें, त्या हुजऱ्याच्या प्रेमाची फेड झाली नाहीं. त्याची इच्छा अपूर्त राहिली. परस्त्रीवर प्रेम करणाऱ्या

हुजुऱ्याला हीन योनि प्राप्त होऊन तो आतांपर्यंत आपल्या प्रेमाच्या विषयाला हुडकत फिरत होता. राजा, राणी आणि हुजऱ्या या जन्मापर्यंत पृथ्वीच्या निरनिराळ्या भागांत जन्माला येत गेल्यानें त्यांच्या परस्परांशीं गांठी पडल्या नाहींत. राजा-राणींच्या पवित्र प्रेमामुळें या जन्मीं त्यांचा पुनः संयोग होईलसें वाटतें. हुजऱ्याच्या सुसंचितानें, या जन्मीं त्याला याच देशांत जन्माला घातलें. आपल्या वल्लभेचा आत्मा याच देशांत एका पुरुषदेहांत आहे असें त्याला उमगलें. आत्म्यानें आत्म्याला ओळखिलें; म्हणून पिलूं असतांनाच तो उंट आपल्या मालकाच्या घरून पळाला. शोधतांशोधतां त्याला आपली प्रियकरीण दिसली. त्याला आपल्या प्रियकरिणीचा, म्हणजे आपल्या जामातांचा आश्रय मिळाला आहेच. यापेक्षां अधिक असें मी कांहींच लिहूं शकत नाहीं. सदरहू माहिती आपल्या उपयोगी पडेल, अशी आशा आहे. ॐ तत्सत् "

मद्रासहून आलेल्या त्या पत्रांतील मजकूर वाचून मी तर हतबुद्धच झालों. माझीं ज्ञानेंद्रियें बधिर झालीं. तरी जीव मायेशीं गुंतल्यामुळे मी बोलूं लागलों, " मायावती, त्यांत तुला निराश होण्यासारखें काय आहे ! आपला संगम व्हावा हें कितीतरी पूर्वी ठरून गेलें आहे."

" छे-छे, प्रिया, स्वार्थत्यागानं मीच प्रेमसंन्यासाचें अवलंबन करायचं ठरवलं आहे. या जन्मीं मला उंटाचा मार्ग निष्कंटक केलाच पाहिजे."

" नाहीं, उंटाचें प्रेम निर्हेतुक नाहीं. त्याचा माझ्यावर कांहींहि हक्क नाहीं. हृदयेश्वरी ! माझा तूं त्याग करूं नकोस."

" प्रेमा, ही माया क्षणिक आहे. मध्यंतरीच्या जन्मीं नाहीं का आपण विरहावस्था भोगली ? त्याचप्रमाणं याहि जन्मीं धैर्यानं आपण ती भोगूं. आत्म्याच्या अविनाशित्वावर माझा पुरा विश्वास आहे. फिरून या माझ्या जीवीच्या जीवाची गांठ पडेतों चौऱ्यांशीं कोटींच्या फेऱ्यांतून फिरून यावं लागलं तरी माझी तयारी आहे. आपल्यावर मी अक्षय्य असंच प्रेम करीत राहीन. माझी परमेश्वराला इतकीच प्रार्थना आहे, कीं देवा ! पुनरपि आमची गांठ पडेल तेव्हां माझा आपला स्त्रीदेहच असावा. सहचारिणीच्या नात्यानं आपली सेवा घडावी असं भारी मनांत होतं; पण—; या जन्मीच्या उरल्या आयुष्यांत आपण उंटाची हौस भागवा. त्याला आपल्या सहवासाचं सौख्य द्या."

" मायावती, काय बोलतेस हें! उंटावर मी कसें प्रेम करूं? जनावरावर मला कसें प्रेम करितां येईल?"

" जीवा, काय हा प्रश्न? बापानं गांठून दिलेल्या अनोळखी पतीवर अथवा पत्नीवर सहवासानं दृढ प्रेम बसतं अशी आपल्या साऱ्या समाजाची समजूत आहे, तर सात जन्मांची ओळख पटलेल्या उंटावर आपलं प्रेम कां बसूं नये? आपण प्रयत्न करा अशी माझी आपल्याला प्रार्थना आहे. केवळ माझी इच्छाच म्हणून आपण उंटावर प्रेम करा. येवढा जन्म आपण त्याच्यावर प्रेम केलंत, कीं पुढं कोणत्याहि जन्मांत हा उंट आपल्या प्रेमांत आड येणार नाहीं. आपल्या अखेरच्या चिरसंमीलनाकडे नजर देऊन मीहि आतां आपल्या आणि उंटाच्या प्रेमाच्या आड येतां कामा नये. ही पहा मी चाललें."

ध्यानीं मनीं नसलेली कृति करून मायावतीनें आमच्या विहिरींत धाड्दिशीं उडी टाकिली. उडीच्या आवाजासरशीं मीं टाहो फोडला.

आर्तस्वरानें मी ओरडूं लागलो, " मायावती, मायावती! काय केलेंस हें? तुझीमाझी प्रेमकथा केवळ स्वप्नच ठरावयाची होती का ग? धांवा हो कोणीतरी, आणि माझ्या प्राणेश्वरीला बाहेर काढा. गेली, गेली! माझी प्रणयदेवता गडप झाली! माझी प्रणयसृष्टि पाण्यांत जळून खाक झाली!"

माझ्या जिवाला चांगलाच चिमटा बसला! जिवाला कीं देहाला?—
" माझा कान कोण पिळतें आहे? कोण आजी? माझा कान काय म्हणून पिळीत आहां?"

" अरे, जागा झालास का? आवशी निजल्यापासून हसतो आहेस काय? रडतो आहेस काय? आणि असा आक्रोश करायला काय झालं? ही मायावती कोण? काल रात्रीं निजण्यापूर्वी तें पुस्तक वाचीत पडला होतास म्हणून असा आरडतो आहेस. थांब, ते पुस्तकच नाहींसं करतें."

रिकाम्या वेळांत नाहीं नाहीं तें धंदे सुचतात. ब्रह्मविद्या ही काय चीज आहे हें पहावें म्हणून मी तत्संबंधाचें एक पुस्तक माझ्या स्नेह्याकडून आणलें होतें. म्हटल्याप्रमाणें आजीनें तें पुस्तक, ज्या विहिरींत मायावतीनें उडी टाकिलीसें मला वाटलें त्या विहिरींत खरोखरच फेकून दिलें!



# बरसात : : ४२

—१—

गैरसमज, अस्पष्ट समजुती आणि मुग्धता या अपयशाच्या मार्गानें तीं दोघेंहि चालली होतीं.

तिला वाटे, जाणून-बुजून आपणाला त्रास देण्याचा त्याचा विचार आहे.

त्याला वाटे, ती हट्टाग्रही आणि अभिमानी आहे. मोकळेपणानें बोलून एकमेकांचा गैरसमज घालविण्याचा कोणीच प्रयत्न करीना.

उपेक्षा आणि उपहास चालू होता; आणि त्यामुळें त्यांच्यांतील प्रेमांत अंतर पडत होतें.

—२—

परकी माणसांना त्यांच्या संसाराचें कौतुक वाटे. आंत-बाहेर शांततेचें साम्राज्य चालू होतें; पण ज्वालामुखी धुमसत होते. तिनें ताट वाढावें त्यानें जेवावें. थोडीशी आदळ-आपट करून चालतें व्हावें. तिनें मर मर उद्योग करावा आणि हायसें तोंड मिटून पडावें.

रात्रीं तिनें बिछाना घालावा, त्यानें खुशाल झोंपावें. बोलणें ना चालणें. क्षेम ना समाचार. ना मीलन—ना विच्छेद.

दोघेंहि दुःखी होतीं. दोघेंहि अस्वस्थ होतीं. एकमेकांना त्रास देण्यासाठींच एकमेकांचा जन्म आहे असें त्या दोघांनाहि वाटे. पण झालेला गैरसमज दूर करण्याचा प्रयत्न कोणीच करीना.

—३—

दिवाळसणाला नेण्यासाठीं तिचा भाऊ आला. ती म्हणाली,

"घरांत कोणी नाहीं. जेवणाचे हाल होतील, मीं येत नाहीं."

"मी त्यांची परवानगी घेतों. तुला दोन दिवसांत परत आणून पोंचवितों." भाऊ म्हणाला.

"छे ! नकोच. सगळ्याच प्रकारचे हाल होतील घरांत." ती म्हणाली.

"अग, पण तुझ्याशीं ते कधीं सुखाचा एक शब्दहि बोलत नाहींत असें मी ऐकतों, तेव्हां तिकडे आलीस तर तितकेच दोन दिवस मौजेंत जातील." भाऊ कळवळून म्हणाला.

" दोन दिवसांची मौज करूं तुझ्याबरोबर येऊन ? छे ! दोन दिवसांची मौज करून जन्माची मौज सोडण्याला मी तयार नाहीं. 'सुखाचा एक शब्द ?' तूं कांहीं तरी बोलतोस ! माझें सुख कशांत आहे हें तुझ्यापेक्षां मला जास्त कळतें भाऊ ! त्यांचें अखण्ड दर्शन, आणि चिरंतन सेवा या दोनच गोष्टी माझ्या दृष्टीनें सुखाच्या एका शब्दापेक्षां जास्त आहेत. आणि यांतच माझा सर्व जन्म जावा असें मी इच्छितें. दगडाच्या मूर्तीची सेवा करून अनेक लोक अखंड तृप्त झाले. मग चालत्या बोलत्या माणसांची-ज्यांनीं मला सौभाग्यवती केलें त्यांची- सेवाचाकरी करून मला समाधान लाभणार नाहीं असें तूं कशावरून म्हणतोस ? जा- भलभलते विचार माझ्यापुढें मांडून नसत्या गोष्टी मला सांगूं नको. प्रेमानें तूं माझी आठवण केलीस, बोलवायला आलास हेंच पुष्कळ झालें. बाबांना आणि आईला मी आनंदांत आहें म्हणून सांग." असें म्हणून ती घरांत गेली. तिला घरकाम संपवून संध्याकाळच्या जेवणाची तयारी करावयाची होती. भाऊ बिचारा मुकाट्यानें बसला.

—४—

तो आज ऑफिसांत गेला नव्हता. महत्त्वाचीं पत्रें लिहिण्यासाठीं आंतील खोलींत बसला होता. पण तें तिला माहीत नव्हतें. अर्थात् भावाबहिणीचें झालेलें सर्व बोलणें त्यानें ऐकलें. तिचें शेवटचें निरोपवजा सांगणें ऐकून तो थक्क झाला. तहानेनें घसा कोरडा झाला असतां तडफडत असावें आणि नजीक असलेला पाण्याचा झरा दिसूं नये, अशीच आजवर त्याची स्थिति झाली होती. पण आज त्याचे डोळे उघडले ती गारगोटी नसून पाणीदार हिरा आहे हें त्याला एका क्षणांत कळून चुकलें आणि कोण काय म्हणेल याचा विचार न करतां तो एकदम बाहेर येऊन आपल्या मेहुण्याला म्हणाला, " वा ! तुम्ही केव्हां आला ? आज जरा डोकें दुखत असल्यामुळें मी आंतच पडलों होतों. केव्हांच झोप लागली. तुम्ही आम्हांला दिवाळसणाला बोलवायला आलां असाल ? "

तिचा भाऊ चकित झाला. कधींहि न बोलणारे हे राजश्री आज असे काय बोलत आहेत हेंच त्याला कळेना; पण उत्तर देणें भाग आहे असें ठरवून त्यानें म्हटलें, " होय. पण सगळी निराशाच झाली. ताई येतच नाहीं म्हणते."

" ती एकटी येत नसेल ! आम्ही दोघेंहि येतों. मग तर झालें ना ? आगंतुकी नाहीं ना होणार ? " त्यानें हसत हसत विचारलें.

" वाः ! दोघेंहि आलां, तर दुधांत साखर पडल्यासारखें होईल." भाऊ अतिशय आनंदित होऊन म्हणाला, विशेष जोराचें बोलणें ऐकून 'हें काय बाई नवल' असें मनांत म्हणून ती दरवाजांत आली. तिच्याकडे पाहून...

" बंधुराजांना अजून चहा दिला नाहीं वाटतें ? " त्यानें प्रसन्न मुद्रेनें विचारलें.

तीहि कांहीं कमी नव्हती. " तो चहा घेतच नाहीं. आपण ऑफिसांत न जातां घरींच असायचें मला कसें कळावें ? आतां आणतेंच चहा."

भाऊ तर चकित झालाच, पण त्याहिपेक्षां तो आणि ती 'हें असें कसें झालें ? ' असें वाटून आश्चर्यांत गढून गेलीं, व याच मनःस्थितींत सर्वांचें चहापान झालें. सहा महिन्यांचा उन्हाळा पांच मिनिटांच्या पावसाळ्यानें पार नाहींसा झाला !



# बबीची तयारी : : ४३

बबीची आई बाळंतपणासाठीं माहेरीं पांच-सहा महिन्यांकरितां येऊन राहिली होती. तेवढाच काय तो बबीचा व आमचा सहवास; पण तेवढ्या वेळांत तिनें आम्हांस विलक्षण लळा लाविला होता. ती आम्हां सर्वांचीच अत्यंत आवडती होती; व आजोबांचा तर ती जीव कीं प्राणच असे. ते सकाळ-संध्याकाळ तिला आपल्यापुढें जेवावयास घेऊन बसत; व भात कालवून तिला भरवीतहि. संध्याकाळीं ते तिला सहल करावयास घेऊन जात. त्या वेळीं ती लडिवाळपणानें त्यांचें बोट धरून चालत असे. वास्तविक पाहतां तिलाच त्या बोटाचा आधार मिळत असे; पण तिची मात्र अशी समजूत असे, कीं आपलाच जणुं कांहीं आजोबांना आधार आहे ! सर्कशींतला वाघ कसा ओरडतो ? या प्रश्नास 'गुर्रर' व सिंह कसा ओरडतो या प्रश्नास 'डुर्रर' असें तिनें उत्तर दिलें म्हणजे त्यांस मोठें कौतुक वाटे, व आपल्या शहाण्या

नातीस कोठें ठेवूं व कोठें न ठेवूं असें त्यांस होऊन जाई. फार काय, पण आजोबा या शब्दांतील 'जो' या अक्षराचा तिनें चुकीचा 'ज्यो' असा उच्चार केला तरीहि त्यांना मोठी धन्यता वाटे.

आजोबांनीं तिला परोपरीचीं खेळणीं विकत घेऊन दिलीं होतीं. त्यांत एक रबरी मडम होती. तिचें पोट दाबलें, कीं ती ओरडत असे. त्याचप्रमाणें त्या खेळण्यांत एक कळीचा म्हातारा होता. त्याची कळ दाबली म्हणजे तो मान वर-खालीं करीत असे. तसेंच आणखी एक बदकहि त्यांत होतें. त्याची कळ दाबली कीं तें पंख फडफडावून उड्या मारीत असे. याशिवाय किल्लीची आगगाडी, आगबोट, बेंडबाजा वगैरे किती तरी वस्तु त्या खेळांत होत्या. बबी नवा परकर नेसून आजोबांच्या पायां पडण्याकरितां आली, अथवा बेंडबाजा वाजवीत नाचूं लागली, की ते हातांतील सारें काम बाजूला ठेवावयाचे; व 'अरे वा!' असें म्हणून तिचें कौतुक करावयाचे. अशा वेळीं त्यांना खोकल्याची उबळ आली असली तरी ती ते दाबीत असत. बबीला आजोबांचें खोकल्यावरील औषध चांगलें माहीत झालें होतें.

पण आजचा रागरंग कांहीं निराळाच होता. आजोबांस अर्धांगवायु झाल्यापासून त्यांच्या अंगांत वातविकार मुरला होता. त्यांतच पित्तकारक पदार्थ खाण्यांत आल्यामुळें ओकारी सुरू झाली. बबीच्या आग्रहावरून कांहीं बोरें खाल्ल्यामुळें खोकल्याची ढांस जोरानें सुरू झाली. मग त्रिदोष होण्यास कितीसा उशीर? बबीनें आजोबांना ओकाऱ्या होतांना व खोकतांना पाहिलें, आणि दुखणें रोजच्यापेक्षां कठीण आहे हें जाणून तिनें आपलें सर्व सामर्थ्य एकवटण्याचें ठरविलें. आणि नवीन परकर नेसून व आपला झोळणा त्यास खोंवून, तिनें आपलीं सर्व खेळणीं त्यांत भरलीं व आळीपाळीनें एक एक खेळणें काढून ती आजोबांपुढें नाचवूं लागली. लागलीच मडम ओरडूं लागली, म्हातारा मान वर-खालीं करूं लागला, बदक पंख फडफडावूं लागलें व आगगाडी शिटी फुंकून धावूं लागली; तरी ओकारी व खोकला थांबेना हें पाहून तिनें बेंडबाजा काढून वाजविण्यास सुरुवात केली. त्यांचा तो खोकला जों जों वाढूं लागे तों तों तिनें बेंडबाजा अधिक जोरानें वाजवावा; व इतर खेळण्यांच्याहि कळा दाबाव्यात, पण कोणतीच मात्रा लागू पडेना.

बबीची आई मात्र उगाळतांना ओव्या म्हणत होती, त्या ऐकूं येत होत्या.

आमची बबी बाळ । आम्हांला आ ऽ वडे ॥
दारींचे घेवडे । जून झाले ॥
आमची बबी बाळ । सकाळीं दूध पीते ॥
दुपारीं भात खाते । बाबांपाशीं ॥

ओव्या ऐकून आजोबांच्या डोळ्यांना टच्कन् पाणी आलें. उद्यां बबीला जेवावयास जवळ कोण घेईल ? भात कोण भरवील ? फिरावयास कोण घेऊन जाईल ? तिच्या भोवऱ्यास दोरी कोण गुंडाळून देईल—असे विचार त्यांच्या मनांत घोळत नसतील ना ? कोणीं सांगावें ?

आजोबांस शेवटची घरघर लागली, पण बेंडबाजा जोरानें वाजतच होता. बिचाऱ्या बबीला हें मृत्यूचें बोलावणें आहे ; याची काय कल्पना तिनें आपला बेंडबाजा वाजविण्याचा व इतर खेळणीं दाखविण्याचा सपाटा चालूच ठेवला. गरीब बिचारी बबी ! तिच्या या साऱ्या जय्यत तयारीला न जुमानतां आजोबांचे प्राण केव्हां निघून गेले हे कळलेंहि नाहीं !



# बरदुल्ला* अर्थात् शान्तीची† गोष्ट : : ४४

"शान्ते, आण पाहूं तुझी लघुकथा." आरामखुर्चीवर पडल्या पडल्या उजव्या बाजूला किंचित् कलून अण्णासाहेब म्हणाले. शान्ताला माझ्यासमोर संकोच वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें. ती उत्साहानें उठली आणि आपल्या मेजाच्या खणांतून तिनें एक पुडकें बाहेर काढलें. तें पाहतांच

* जुन्या आरबी भाषेंतील सुप्रसिद्ध लघुकथालेखक (कुणी तरी असणारच. ) चाऊस, याच्या एका 'बरदु-उल्ला' नामक उत्कृष्ट लघुकथेच्या आधारें प्रस्तुत गोष्ट लिहिली आहे असें कुणीं सिद्ध करण्याचा प्रयत्न केल्यास (आणि तो हटकून होणारच. ) त्याचा विषाद न मानतां आरबी भाषेंतहि आपली प्रगति असल्याचा बोभाटा परभारेंच होत असलेला पाहून प्रस्तुत लेखकास आनंदच होणार आहे !

† पाळण्यांतील नांव एक आणि हांक मारण्याचें लाडकें नांव एक,

अण्णासाहेब म्हणाले, “अबब! ही तुझी लघुकथा वाटतं? अग, तूं अगदीं नामांकित लघुकथालेखकांप्रमाणं पन्नास-पन्नास साठ-साठ पानांची लघुकथा लिहिलीस कीं काय? लघुकथा म्हटली, कीं ती नुसती लिंबाच्या लोणच्यांतील मिरचीप्रमाणं लहानशी, चुरचुरीत आणि चटकदार—”

“पण यांत गाळण्याचा भाग बराच आहे.” शान्ता मध्येंच म्हणाली.

“म्हणजे?” अण्णासाहेबांनीं कपाळावर साडेतीन आंठ्या पडेपर्यंत भुवया चढवून म्हटलें, “गोष्टींतसुद्धां गाळण्याचा भाग असतो कीं काय? मी आतांपर्यंत गाळण्याचा भाग नाटकांतच असतो असें समजत होतों!”

माझ्याकडे वळून ते पुढें म्हणाले, “आमचे एक मित्र नाटकाच्या प्रयोगांतून गाळण्याचा जेवढा भाग असेल तेवढाच अगोदर लिहून काढीत, आणि मग केव्हां तरी फुरसतीअंतीं प्रत्यक्ष प्रयोगाचा भाग लिहिण्यास घेत!”

मी ही त्यांची नेहमींची अतिशयोक्ति समजून तोंडांतील विडा बाहेर टाकण्याच्या मिषानें गॅलरींत गेलों, आणि त्यांना न समजेल इतक्याच बेतानें हसून परत आपल्या खुर्चीवर येऊन बसलों.

इतक्या अवधींत शान्तीनें अण्णासाहेबांच्या शंकेचें निरसन 'तसं नव्हे, लिहितां लिहितां चुकलेला आणि अवास्तव वाढलेला मजकूर खोडलेला यांत पुष्कळच आहे' असें म्हणून केलें; आणि अण्णासाहेबांनीं 'बरं वाच' असें म्हटल्यानंतर ती वाचनासाठीं पुढें सरसावली. मीं आपला स्वतःचा घसा खांकरून साफ करीत तिला उत्तेजन दिलें. तिनें माझ्याकडे पाहत किंचित् ओठ दाबून मंदस्मित केलें आणि वाचनास सुरुवात केली.

—संध्येच्या अनुरागाची रक्तिमा संध्येच्या मुखमंडलावर विराजत होती; पण तिचाहि अस्त जवळच येऊन ठेपल्यासारखा अंधुक रंगांत दिसून येत होता. पश्चिम दिशेचें हें वैभवपूर्ण सौभाग्य—

“शान्ते—” अण्णासाहेबांनीं मध्येंच तिला अडवून विचारलें, “अगोदर मला हें सांग कीं हें प्रास्ताविक वर्णन किती पानं आहे? आणि तुला संपादकाकडून पानागणिक मोबदला मिळणार आहे कीं ओळीगणिक, मिळणार आहे?”

---

या सांप्रदायाचा परिणाम हल्लीं कित्येक गोष्टी, नाटकें आणि कादंबऱ्या यांच्या नांवांवर झाला आहे. त्या चालीवर.

शान्ता चिडून म्हणाली, " हें काय हो ? मीं मोबदल्यासाठीं कधीं तरी लिहिलें आहे का ? "

अण्णासाहेब म्हणाले, " मोबदल्यासाठीं कुणीं लिहूं नये असं मी म्हणत नाहीं; पण संध्येच्या रागरंगाच्या वर्णनांतच रंगून तूं दोन पानं तरी अडवणार अशी भीति मला वाटली म्हणून आपली शंका प्रदर्शित केली. अग, त्या पश्चिम दिशेच्या दैदीप्यमान वैभवाकडे आणि तुझ्या या काव्यमय वर्णनाकडे लक्ष देण्यास सामान्य वाचकांस फुरसत कुठं असते ? कवितांचीं पानं आणि लांबलचक वर्णनांचीं पानं वाचकांना नुसतीं चाळण्याकरितां आणि संपादकांना अंक वाढविण्याकरितां असतात ! मुख्य कथानकाकडेच बहुतेकांची दृष्टि असते ! "

त्यावर मी म्हणालों, " मग काय, स्थलकालाची माहिती, आजूबाजूची परिस्थिति वगैरे कांहीं एक न देतां एकदम, 'एक होती ऊ तिला झाली टू'* अशीच सुरुवात करावी म्हणतां ? "

" छे छे ! अगदीं तशीच सुरुवात नसली तरी पण लघुकथेंत पाल्हाळिक वर्णनं टाळलींच पाहिजेत." अण्णासाहेब म्हणाले. नंतर शान्तीकडे वळून ते म्हणाले, " हं शान्ते, त्या वर्णनानंतरचा मजकूर वाच."

शान्ता थोडीशी खिन्नच झाली होती; तरी पण तिनें उसनें अवसान आणून वाचनास सुरुवात केली—

—दगड, चुना, लोखंड इत्यादि साहित्यांनीं मजबूत बांधून काढलेल्या लकडीपुलावरून एक तरुण विद्यार्थी सायकलीवरून वेगानें गांवांत येत होता.

" छान ! " अण्णासाहेबांच्या या प्रोत्साहनानें शान्तीच्या मुखावर तजेला आला.

शान्ता पुढें वाचूं लागली—

—कोपऱ्यावरील पोलीस-चौकीवरून नारायण पेठेकडे तो वळणार इतक्यांत त्या बाजूनें सायकलवरून येणाऱ्या एका विद्यार्थिनीच्या सायकलवर त्याची सायकल आदळली, आणि दोघेंहि दोन बाजूंना जाऊन पडलीं.

* लहानपणीं ऐकलेली आणि मोठेपणीं मूकनायकांत वाचलेली.

कोणाची का चुकी असेना, पण ती दोघांनाहि भोंवली. थोड्याशा खरचट-ण्यापलीकडे विशेषसें दोघांनाहि लागलें नाहीं. फक्त त्या विद्यार्थिनीच्या डोकींतील फुलें कांहींशीं गळून पडलीं, आणि एखाद-दुसरी बांगडी पिचली येवढेंच. पण ह्या अपघाताच्या अकल्पिततेमुळें दोघेंहि भांबावून गेलीं होतीं. त्यांतल्या त्यांत प्रसंग ओळखून तो विद्यार्थी त्या विद्यार्थिनीच्या मदतीस गेला आणि दिलगिरीच्या स्वरांत त्यानें तिजजवळ क्षमेची याचना केली. तिची सायकल जी थोडयाशा अंतरावर पडली होती, ती त्यानें नीट तपासून तिच्याजवळ आणून दिली. तिच्या डोळ्यांत अश्रु उभे होते, पण मुद्रा क्रुद्धच दिसत होती. त्यानें तिची सायकल तिच्या हातीं देतांच ती रागानें म्हणाली, 'तुम्हीं मुद्दामच हा खोडसाळपणा केलात—'

'छे-छे! तुमचा विनाकारणच—' इतक्यांत चौकीवरील पोलीस आणि इतर प्रेक्षकांचा घोळका जमला. 'कसें झालें', 'काय झालें' वगैरे प्रश्नमालिका सुरू झाली. पुढील विटंबना टाळण्यासाठीं 'विशेष कांहीं झालें नाहीं', असें सांगून त्या विद्यार्थिनीनें चपळाईनें त्या घोळक्यांतून मार्ग काढला. आपणहि तोच मार्ग स्वीकारणें बरें असें वाटून त्या विद्यार्थ्यानेंहि आपल्या सायकलवर उडी मारली. मात्र त्यानें पूर्वीचा आपला बेत बदलून परत लकडीपुलाकडे आपला मोर्चा वळविला.

—ती मुलगी रंगानें निमगोरी पण नाकाडोळ्यांनीं अतिशय तरतरीत होती. आणि कुणाहि पाहणाऱ्याचे डोळे चट्कन् वेधून घेण्याइतकें अतुल सामर्थ्य तिच्या बांधेसूद ठेवणींत आणि मोहक चेहऱ्यांत होतें, ह्यांत शंका नाहीं. त्यांतून सायकलीवरून जाण्याकरितां म्हणून तिनें आपला पदर व्यवस्थितपणें खोंचल्यामुळें आणि गार्टर्सनीं आपल्या पायघोळ लुगडयाचा भाग चोपून बसविल्यामुळें तिच्या बांधेसूदपणास विशेषच उठाव आला होता. जिलबीची वेणी जी तिनें घातली होती, तिनें तर तिच्या सौंदर्यांत अधिकच भर घातली होती. तिच्या वेणींतील कांहीं फुलें सायकलीवरून पडल्यामुळें गळून पडलीं होतीं. तरी एक-दोन फुलें आणि पानें तशींच आपली जागा धरून होतीं.

अण्णासाहेब पुन्हा माझ्याकडे वळून म्हणाले, " हा एकांगी शिक्षणाचा परिणाम कीं गतानुगतिकत्व ? पुरुष लेखकांच्या लेखनांत जशी स्त्रियांच्या सौंदर्यवर्णनाची अहमहमिका लागून राहिलेली दिसते तसाच

प्रकार स्त्री-लेखकांच्या लेखनांतून कां आढळून येतो ? एखाद्या सुंदर पुरुषाच्या सौंदर्याकडे मार्मिकतेनं पाहून त्याच्या सौंदर्याचं वर्णन एखाद्या रसिक स्त्रीनं केलेलं कांहीं आढळून येत नाहीं. आपल्याला तर बुवा त्याच त्या चकारींतून गाडी हांकणाऱ्या गाडीवानाप्रमाणं हा लेखकवर्ग वाटतो. नंतर शान्तीकडे वळून ते म्हणाले, " बरं, आतां तूं लिहिलेली गोष्ट न वाचतां नुसती गोष्टच तोंडानं सांग, म्हणजे गोष्टीचं कथानक कळेल आणि थोडक्यांत आटोपेल."

शान्ता म्हणाली, " अहो, पण मीं अजून एक पानहि पुरतं वाचलं नाहीं तोंच तुम्ही कंटाळलांत ? मी काय तुम्हांला खंडकाव्य वाचून दाखवीत आहें, कीं इतिहास-संशोधनांतील एखादा निबंध वाचून दाखवीत आहें ? "

" शान्ते, रागावूं नकोस." अण्णासाहेब समजुतीच्या सुरांत थोडेंसें हसून म्हणाले, " मला आतां आणखी पंधरा मिनिटांनीं एका सभेस जायचं आहे म्हणून मी घाई करीत आहें."

शान्ता म्हणाली, " बरं तर; गोष्ट अशी आहे कीं, आपली दुर्गी यादगिरीकर माझ्याकडे येते ना ? तीच या गोष्टींतील नायिका."

" हो का ? तिच्याच सायकलीची टक्कर झाली का ? " अण्णासाहेब आश्चर्यानें म्हणाले, " आणि मग तो विद्यार्थी कोण होता ? "

शान्तेनें हसून उत्तर दिले, " तो आपल्या मधूचा रूम-पार्टनर—अगदीं जिवश्चकंठश्च मित्र—माधव."

अण्णासाहेब म्हणाले, " बरं, मग ? "

शान्ता पुढें सांगूं लागली,

—तो त्या दिवशीं तिच्या पाठोपाठ गेला. त्याच्या मनांतून वाटेंतच तिला गांठून तिचा गैरसमज दूर करावा असं होतं; पण तो कांहीं तिला गांठूं शकला नाहीं. आपल्या मागून तो विद्यार्थी येत आहे हें दुर्गेनं पाहिलं होतं, म्हणून तिनं आपली सायकल खूप जोरानं चालवून आपला बंगला गांठला. तुम्हांला तो कोरटकरांचा बंगला माहीत आहे का ? तिथंच रा० सा० यादगिरीकर राहतात. त्यांच्या त्या पठाणानं दुर्गेची ती कावरीबावरी स्थिति, तिचं वरचेवर मागं वळून पाहणं आणि तिचा पाठलाग करणारा विद्यार्थी या गोष्टी पाहिल्या, आणि दुर्गा फाटकांत शिरतांच त्यानं त्या

विद्यार्थ्याकडे आपली भेसूर दृष्टि फिरविली. त्याची ती धिप्पाड आकृति, क्रूर दृष्टि आणि हातातील सोटा पाहून माधवाची गाळणच उडाली. 'पठाणांच्या लीला' त्याच्या डोळ्यांपुढं उभ्या राहिल्या असाव्यात. त्यानं आपलं सर्व धैर्य एकवटून अंगीं आणलं आणि पठाणाच्या दृष्टीस दृष्टि न देतां तो बंगला ओलांडून पुढं गेला.

—त्यानंतर आठ एक दिवसांनीं मला दुर्गा भेटली. आणि तिनं ही सगळी हकीकत सांगितली. त्या दिवसापासून दिवसांतून दोन चार वेळां तरी त्या बंगल्यावरून माधवाच्या खेपा होत असतात असं तिनं मला सांगितलं. एकदां तर त्यांच्या पठाणानं त्याला गांठून चांगलीच तंबी दिली असंहि कळलं. आम्ही या आमच्या गोष्टी बोलत होतों, इतक्यांत मधु तिथं आला, आणि म्हणाला, 'दुर्गाताई, बऱ्या भेटलांत. मला तुमच्याशीं थोडंसं महत्त्वाचं बोलायचं आहे. रावसाहेबांचा आणि माझा तितकासा परिचय नाहीं, म्हणून मी तुमच्या बंगल्यावर कसं यावं या विचारांत होतों. त्या दिवशींच्या सायकलीच्या टकरीसंबंधीं तुमचा माझ्या मित्राविषयीं गैर-समज झाला आहे. त्याच्याकडून मुद्दाम असं वर्तन आणि त्यांतून स्त्रियांच्या बाबतींत तर कधींच होणं शक्य नाहीं. तुम्हांला त्याची कल्पना नाहीं. तो पराकाष्ठेचा सालस आणि पापभीरु आहे. तुम्ही त्याला जें बोललांत तें त्याच्या अंतःकरणाला फार लागून राहिलं आहे. तुमचा गैरसमज दूर करण्याची संधि एकदां तरी यावी म्हणून त्यानं तुमच्या बंगल्यावरून पांच-पन्नास तरी खेपा घातल्या असतील; पण आंत जाण्याचं मनोधैर्य नसल्यामुळं आणि तुमच्या त्या पठाणाच्या भीतीनं स्वारी प्रत्येक वेळीं माघारी फिरे. एकदां तर त्याच्या त्या खेपांचा संशय घेऊन त्या पठाणानं त्याचा खरपूस समाचारहि घेतला म्हणे.'

—दुर्गा म्हणाली, 'हो, मला ती हकीकत कळली. असंच जर असेल तर माझं कांहीं म्हणणं नाहीं. तुम्ही त्यांना सांगा कीं, झालेल्या प्रकाराबद्दल उगीच वाईट वाटून घेऊं नका. शिवाय तसं नुकसान असं कुणाचंच झालं नाहीं.'

—मधू म्हणाला, 'तें खरंच; पण एखाद्याचं मन जात्याच अत्यंत हळुवार असतं. त्याशिवाय आणखीहि मला थोडंसं बोलायचं आहे. तें

काम थोडं नाजुकच आहे. तुम्ही जर उद्यां याच वेळीं इथें याल तर त्या-संबंधीं मी तुमच्याशीं बोलेन.'

—दुर्गेनं दुसऱ्या दिवशीं यायचं कबूल केलं. थोड्या वेळानं ती गेल्यानंतर मीं मधूस त्याच्या नाजुक कामाविषयीं प्रश्न केला. तेव्हां तो म्हणाला, 'अग, तें काम तुझ्या मदतीशिवाय होणं अशक्य, म्हणून तर मीं त्याविषयीं आतांच न बोलतां उद्यांचा वायदा केला. थोडंसं घुटमळून, उलट त्यानंच मला विचारलं, दुर्गेशीं माझं नाजुक काम काय बरं असेल ? '

अण्णासाहेब मध्येंच म्हणाले, " अग, दुसरं काय असणार ? मी सांगतों, लघुकथेंतील संविधानकाचा प्राण—आजकालच्या लेखकांची नाडी तपासून पाहता एका प्रेमाभोंवतींच घुटमळत असतो, हो ना ? "

त्यावर शान्ता म्हणाली, " हो, तसं असायचंच ! लेखक झाला तरी तो समाजाची नाडी पाहूनच आपलं लिखाण लिहिणार."

" आणि यावरून पाहिलं म्हणजे दुर्गारूपी 'महाश्वेते'वर माधवरूपी 'पुंडरीक' बेहोष होऊन गेला आहे, हेंच मधुरूपी कपिंजलानं तुला सांगितलं ना ? " अण्णासाहेबांनीं शान्तपणें ठांसून विचारलें.

शान्तेनें " होय." म्हणून उत्तर दिलें.

" बरं, मग पुढं ? "

अण्णासाहेबांच्या या प्रश्नावर शान्ता म्हणाली, " पुढं काय ? मी त्याच दिवशीं संध्याकाळीं दुसऱ्या दिवशींच्या मधूच्या नाजुक कामगिरीचा प्रस्ताव करण्यासाठीं दुर्गेकडे गेलें, तों तिथं गेल्यावर फारच गम्मत घडून आली."

—रावसाहेब यादगिरीकरांची वागणूक त्यांच्या मुद्रेप्रमाणंच किती कडवी आहे हें तुम्हांला माहीत आहेच. दुर्गेच्या सायकलीशीं कुणी तरी एका टवाळानं टक्कर दिली आणि तो टवाळ विद्यार्थी आपल्या बंगल्यावरून नेहमीं टेहेळणी करीत असतो, ही बातमी त्यांच्या कानांवर गेली होती. तेव्हां पुन्हा जर तो टवाळ मनुष्य घिरट्या घालतांना आढळली तर त्याला आंत आपल्याकडे आणण्याविषयीं त्यांनीं आपल्या पठाणास चार दिवसां-पूर्वी बजावून ठेवलं होतं.

—त्या दिवशीं दुर्गा मला फाटकांत उभी असलेलीच दिसली. तेव्हां मीं थट्टेनं, 'अगदीं एकसारखी कुणाची वाट पाहत उभी आहेस ? फारच

उतावळी झाली असशील तर सायकल घेऊन बाहेर पड म्हणजे नेमकी गांट पडेल,' असं म्हटलं.

तेव्हां ती जरा कुऱ्यानंच म्हणाली, 'काय ग तुझा चहाटळपणा ?'

—थोड्याशा विनोदानंतर मी हळूहळू दुसऱ्या दिवशींच्या मधूच्या कामागिरीसंबंधीं तिची मनोभूमिका तयार करण्यांत गुंतलें असतां माधवाची स्वारी हळूहळू सायकल चालवीत आमच्याकडे पाहत पाहत आणि हसत हसत चाललेली दिसली. माझा आणि त्याचा परिचय जरी होता तरी विशेषशी दाट ओळख नव्हती; पण त्या वेळीं काय वाटलं कुणास ठाऊक! मी आपली चट्कन् त्याला 'या तुम्ही' असं बोलून गेलें. मग मात्र मी वरमलें. पण माझी अंतःस्थिति मीं बाहेर कुणास दिसूं दिली नाहीं. सुदैवानं कीं दुर्दैवानं हें भविष्यकाळच जाणूं शकेल, पण तोहि आमच्या भेटीस उत्सुक असा दिसला. कारण माझ्या तोंडून पुरते शब्द निघतांत न निघतात तोंच त्यानं सायकल थांबविली. पण मग तोहि जरा लाजल्यासारखाच झाला. त्याच्या मूळ स्वभावानं उचल खाल्ली असावी. मग मीं बळंच अवसान आणून 'आंत या,' असं त्यास म्हटलं.

अण्णासाहेब म्हणाले, "हं आटप आं तुझी गोष्ट. माझी वेळ झाली."

शान्ता म्हणाली, "संपलीच माझी गोष्ट—"

"मीं माधवास आंत बोलावलं, आणि तो आंत येऊं लागला, तोंच रावसाहेबांची मोटार येऊन थडकली. तो पठाण कुठंसा आंत दडला होता तो रावसाहेबांच्या मोटारचा आवाज ऐकून बाहेर आला, आणि त्याची व माधवाची दृष्टादृष्ट होतांच रावसाहेबांच्या कानाशीं लागून त्यांनं कायसंसं सांगितलं. माधव गोंधळून गेला. आम्ही दोघी आंत गेलों. इतक्यांत दुर्गेचा धाकटा भाऊ चिमणाप्पा दुर्गेकडे आला आणि रावसाहेब बाहेर बोलावताहेत असं आपल्या कानडी बोबड्या बालभाषेंत सांगूं लागला. 'रावसाहेब बोलावताहेत' असं कुणीं म्हटलं, कीं अगोदर सर्वांची गाळणच उडत असे. त्यांतून ती वेळ तर फारच चमत्कारिक होती. तेव्हां साहजिकच दुर्गा बाहेर जाण्यास कचरूं लागली. तिकडे माधव रावसाहेबांची मुद्रा, आमची उडालेली गाळण आणि पठाणाची संशयित वृत्ति पाहून अधिकच घाबरून गेला होता. दुर्गा जेव्हां बाहेर येईना तेव्हां चिमणाप्पा 'ती येत नाहीं,' ह्या अर्थीं मोठ्यानं 'बुरदुल्ला' म्हणून ओरडला. रावसाहेबांचा पारा नेहमींच

चढलेला असायचा. तो 'ती येत नाहीं' हें ऐकून अधिकच चढला आणि ते मोठ्यानं 'बरदुल्ला!' म्हणून ओरडले. पठाण जवळ धांवत आला. माधवास वाटलं कीं, रावसाहेबांनीं पठाणासच 'बरदुल्ला' म्हणून हांक मारली. आतां पठाण आपली गठडी खास वळणार असं माधवास वाटलं, आणि तेथून त्यानं धूम ठोकली.

"संपली माझी गोष्ट." शान्ता म्हणाली.

"संपली? अशी कशी संपली?" अण्णासाहेब आश्चर्यदर्शक स्वरांत ओरडले. नायक-नायिकेचं लग्न लागल्याखेरीज कधींच कुणाची गोष्ट संपत नसते!"

शान्ता म्हणाली, "पण मला मुळीं ती सायकलीची टक्कर आणि पुढं माधवाची उडालेली गाळण येवढीच गोष्ट सांगायची होती."

अण्णासाहेब म्हणाले, "वा! मधून दिलेल्या नाजुक कामगिरीच्या नाजुक आश्वासनाची तुला आठवणच नाहीं वाटतं?"

शान्ता म्हणाली, "आठवण आहे; पण आतां तुम्हीच पहा. असल्या लग्नाची मध्यस्थी मी कशी करूं? 'कानडीनं केला मराठा भ्रतार, एकाचं उत्तर एका न ये,' याचं प्रत्यंतर तर मला नुकतंच मिळालं आहे. चिमणाप्पा आणि रावसाहेब 'येत नाहीं' या अर्थानं 'बरदुल्ला' म्हणून ओरडले आणि माधवनं तें पठाणाचं नांव समजून घेऊन पोबारा केला. तेव्हां असल्या भिव्या भागूबाईस मी आपल्या गोष्टीचा नायक करून त्याचं लग्न नायिकेबरोबर कसं लावूं? बरं, कांहीं तरी करून नसलेलं 'चंद्रबळ' ओढून आणून मीं गोष्टीच्या शेवटीं त्यांचं लग्न लावलं असतं; पण मग तुम्हींच मला 'गतानुगतिक' म्हणून टोमणा मारला असता."

"बरं, तुझ्या या गोष्टीचं नांव तरी काय?" अण्णासाहेबांनीं बाहेर जातां जातां विचारलें.

"माझ्या गोष्टीचं नांव 'बरदुल्ला' हेंच आहे. ज्या एका शब्दानं माधवाचा घोंटाळा उडाला तोच शब्द माझ्या गोष्टीचा मध्यवर्ति तंतु आहे. शिवाय, हेंच नांव देण्यांत माझा दुसरा एक मुख्य हेतु आहे तो हा कीं, मनोरंजनाबरोबरच लोकशिक्षणाचं कार्यहि झालं पाहिजे, अशा मतांची पुरस्कर्ती मी आहे."

"मग यांत कोणतं लोकशिक्षणाचं कार्य तूं संपादलंस?" अण्णासाहेबांनीं विचारलें.

शान्तानें उत्तर दिलें, "कां बरं? महाराष्ट्रीयांना एक तरी कानडी शब्द शिकविल्याचं श्रेय मला नाहीं का मिळालं?"

"शाबास! शाबास! शान्ते, मला आवडली तुझी गोष्ट!" असें म्हणून अण्णासाहेब बाहेर पडले.

* * * *

संपादकमहाराज,

जी गोष्ट मीं ऐकली ती तशीच आपणाकडे प्रसिद्धीकरितां पाठवीत आहें. दुसऱ्याच्या कथानकाचा फायदा मी घेत आहे हें मी त्यांतल्या त्यांत कबूल करण्याचा प्रामाणिकपणा दाखवीत आहें, येवढें तरी समाधान खास मिळेल. आतां कदाचित् शान्तीची गोष्ट आपणाकडे आल्यानंतर तिची विल्हेवाट कशी लावायची हें मी आपणांसारख्या कसलेल्या संपादकांस लिहावयास नकोच. थोडक्यांत गुप्त गोष्ट म्हणून सांगतों कीं, ती 'लघुकथा' नसून लहानशी पाऊणशें एक पानांची कादंबरीच आहे. पत्र पाहतांच—नव्हे वाचून होतांच फाडून टाकावें. कळावें, ही विनंति.

आपला

लेखक



# बाळूची बायको : : ४५

तसें पाहिलें तर बाळूची व माझी विशेषशी मैत्री नव्हती. लहानपणापासून तो व मी एका शाळेंत शिकलेले. तो माझ्यापुढें एखादें वर्ष असेल इतकेंच काय तें. पण अभ्यासासंबंधीं विरोधी भक्ति, शाळेबाहेरील इतर सर्व 'चळवळीं'मध्यें भाग घेण्याची उत्सुकता, केसांचा भांग व धोतराचा काच्या 'झ्याकीं'त ठेवण्याबद्दलची आस्था इत्यादि 'गुण' दोघांत सारख्याच प्रकर्षानें असल्यामुळें आम्ही दोघे एकमेकांना चांगलेच ओळखून होतों. जोगळेकराच्या हॉटेलांत आम्ही दोघे बरोबरीनें कधींच गेलों नसलों तरी दोघांचा त्या

ठिकाणीं 'साहेबजी' झाला नाहीं असा त्या वेळीं क्वचित्‌च एखादा दिवस गेला असेल. 'आर्यन्'च्या शेवटच्या 'शो'ला मसालेदार पट्टी दांतांत चघळीत शेवटच्या रांगेला जाऊन बसावें व मध्येंच उजेड होतांच आजूबाजूला आपल्या ओळखीचीं कुळें आहेत किंवा नाहींत तें चौकस नजरेनें पहावें तोंच दोन रांगा टाकून पलीकडे एका खुर्चीवर पाय पुढें तणावून बसलेल्या बाळूचा अर्धचेहरा दिसला नाहीं असें कधींच व्हावयाचें नाहीं. शाळेमध्यें एक-मेकांची गांठ महिना महिना पडली नाहीं तरी बँडच्या दिवशीं 'एम्प्रेस गार्डन'मध्यें, रविवारीं संध्याकाळीं 'बंड गार्डन'वर व इतर दिवशीं सायंकाळीं फर्ग्युसनच्या टेकडीवर एकमेकांची नजरभेट झाली नाहीं असें कदापिहि व्हावयाचें नाहीं.

एवंच, आम्ही एकमेकांच्या खांद्यांवर हात ठेवून सायकलवर फिरणारे दोस्त नसलों तरी एका कक्षेंत फिरणारे ग्रह होतों. ग्रहमालिकेंत अहोरात्र फिरणाऱ्या नवग्रहांत हा मागें व तो पुढें अशी ज्याप्रमाणें नंबरवारी लावतां येणें अशक्य आहे तद्वत् अभ्यासाचे–नव्हे इयत्तेच्या बाबतींत बाळूची एक वर्षाची वडीलकी वजा केली तर बाकीच्या गोष्टींत आम्ही दोघेहि एक-मेकांना हार जाण्यापैकीं नव्हतों. बाळूनें 'स्टूडंट्स स्नफ्'ची बाटली खिशांत बाळगण्याचे आधींच मी पानपट्टीची डबी कोटाच्या आंतल्या कप्प्यांत ठेवून राहिलों होतों. स्वतःची उगवलेली शेंडी बाळूनें छाटण्याआधींच ओठांवर न उगवलेल्या केसांची साफसफाई करण्याची मीं सावधगिरी बाळगलेली असल्यानें बाळूला मीं केसभरहि पुढें जाऊं दिलें नाहीं. मात्र एका बाबतींत बाळूनें मला चांगलेंच चीत केलें. मी 'पासिंग शो'चें पहिलें पाकीट विकत घेतलें असेल नसेल तोंच मला बाळू 'लखपती'च्या पुस्तकाचीं पानें उलटून त्यांवर पेन्सिलीच्या खुणा करीत असतांना दिसला.

त्या दिवसापासून बाळूसंबंधीं माझें मत पार बिघडून गेलें. बाकी त्याचें माझ्यासंबंधीं काय मत होतें तें कळण्याला मला मार्गच नव्हता. त्यापुढें बाळूसंबंधीं मी वाटेल त्या बातम्या ऐकायला तयार झालों होतों. नाटकांतील स्त्रीपार्टी, डोअरकीपर, स्टेशनवर नंबरटेकर, झिज्या वाढविले-ला सिनेमा नट, रेसकोर्सवर 'वधारो' विकणारा पोऱ्या, इ०अनेक हुद्द्यांच्या जागा मीं बाळूसाठीं कल्पनेनें चितारून ठेविलेल्या होत्या. त्या वर्षी बाळू प्रिलिमिनरी परीक्षेंतून पसार होण्याऐवजीं त्या परीक्षेआधींच पसार

झाल्याची बातमी कळली. मला मुळींच आश्चर्य वाटलें नाहीं. लांबचा नातेवाईक मेल्याची बातमी ऐकून क्षणैक गंभीर चेहऱ्यानें 'सुटला एकदांचा' या अर्थी सुस्कारा टाकणाऱ्या माणसाइतकाच मला बाळू 'अभ्यासी जगां'तून सुटल्याबद्दलचा विषाद वाटला. त्यानंतर तो पुन्हा मला कधीं दिसला नाहीं व मींहि त्याच्यासंबंधीं कधीं कोणापाशीं चौकशी केली नाहीं.

— २ —

पुढें चार वर्षांनीं मी बी. ए.च्या परीक्षेस बसण्यासाठीं मुंबईस गेलों होतों. परीक्षा आटोपल्यानंतर दुसऱ्याच दिवशीं दुपारीं बोरीबंदरावर रेल्वेंत माझे एक मावसभाऊ नोकरीस होते त्यांना भेटून आलों, व परत गिरगांवांत जाण्यासाठीं सहा नंबरची ट्रॅम पकडावी म्हणून मी एम्पायर हॉटेलच्या समोर उभा राहिलों. बराच वेळ झाला तरी ट्रॅम येईना. उभें राहून अगदीं कंटाळा आला होता, व अंगाचा विलक्षण उकाडा होत असल्यामुळें घसाहि कोरडा पडला होता. म्हणून कोंपऱ्यावरच्या इराण्याच्या हॉटेलांत थोडेंसें 'ड्रिंक' घ्यावें म्हणून आंत शिरून एका कोपऱ्यांतील टेबलाशीं बसलों. 'एक आइस्-लेमन' म्हणून मी पोऱ्याला ऑर्डर देऊन जरा इकडे तिकडे पाहतों तों माझेपासून दोन हातांवर दुसऱ्या एका टेबलावर एका बशी भरून आणलेल्या कालवणांतील कसल्याशा गोळयावर कांटा-सुरी चालवीत असलेला बाळू दृष्टीस पडला! इतक्या वर्षांनंतर अशा अचानक तऱ्हेनें बाळू दृष्टीस पडतांच मीं पूर्वीच्या अप्रिय आठवणी क्षणमात्र बाजूला ठेऊन त्याला हांक मारली. कदाचित् आपण त्याला 'असलें कांहींतरी' खातांना पाहिलें म्हणून तो शरमून फारसा बोलणार नाहीं असें मला क्षणमात्र वाटलें. पण मला पाहतांच 'Hallo, old chum!' म्हणून तो उठून जवळ आला व जोराचें हस्तान्दोलन करून मला आपल्या टेबलावर घेऊन गेला. ऐटबाज इंग्लिशमध्यें बाळूला बोलतांना मीं प्रथमच ऐकलें. ही त्याची अलीकडचीच कमाई असावी असा मीं तर्क केला. त्याचा चेहरा फारसा बदलला नव्हता; पण वयाची वाढ त्याच्या साफसूफ केलेल्या गालावरील हिरवटसर रंगावरून दिसून येत होती. अंगांत एक काश्मिरी कोट, खालीं डकची पांढरी विजार व डोक्यावर फरची सैल टोपी—बाळू पक्का मुंबईकर बनला होता. त्याच्यापुढें पुणेरी धोतरा-वहाणांत बसतांना माझी मलाच लाज वाटूं लागली.

" दोस्त, फार दिवसांनीं भेटलांत! So glad to meet you!

पुण्याची बातमी सांगा आधीं! बरं, तुम्हांला काय मागवूं? पॅटीस मागवूं का क्रीमचॉप पाहिजे? का नुसतें ऑम्लेटच चालेल? हें पहा, We have met after so many days! आतां we must have a jolly good time! बाकी सर्व मंडळी ठीक आहेत ना? केम् तमे पोते तो मजामां छो ने?"

बाळूला गुजराथीहि येऊं लागलें वाटतें? त्याची ती बोलण्याची पद्धत व माझ्याविषयींची विलक्षण सलगी पाहून तर मीं मागविलेलें पेय पिण्याचे आधींच गार झालों. माझ्या पूर्वीच्या अटकळी पार चुकीच्या ठरल्या तर! 'कारटें लकी आहे' असें मनांत मी पुटपुटलो देखील.

"हें पहा बाळोबा, आम्ही बोलून चालून पुण्याचे—तुमचं तें मुंबईचं खाणं-पिणं आम्हांला नाहीं जुळायचं!" खाण्याच्या बाबतींत आपण इतके मागासलेले असल्याचें बाळूच्यापुढे कबूल करतांना किती वाईट वाटलें तें सांगतां येत नाहीं. पूर्वी असा त्याला हार गेलों असतों काय? "मीं लेमन मागविलें आहे आतांच! मला नको आतां कांहीं!" नंतर आठवण झाल्यासारखें करून अगदीं 'फर्ग्यूसनी' उच्चारांत मी घाईघाईनें 'थ्यांक्यू' म्हणालों. बाळूच कांहीं एकटा इंग्रजी शिकलेला नव्हता.

"छट्! लेमन राहूं दे बाजूला. निदान रास्बेरी–आइस्क्रीम तरी घेतलं पाहिजेच!"

मी नको नको म्हणावयाच्या आधीं बाळूनें ऑर्डरदेखील देऊन टाकिली होती. चोरांच्या गुहेंतील अपरंपार संपत्ति पाहून भांबावलेल्या अल्लीबाबाच्या आश्चर्यानें मी बाळूच्या औदार्यवृत्तीकडे पाहत होतों. वास्तविक शाळेंत असतांना त्यानें माझ्यासाठीं कधीं एक पैहि खर्च केली नसेल. मग आतांच त्याच्या अंतःकरणांत माझ्याविषयीं प्रेमाचा राजापुरी झरा कसा उपटला? सुमारें अर्धा तासभर आम्ही त्या ठिकाणीं बसलों होतों. बाळूच्या तोंडाची सारखी टकळी चालली होती. मला बोलावयाला त्यानें सवडच दिली नाहीं. तो काय करतो, कुठें असतो, त्याला पगार किती आहे इत्यादि गोष्टी त्याला विचारण्याचें मला धाडसच झालें नाहीं. 'खंबाला हिल', 'शान्तीदास रंगीलदास', 'फियट गाडी', 'कूपरेज', 'व्हाइट सिटी', 'फर्स्ट एन्क्लोझर', 'जॉर्ज रेस्टोरां' इत्यादि मला दुर्बोध असलेले किती तरी अपरिचित शब्द त्याच्या भाषणांत वारंवार येत होते. मेडिकल स्कूलमध्यें

एकदां अनॅटमीच्या व्याख्यानाला एका मित्राबरोबर गेलों असतांना माझ्या कानांवरून लांबलचक शब्दांची जी अनोळखी घोडदौड गेली त्याचीच पुनरावृत्ति बाळूचें संभाषण ऐकतांना झाल्यासारखें मला वाटलें. एकंदरीत बाळू खूपच चैनींत असला पाहिजे असा मीं कयास बांधला. त्याचें रिस्ट वॉच, खिशांतून डोकावणारा रेशमी रुमाल, सिगारेटची ऐटदार पेटी, सिगारेट 'पिण्या'ची रंगीत बाकदार नळी, बोटांतली अंगठी व त्यांत अडकविलेलें ट्रॅमचें तिकिट—ग्रँड ! मला बाळूचा अगदीं हेवा वाटूं लागला. बोरीबंदरवर मी ज्या भावसभावाला भेटावयास गेलों होतों तो मॅट्रिक फेलच होता. त्याच्यापुढें माझ्या बी. ए. परीक्षेची हकीकत सांगतांना मला स्वर्गाच्या तुळया डोक्याला लागल्याचा भास होत होता. पण आतां या नॉनमॅट्रिकपुढें मला शनिवारवाड्याच्या दिंडींतून जात असल्याचा भास झाला. अखेर 'किर्लोस्कर पंपा'चा दांडा हालविल्याप्रमाणें माझ्याशीं पुन्हा जोराचें हस्तान्दोलन करून, सिगारेटच्या धुराचे फवारे सोडीत 'चीरिओ !' म्हणून तो चालता झाला. त्यानें दिलेली जाड सोनेरी टोकाची सिगारेट मी शान्तपणें खिशांत ठेवून उठलों. उतरलेल्या ठिकाणीं परत आल्यावर बाहेर कुठें गेलोंच नाहीं. बाळू हा विषय सारखा डोक्यांत घोळत होता. मध्येंच डिक्शनरी उघडून बाळूनें उच्चारलेल्या 'चीरिओ' शब्दाचा अर्थदेखील पाहिला. कमाल आहे ! कारटें हुषार आहे ! उगाच नाहीं ! बाकी नशिबवानहि आहेच ! नुसतें बी. ए. होऊन काय करावयाचें—!

— २ —

या गोष्टीला सात-आठ वर्षे होऊन गेलीं असतील. मी त्या वेळीं मुंबईत एका इंग्रजी शाळेंत मास्तर होतों. गिरगांवांत एका अंधाऱ्या चाळीच्या दुसऱ्या मजल्यावरील एका अरुंद खोलींत मी एक-तृतीयांश भाडेकरी होतों. बाकीचे दोघे असेच कोठें तरी नोकरीस होते. सकाळीं उठून प्रार्थनासमाजासमोरील हॉटेलांत एक 'सिंगल' व छटाक शिरा घशाखालीं घालून थोडेसें इकडे तिकडे हिंडावयाचें. नंतर 'बाळा भागवता'च्या खाणावळींतील पहिली पंगत पकडावयाला पळावयाचें. तिथें चारदोन घांस खाऊन शाळेचा रस्ता गांठावयाचा. पांच वाजतां चौपाटीच्या वाळूंत जाऊन पसरावयाचें, तेथें अर्धा आण्याची खारी शेंग खाऊन पुन्हा 'बाळा भागवता'च्या 'गुत्त्या'वर यावयाचें. फार झाले तर क्वचित् एखाद्या रात्रीं ग्रँटरोडवर चक्कर

मारून यावयाचें ! अशा तऱ्हेनें माझें आयुष्य चालले होतें. मुंबईचा अगदीं वीट आला होता. पण करणार काय ? एके दिवशीं संध्याकाळीं बाळा भागवतास छाट मारून 'माधवाश्रमा'ची लज्जत घ्यावी असा विचार करून तिकडे वळलों. खिशांत अवघे चौदा आणे होते. बारा आण्यांत माधवाश्रमांतील जेवण उरकून व बाहेरील टेबलावर ठेविलेली सुपारी सढळ हातानें तोंडांत टाकून ती चघळीत चघळीत मी बाहेर पडलों. तोंच उजव्या बाजूनें येणाऱ्या एका जोडप्याकडे माझें लक्ष गेलें. कोण, बाळू ? शक्य नाहीं ! पण तोच ! होय, बाळूच तो ! पूर्वीचा त्याचा अवतार किती बदललेला होता. त्याचें शरीर आतां स्थूल झालेलें होतें. डोक्यावर पूर्वीच्याच काळजीनें भांग पाडलेला, अंगांत काळा सर्जचा शॉर्ट कोट व आंत पोलो गळपट्टीचा पांढरा शर्ट, पायांत खाकी अर्धी विजार, उंच पायमोजे, हातांत एक बारीक छडी—आणि बरोबर एक वीस वर्षांची मुंबईपद्धतीचा शृंगार, जरा फाजीलच थाटानें, केलेली एक सुंदर तरुणी ! दोघेंहि एकमेकांशीं मोकळेपणानें बोलत व हसत येत होतीं.

ही कोण ? बाळूची बायको? Impossible ! शक्यच नाहीं ! नशीबवान् झाला म्हणून काय झालें ! तो कांहीं शिकलेला थोडाच आहे ? चार पैसे खिशांत असले म्हणून असल्या उथळ्या व छानछोकीच्या माणसाला कोण बायको देतो आहे ?

आपण त्याच्या नजरेस पडूं नये म्हणून मी तसाच मागें पायरी चढून माधवाश्रमांत शिरलों. 'वेस्ट एन्ड' सिनेमाच्या दाराकडे तीं चाललीं होतीं.

" बाकी माणिक, तुझं म्हणणं मुळींच—" बाळूचे परिचित आवाजाचे शब्द माझ्या कानांवर आले. मागून येणाऱ्या मोटारींच्या आवाजांत पुढील भाग मला ऐकूं आला नाहीं.

तो तिला माणिक म्हणतो ? मग अगदींच clear ! ती त्याची बायको असणें शक्यच नाहीं ! असल्या उपऱ्या माणसाला बायको ? मी क्षणैक मनांत हसलों; पण मनाचें समाधान झालें नाहीं. ही त्याची बायको नाहीं तर मग कोण ? खास, बाळूची कांहीं तरी भानगड दिसते आहे ! बाकी कारटें पहिल्यापासूनच तसें म्हणा ! I am not surprised ! किंचित्काळ मी विचारांत पडलों. खिसे चांचपून पाहिले; खिशांत फक्त दोन आणे शिल्लक होते. तसाच धावत वेस्ट एन्ड सिनेमाकडे गेलों. तिकिटाचे

दारापाशीं जाऊन 'एक दोन आण्याचें तिकिट द्या' म्हणून जोरानें ओरडलों. 'दोन आण्याचें तिकिट शिल्लक नाहीं' असें आंतून उर्मट आवाजांत उत्तर आलें. हातांत काढलेलें दोन आण्यांचें नाणें तसेंच खिशांत टाकीत मी परतलों. जाऊं द्या झालें! करायचें काय आपल्याला ? इतक्यांत 'बाल्कनी'-च्या दारांतून सिनेमागृहामध्यें शिरतांना बाळू व त्याचें 'कुटुंब' पुन्हा दृष्टीस पडलें ! जाऊं द्या कां म्हणून ? एकदां दुरून पहायचें; माहिती असावयाला काय हरकत आहे ? म्हणजे पुन्हा भेटला तर असल्या माणसाशीं संगत नको.

दोन आण्यांचे कथली नाणें पुनः पुन्हा तपासून पाहिलें. सर्व खिशांचे कानेकोपरे तपासले. खाऱ्या शेंगांच्या दोनचार टरफलांखेरीज दुसरें कांहींहि सांपडलें नाहीं. आपणांला दुसऱ्याच्या भानगडी काय करावयाच्या आहेत ? मरेना तो बाळू ! याला काय सुख म्हणतात ? चिखलांतला किडाहि मग सुखी म्हणावयाचा ! इतक्यांत सिनेमाच्या सुरवातीची घंटा वाजली. दरवाजाचे पडदे खरेकन् ओढल्याचा आवाज झाला. आंतील दिवे विझले. आंत अंधार झाला असेल——दोघें अगदीं बेहद्द—छट् ! आज आपण चांगली संधि घालविली ! बाळूला नेमका पकडला असता ! घरीं जाऊन पैसे घेऊन यावें व त्याच्या नाकावर टिच्चून वरच्या दर्जाच्या जागेवर बसावें असें वाटलें ! पण तो विचार जागच्याजागींच दबला. कारण घरीं गेलों, कीं आमच्या खोलीचे दोन-तृतीयांश भागीदार मोफत बोकांडीं बसावयाचे ! काय करावें कांहीं कळेना ! राजाबाई टॉवरवरील घड्याळाच्या लंबकाप्रमाणें मन आंतल्या आंत हेलकावे खात होतें.

सिनेमाच्या कांपाउंडमधून सरळ बाहेर आलों. समोरील पानपट्टीच्या दुकानदारापुढें शेअरबाजारांतील गुजराथी व्यापाऱ्याच्या बेपर्वाई वृत्तीनें दोन आणे फेकून चपट्या विड्यांचें अख्खें बंडल व एक काड्याची पेटी विकत घेतली, व शेजारील एका बंद झालेल्या दुकानाच्या पायरीवर अंधारांत ठाण मांडून बसलों. तसें कशाला पाहिजे ? एकदां तलास लावावयाचा ठरल्यावर मग काय कोणाची परवा आहे ? उद्यां सकाळची शाळा आहे—उशीर होईल ना ? जाना देव ! माझें धूम्रपान जोरांत सुरू झालें. बाळू बाकी 'लकी' यांत शंका नाहीं ! पूर्वींचें त्याचें

आयुष्य काय--आणि आतां काय ?--पण शक्य नाहीं. जगांत असें किती दिवस चालणार ! पापाचा घडा केव्हां ना केव्हां तरी भरलाच पाहिजे. आजपर्यंत या मार्गांनीं गेलेल्यांपैकीं कोणाचें चांगलें झालें आहे ? मी 'मुमुक्षु' पत्राच्या भाषेंत विचार करूं लागलों. इतक्यांत विडीचा चटका बसला. दुसरी पेटविली. एका तासांतच पन्नास विड्यांची राख झाली. विड्या संपल्या; पण विचार संपले नव्हते. माझ्या 'नॉन-स्टॉप' धूम्रपानानें ओठ अगदीं हुळहुळे झाले होते. काडी ओढून फूटपाथवर पाहिलें. विड्यांच्या थोटकांचा सडा पडला होता. त्यांपैकीं थोडींफार फिरून वापरण्याइतक्या लांबीचीं दिसत होतीं. मनांत एक अविचार उत्पन्न झाला. इतक्यांत 'काय हरवलें हो ?' म्हणून एक रिकामचौकस प्राणी माझ्या शेजारीं वांकून पाहूं लागला. तेव्हां काडी विझवून न बोलतां मी सरळ चालूं लागलों. पन्नास विड्यांत पहिला तास घालविला तसा पन्नासपाउणशें चकरांत पुढला तास घालवावा ! फूटपाथवर हमाल वेडेवांकडे झोपले होते. त्यांच्यावरून हर्ड्लसप्रमाणें उड्या मारीत मी पुढें गेलों. हतभागी जीव ! जगांत काबाडकष्टानें उपजीविका करणाऱ्यांनीं रस्त्यावरून कचऱ्याप्रमाणें लोळावें आणि समाजाच्या उकिरड्यांत लोळणाऱ्या कचरेवजा लोकांनीं वेस्ट एन्डमध्यें मजा माराव्या--न्याय नाहीं ! मला एकंदरींत जगाचाच राग आला. अशा जगाला कांहीं नाहीं, नुसते फटके पाहिजेत ! अंदमानमधील निष्ठुर बारीबाबा माझ्या अंगांत संचारला. फरासखान्यांतील पोलिसांची गुर्मी माझ्या मनगटांत फुरफुरूं लागली. पण जाऊं द्या झालें ! चालावयाच्याच या गोष्टी ! फर्ग्युसन कॉलेज रोडवर फिरावयास जाणाऱ्या पेन्शनरी प्राण्यांच्या थंडाईनें मीं म्हणालों. अजून किती तरी वेळ होता. छे ! अठ्ठावीस वर्षांची उमर कशी घालवली तें कळलें नाहीं आणि आतां दोन तास कसे घालवावेत तें सुचत नाहीं. आश्चर्य आहे ! सँढर्स्ट रोडच्या जंक्शनवरील एका रस्त्याकडे ठेविलेल्या बाकावर जाऊन मी बसलों. डोकें अगदीं सुन्न झाले होतें. कधीं डोळा लागला कोणास ठाऊक ? वेस्ट एन्ड सिनेमा सुटल्याच्या गलग्यानें जागा झालों; आणि आग लागलेल्या घराच्या मालकाच्या वेगानें सिनेमाकडे पळत सुटलों. तों कोपऱ्यावरच गर्दींत बाळू व त्याची 'मंडळी' दृष्टीस पडली. फिरूनहि तीं हसतच होतीं. त्याच्या हातांत सिगारेट होती. तिच्या हातांत सिनेमांत फुकट मिळणारा जपानी पंखा होता. माझ्या हृदयांत जागृत

झालेला 'शेरलॉक होम्स्' स्वस्थ थोडाच बसणार होता? चटकन् रस्ता ओलांडून मी त्यांच्या मागें झालो. चार पावलें पुढें गेलों नाहीं तोंच रस्त्या-नें जाणाऱ्या एका टॅक्सीला बाळूनें ऐटींत खुणावलें. टॅक्सी थांबली. दोघें आंत जाऊनदेखील बसलीं. मोटारच्या मागें जाऊन बसूं का? पण हा विचार डोक्यांत येण्याच्या आधींच मोटार पसार झाली होती! D--d lucky beggar!

लोकमान्यांची प्रेतयात्रादेखील इतकी हळू गेली नसेल इतक्या हलक्या पावलांनीं व जड अंतःकरणानें मी चाळींत परत आलों. दार उघडून दिवा लावला. माझे दोन-तृतीयांश भागीदार एकमेकांशीं नव्वद डिग्रींचा कोण करून निजले होते. लाथेनें मीं गादी ढकलली. मोरीच्या भिंतीवरील डेऱ्यांतील उरलेलें पाणी प्यालों व गादीवर परत येऊन पडलों. दिवा विझ-वला. पुष्कळ वेळ झोप येईना. पुण्यांतील धंदेवाईक वक्त्यांप्रमाणें माझ्या डोळ्यांपुढें 'आजचे तरुण' हा विषय फिरत होता. बी. ए. होऊन आयुष्या-चा व्यर्थ नाश मात्र होतो. मनोदेवतेनें शेवटचा निकाल दिला. काय माझें आयुष्य! 'निष्प्रेमाची शेज सोबती। मनिंच्या आशा मनास खाती।—' आणि बाळू? Exquisitely happy! इतक्यांत भागीदाराची तंगडी माझ्या गळ्यावर आली. ती जोरानें ढकलून मीं ब्लँकेट तोंडावर ओढून घेतलें व घोरूं लागलों.

— ४ —

या गोष्टीला चार दिवस लोटले असतील. एका संध्याकाळीं नेहमीं-च्या शिरस्त्यास अनुसरून मी चौपाटीच्या उकिरड्यावर लोळत पडलों होतों. आज मात्र स्वारी शेंग विकत घेतली नव्हती. येणाऱ्या-जाणाऱ्यां-कडे विमनस्क दृष्टीनें पाहत, मधून मधून मावळत्या सूर्याची सोनेरी शोभा अवलोकीत व अधींमधीं मलबार हिलवरील हिरव्या झाडींतून डोकावणाऱ्या बंगल्यांकडे बघत मी कसा तरी वेळ घालवीत होतों. इतक्यांत मागून "Hallo, old chum!" म्हणून परिचित शब्द कानांवर पडले. अंगावर बर्फाचें पाणी टाकावें त्याप्रमाणें मी खडबडून उठलों. मागें पाहतों तों बाळू व त्याची 'मंडळी'! पूर्वीपेक्षांहि अधिक झोंकांत! Shameless! दिवसाढवळ्यादेखील हिंडतात वाटतें? मनांत चट्कन् विचार येऊन-देखील गेले. मी लिथो प्रेसवर छापलेल्या चित्राप्रमाणें हसरा चेहरा करतों

तों बाळू माझ्या खांद्यावर हात ठेवून म्हणाला, "अरे! किती वर्षांनीं भेटलास दोस्त! माणिक, He is my very old friend बरं का! इतके दिवस मी मेसापोटेमियामध्ये होतों त्यामुळें आमची गांठ पडली नव्हती. आतां माझी इथेंच बदली झाली आहे, बरं का! अरे, पण Excuse, let me introduce my wife to you! नुकतंच आमचं लग्न झालं!—"

जुहूच्या किनाऱ्यावर येणाऱ्या प्रचंड काळलाटेंत मी गुरफटून गुद-मरतों आहें असें वाटलें! यमपुरींतल्या लांकडी बाहुल्यांच्या पवित्र्यांत मीं बाळूच्या बायकोला नमस्कार केला व वाळूवर पायाच्या अंगठ्यानें कांहीं तरी आकृति काढूं लागलों.



# बैलाचें श्राद्ध (ग्राम-कथा) : : ४६

दोन-अडीच वाजण्याचा सुमार होता. बाहेर ऊन म्हणजे मी म्हणत होतें. मधून मधून कलिंगडें विकीत जाणाऱ्या एखाद्या फेरीवाल्याखेरीज रस्त्यांत कोणी फिरकत नव्हतें. राघोपंतांचे चिरंजीव हरबाराव भाताची गाडी घरीं आणल्यावर, स्नान-भोजन आटोपून पडवींत बांधलेल्या झोंपाळ्यावर नुकतेच आडवे झाले होते. झोपाळ्याच्या अलीकडेच असलेल्या बायनालगत राघोपंतांचा आवडता कुत्रा 'जया' पहुडला होता. घरांतलीं मुलें गल्लीत विटीदांडू खेळण्याच्या नादांत होतीं; पण इतर माणसें वामकुक्षीच करीत असल्यामुळें घरामध्यें सर्वत्र सामसूमच होतें.

राघोपंतांचा नित्य नियम असा असे कीं, एकादशिनी करून घरीं परत आल्याबरोबर अकराच्या ठोक्याला पानावर बसावयाचें. बारा वाजले कीं समजावेंच, कीं राघोपंत झोंपीं गेले म्हणून. अडीच-तीनच्या पुढें मात्र ते कधींहि अंथरुणावर राहत नसत. वयाला पासष्ट वर्षें होऊन गेलीं होतीं, तरी देखील त्यांची हालचाल कमी झालेली नव्हती.

आजहि उठतांक्षणींच त्यांनीं चूळ भरून टाकली व शिरस्त्याप्रमाणें गूळपाणी घेऊन ते पडवींत आले. घरासमोरच्या खळ्यांत रचलेलीं पोतीं

पाहून ते समजले, कीं कुळांकडील मक्त्याचें भात आणण्यासाठीं झुंजुमुंजु घराबाहेर पडलेल्या तिन्ही गाड्या तब्चल भरून आल्या असल्या पाहिजेत. ते तसेच पुढें गेले व बोळाच्या रस्त्यानें वाड्याकडे वळले. वाड्यांतील सगळ्या गुरांना दिवसांकांठीं एकदां तरी डोळेभर पाहिल्याशिवाय राघोपंतांचा जीव राहतच नसे.

वाड्यांत पाऊल टाकतांक्षणींच त्यांनीं उपरण्यांत पेंडीचे आठ-दहा खडे घेतले आणि इतर गाई-वासरांकडे नजर न वळवितां ते प्रथम घरच्या गाडीच्या बैलांकडे वळले. पहिल्या जोडीच्या तोंडांत ते पेंडीचे खडे देऊं लागले तोंच त्यांची नजर जरा पलीकडे पडून राहिलेल्या 'झुंजार'कडे वळली. त्यानें लोळण घेतली आहे हें पाहून त्यांना कसेसेच वाटूं लागलें आणि ते तडक 'झुंजार'पाशींच गेले. खालीं बसून ते बारीक नजरेनें झुंजारकडे बघूं लागले आणि त्याचें तोंड कुरवाळूं लागले.

* * *

जवळजवळ जोडीचे दोन बैल, व जोडीचे दोन भाऊ असावे आणि धाकट्या भावाला बाहेर कोणी तरी निष्कारण बदडावें, म्हणजे तो जसा घरीं येऊन थोरल्या भावाच्या गळ्यांत गळा व शब्दहि न बोलतां केवळ अश्रु ढाळून आपल्या मनाला झालेलें दुःख व्यक्त करतो, तशीच झुंजारची या वेळीं अवस्था झाली. राघोपंतांच्या प्रेमळ व परिचित हाताचा स्पर्श होतांच आतांपर्यंत गिळून ठेविलेलें त्याचें दुःख एकदम प्रकट होऊं लागलें; व गाऱ्हाणें सांगणाऱ्या मुलानें केंविलवाणी नजर करावी तशी नजर राघोपंतांकडे वळवून तो रडूं लागला. त्याच्या डोळ्यांतून टपटप पडणाऱ्या अश्रूंनीं राघोपंतांचा हात भिजून निघाला; त्यांच्याहि डोळ्यांत अश्रुबिंदु चमकूं लागले, पण ते आवरून व पुसून त्यांनीं पेंडीचा एक खडा झुंजारला भरविण्याचा प्रयत्न केला. आईनें प्रेमभरानें दिलेला घास, तिच्या प्रेमाचा अव्हेर होऊं नये म्हणून मूल घेतें, पण तो गिळण्याची उमकाच नसल्यामुळें तो घास गळून पडतो.

* * *

" मांगाची करणी केलीस कांहीं तरी, हरचा! " घराच्या पडवींत येऊन मटकन खालीं बसलेले राघोपंत आपल्या चिरंजीवांना निर्भर्त्सनापूर्वक म्हणत होते. " झुंजारच्या डोळ्यांतून अश्रु वाहत आहेत अजूनहि ! इमानें-इतबारें

जन्मभर काम केलेल्या त्या 'झालेल्या' जनावराला, तुम्ही अजूनहि ओझ्याला ताचडतां, शरम नाहीं रे वाटत तुमच्या जिवाला!"

राघोपंत आणखीहि कांहीं बोलले; पण तें पुरें होईपर्यंत हरबा तेथें थांबलेच नाहींत. गाडी परत घेऊन येत असतां इरेस पडून आपण गाडी कशी धावडविली, आणि पूरवाडीच्या रावांच्या छकड्याची ऐटी जिरविण्याच्या ईर्षेनें टळटळीत दुपार झाली असतांहि, आपण भातानें भरगच्च भरलेली गाडी पुढे कशी काढली, हीं सगळीं दृश्यें त्यांच्या कल्पनाचक्षूंपुढून भराभर जाऊं लागलीं. आधींच त्यांचें तोंड गोरेंमोरें झालें होतें; आणि वाड्यांत गेल्यावर 'झुंजार'कडे पाहतांक्षणींच तें अगदीं काळेंठिक्कर पडलें. 'रॅटिस्बन' हस्तगत झाल्याची हकीकत सांगण्यासाठीं नेपोलियनकडे आलेल्या बालवयी रणझुंजाराची गोष्ट कविश्रेष्ठ ब्राउनिंगनें सांगितली आहे नव्हे का, तसाच प्रकार राघोबांच्या झुंजारचाहि झाला होता. धन्याला आपलें गाऱ्हाणें निवेदन केल्यावर थोडक्याच वेळांत तो मृत्युपंथाला लागला होता. हरबा.त्याच्याजवळ गेले तेव्हां त्यानें डोळे फिरविले होते व हात-पाय झाडीत तो अखेरचा श्वास सोडीत होता.

त्या दिवशीं सायंकाळीं झुंजारचा जीव गेला. तत्पूर्वीच राघोपंतांनीं अंथरूण धरलें होतें. दारच्या जनावरांची जोपासना जिवापलीकडे करावयाची, हें आपलें कुलव्रत आपल्या मुलांच्या हातून पाळलें जाणार नाहीं असें वाटल्यामुळेंच कीं काय, त्यांच्या जिवाला अतिशय कष्ट होत होते. जो आपल्या घरींच जन्मला व वाढला, ज्याला आपण आपला बहुमोल ठेवा मानिला, व ज्यानें जन्मभर आपली इमानें-इतबारें नोकरी केली त्या झुंजाराचा अंत अशा आकस्मिक व इतक्या हृदयद्रावक रीतीनें झाला ही गोष्ट राघोपंतांच्या जिवाला लागली. दोन दिवस ते आजारी या सदरांत होते. तिसऱ्या दिवशीं ज्या समयाला झुंजारचा प्राण गेला होता त्याच समयाला राघोपंतांनींहि आपला प्राण सोडला!

*          *          *

विकाराच्या वावटळींत सांपडून आपल्या हातून एखादी चूक होऊन जाते, व ती चूक झाली या गोष्टीचें स्मरण आपणास होऊं नये यासाठीं केव्हां केव्हां कांहीं तरी उपाययोजनाहि आपण करतों. हरबांनींहि तेंच केलें आहे; कारण वडिलांच्या श्राद्धतिथीच्या दोन दिवस अगोदर ते एक ब्राह्मण

अजूनहि सांगतात. या प्रकरणांतील आपल्या खऱ्या हेतूची वाच्यता ते कोणापाशीं करीत नाहींत; पण त्यांचें मनोगत जाणणाऱ्या माणसांना हें माहीत आहे, कीं हरवा त्या दिवशीं मनांत संकल्प सोडीत असतात व वडिलांनीं आप्तासमान मानलेल्या 'झुंजार'चें श्राद्ध ते त्या दिवशीं करीत असतात !



## 'भा. श्री. जो.' : : ४७

मुंबईहून पुण्याला जावयाचें असलें म्हणजे आपण ट्रॅम किंवा गाडी गांठतों आणि जी. आय्. पी. रेल्वेच्या बोरीबंदर स्टेशनवर येतों. तेथें आल्यावर खिशांत थोडेसेच पैसे असले म्हणजे आपण थर्ड क्लास तिकिट-ऑफिसकडे वळतों आणि 'काय त्रास आहे बुवा ! कुठं प्लॅटफॉर्म आणि कुठं तिकिट-ऑफिस ! ' म्हणून आपल्याशींच पुटपुटत, तडफडत, धडपडत नाइलाजानें तिकीट घेऊन पुनः आपण प्लॅटफॉर्मकडे वळतों. पुनः तिकडे जातांना 'जी. आय्. पी. रेल्वे माजली आहे, पैसे घेऊनच्या घेऊन जी. आय्. पी. रेल्वे थर्ड क्लासच्या लोकांची मुळींच सोय बघत नाहीं,' असे विचार करीत आपण सव्वादोनची एक्स्प्रेस गांठतों; आणि एका तिकिटाच्या अधिकारावर आपण टोपी, बॅग, छत्री, काठी ठेवून आसपासच्या तीनचार जागा काबीज करतों; आणि आपल्यासारख्याच दुसऱ्या वैतागलेल्या उतारूंना 'इकडे ये, तिकडे जा, इथं दुसरे लोक बसले आहेत' म्हणून विनाकारण त्रास देऊन घालवून देतों. आणि पुनः आपण जी. आय्. पी. रेल्वे लोकांची सोय बघत नाहीं म्हणून आपल्याशींच कोकलत फुरंगटत बसतों.

भा. श्री. जो. असाच गाडींतून उतरला; आणि असाच जी. आय्. पी. रेल्वेला शिव्या देत थर्ड क्लास तिकिटऑफिसकडे गेला, असाच शिव्या देत परत आला व त्यानें एक्स्प्रेस गांठली. आणि त्यानें डब्यांत शिरून अशाच चार जागा अडवल्या, आणि 'जी. आय्. पी. रेल्वे थर्ड क्लासच्या लोकांची मुळींच सोय बघत नाहीं,' असा विचार करीत शेजारीं बसूं पाहणाऱ्या कित्येक लोकांना त्यानें असेंच पिटाळून लावलें. भा. श्री. जो. चें

सबंध नांव आम्हांला माहीत नाहीं. हा भा. श्री. जो. आहे असें आम्हांस त्याच्या सूटकेसवर लिहिलेल्या भा. श्री. जो. या नांवावरून वाटतें. त्यानें पुण्याचें तिकिट काढलें आणि तो पुण्याच्या एक्स्प्रेसच्या थर्ड क्लासांत जाऊन बसला, म्हणून तो पुण्याला जाणार असें आम्हांस वाटतें. आणि तो आपल्याशींच फुरंगटत खिडकीबाहेर पाहत बसला म्हणून तो रागावून बसला असें आम्हांस वाटतें. आणि 'अहो, ही सीट खाली आहे का ?', 'ए भाई, जरा टोपी उठाव नी' म्हणून प्रत्येकजण त्याला त्रास देऊं लागला तेव्हां 'काय गैरशिस्त लोक आहेत' म्हणून पुटपुटला, त्यावरून तो बराच रागावला असावा असें आम्हांस वाटतें.

पण त्याच्या रागाचें खरें कारण निराळेंच होतें; आणि ते त्याच्या कोटाच्या आंतल्या खिशांत होतें.

आतां ती एक्स्प्रेस बहुतेक भरली. तुरळक एक-दोन जागांशिवाय एकहि जागा रिकामी दिसेना. आणि भा. श्री. जो. बसला होता त्याच्या-शेजारच्या जागेशिवाय मागेंपुढे सर्व जागा भरल्या.

शिर्रर्रर्र......गार्डाची शिटी झाली, भॉऽऽऽ इलेक्ट्रिक एंजिन वाजलें आणि एक्स्प्रेस भायखळ्याला उभी राहिली.

"ही इथं एक सीट आहे बघ, दादा." एक फॅशनेबल तरुणी मागून म्हणाली. "मग तूं बैस तिथं, मी इकडे बसतों." तो दादा म्हणाला. आणि ती बसतेसें पाहून भा. श्री. जो. आपली टोपी उचलून घेऊं लागला. पण त्याला पाहिल्यावर तिला काय वाटलें कोणाला ठाऊक; ती बसतांच विंचू डसल्यासारखी ताड्कन् उठली आणि "नाहीं तर इथं नको दादा, मी आपली बायकांच्या डब्यांतच बसतें" असें म्हणत निघून गेली. आणि तिचा तो दादाहि तिच्या पाठोपाठ गेला.

'आग लाव तुझ्या त्या बायकांच्या डब्याला !' भा. श्री. जो. मनांत म्हणाला. आणि मग त्याला वाटलें, कीं या गाडीचा बायकांचा डबा काढून टाकावा; आणि मग त्याला वाटलें, कीं इथें बसली असती तर मी काय खात होतों तिला ? आणि मग त्याला वाटलें, कीं एखादा पठाण वाटेंत भेटून ती भिऊन परत यावी; आणि तशी ती आली नाहीं म्हणून तो आणखीच रागावला.

ती गाडी पुनः चालू झाली, आणि मधलें दादर स्टेशन केव्हां गेलें तें

त्याला समजलेंच नाहीं. मग त्याला खिशांतल्या पत्राची आठवण झाली आणि त्याच्या मनांत नाहीं नाहीं ते विचार आले. 'मला मुलगी दाखवीत नाहींत म्हणजे काय ? इतका जुन्या चालीरीतीचा अभिमान या काळांत काय उपयोगी ? मी म्हणजे काय 'भावला' आहे, कीं मला न विचारतांच वाटेल ती मुलगी माझ्या गळयांत बांधावी ! आणि एकदम तुझें लग्न परवांच उरकून घेण्याचें ठरलें आहे. असशील तसा निघून ये. आणि मी गेलोंच नाहीं तर लग्न कुणाशीं लावतील तिचें ? आणि अजूनहि पुढच्याच स्टेशन-वर उतरून परत गेलो तर काय होईल ?' असे विचार मनांत येऊन तो रागावला, आणि या रागावण्याचा कांहीं उपयोग नाहीं म्हणून तो आणखीनच रागावला.

आणि मग त्याला वाटलें कीं आजच्या गाडींत गर्दीच फार आहे; आणि मग त्याला वाटलें आज गाडी मालगाडीपेक्षांहि हळू चालली आहे; आणि त्याला वाटलें, आज हे थर्ड क्लासमधले लोक अगदीं गैरशिस्त आहेत; आणि मग त्याला वाटलें, इंटर क्लासचें तिकिट काढलें असतें तर बरें झालें असतें.

मग पुनः गाडीचा वेग कमी झाला आणि गाडी कल्याणच्या स्टेशन-वर थांबली.

'आः ! काय ब्यूटी आहे !' आंत येणाऱ्या एका सतरा वर्षांच्या मुलीकडे पाहत भा. श्री. जो.च्या मनांत विचार आला. 'अर्रर्र ! पण इतक्या सुरेख मुलीबरोबर हा कोण एडका आहे ?' डोक्यावरच्या लांब काळयाभोर केसांचा बरोबर मध्यें उलटा भांग पडून एडक्याच्या शिंगांची शोभा दिसणाऱ्या तिच्या भावाकडे पाहून त्याला वाटलें; आणि मग तो खिडकीबाहेर पाहूं लागला.

"अहो मिस्टर, इथं कुणी बसलं आहे का ? तो 'एडका' थेट त्याच्या अंगावर येत म्हणाला. आणि भा. श्री. जो. उत्तर देण्याच्या आधींच त्याची टोपी उचलून 'इथं बैस पद्मे' म्हणून त्यानें त्या सुंदर मुलीला त्या सीटमध्यें कोंबलें. आणि 'मी इथंच कुठं तरी जागा पकडतों हं.' म्हणून आजूबाजूच्या लोकांना धडका देत तो एडका पलीकडच्या डब्यांत पार दिसेनासा झाला.

शिर्र्रर्र ! पुनः गार्डची शिट्टी झाली. भॉऽऽ पुनः इलेक्ट्रिक एंजिन वाजलें आणि गाडी पुनः सुरू झाली.

भा. श्री. जो. खिडकीच्याबाहेर पाहत होता. आणि त्याचा कंटाळा येऊन तो आपल्या हातांतलें इंग्रजी मासिक वाचूं लागला.

'बर्मा पॅटर्न. पेटंट लेदर ! आणि गोऱ्या कातडयाला काय खुलून दिसताहेत. तरी याच्यापेक्षां पंपशू कां नाहीं घालीत ही ?' मासिकाच्या कोपऱ्यावरून त्याचा चुकार डोळा त्या सुंदर मुलीच्या पायांतल्या चपलांकडे पाहूं लागला.

'अगोबाई, यांच्या सूटकेसवर का पाय देऊन बसलें मी ?' त्या सुंदर मुलीच्या मनांत विचार आला, आणि तिनें आपले पाय झटकन् मागें घेतले.

आणि मग भा. श्री. जो. अगदींच ओशाळला. आणि मग आपण सुसंस्कृत तरुण आहोंत, आणि सुसंस्कृत तरुणांनीं शेजारच्या अनोळखी मुलीच्या चपलांकडे असें टक लावून बघूं नये. आणि बरें, एकदां पाहिलें तें पाहिलें, पुनः पहावयाचें नाहीं असा निश्चय करून तो पुनः वाचण्यांत दंग झाला.

'तरी पण डाळिंबी बांगडयांच्यामध्यें एकएक हिरवी बांगडी काय शोभली असती !' पुनः त्याचा डोळा तिच्या हातांकडे वळला, आणि पुनः त्यानें त्याला पुस्तकाकडे खेंचून नेलें.

'आणि नाकांतल्या मोरणींतसुद्धां पांढऱ्यापेक्षां डाळिंबी खडा काय खुलून दिसला असता!' आतां त्याच्या विचारांनीं पुरतें बंड पुकारलें, आणि त्या बंडाच्या धामधुमींत दोन्ही डोळयांनीं तिच्या सौंदर्याची शक्य ती लूट केली. आणि त्यांतल्यात्यांत तिच्या गळयांत अजून हिरवी दूड आहे असें पाहून त्याला समाधान वाटलें. आणि मग त्याला आढळून आलें, कीं आपल्या सूटकेसवर पाय पडतील या भीतीनें ती आपले पाय वर अधान्तरीं धरून ताटकळत बसली आहे. तिला नीट पाय ठेवतां यावे म्हणून तो आपली सूटकेस सरकवून घेऊं लागला. पण ती मोठी असल्यामुळें मागें सरकेना. तेव्हां नाइलाजास्तव त्यानें तिला सूटकेसवर पाय ठेवून बसा, कांहीं हरकत नाहीं, म्हणून सांगितलं आणि तिनेंहि पहिल्यासारखे पुनः सूटकेसवर पाय ठेविले.

आणि मग बराच वेळ गेला. आणि सांगण्यासारखें कांहीं घडलें नाहीं.

" अन् जांवईसुद्धां बदका रुपयाच आहे, खणखणीत कांहीं नाहीं." त्याच्यामागची एक बाई दुसरीला एवढ्या मोठ्यांदा म्हणाली, कीं तें साऱ्या गाडींतल्या माणसांना ऐकूं गेलें असेल. "मीं तर मुलाच्या आईला तोंडावर सांगितलं." त्यांच्या कुठल्या तरी लग्नाच्या गप्पा चालल्या होत्या.

अन् मग भा. श्री. जो. एकदम मागें वळून पाहूं लागला. 'देशस्थ अन् गैरशिस्त' मान फिरवतांना त्याला वाटले. आणि मग आपण सुधारलेले तरुण आहों, आणि सुधारलेल्या तरुणांनीं देशस्थ-कोंकणस्थ असा भेद करूं नये; आणि कोंकणस्थ तरी काय कमी अजागळ असतात, असे विचार त्याच्या मनांत आले. तरी पण मान फिरवितांना आपल्या शेजारची मुलगीहि आपल्यासारखीच त्या मागच्या बायांकडे पाहत आहे असें त्याला आढळून आलें. आणि तिची आणि त्याची दृष्टादृष्ट होतांच आपल्यासारखेच विचार तिच्याहि मनांत आहेत अशी त्याची खात्री झाली.

" टिकेट् प्लीज—" त्या गाडीचा कण्डक्टर तिकिटें तपाशीत त्यांच्याजवळ आला.

" तिकिट ! अगोबाई, तिकिट तर भाऊजवळ राहिलं." ती मुलगी म्हणाली.

" टिकेट् प्लीज." तो कण्डक्टर तिच्या बोलण्याकडे लक्ष न देतां पुनः म्हणाला.

" आतां काय करावं बुवा ?" भा. श्री. जो. बुचकळ्यांत पडला; आणि निदान तिच्या भावाजवळून तिकिट आणावें म्हणून तो अर्धवट उठला.

" टिकेट् प्लीज—" तो कण्डक्टर थोड्या मोठ्या आवाजांत म्हणाला. 'आणि आतां या बाईजवळचें तिकिट नाहीं तपासलें तर गाडी पुढें कशी चालेल' अशी मुद्रा करून तिथेंच उभा राहिला.

पण तितक्यांत तो प्रकार पाहून म्हणा, किंवा अचानक म्हणा, तो एडका पलीकडच्या डब्यांतून उड्या टाकीत तेथें आला, आणि त्यानें आपलें आणि आपल्या बहिणीचें अशीं दोनहि तिकिटें चिमटींत धरून त्या कण्डक्टरच्या अगदीं डोळ्यांजवळ धरलीं. आणि कांहीं न बोलतां आला तसाच

उड्या टाकीत धडका देत तो एडका परत गेला. मग 'आपल्या हांकेला देवच धांवला, अन् आतां गाडी बिनधोक पुढें जाईल' असा चेहरा करून मोठें संकट टळलें म्हणून तो कण्डक्टर तिकिटें तपाशीत पुढें निघून गेला.

"आज गर्दी फार आहे, नाहीं ?" आतां कांहीं तरी बोललें पाहिजे म्हणून भा. श्री. जो. अर्धवट तिच्याकडे आणि अर्धवट सगळ्या लोकांकडे पाहत म्हणाला.

"आम्हीं नागपूरहून आलों तेव्हां नव्हती इतकी गर्दी गाडींत." ती म्हणाली.

'अरेच्या, नागपूरला राहते काय ही!' त्याच्या मनांत विचार डोकावला.

"अन् आमचे वडील रेल्वेंत ऑफिसर असल्यामुळं आम्हांला तिकडे तर मुळींच त्रास होत नाहीं."

"अन् इचे वडील रेल्वे ऑफिसर आहेत काय!"

"गरम चहा, शेठ." यासकट तो चहावाला पोऱ्या चारदां त्याला विचारून गेला आणि चारदां त्यानें त्याच्याकडे लक्ष दिलें नव्हतें. आपण एकट्यानें घ्यावा तरी पंचाईत; विचारावें तरी पंचाईत. आणि तिला देऊन ती नको म्हणाली म्हणजे तोंडांत मारल्यासारखें गप्प बसावें लागेल. अन् दुसरीकडे जाऊन प्यावा तर चहाचा स्टॉल त्याच्यासमोरच.

अन् मग त्याला वाटलें कीं, 'एकंदर चहा पिणें म्हणजे देश बुडवणें आहे; अन् चहा पिणें म्हणजे मळयांतील मजुरांचे हाल वाढवणें आहे; अन् आजपासून चहा सोडून द्यावा. तरी पण आतांची वेळ शेवटचा एक कप प्यायलों असतों तरी कांहीं हरकत नव्हती.'

"अन् बनीच्या लग्नाचं तरी अस्सं झालं," ती मघांची बाई पुनः मोठ्यानें म्हणते. आतां त्यांच्या दुसऱ्याच कसल्या गप्पा चालल्या होत्या.

अन् मग पुनः तो मागें वळून बघूं लागला. अन् मग पुनः ती मागें वळून बघूं लागली आणि पुनः त्यांची दृष्टादृष्ट झाली. आणि जणुं काय आपण एकमताचीं आहोंत असें तिला वाटत होतें, आणि हिलाहि 'मॅनर्स' कळतात असें त्याला वाटत होतें.

अन् मग त्याला वाटूं लागलें, कीं आज गाडींत म्हणण्यासारखी गर्दी नाहीं. अन् मग त्याला वाटूं लागलें, कीं आज गाडी मेलपेक्षांहि जास्त

वेगानें चालली आहे. अन् मग त्याला वाटूं लागलें, कीं इंटरपेक्षां थर्ड क्लासचें तिकिट काढलें तेंच बरें झालें. अन् मग तिला वाटूं लागलें, कीं नागपूर-पेक्षांदेखील पुण्याच्या बाजूला मुळींच प्रवासाचा त्रास होत नाहीं!

यानंतर त्या दिवशीं ती आगगाडी बहुतकरून नेहमींच्याच वाटेनें नेहमींच्या स्टेशनांवर उभी राहत पुण्याला पोंचली असेल. कारण तिला किंवा त्याला शपथेवर विचारलें असतें तर ती तशी गेलीच असे खात्रीनें सांगतां आलें नसतें. मात्र गप्पांच्या भरांत तिचें शिक्षण किती झालें आहे, तो पलीकडच्या डब्यातला एडका तिचा वडील भाऊ कीं धाकटा भाऊ वगैरे वगैरे अनोळखी सुंदर मुलीबद्दल तिऱ्हाईत तरुणाला जरूर त्या सर्व गोष्टी तिच्या तोंडून कळल्या. आणि त्याच्या भरांत पुण्याचें स्टेशन केव्हां आलें तें त्याला कळलेंसुद्धां नाहीं.

अर्धाअधिक डबा रिकामा होईपर्यंत त्यांच्या गप्पा चालल्याच होत्या. आणि मग तिच्या भावाच्यामागोमाग ती चालती झाली. तिच्यामागून तोहि निघाला. आणि स्टेशनाच्याबाहेर आल्यावर एका टांगेवाल्यानें त्याची सूटकेस ओढली आणि दुसऱ्यानें त्याची छत्री घेतली. आणि तिसऱ्यानें त्याचा दंड धरून त्याला आपल्या टांग्यांत बसवलें. आणि ती सूटकेस, छत्री आणि तो एका टांग्यांत जमेपर्यंत ती सुंदर मुलगी आणि तो एडका पार कोणीकडे तरी निघून गेलीं, आणि तीं कोठे जाणार तें आपल्याला माहीत नाहीं असें त्याला आठवलें.

अन् मग तो घरीं गेऊन पोंचला, जेवला, कोणाशीं फारसा बोलला नाहीं! निजला, त्याला स्वप्न पडलें. सकाळीं उठला, तोंड वगैरे धुऊन चहा प्याला, कोटटोपी घालून घराच्याबाहेर पडला, जेवणाच्या वेळीं घरीं आला, जेवून पुनः बाहेर गेला, संध्याकाळीं पुनः घरीं परत आला, पुनः कोणाशीं फारसा बोलला नाहीं, पुनः जेवला, आणि पुनः निजला, आणि पुनः त्याला गाढ झोप लागली.

अन् मग त्याच्या आईला वाटलें, ह्याला मुलगी दाखवली नाहीं म्हणून हा असें करतो आहे. अन् मग त्याच्या बहिणीला वाटलें, ह्याला मुलगी दाखवली नाहीं म्हणून हा असें करतो आहे. आणि मग त्याच्या वडिलांना वाटलें, ह्याला मुलगी दाखविली नाहीं म्हणून हा असें करतो

आहे. पण त्याची मात्र खात्री होती, कीं सारा गांव भटकूनहि कालची मुलगी दिसली नाहीं म्हणून आपण असें करतों आहोंत.

अन् मग दुसऱ्या दिवशीं सकाळीं उठल्यावर तो बहिणीकडून मुंडावळ बांधला गेला, आईकडून कौतुक केला गेला, सासऱ्याकडून श्रीमंत-पूजिला गेला, आणि संध्याकाळीं सासूकडून रुखवताचा फराळ वाढला गेला, मित्राकडून थट्टा केला गेला, आणि सर्व लोकांकडून घोड्यावर घालून लग्नमंडपाकडे नेला गेला.

तरी ती कालची सुंदर मुलगी त्याच्या डोळ्यांसमोरून हालेना. त्याच्या मनांत हजारों वेळां आलें कीं घोड्यावरून उडी टाकून वेळींच पळून जावें; पण डोक्यावरील पगडी, शेला, मुंडावळ यांचें अवडंबर आणि आजूबाजूची गर्दी पाहून ती युक्ति साधेल असें त्याचें मन त्याला भरंवसा देईना.

अन् जोश्याची घटका भरूं लागली. अन् मग भिक्षुकमंडळी मंगलाष्टकें म्हणूं लागली, अन् मग सर्व मंडळी अक्षता टाकूं लागली, तरी त्याच्या चेहऱ्यावर आनंदाची छटा म्हणून दिसेना.

अन् मग वाद्यांचा गजर होऊं लागला, आणि सर्वस्व पणाला लावून बायकोसुद्धां हरलेल्या धर्मराजाप्रमाणें निराश चेहरा करून तो अंतरपाटाकडे शून्य दृष्टीनें पाहूं लागला. आणि अंतरपाट दूर झाल्याबरोबर क्षणभर माळ घालण्याचें विसरून सर्वांना ऐकूं जाईल एवढ्या मोठ्यानें तो ऑ ऽ ऽ करून ओरडला !

* * *

अन् मग आठ दिवसांनीं, तीच ती पुण्याहून मुंबईला परत जाणारी एक्स्प्रेस, अन् तोच तो भा. श्री. जो. अन् त्याच्या शेजारीं बसलेली तीच ती सुंदर मुलगी !

अन् आतां तिच्या नाकांतल्या मोरणींत पाढऱ्याऐवजीं डाळिंबी खडा होता. अन् हातांत दोन बांगड्यांआड एकएक हिरवी बांगडी होती. अन् तिच्या पायांत पंप शूज् होते. अन् आतां त्याचा मेहुणा झालेला तो एडका त्यांच्यासमोर कांहीं बाकें सोडून लांब बसलेला होता.

" अगोबाई " त्यांच्यामागें बसलेली तीच ती गैरशिस्त बाई लोणावळ्याच्यापुढें गाडी गेल्यावर सगळ्या माणसांना ऐकूं जाईल एवढ्या

मोठ्यांदा दुसरीला म्हणाली, "हीं नवरा-बायको पुण्याला जातांना कशीं सारी वाट गुलूगुलू गोष्टी बोलत होतीं, अन् आतां पहा कशीं नुकतंच लग्न झाल्यासारखीं गप्प बसलीं आहेत!" अन् तें ऐकून तीं दोघेंहि चपापून एकमेकांकडे पाहूं लागलीं.

अन् याला कारण ती थर्ड क्लासमधली गर्दी!

अन् याला कारण ते थर्ड क्लासमधले गैरशिस्त लोक!!

अन् याला कारण, जी. आय्. पी. रेल्वे लोकांची सोय मुळींच पाहत नाहीं!!!



# माझी मैत्रीण : : ४८

तिची ओळख करून घेण्याला मला दिवस घालवीत तपश्चर्या करावी लागली नाहीं. त्या दिवशीं संध्याकाळीं नंबर पाहण्यासाठीं मी युनिव्ह-र्सिटी हॉलमध्यें गेलों होतों. इतक्यांत शेजारच्याच बोर्डवर दोघी मुली नंबर पाहत होत्या तिकडे माझें लक्ष सहज गेलें. त्यांपैकीं एकजणीला कोठेंतरी पाहिल्यासारखें मला वाटलें म्हणून थोडासा विचार करीत मी तिच्याकडेच पाहत उभा राहिलों. इतक्यांत तिचें नंबर शोधण्याचें काम आटोपल्यामुळें तिनें मान वर केली. सहजच तिची दृष्टि माझ्याकडे गेली. मी ओशाळा होऊन बोर्डकडे पाहूं लागलों. तिला त्याबद्दल कांहींच वाटलें नसावें असें मला वाटलें. येतांना साऱ्या वाटभर त्या मुलीसंबंधानें विचार चालू होता. पण तिला कोठें पाहिली हें मात्र आठवेना. आठवणार कोठून? फक्त मीं एकदांच तिला ओझरती पाहिली होती.

मी घरीं येऊन कोटच काढीत होतों, त्या वेळीं आंतल्या खोलींत "राधाकाकू, आमची माली आहे का इथें?" असें विचारीत ती आली, तेव्हां सारा प्रकार माझ्या ध्यानांत आला. खालच्या मजल्यावर राहत अस-लेल्या रा० ब० गपचुपांची ती मुलगी. एका दिवसाच्या अवधींत मीं तिला

नळावर ओझरती पाहिली होती. त्यामुळें माझ्या लक्षांत राहणें शक्य नव्हतें. ती तेथें असतांनाच मीं मामींना विचारलें,

"मामा केव्हां येतील ?" मधल्या दारांत उभा होतों तेव्हां तिची माझी पुन्हा दृष्टादृष्ट झाली.

"येतील आठ वाजतां. तुला वाढूं का आधीं ?"

"कांहीं नको, बसेन मगच." असें म्हणून मी खुर्चीवर जाऊन बसलों व टेबलावरचा दिवा मोठा करून दुसऱ्या दिवसाच्या पेपराची तयारी करूं लागलों. माझे कान मात्र आंतल्या खोलींत त्या दोघींचें माझ्याविषयीं-चें खलबत चाललें होते तिकडे होते. आमच्या मामींनीं माझ्या हुपारीबद्दल जेव्हां अभिमानाचे उद्गार काढून खूप स्तुति केली तेव्हां तर मला मूठभर मांस वाढल्यासारखें झालें. त्या मुलीसमोर माझी स्तुती! आणखी काय पाहिजे ? आमची ओळख करून देण्याचें काम त्या वेळीं मामींनींच केलें. तिऱ्हाइताशीं बोलण्याची धिटाई पाहून मला तिचें कौतुक वाटे. रोज संध्या-काळीं पेपरासंबंधीं आमची खूप चर्चा होई, व एकमेकांना आम्ही आमचे अपेक्षित प्रश्न सांगत असूं. हा परीक्षेचा प्रसंग त्या आम्हां दोघांना सारखा-च तापदायक असल्यामुळे आम्हांला परस्परांविषयीं स्नेह वाटावयास मुळींच वेळ लागला नाहीं. त्यांत मामींची व तिच्या आईची गट्टी. तेव्हां थोड्याच अवधींत मी त्यांच्या घरीं जाऊन देखील बसूं लागलों.

त्या दिवशीं मामी दाराला कुलूप घालून खालीं गपचुपांच्या घरीं जाऊन बसल्या होत्या. दुपारच्या वेळीं मी बाहेरून आलों तों गुपचुपांच्याच घरीं मामींना हाक मारावयास म्हणून गेलों. तों सरलेच्या आईनें खालीं बसवूनच घेतलें. बोलतां बोलता त्या सहज म्हणाल्या—

"कां भाऊराव अगदीं उद्यांचसे जाणार ? अन् तुम्ही कशा राधाबाई जाऊन देतां ?"

"नाहीं बाई तो राहत त्याला मी काय करूं ? अगदीं पुष्कळ केला आग्रह. त्यांत त्याच्या घरचं पत्र काल आलं आहे. म्हणून नाइलाजच झाला." मामी उद्गारल्या.

इतक्यांत सरल फराळाचें घेऊन आली. तेव्हां बायकांच्या स्वभावा-नुसार तिच्या आईनें तो प्रश्न काढलाच. त्यांत त्यांना मामींची जोड, मग काय ? तेवढ्या अवधींत त्यांनीं कितीक विवाह लावले व कितीक मोडले.

मीं त्यांत फारसा भाग घेतला नाहीं. तेव्हां तिच्या आईनें मला मुद्दाम
बजावलें, " आमच्या सरलेला एखादं चांगलसं स्थळ सांगा
" पण तुमची सरला तर कॉलेजांत जायचं म्हणते आहे." मी उत्तरलों.

" तिला काय होतं म्हणायला? तिकडून जर कांहींच म्हणायचं होत नाहीं, पण मी कांहीं यंदा कोणाचं चालूं देणार नाहीं. लग्नाशिवाय राहायचं तरी किती दिवस मेलं? अन् शिकून तरी काय मोठं साधायचं आहे तर त्यासाठीं येवढी यातायात!"

कां–कोण जाणे, सरला नुसती हसली. कॉलेजमध्यें जावयास तिच्या वडिलांची पूर्ण संमति होती. पण आईनें प्रेमातिशयानें दाखविलेला विरोध पाहून तिला कदाचित् हसूं आलें असेल.

मी म्हणालों, " एकंदरींत तुमची सरू यंदा उजवणार म्हणायची."

" उजवणार नाहीं हो! चांगलसं स्थळ असलं तरच उरकून घ्यायचं. नाहीं तर शिकतेच आहे. आम्हांला तरी मेला कुठं मुलांचा सुळसुळाट झाला आहे!" त्यांनीं टोला दिला.

" बरं बुवा आढळलं एखादं उत्तम स्थळ तर कळवूं. आपलं काय गेलं, लाडू खायला मिळतील. आणि चार दिवस खिदळायला सांपडेल!" मी तेथून हसत हसत उठून आलों.

मी गांवीं निघून गेलों तेव्हां आमच्या मैत्रीला चिरकालीन स्वरूप आलें होतें, व तें व्यक्त करण्याकरितां कधीं कधीं पोस्टाचें सहायहि आम्हीं घेण्याचें ठरविलें होतें.

— २ —

कादंबरीच्या नेहमींच्या नियमाला अपवाद म्हणूनच कां होईना आम्ही दोघेंहि सरासरी पास झालों. अर्थात् मी गांवींच असल्यामुळें मामांची तार आल्यावरून हें मला समजलें. दुसऱ्या दिवशीं लागलीच सरलेचें पत्र आलें; त्या पत्रांत परस्परांच्या गुणगायनाशिवाय व लटक्या रुसण्याशिवाय काय असणार? पत्र पाठविण्याचें कबूल करून मी चुकलों होतों खरा; पण ती चूक माझ्या हातून लौकर सुधारण्याचें चिन्ह दिसेना. मी किती तरी वेळां

पत्र लिहावयास सुरवात केली असेन! पण लागलाच असा विचार उद्भवे, कीं हें जर लोकांना कळलें तर कसें? तिच्या वडिलांना तें आवडेल का? तिचे भाऊ याचा अर्थ काय करतील? कदाचित् वस्तुस्थितीचा विपर्यास होणार नाहीं म्हणून कशावरून? याचा परिणाम असा झाला कीं, मीं तिला पत्र असें पाठविलेच नाहीं. मामांच्या पत्रांत मात्र तिजबद्दल जितकें लिहितां येत असे तितके लिहिण्याची मी काळजी घेत असे. आणि त्यामुळेंच तिनें या परीक्षेच्या निकालाची संधि साधून मला पत्र धाडण्याचे 'धाडस' केलें असावें. माझ्याप्रमाणेच तिलासुद्धां तीच अडचण जाणवली असावी. तिचें पत्र जर कोणी वाचलें असतें तर तें एका मित्राकडून आले आहे ह्यापलीकडे त्याला कांहीं बोध झाला नसता. खालीं नांव घालण्यांतसुद्धां तिनें किती खबरदारी घेतली होती! पण आमचा विन्या कसला खट्याळ! त्याने संधि साधून ते पत्र वाचलेच व 'स. ग.' म्हणजे काय म्हणून थांत्रत मला विचारायला आला. असा राग आला कार्ट्याचा! नेहमीं पत्र वाचायला सवकला म्हणून मीं त्याच्या तोंडांत द्यायला जोरानें हात उगारला. पण पत्र दृष्टीस पडतांच तो राग जागच्या जागींच जिरला. त्या पत्राचा बोभाटा होऊन जिरवून घेण्यापेक्षां ह्या बाबाची समजूत घालून द्यावा पिटाळून, असा विचार करून आम्हीं त्याच्या हातांतलें पत्र हिसकावून घेतलें व 'स. ग.' म्हणजे 'सदाशिव गपचूप' असें मोठ्या गंभीरपणानें उत्तर दिलें. नशीब माझें, कीं त्या 'स. ग.'च्या वर 'आपली' अशी निशाणी नव्हती. नाहीं तर त्याची व्युत्पत्ति लावण्यासाठीं माझें डोकें कुणीकडे चालले असतें कुणास ठाऊक. पहिल्याप्रथम मीं त्या पत्राला ट्रंकेचा कोपरा दाखविला. एका मुलीचें पत्र आले तर त्याची एवढी चोरी. असें कां व्हावें हें मला समजत नाहीं; पण होतें मात्र खास.

— ३ —

दैवाचें अस्तित्व नाहीं म्हणावें तर ज्यांची कल्पनाहि करतां येणार नाहीं असे प्रसंग सहज घडून येतात. जर आहे म्हणावें तर तें सिद्ध करतां येत नाहीं. माझा मात्र अलीकडे दैवावर थोडासा विश्वास बसूं लागला. आणि त्याला कारण म्हणजे सरला. तिची माझी ओळख दैवानें करून दिली. स्नेह दैवानेंच वाढविला असें म्हणावें लागतें; कारण–दुसरें कारणच नव्हतें. सध्यां वाटणारें सुदैव पुढें दुर्दैव बनणार नसेल ना?

सरलेला पत्र पाठविणें माझ्या मनाला प्रशस्त वाटत नसेल; हा आमच्या समाजाचा परिणाम असेल कदाचित्. तिलाच पत्र न पाठविण्यावरून तिचा रोष नसावा म्हणून मी हळूहळू मामांनादेखील कधींकाळींच लिहूं लागलों. त्यामुळे मला तिकडील हकीकत कांहीं अलीकडे कळली नाहीं. मध्यंतरीं रावसाहेबांची बदली पुण्यास झाली. तेव्हां सरलाहि पुण्यास आली. मी पुण्याच्याच कॉलेजमध्यें जाणार असे तिला मामांकडून अगोदरच कळलें म्हणून तिने मला उतरावयासच आपल्या घरीं येण्याविषयीं लिहिलें. वास्तविक त्यांच्या घरचा व माझा संबंध मामांच्यामुळे व तोहि अगदीं तात्पुरता. तेव्हां जगाच्या दृष्टीनें मला त्यांचे घरीं उतरणें योग्य वाटेना, म्हणून मी परस्पर रेसिडेन्सींतच गेलो. येथें अगदीं नवीनच आल्यामुळे पहिले दिवस माझी व्यवस्था लावण्यांतच गेले. रावसाहेबांकडे जाऊन येण्याची मला खरोखरच फार तळमळ लागली. पण जाणें मात्र शक्य झालें नाहीं. त्या दिवशीं मी सरलेला पाहिली मात्र आणि माझें मन अपराध्याप्रमाणे ओशाळे झालें. मला तिला तोंड दाखवूं नये असे वाटलें व हजारों कामे बाजूस सारून कॉलेज सुटतांच पहिल्या प्रथम त्यांच्या घरीं जाण्याचा मीं निश्चय केला. पण ती मुंबईपुण्यात वाढलेली पोर मला पाहतांच न बोलतां जाऊं थोडीच देणार होती? मधल्या सुटींत मी एकदोघाबरोबर बोलत गॅलरींतून चाललों होतों. इतक्यांत मागाहून अगदीं हलकेच 'शारंगपाणी' म्हणून हांक ऐकूं आली. आवाजावरून मीं तें ओळखलेंच; आणि माझी तयारी नसतांनासुद्धां मला उत्तरादाखल मागें तोंड फिरवून उभें रहावें लागलें. तिचा तो निर्मल चेहरा पाहून मीं बाजूला मान फिरविली तों माझे दोस्त परस्परांकडे पाहून दांताड काढीत असलेले दिसले. त्या निष्पाप पोरीकडे पाहून त्या कुटाळ व संशयी पोरांना असा द्वेष वाटूं लागला! पण करणार काय? बहीण-भावंडांचें नातें तेवढे हे पामर कसे विसरतात म्हणून त्यांची कींव येऊनच कीं काय, मला उलट थोडें हसूंच आलें.

"आम्हांला वाटलं कीं तुम्हीं अजून इथं आलांच नाहीं." आलेल्या प्रसंगाला हसत तोंड देण्यांतच माणुसकी ना?

"पण तुमच्या वाटण्यावर जग कुठं चाललं आहे?" झाल्या गोष्टीवर विरजण घालण्यासाठीं मी हसत उत्तरलों.

" खरं आहे ! सागराला भरती येते ती आपल्यामुळं असं जर चंद्राला कळतं तर त्यानंसुद्धां आपली गति बदलली नसती का ? "

बाजू अंगावर आली खरी. तेव्हां आटोपतें घेण्याशिवाय उपायच नव्हता. शिवाय मी कोठे कवि होतों, सरलेच्या रसपूर्ण परिस्थितीशीं तादात्म्य व्हायला ? माझं सारं लक्ष जवळून जातांना मुद्दामच खांकरणाऱ्या वात्रट विद्यार्थ्यांकडेच होतें. बागवानाचें लक्ष गुलाबाच्या सौन्दर्यापेक्षां फुलांचा नाश करणाऱ्या कीटकांकडेच असणार !

" मी आपली चूक कबूल करतों, मग तर झालं ना ? "

" नुसती कबूल करतों म्हणून भागणार नाहीं."

" भाऊबीजेची ओवाळणी जरा सैल हातानं दिली म्हणजे मग बहिणीकडून सगळ्या गुन्ह्यांची माफी मिळतेच ना ! "

" भाऊबीजेला म्हटलं आजून तीन महिने आहेत !"

" मग आज संध्याकाळींच येईन तुमच्याकडे. याउपर तर नाहीं ना कांहीं शिक्षा ? "

अर्थात् त्या दिवसापासून आमचें दळणवळण फार झपाट्यानें वाढूं लागलें.

— ४ —

मला वाटे, कीं रावसाहेबांना हें पसंत कसें पडतें ? ते सुधारक म्हणून तर नसेल ना ? पण त्यांत त्यांना न आवडण्याजोगें तरी तें होतें काय ? सरलेला माझ्यायेवढा भाऊ होता, तिचा नात्यागोत्यांतील ओळखी-पाळखीच्या पुरुष-माणसांशीं संबंध येतच होता. मग मीच काय कमी होतों किंवा जास्त होतों ? मी तरी तिच्या बरोबरीचा व सहाध्यायीच होतों ना ? मग मला तिच्या बंधुत्वाचा मान घेण्यास त्यांनीं तरी कां मनाई करावी ? मी तरी मनुष्यच होतों, विचारी होतों, शिकलेला होतों, ह्याचा त्यांच्या मनाला प्रत्यय आल्यामुळेंच कदाचित् त्यांना माझ्याबद्दल आपलेपणा वाटत असावा. पण मी कॉलेजचा विद्यार्थी होतों ना? शहरवासियांनीं तर आमच्यावर कटाक्ष ठेवला आहे. पण त्यांना असा विचार येत नाहीं, कीं कॉलेजचा तरुण विद्यार्थी झाला तरी त्याला घर आहेच; आईबहीण हीं त्याच्या निःस्वार्थी प्रेमाची भागीदारी करीतच असतात. त्यालाहि भावना आहेतच. तो आपलें राष्ट्रीय व सामाजिक जीवनाचें महत्त्व जाणतच असतो. पण

आजकाल कॉलेजचा विद्यार्थी म्हटला कीं, कौटुंबिक लोक आठीच घालतात. पण आपल्या मुलीसाठीं पायपिटी करीत याच कॉलेजच्या विद्यार्थ्यांच्या दाराशीं जावें लागेल हेंदेखील ते त्या क्षणीं विसरतात. याला कारण विद्यार्थिवर्गांतील परस्परांविषयीं कुटाळखोर व संशयी वृत्ति तर नसेल ना ?

प्रेमविषयक कविता जरी वाचल्या तरी त्यांचा व्यावहारिक उपयोग किती हें कविशिवाय प्रत्येकजण जाणतच असतो. आणि कवींचें प्रमाण शेंकडा फारच थोडें असतें. तरुणपणांत हौस असते, चैनीकडे प्रवृत्ति साहजिक असते, पण त्याला वैषयिकपणाचें हिडीस स्वरूप देऊन विद्यार्थिवर्गाचा किती अपमान केला जात आहे !

माझा आणि सरलेचा किती साधा आणि सरळ संबंध ! माझी तिची ओळख किती पवित्र वातावरणांत झाली. अगदीं निष्पाप मनानें आम्ही एकमेकांना मदत करीत होतों. बहीणभावाप्रमाणें मनमोकळेपणानें बोलत होतों. आमच्या मनांत वैषयिक वासनेचा परस्परांविषयीं कधींहि नुसता वाससुद्धां आला नव्हता. पण त्याचा शेवट गोड झाला तर जगाचें जागतिक स्वरूप तरी काय राहिलें असतें ? सत्याचें 'सत्त्व' दुःखांत अंत झाल्यावरच सिद्ध होत असतें.

— ५ —

संध्याकाळीं फिरावयास म्हणून जिमखान्यावर गेलों होतों. जवळच एक कुटाळकांचा अड्डा बसला होता. माझ्या एका मित्रानें मला हांकच मारल्यामुळें मी तेथे गेलों. इतक्यांत एक सीनिअरमधील शिष्ट गृहस्थ आमच्यासंबंधानेंच कांहीं बरळत असावे असें मला वाटलें. माझ्या मित्रानें त्याला खुणेनें इशारा दिला होता, पण हे आपल्या शहाणपणाच्या घमेंडींत. त्यांचें पुराण चालूंच होतें. तेव्हां मीं विचारलें,

" आपण कोणासंबंधीं हें बोलतां आहां ? "

" तुला का त्याची येवढी पंचाईत ?" म्हणून मलाच दबकावण्याच्या आविर्भावानें त्यानें उत्तर दिलें.

"मला वाटलं कीं, माझ्या नांवाचा उल्लेख झाला म्हणून मीं विचारलं."

" असेल ! पिकल्याशिवाय विकतंय् थोडंच ? "

" ठीक आहे ! पण जरा जपून बोलत जा मात्र यापुढं !" असें म्हणून मी उठून उभा राहिलों.

"अरे हो, आलाहे मोठा दीडशहाणा शिकवायला. चोर तर चोर, पुन्हा शिरजोर!"

लोकांना काय, असले प्रसंग हवेच असतात. भोंवतालचे लोक कान सावरूं लागले.

"मराठीवरचं आपलं प्रभुत्व मला माहिती आहे. पण म्हणींचा उपयोग योग्य ठिकाणीं करावा लागतो. चोर म्हणण्यापूर्वी चोरी दाखवून द्यावी लागते बरं का!"

"काय आतां दाखवायची उरली आहे? प्रत्येकाला माहीत आहेत आपलीं कारस्थानं. म्हणे मी दा-दा, सोदा लेकाचा."

"आतां तोंड आवराल का? पुष्कळ मुक्ताफळं पडलीं कीं" सरलेच्या नांवाचा बभ्रा होऊन तिची विद्यार्थ्यांत अपकीर्ति होण्यापेक्षां सध्यां आपणच मूर्खपणा पदरांत घ्यावा म्हणून मी समेटाची भाषा बोलूं लागलों. इतक्यांत तेथलेच एक दोघे शिष्ट पुढें झाले व 'जाऊंद्या हो, चालायचंच,' तुम्हांला काय करायचं हो? वगैरे शेलक्या शब्दांनीं त्यांनीं आम्हांला वाटेला लावले. पण त्याचें माझें मात्र मनोमय वांकडें आलें. ही गोष्ट कोणत्या थराला जाईल याचा मला नेम लागेना.

रस्त्यांतून वारंवार बरोबर जातों म्हणून, व्हरांड्यांत बोलत उभीं राहतों म्हणून वगैरे कारणांनीं विद्यार्थी आमची चेष्टा करीतच असत. त्यांत या प्रसंगानें अधिकच भर घातली. ज्या कर्माला मी भीत होतों तेंच पुढें उभें राहिलें. दुसऱ्या दिवशीं जो तो आमच्याकडे बोट दाखवून कुजबुजूं लागला. आम्हांला ऐकूं येईल अशा तऱ्हेनें 'हीं पहा भावी पतिपत्नी' म्हणून कुजबुजण्यासहि कमी केलें नाहीं. पण करणार काय? कोणाच्या तोंडाला हात थोडाच लावतां येणार आहे? प्रत्यक्ष अध्यापकसुद्धां संशयी दृष्टीनें पाहूं लागले; पण मी मनांत पक्कें समजून होतों, कीं माझी यांत कांहीं चुकी नाहीं. ढगांच्या पडद्याआड चंद्रदेखील नाहीं का झांकला जात? पण वाऱ्यानें पटल दूर केलें गेलें म्हणजे तोच चंद्रमा आल्हाद देतो ना? त्याप्रमाणें मी सरलेला सांगत असे, "सरलाबाई, ह्या लोकांच्या बडबडीला का आपण भ्यायचं? आपला मार्ग आपल्या मनाला पसंत आहे ना? आपण चुकत नाहीं ही आपल्याला खात्री आहे ना? मग जनापवादावर विश्वास ठेवून वागण्यांत काय अर्थ? प्रत्यक्ष परमेश्वराला तरी कुठं सगळेच वंदन

करतात? तो तर सर्वशक्तिमान् आहे ना? या लोकांना वाटेल तसं बडबडूं द्या. उद्यां तेच आपली स्तुति करतील."

— ६ —

एक कीं दोन अशा कितीक गोष्टी सांगतां येतील, कीं त्यामुळें सरलेला व मला एकमेकांना कॉलेजमध्यें भेटण्याची एक प्रकारची भीति वाटूं लागली. 'या लोकांच्या कुचेष्टेला काय भ्यायचं आहे? आपलं नाणं खरं असलं म्हणजे झालं,' वगैरे सागून मी सरलेला उत्तेजन देत असे खरा, पण माझेंच मन अलीकडे पंगु होत चाललें होते. आमची दैवगति फिरली.

परीक्षा जवळ आली होती. त्यामुळें अलीकडे बरेच दिवसांत मी रावसाहेबांकडे गेलों नव्हतों. सरलाहि मला कॉलेजमध्ये फारशी भेटत नसे. मी Balance Room मध्यें होतों. इतक्यांत दरवाजांतूनच सरलेनें मला हांक मारली. मीं सहज म्हटलें,

" आंतच या, मी weights घेतों आहें."

नाइलाज म्हणून ती आंत आल्याचे दिसलें. तरी तिनें एकदां सभोंवार पाहिलेंच. ती उभीच राहिलेली पाहून मी उद्गारलों,

" कां, वेळ नाहीं वाटतं बसायला?"

" वेळ आहे पण काळ नाहीं भाऊराव." निराशेनेंच तिनें उत्तर दिलें.

" आहे माहीत काळाची महती. बसा त्या धक्क्यावर म्हणजे मी एकीकडे तुमच्याशीं बोलेन तरी." ती धक्क्यावर अखेर बसलीच.

" मामी गांवांत आल्या आहेत तरी तुम्हांला यावंसं वाटत नाहीं ना?"

" वाटतं तर काय झालं. पण करणार काय? रोज मी म्हणतों कीं येईन म्हणून. पण practicals जर संपत नाहींत सहा वाजेपर्यंत तर त्याला माझा काय उपाय!"

" आपल्या माणसासाठीं आपण नको का काळजी घ्यायला? त्या किती तरी वेळां म्हणाल्या, 'भाऊ आला नाहीं, भाऊ आला नाहीं.' अखेर आज त्यांनीं मला तुम्हांला भेटायला सांगितलंच."

" नाहीं तर काय भेटणार नव्हतांच ना?"

" नव्हतें असं नाहीं; पण—"

" तें आलं लक्षांत माझ्या—"

" बरं पण तुम्ही येणार केव्हां ? " आटोपतें घेत ती म्हणाली.

" रविवारीं सकाळशिवाय तर कांहीं शक्य दिसत नाहीं."

पूर्वी माझ्याशीं बोलतांना आनंदानें उमलून जाणारा तिचा चेहरा मला त्या वेळीं काळजीनें करपून गेलेला दिसला. लोकनिंदेच्या बाबतींत स्त्रीहृदय हळवें असतें याचा प्रत्यय मला त्या वेळीं आला. अगदीं आपल्या मनाविरुद्ध ती उठून निघून गेली. मला नवल वाटलें, कीं पूर्वी मला भेटावयास उत्सुक असलेली सरला आज अशी परक्याप्रमाणें कां वागावी ?

— ७ —

अलीकडे सरला माझ्याशी बोलण्याचें तर दूरच राहिलें पण पाहूनसुद्धां न पाहिल्यासारखें दाखवी. माझी आपली कल्पना होती कीं, लोकांच्या टीकेला कंटाळून तिनें तसें केलें असावें. पण एखादे वेळीं असें वाटे कीं, तसें असतें तर तिचा चेहरा इतका दयार्द्र दिसला नसता. त्या दिवशीं मी नेहमींप्रमाणें त्यांच्या घरी गेलों होतों; तेथील प्रकार पाहिला तो तर कल्पनातीतच होता. नेहमींप्रमाणें माझ्याशीं कोणी बोललेसुद्धां नाहीं. मग स्वागत-सत्कार करण्याचा प्रश्न दूरच राहिला. तसें परत जाणेंहि बरें दिसेना, म्हणून आईसाहेबांकडे जाऊन यावें म्हणून मी आंत गेलों. त्या भोळ्या माउलीनें मात्र माझा मनमोकळेपणानें आदर ठेविला.

" सरल कुठं आहे ? " कांहीं तरी विचारावयाचें म्हणून मीं विचारलें. कोणीं सांगितलें असतें तर त्यावर या जन्मांत मी विश्वास ठेवला नसता, पण दरवाजांतून बाहेर पडतांना सरलेला त्या क्षणीं मीं आपल्या डोळ्यांनीं पाहिली. मी हतबुद्ध झालों व तसाच उठून चालूं लागलों. आईसाहेब 'बस, बस' म्हणत होत्याच. त्याकडे माझें लक्षसुद्धां लागलें नाहीं. जिच्यासाठीं मी आपला मानअपमान वेळोवेळीं बाजूस ठेवला तिलाच जर माझी किंमत वाटत नाहीं तर त्या दिशेकडे मी ढुंकून तरी कशाला पाहूं ?

एकदां कोठेंतरी तिचा सुकलेला चेहरा माझ्या पाहण्यांत आला, तेव्हां माझ्या हृदयांत कालवाकालव झाली व आतांच्याआतां जाऊन तिच्या दुःखाचें कारण विचारावें असें वाटून मी जागच्याजागीं उभा राहिलों. माझ्या तोंडांतून शब्द तर बाहेर पडेनाच, पण सरला तरी कोठें जाग्यावर

होती ? या सगळ्या कोड्यांचा मला तरी कांहींच उलगडा होईना. रावसाहेबांच्या घरीं जाऊन शोध करण्याची तर माझी मुळींच तयारी नव्हती.

केमिस्ट्री practical असल्यामुळें सहाच्या सुमारास अगदीं कंटाळून मी आरामखुर्चीवर 'कॉलेज' वाचीत पडलों होतों. मी अगदीं डोळे फाडफाडून वाचूं लागलों—'कु. सरलाबाई गपचुप यांचा विवाह वसंतराव मोने, बी. ए. यांचेबरोबर होणार असल्याचें कळतें.' काय ? मला याचा पत्ता नाहीं ? वर्तमानपत्रांतील बातमी म्हणजे कांहीं कोणीं उठवलेली गप्प खास नव्हे. तिला आधार सबळ असणारच. मी डोळे मिटून स्वस्थ पडून राहिलों. विचारांची भरती संपून ओहोटी सुरू झाली तेव्हां खडक जसे उघडे पडूं लागतात त्याप्रमाणें मला एकेक गोष्ट सुचूं लागली. वसंतराव म्हणजे एक वर्षांपूर्वी ज्याची माझी सरलेसंबंधींच चकमक उडाली होती ती व्यक्ति. मग काय ? सर्व गोष्टींचा खुलासा होण्यास मुळींच अवधि लागला नाहीं.

पहांटे सातचा सुमार असेल. मी अजून अंथरुणांतच होतों. मामांनींच मला उठविलें. अर्थात् त्यांच्या येण्याचा मला कांहींच सुगावा नव्हता.

" इकडे कुणीकडे मध्येच ? " मीं विचारलें.

" सरलच्या लग्नाला." त्यांनीं जरा बेफिकीरपणेंच उत्तर दिलें.

" गपचुपांच्या ? आणि तें केव्हांचं ? " मी अधीरपणानें विचारलें. अज्ञानाचा आव आणण्याशिवाय गत्यंतर नव्हतें.

" आजचंच आहे." त्यांनीं शान्तपणानें उत्तर दिलें.

" मुलगा वगैरे कुठला ? " मी अगदीं आंबटपणानें पुढें म्हणालों.

" तुला माहीत नाहीं वाटतं ? "

" काय कारण ? मला तर तिकडची किती दिवसांत वार्ता नाहीं." मीं सरळ जबानी दिली.

" तुझ्यामुळंच तर तो मुलगा तयार होत नव्हता. नाहीं तर हें लग्न मागंच उरकलं असतं."

" तो काय म्हणून ? मीं काय केलं ? "

" मलाच वर विचारतोस काय म्हणून ? तुझ्याविषयीं त्याला जबर संशय होता, कीं ती तुझ्या नादीं लागली आहे म्हणून."

" कमाल झाली मात्र यांच्या हलकटपणापुढं " त्याच्या अज्ञानाची

कींव येऊनच कीं काय मी सहज बोलून गेलों. " मग त्या दीडशहाण्याची समजूत कशी झाली ? " मीं उत्कंठेनें विचारलें.

" कसली समजूत अन् कसलं काय ? पैशाचा लोभ सुटेना बापाला, मुलीचं सौन्दर्य व शहाणपणाला भुलला मुलगा. शेवटीं, एक वर्षभर स्वस्थ बसण्याचं ठरलं. तेवढ्या अवधींत मुलाकडील लोकांनीं सरलेवर व तुझ्यावर पहारा ठेवला होता."

" म्हणूनच का सरला आतांशा एकलकोंडेपणानं वागे ? पण हें तुम्हांला कसं कळलं ? " मीं मध्येंच विचारले.

" सरलेला त्याची कुणकुण लागली, त्या दिवसापासून तिनं आपलं वर्तन बदललं. अखेर मात्र पोरीनं साधली खरी." मामा कौतुकानें म्हणाले.

" उगीच का मी तिला बहिणीइतका मान देतों तो ! " मी अभिमान-पूर्वक उद्गारलों.

" आईसाहेबांनीं तुला आणण्यासाठीं मला मुद्दाम पाठवलं आहे. "

मी परत व्यावहारिक वातावरणांत आलों. माझ्यापुढें सर्व देखावा उभा राहिला. 'अगदीं जिवलग मित्राच्या लग्नाला जावयाचें आहे' अशी थाप मनाविरुद्ध मारून मला मामांना घालवावे लागलें. सरलेच्या विवाह-प्रसंगीं हजर राहणें मला आवडलें का नसतें ? उलट माझ्याइतका आनंद दुसऱ्या कोणा तिऱ्हाइताला कदाचित् झालाहि नसता. तिच्या लग्नासाठीं वाटेल तें आनंदाने करण्यास मीं मागे-पुढें खरोखरच पाहिलें नसतें. प्रत्यक्ष वसंतरावापुढें हात जोडून, क्षमा मागून, हिला तेवढी पदरांत घ्या म्हणून मी भाऊ या नात्यानें, वेळ आली असती तर वाटेल तितके वेळां, विनंति केली असती; तिचें जर कल्याण होत असेल तर त्यांत मला आनंदच आहे. तिच्या सुखासाठीं मी आपलें सुख क्षणभर विसरलोंहि असतों. पण या परिस्थितींत माझा तरी काय उपाय ? लोकांच्या दृष्टीवर संशयाची धुंदी असतां त्यांना माझें खरें स्वरूप कसें पटणार ? मला लग्नाला जाणें कसें बरें योग्य दिसेल ? सरलेला मी बहीण मानतों तर तिला मी भाऊबीजेला मोठ्या आनंदानें बोलावीन. माझें घर केव्हांहि उघडेंच आहे. पण तिच्या नवऱ्यानें मला तिचा भाऊ म्हणून मानलें पाहिजे ना ? जगांत त्याच्या मताला आधीं मान आहे.



# माणसाचें मन : : ४९

अनंता अत्यंत हुषार, कष्टाळू आणि महत्त्वाकांक्षी होता. पण पत्त्याच्या डावाप्रमाणें संसारांतले अनुभव हेहि निव्वळ अनिश्चित; कधीं अनुकूल कधीं प्रतिकूल असायचेच. अनंताचेंहि असेंच चाललें होतें. अगदीं ऐन तारुण्यांतहि अनंता नशिबाशीं तडजोडीच्या आणि गोडीगुलाबीच्या धोरणानें वागत होता. वाटेंत आलेली निराशा हास्यमुखानें ओलांडून तो आशेचा मार्ग आक्रमीत असे. आपण आपल्या ध्येयाशीं एकनिष्ठपणें प्रामाणिक असावें, म्हणजे आयुष्यांतील इतर सुखदुःखें कमी तीव्र होतील, असा त्याचा तात्त्विक बाणा असे.

पण हें सारें तत्त्वज्ञान त्याच्या अत्यंत कोमल मनाचें समाधान करण्यास असमर्थ असे. तो गोष्टी लिही, तेव्हां त्याच्या मनाचें भावनावैभव त्याला झांकतां येत नसे. सहज बोलूं लागला तरी मनाच्या अगदीं आंतल्या उमाळ्यानें तो सहज गहिंवरून येई. त्याच्या मित्र-मैत्रिणींना हा नेहमींच अनुभव येत असे; आणि त्याच्या उदार, प्रेमळ वृत्तीनें तो सहज कोणाचेंहि मन आपलेंसें करून टाकी.

त्याचें ध्येयवादी मन फक्त आत्मिक उत्कर्षापुरतेंच स्वार्थी आहे, नव्हें तें तसेंच असावें, परंतु इतर सर्वच बाबतींत तें अगदीं निरभिलाष असूनहि अत्यंत सहानुभूतिपूर्ण आहे अशी त्याची खात्री होती. तो लेखनांत कुशल होता. त्याचें लेखन त्याच्या उपजीविकेपुरतें धन त्याला देत असे. तो इतर छोटे-मोठे व्यवसाय करून द्रव्य संपादन करी. कष्ट असह्य झाले तरच तो स्वतःच्या दुबळ्या शरिरावर रागावे, पण भोवतालच्या क्षुद्र वृत्तीच्या माणसांवर तो रागावत नसे. हेवा, मत्सर वगैरे कोठल्याहि भावनेपासून अलिप्त असण्याइतका आत्मप्रत्यय त्याला होता.

पण त्याचें हें सारें सामर्थ्य ज्या अंतर्जागृतीमुळें त्याला प्राप्त झालें होतें, त्या दृष्टीनें त्याला स्वतःचेंच मन कधीं कधीं समजेनासें होई.

त्याचें लग्न झालें तेव्हांचीच गोष्ट. आईबापांनीं त्याला मुलगी पाहण्यासाठीं जेव्हां बोलावलें तेव्हां त्याच्या मनांत दुसऱ्याच एका मुलीबद्दल कांहींसें आकर्षण जाणवूं लागलें होतें. पण आपलें एकतर्फी आणि अनिश्चित

असें मन गुंडाळून ठेवून आईबापांचें थोडें आराधन करावें म्हणून तो मुलगी पहावयास गेला. मुलगी सुदृढ, सुसंस्कृत होती; जरा कमी चटकदार होती. अनंताचें मन पूर्वसंस्कारामुळें तितकेंसें हेकट बनलेलें नव्हतें. त्यानें संमति दिली; आणि लग्नहि होऊन गेलें.

अनंतानें स्वतःच्या मनाची चटकन् समजूत करून टाकली. आपण आपल्या कर्तृत्वाशीं तर अर्धवटपणानें बेइमान होत नाहीं; तेवढें साधलें अथवा तेंच साधण्यासाठीं आयुष्यांत सर्व बाबतींत कमी अडचणीचा मार्ग आखावा हेंच अधिक श्रेयस्कर.

पण विवाहित पत्नीच्या प्रेमाचें ओझें जसें वाढत जात चाललें त्या प्रमाणांत मनावरचा पहिल्या चटकदारपणाचा संस्कार कांहीं कमी होईना. तो आपल्या बायकोशीं इतक्या निष्कपटपणानें आणि मोकळ्या मनानें वागत असे, कीं तिला स्वतःच्या सुखाबद्दल धन्यता वाटून ती त्याच्यासाठीं आपलें सर्वस्व अर्पण करण्यास उत्सुक असे. अनंता तिला सांगे, कीं त्याच्या मनांत दुसऱ्या एका मुलीच्या रूपगुणांनीं अधिष्ठान मिळविलें आहे; तेव्हां ती त्याला उलट सांगत असे, कीं तुम्ही खुशाल त्या दुसऱ्या मुलीवर प्रेम करा! तिचा त्याच्यावरील विश्वास अनंत होता; आंधळाहि होता. पण अनंताचें मन त्याला कधीं कधीं खात असे. प्रेमांत आपण गाफीलगिरीनें वागत आहोंत असें त्याला वाटूं लागे. पण तो उलट स्वतःचेंच असें समाधान करून घेई, कीं एकनिष्ठेचें अनैसर्गिक बंधन मी पाळतों तितकें काय कमी आहे! स्वतःची बायको आपल्या अगतिक आयुष्याचें बलिदान करीत आहे, त्या ऋणानें भारावलें म्हणजे मन थाऱ्यावर येईल; आणि मग जगांतलें सारें तारुण्य एकवटून जरी विरुद्ध उभें राहिलें, तरी एका बायकोच्या कृतज्ञतेनें भारलेलें मन चवचाल होऊं शकणार नाहीं; असा तो स्वतःला धीर देत होता. कदाचित् विवाहिताचें ताबेदार मन त्याला फसवून दुबळा बनवीत असेल.

त्याच्या लेखनांत आणि इतर व्यवसायांत तो बाकीचें सारें विसरून गेला होता. पत्नीचें आराधन करण्यांत त्याला स्वतःच्या थकलेल्या मनाची करमणूक करण्यापलीकडे विशेष लक्ष द्यावें लागत नसे. आयुष्यांतील अभिनव संवेदनांचें सोनें बनविणारी त्याची लेखणी कथा, नाटकें, कादंबऱ्या

निर्माण करीत होती; आणि अनंताच्या वाढत्या लौकिकाकडे पाहून त्याची पत्नीहि त्याच्या किंचित् औदासिन्याच्या छटा मनावर घेत नसे. सहवासानें आचारविचारातील बारीकसारीकहि लकबी कळूं लागून एखाद्या व्यक्तीचें मनोगत हस्तगत झालें म्हणजे जो आपलेपणा वाटावा तसा आपलेपणाहि परस्परांत उत्पन्न झाला होता. अनंताचें सामर्थ्य आणि दौर्बल्य हीं दोन्ही त्याच्या पत्नीने बहुधा हेरून ठेवलीं होतीं; निदान ती तसें मानीत असे.

कोठल्या वेळीं चहा मिळाला म्हणजे अनंता खूष असतो हें तिला ठाऊक होतें. देवा-ब्राह्मणांचें नांव काढलें, कीं अनंताच्या तळपायाची आग मस्तकाला जाते, हेंहि तिला कळून चुकलें होतें. लोकप्रिय चित्रें, गोष्टी, पैसे, नाटकें, लौकिक वगैरे अनंताच्या अनेक नावडत्या वस्तु तिलाहि आवडेनाशा झाल्या होत्या. अनंताच्या टीकात्मक उद्गारांनीं तिला एवढें कळून चुकलें होतें, कीं सत्य आणि सुंदर असें सर्व त्याला आवडतें. परंतु चैतन्य आणि जिव्हाळा नसलेलें त्याला कांहींहि आवडत नाहीं. आणि याच विश्वासानें ती अनंताचा देवा-ब्राह्मणांबद्दलचा राग सहन करीत असे. अनंताला स्वतःच्या मनावरील वैचित्र्यपूर्ण संस्कारांचें रोज कौतुक वाटे, आणि याच कौतुकाचें पर्यवसान त्याच्या ललित वाङ्मयांत होई. पण हें वैचित्र्याचें कोडें नित्य सहवासामुळें त्याच्या पत्नीला मात्र अगदीं आश्चर्यशून्य वाटूं लागलें होतें. ती अनंतापेक्षां थोडी अधिक व्यवहारदक्ष होती. आणि स्वतःच्या मनाबाहेरचें जग फालतू आहे असें मानणाऱ्या या राजश्रींना आपण सहज जिंकूं शकणार नाहीं, हें ओळखून तिनें प्रियाराधनाचें आपलें व्रतहि सतत दक्षतेनें चालू ठेविलें होतें. स्वैर मनाच्या प्रबल ओघांत स्वतःच्या पत्नीच्या सुखांत अथवा स्वातंत्र्यांत आपण न्यून पडूं देत नाहीं अशी काळजी अनंतादेखील वाहत असे. तिच्या आवडीनिवडी कांहींशा पोरकट वाटल्या तरी पत्नीची हेटाळणी तर तो कधींच करीत नसे. पण उलट तिच्या हौसेसाठीं तोहि क्वचित् तिच्या निर्मळ पोरपणानें स्वतः बालिश बनत असे.

अनंताच्या पत्नीला जर कोणीं विचारलें असतें कीं, अनंताचें मन तर त्या चटकदार पोरीकडे आकर्षिलें जात आहे! याबद्दल तुला काय वाटतें? तर तिनें चटूदिशीं उत्तर दिलें असतें कीं, प्रेम—प्रेम काय म्हणतात तें तर मला आधींच पूर्णत्वानें मिळालें आहे. दुसऱ्या भ्रामक कल्पनांनीं भेडसावणारे संशयी लोकच खुळे असले पाहिजेत. म्हणे चटकदार पोरीचें

आकर्षण! त्याला कांहीं कोणी प्रेम म्हणत नाहीं, अन् तेहि कांहीं आतां रिंगणीं-खुळखुळे घेऊन खेळणारे पोर नाहींत!

उलट अनंताचें मन मात्र मधून मधून फारच अस्थिर होत असे. सर्वांशीं सारख्याच प्रेमानें वागण्याच्या सरावामुळें, पत्नीच्या किरकोळहि दुःखाबद्दल अथवा सोई-गैरसोईबद्दल त्याचें वागणें अगदीं कळवळ्याचें असे. त्याच्या त्या चटकदार मैत्रिणीचा त्याला विसर पडत नव्हता. आनंदानें आणि नैसर्गिक मोहकतेनें त्याचें स्वागत करणारी दुसरी आकर्षक मूर्ति त्याच्या मनाला एखाद्या हरवलेल्या वस्तूप्रमाणें हुरहूर लावीत असे. तिचें शिक्षणहि अधिक झालेलें, स्वावलंबनहि अधिक, त्यामुळें स्वतःवर सर्वस्वीं अवलंबून असणाऱ्या पत्नीपेक्षां त्या दुसऱ्या मैत्रिणीचें संभाषण त्या स्वैरात्म्याला अधिक सजातीय आहे असें आढळून येई. पण स्वतःच्या भावनांना वाव न मिळावा असा प्रयत्न उभयपक्षीं चालू असल्यामुळें कधीं कधीं तीं दोघें रुक्ष कठोरपणाचा अंगिकार करीत असत. दोघेहि समजत होतीं, कीं ही चूक सुधारण्याच्या आटोक्यापलीकडे गेली आहे. स्वतःच्या मनाची स्थिति कल्पनेनेंहि जाणण्याइतकी सूचना न मिळावी असा परस्परांचा आटोकाट प्रयत्न चालू होता.

*  *  *

पत्नीच्या आजाराचें स्वरूप जितकें भयावह आहे असें डॉक्टर सांगतात तितकें निराश होण्यासारखें खास नाहीं, असा धीर अनंता स्वतःच्या मनाला देत होता. एकदां मुदत संपली, कीं तापाचा जोर कमी होईल, आणि मग संकटाची मुळींच धास्ती नको; तिची शक्ति तेवढ्या मुदतीपर्यंत खास टिकेल, अशा आशावादी उमेदीनें अनंता पत्नीच्या उपचारांत यत्किंचितहि कसूर होऊं देत नव्हता. पत्नीची सेवा करीत असतां त्याला इतके कष्ट होत होते, पण त्याला त्यांचें कांहींच वाटत नव्हतें. तिचा ताप जरा कमी असला म्हणजे अनंता तिच्याशीं अनेक आनंदी, विनोदी गप्पा बोलत बसे; आणि अनंताचें नवें नाटक प्रसिद्ध होतांच मिळणाऱ्या पैशांची काश्मीर वगैरे प्रवासांत कशी विल्हेवाट लावायची, याबद्दल दोघेंहि मनोराज्यें करीत असत.

विषमाची मुदत तीन आठवड्यांनींहि संपेल असें वाटेना. पत्नीची शक्ति मात्र अधिकाधिक क्षीण होत होती. तिनें वारंवार म्हणावें,

आपल्याला माझ्याकरितां किती जाग्रणं आणि दगदग सोसावी लागते आहे! तुम्ही आतां थोडा वेळ स्वस्थ झोंप घ्या बघूं."

"ए बये, तूं असलं कांहीं बोलूं नकोस. म्हणे दगदग अन् जाग्रण! आणि तूं दुखण्याचे हाल कमीच सोशीत आहेस वाटतं!"

अनंताचें सारें चित्त आणि शक्ति पत्नीच्या शुश्रूषेंत एकवटल्या होत्या. दोघेंहि या दुखण्यानें अधिकच जिव्हाळ्याच्या बंधनांनीं जखडलीं जात होतीं. पत्नीची सेवा करण्यांत आपण तिनें केलेल्या सेवेची फेड करीत आहों असें अनंताला कधींच वाटत नसे. पैशांची फेड करतां येते, उपकारांची फेड होत नाहीं. आत्मीयतेचें बंधन प्रत्युपकारानें अधिकच दृढ होणारें असतें. अनंताचें असेंच झालें होतें. तो पत्नीच्या शुश्रूषेंत इतका गढून गेला होता, कीं त्याला दुसऱ्या कोणत्याच विषयाचें भान उरलें नव्हतें.

तापाची मुदत वाढत चालली, आणि अनंताच्या पत्नीची प्रकृति अगदीं खालावत चाललीं. पण आशेमुळें तो फसत होता. मुदत संपून ताप उतरावयाची वेळ फार धोक्याची असते असें डॉक्टर सांगत होते. त्याचप्रमाणें त्या दिवशीं परिस्थिति भयावह वाटूं लागली. डॉक्टरनीं योग्य त्या उपायांत कमी पडूं दिले नाहीं. आणि या संकटांतून आपण बहुधा यशस्वीपणें पार पडूं असाहि धीर अनंतास पुनः वाटूं लागला. रात्रीं डॉक्टर औषध टोंचून गेले. औषध थोडे उत्तेजक होतें. रात्रीं तिला झोंप आली नाहीं. अनंता रात्रभर उशाशीं बसून राहिला होता. उभयतां प्रथम थोडा वेळ कांहीं विनोदी भाषणें करीत होतीं, पण अधिक श्रमांच्या भीतीनें पत्नीस गप्प बसण्याबद्दल अनंता सुचवीत होता. ती गप्प बसेना.

वातानें ती बडबडूं लागली. विझतांना दिवा मोठा होतो म्हणतात! नाडी सुटली. अनंता तितक्या पहाटेस डॉक्टरांकडे धावतच निघाला. ती हातची गेली, ह्या भीतीनें त्याचें मन स्तंभित झालें होतें. डॉक्टरनीं कांहीं उपाय केला तर ती अजूनहि कदाचित् वांचेल! अनंताच्या मनांत आशा घोटाळत होती.

डॉक्टरना घेऊन तो परत घरीं चालला होता. त्याच्या परमप्रिय पत्नीचें शेवटचें दर्शन घेण्यासाठीं तो चालला होता. वाटेंत त्या चटकदार मुलीचें त्याला एकाएकीं स्मरण झालें. पत्नीच्या मृत्यूमुळें जुनी चूक

सुधारण्याची संधि नाहीं का मिळणार! आपल्याला त्या चटकदार मुलीशीं लग्न करावयाची आतां बरी मोकळीक मिळाली!

अनंताच्या मनांत या वेळीं हे विचार येत होते तरी कसे! त्याचें त्यालाच आश्चर्य वाटूं लागलें.

अनंताचा सल्ला घेणारे नवशिके लेखक त्याला जेव्हां विचारीत, कीं अमुक एक गोष्ट मानसप्रवृत्तीच्या दृष्टीनें योग्य आहे का? तेव्हां तो चटकन् उत्तर देई कीं, "हो–ह्या त्या विपरीत भावना एकत्र येणं शक्य आहे. माणसाच्या मनाला कसल्याच मर्यादा नसतात. उचितता, प्रामाणिकपणा, अभिरुचि हीं सारीं बंधनं फक्त पुस्तकांत असूं शकतात. माणसाचं मन हें बंधनांच्या पलीकडे आहे!"



## मुंग्यांच्या जगांत! : : ८०

तोंडानें शीळ घालीत सायकलवरून मी उगाच फेऱ्या घालीत होतों!

आकाशाकडे पहा, झाडांकडे पहा, पश्चिमेकडे अस्ताला जात असलेल्या सूर्याकडे पहा, असे माझे चाळे चालले होते! इतक्यांत माझें माझ्या पायांकडे लक्ष गेलें!

......आणि स्वतःच्या पायांखालीं नेहमींच उशिरां लक्ष जातें!

मुंग्यांची काळी रांग लांबवरपर्यंत वांकडीतिकडी वळसे घेत गेली होती! पण ती पाहून थांबण्यापूर्वीच माझ्या सायकलीचीं दोन्ही चाकें एक लहानसा भाग चिरडून त्या रांगेवरून पुढें निघून गेली! मला एकदम चमत्कारिकच वाटलें!

ब्रेक दाबून सायकल थांबवली, खालीं उतरून ती जमिनीवर पाडून ठेवली व जरा लक्षपूर्वक निरखून पाहण्यासाठीं त्या मुंग्यांच्या काळ्या रांगे-जवळ जाऊन उकिडवा बसलों!

माझ्या सायकलीचीं चाकें गेलेला भाग माझ्यासमोरच होता!...... स्वतःच्या उंचीवरून थोडें खालीं आल्यावर व मान जरा नमती केल्यावर मला सर्व स्पष्ट दिसूं लागलें!

वीस-पंचवीस सूक्ष्म मुंग्या मीं जमीनदोस्त केल्या होत्या! ती त्या दिवसाची माझी फुशारकी!

मला वाईट वाटलें.

......पण हळहळणाऱ्या हृदयाला मीं थोडया कठोरतेनें दाबलें. "इतका भावनाप्रधानपणा काय उपयोगी जगामध्यें? काय मीच एक मनुष्य? आणि इतर कोणीच नाहींत?"

माझी दृष्टि त्या मुंग्यांच्या काळ्या रांगेवर स्थिर झाली होती!

......आवाज नव्हता! गिल्ला-गोंगाट नव्हता!! जाणाऱ्या येणाऱ्या काळ्या रांगा सतत जात अन् येत; जणुं काय आघात-अपघात कुठें कांहीं झालाच नाहीं!

मला रागच आला; जरा कांहीं नवीन झालें, कीं आरडाओरड ऐकण्याची संवय झालेली! मुंग्यांना आम्ही मोठ्या उद्योगी म्हणतों,—म्हणून इतका निष्ठुरपणा काय उपयोगी?......मेलेल्या जातभाईंची व्यवस्था लावण्यापुरतीसुद्धां त्यांना फुरसत नाहीं?

पण माझ्या मानवी मनाचा संशय खोटा ठरला; चिरडलेल्या जागीं जाणाऱ्या-येणाऱ्या रांगेंतील मुंग्यांचें आपापसांत बोलणें सुरू झालें! एक एक सेकंद, एक दुसरीशीं बोले व आपल्या मार्गाला लागे! थोडा वेळ तसा विचारविनिमय झाल्यावर, जाणाऱ्या-येणाऱ्या रांगा तशाच कायम ठेवून कांहीं मुंग्यांचा घोळका अपघाताच्या ठिकाणीं जखमी व ठार झालेल्या बांधवांभोंवतीं गोळा झाला. त्यांचे सर्व व्यवहार अगदीं जलद चालले होते.

जमिनीवर चिरडून गतप्राण झालेल्या वीरांचीं शवें अलगद वर उचलण्यांत आलीं! तिघातिघांचा एक कंपू होऊन प्रत्येकानें बळी पडलेला एक एक वीर आपल्या ताब्यांत घेतला व चालावयास त्वरित सुरुवात केली!

थोडयाच वेळांत ती सर्व तुकडी जाणाऱ्या-येणाऱ्या रांगेपैकीं एकींत मिसळून ताब्यांतील हुतात्म्यांच्या शवांसह, शान्तपणें रांगेतून जाऊं लागली!

माझ्यादेखत तसले किती तरी अपघात माणसांकरवीं त्या शान्तताप्रिय प्राण्यांतहि होत होते! पण त्यांची रांग जशीच्या तशीच कायम होती!

चिकाटी......सहनशीलता!......सन्मार्ग व सत्याग्रह!!

प्रत्येक ठिकाणीं त्या हें शान्तताव्रत असेंच कायम ठेवीत असतील काय ?

मी थोडा जास्त बारकाईनें पाहूं लागलों ! जिवंत मुंग्यांची ये-जा पुनः ठरल्या रस्त्यानें, पूर्वींइतक्याच शिस्तीनें व शान्ततेनें भराभर होऊं लागली ! त्यांत किंचित्‌देखील खंड पडला नाहीं !

भिंतीच्या बाजूनें येणाऱ्या रांगेतील प्रत्येक मुंगीच्या तोंडांत रव्याचा किंवा साखरेचा बारीक पांढरा कण होता; रिकाम्या मुंग्या भिंतीकडे जात होत्या !

भिंतीपासून लांब जाणाऱ्या रांगेंत, मेलेल्या मुंग्या घेऊन गेलेली मघांची तुकडी मी शोधूं लागलों; पांच सहा पावलें पाहत पाहत चालल्यावर मला ती तात्काळ दिसली ! मी त्यांच्याबरोबर पुढील रस्ता काढूं लागलों !

सुमारें पांच मिनिटें माझा त्यांच्याबरोबरच प्रवास चालला होता ! त्या चिमुकल्या जिवांची धडपड किती उत्साहपूर्ण होती म्हणून सांगूं ? शेवटीं, त्या माळरानांतील एका उंचवट्याजवळ, आम्ही सर्व येऊन दाखल झालों. त्या लहानशा पोकळ टेंकाडाला वळसा घालून ती मुंग्यांची काळी रांग शेवटीं मला आपल्या जगाच्या प्रवेशद्वाराशीं घेऊन आली ! त्या भोंकांतूनच त्या सर्व आंत जात होत्या......बाहेर येत होत्या !

मी तेथपर्यंत, त्या मुंग्यांच्या स्वयंसेवकदलांत मिसळूनच येऊन पोंहोचलों होतों ! त्यांचा माझा बराच वेळ संबंध आला होता ! मी त्यांच्या चिमुकल्या राष्ट्राकडे आपुलकीच्या भावानें पाहूं लागलों !

त्यांची सारी धडपड सत्य तत्त्वांना धरून होती; आणि म्हणूनच उघड उघड चालली होती ! स्वराष्ट्रपोषण, स्वराष्ट्रोन्नति, प्रत्येक व्यक्तीचें समाधान, शान्ति आणि आत्मोन्नति हींच त्यांचीं उदात्त तत्त्वें ! ती वाखाणण्यासारखीं नव्हतीं असें कोण म्हणेल ?

पण ती एकजुटीनें चाललेली त्यांची स्वोन्नतीची अव्याहत धडपड सर्व जगावर स्वतःचेंच साम्राज्य स्थापण्याची स्वार्थी महत्त्वाकांक्षा बाळगणाऱ्या साम्राज्यशाहीप्रिय मानवाला कशी सहन होणार ? त्याला वाटतें आपण तीं सहज पायांखालीं चिरडूं ! आणि तो तसा प्रयत्नहि करतो !

पण स्वतःच्या श्रेष्ठत्वाच्या घमेंडींत त्याच्याकडून कांहीं वेळ ठिक-ठिकाणचे थोडेसे भाग चिरडले गेले म्हणून काय झालें ? त्यांच्यांतील

प्रत्येकाच्या हृदयांत स्वातंत्र्याची तीच जागती ज्योत सारखी तेवत असली, तर मधले साम्राज्यशाहीच्या हावेनें व अरेरावीनें चिरडलेले भाग मुळींहि न डगमगतां भरून निघतील! ती जुटीची रांग तशीच अव्याहत चालू राहील!

तो देखावा अगदीं अवर्णनीय होता!

घमेंडखोर मानवानें देखत्या डोळां स्वतः पददलित केलेल्या अथवा मजप्रमाणें यंत्राच्या साह्यानें अमानुषपणें जखमी किंवा ठार केलेल्या त्यांच्या राष्ट्रवीरांना परत घेऊन येणारी एक 'रेड क्रॉस'ची तुकडी, तितक्यांतच माझ्या अगदीं समोरून मोठ्या अभिमानाने व शिस्तीनें त्या भोंकांतून आंत गेली!

पण त्याच वेळीं तितक्याच उत्साहानें, तितक्याच धैर्यानें, स्वकर्तव्या-साठीं मुंग्यांचे नवीन नवीन स्वयंसेवक वीर, टोळयांटोळयांनीं व अगदीं शान्ततेनें बाहेर पडून, त्या चिमुकल्या काळया रांगेला मिळून, तिला अखंड पुढें चालवीत होते!

त्यांना स्वराष्ट्राच्या स्वातंत्र्याची खरी कल्पना होती! आणि त्यांना नुसतें जगण्यापेक्षां तें स्वातंत्र्य टिकवावयाचें होतें!

होय! स्वातंत्र्याची लज्जत एकदांहि चाखलेल्या व्यक्तीचें असेंच असतें! हृदयाच्या हांकेला पुढाऱ्यांची किंवा नेत्यांची गरज काय? खरेंच...... !

अहाहा! अशा या जगांतील—या स्वतंत्र राष्ट्रांतील अंतर्व्यवस्था कशी असेल?

माझे अंतश्चक्षु आंत शिरले खरे; पण बहिश्चक्षूंनाहि तें पाहण्याची झालेली प्रबळ इच्छा मोडवेना!

मी जवळची एक काटकी उचलून त्या मुंग्यांच्या जगाचा वरचा भाग फोडून आंत काय आहे तें पाहण्यासाठीं हात पुढें केला तोंच——

माझें हृदय धडधड हालूं लागलें......त्यांतून खोल पण रागाचा स्पष्ट आवाज ऐकूं आला......

"नीचा! थांब. पारतंत्र्याच्या पंकांत मानेपर्यंत रुतलेल्या व त्यांतून बाहेर पडण्यासाठीं स्वतः किंचित्देखील हालचाल न करणाऱ्या तुला, मुंग्यांच्या या स्वतंत्र राष्ट्राचें स्वास्थ्य बिघडविण्याचा काय अधिकार?"

......आणि दुसऱ्याच्या स्वातंत्र्याच्या आकांक्षा जुलूम-जबरदस्तीनें दडपून टाकण्याचा जगांत कोणाला अधिकार आहे?

माझा हात न कळत एकदम मागें झाला! तोंड अगदीं लाजेनें काळें झालें!

......पण त्याबरोबरच नवीन आशेने हृदय फुलून आलें!!



## ललाट-लिखित : : ५१

मी सुधेकडे न्याहाळून पाहत होतों. तिच्या विशाल भालावर माझी नजर ज्या ज्या वेळीं स्थिर होई त्या त्या वेळीं 'कुणा भाग्यवंताचें भावी भाग्य त्यांत लिहिलें' या गडकऱ्यांच्या ओळींची मला आठवण होत असे. गृहिणी कशी असावी याचा आदर्श दाखविण्यासाठीं विधात्यानें तुझी योजना केली आहे असें मी तिला नेहमीं म्हणावें. तिच्याकडे दृष्टि जातांच अंतःकरण पावित्र्याने भरून येई व तिची हुषारी पाहून मन विस्मयाकुल होई. आपल्या सुविद्यतेचें सारें श्रेय वडिलांकडे आहे, असें ती वरचेवर म्हणे व कोणीं तिची स्तुति केली कीं वडिलांच्या तसबिरीला मनोभावें प्रणाम करी. तिचे वडील एका सुविख्यात मासिकाचे चालक असून एका अग्रगण्य संगीत विद्यालयाचे मालक होते. त्यांच्या अमदानींतच सुधेचा विवाह व्हावयाचा; परंतु असल्या अद्वितीय कन्यारत्नाला हातावेगळें करण्याच्या कल्पनेनेच त्यांच्या अंतःकरणाला यमयातना होऊं लागल्या. कुणा अरसिकाच्या घरीं या कलावतीला पाणी भरण्याचा प्रसंग आला तर......या विचारानेंच त्यांच्या अंगावर शहारे येत. सुधेसाठीं अनुरूप वर शोधून काढतांना एखाद्या त्रयस्थाची मति कुंठित व्हावयाची, मग तिच्या प्रेमळ पित्याची अवस्था कशी व्हावी? त्यांनीं शोधून काढलेल्या उत्तमोत्तम स्थळांत स्वतः तेच कांहीं ना कांहीं दोष काढूं लागले, व असें होतां होतां व्हावयाचें तेंच होऊन सुधेच्या कंठीं विवाहाचे पाश पडण्यापूर्वीं यमराजाचे पाश तिच्या वडिलांच्या मानेवर पडले. त्यांच्या मृत्यूनें सुधेची या घरांतली अनियंत्रित सत्ता विराम पावली. स्वतःच्या असाधारण चांगुलपणामुळें तिचें कोणाशीं वितुष्ट आलें नाहीं तरी आज ती स्वतःच्या घरांत आपल्या मामा-मामींची केवळ आश्रित

होती, ही गोष्ट माझ्याआधींच तिच्या लक्षांत येऊन चुकली होती. तरी पण माझ्या दृष्टीला ती अजूनहि या घराची एकच एक शोभा दिसे.

'अर्थो हि कन्या परकीय एव' या न्यायानें सुधेला आज ना उद्यां या घरांतून निघणें प्राप्त होतें. ती येथून गेली, की या घराची शोभा नष्ट होणार याविषयीं मला मुळींच प्रत्यवाय वाटत नव्हता. हिरकणी निखळून पडल्या-वर कोंदणाची शोभा कशी राहणार? सुधेला नवीन कोंदण मिळेल; पण तें कसें असेल? ते कोंदण या हिरकणीला शोभेल का? या विचारांनीं मला ग्रस्त केलें. कुणा माकडाच्या गळ्यांत हें रत्न पडणार नाहीं ना, अशी शंका येऊन मी भयभीत झालों. माझी स्थिर झालेली नजर पाहून तिनें सस्मित विचारलें, "काय रे, सारखा पाहतो आहेस काय माझ्याकडे? माझ्या अदृष्टांत काय लिहिलं आहे तें पाहण्याचा प्रयत्न आहे वाटतं तुझा?"

मी चकित झालों. सुधेनें कसें अचुक जाणलें हें! ती म्हणाली, "रमाकान्त, माझं अदृष्ट तुला तसं दिसायचं नाहीं; आणि समज तें दिसलं तरी तूं काय करणार? तें फिरवतां येईल असा तुला भरंवसा असेल तर तो तुझा भ्रम आहे. तसं असतं तर माझ्या शिरावरचं बाबांचं छत्र इतक्या लवकर निखळलं नसतं. वेड्या, 'लिखितमपि ललाटे प्रोज्झितुं कः समर्थः!'

सुधा हें हसतच बोलली. परंतु तें ऐकून माझा कंठ मात्र दाटून आला. मीं म्हटलें, "सुधे, तूं इतकी चांगली कशाला झालीस?"

"इतकी म्हणजे?"

"म्हणजे काळजी वाटण्याइतकी. सुधाताई, तूं इतकी चांगली व्हायला नको होतीस."

"तशी मी खरोखरी नाहींच. पण तुझ्या आपलेपणाला कसली सीमा असेल तर ना? रमा, तूं इतका आपलेपणा दाखवायला नको होतास."

सुधेच्या या बोलण्यानें मला साहजिकच हसूं आलें.

त्याबरोबर ती म्हणाली, "आतां पटलं का तुला?"

"सुधे, आज माझी मनःस्थिति बरोबर नाहीं. सारखे खिन्न विचार मनांत येत आहेत, म्हणून मी तुझा दिलरुबा ऐकायला आलों."

"होय का! मग कांहीं सेकंदाचंच काम. आतां पहा तुझी खिन्नता देशोधडीला लावतें."

असें म्हणून सुधेनें आपला दिलरुबा काढला आणि तो घेऊन ती

खुर्चीवर बसली. तारांवर गज फिरवून तिनें एक गोड झंकार केला. पडद्यांवरून बोटें फिरूं लागलीं; तारांवर गज हालूं लागला; त्या तंतुवाद्यांतून मंजुळ स्वर निनादूं लागले. त्या स्वरांत सुधेनें आपला आवाज मिळवितांच माझी चित्तवृत्ति आनंदानें थरारून गेली. अहाहा!

मधुर—अत्यंत मधुर—वर्णनातीत असें गायन होतें तें!

त्या गायनानें सर्वत्र आनंदाचें वातावरण निर्माण केलें व माझी खिन्नता दिगंतरीं पळवून लावली. गायन संपवून सुधेनें दिलरुबा खालीं ठेवला व हास्यमुद्रेनें विचारलें, "कां? कसं वाटतं आतां? झालं का मनाचं समाधान?"

"इथं येऊन तुझ्याशीं चार शब्द बोललों, कीं समाधान होतं. मग आज तर तूं आपलं मंजुळ गाणं ऐकवलंस. काय सांगूं, सारखा पुष्पक विमानांत बसून उंच वातावरणांत हिंडत होतों. गाणं संपलं आणि खालीं आलों. खरोखरच तुझे गुण दैवी आहेत. आज मला 'आनंदी आनंद गडे' या कवितेची सत्यता पटली. सुधे, असा दिलरुबा तूं मला शिकवशील का?"

"मी दिलरुबा शिकवीन; पण असाच दिलरुबा शिकवणं माझ्याहि सामर्थ्याबाहेरचं काम आहे. यापेक्षां कमी शिकवीन. कदाचित् यापेक्षां जास्तहि शिकवीन. कितीहि उत्कट प्रेम अंतरीं वसत असलं तरी कोणतीहि कला साध्य व्हायला शारदेची कृपादृष्टि पाहिजे."

असें म्हणत तिनें दिलरुबा ठेवून दिला व नुकत्याच निघालेल्या चित्तरंजन मासिकाचा अंक माझ्यापुढें ठेवून म्हटलें, "ही पाहिलीस का यांत एक गोष्ट आलेली आहे. समान आवडनिवड असलेल्या पतिपत्नींचं आयुष्य सुखावह होत नाहीं, अशी कल्पना घेऊन ही गोष्ट रचलेली आहे. तूं वाचलीस ही?"

"हो."

"ही कल्पना चमत्कारिक वाटते, नाहीं? समान आवडीनिवडीच्या पतिपत्नींचं जीवित सुखावह होत नाहीं ही गोष्ट शक्य आहे का? तुझं काय मत आहे याबद्दल?"

"समान आवडीनिवडीमुळं गुणदोषांविषयीं मतभेद होऊन एकमेकांचं कौतुक न होतां वादालाच प्राधान्य मिळत गेलं तर अशा पतिपत्नींचं जीवन सुखी न होणं शक्य आहे."

" मला नाहीं ही कल्पना पटत. स्त्री ही भावनाप्रधान असते. तिच्या मनावर बुद्धीपेक्षां भावनेचाच अधिकार स्वभावतः जास्त चालतो. आणि एका हातानं टाळी वाजत नाहीं हें तुला सांगायला नकोच. समान आवडीच्या पतिपत्नींचं आयुष्य सुखावह होत नाहीं असं प्रतिपादन करणाऱ्या या लेखकाला स्त्रीहृदयाची ओळख पटलेली नाहीं."

" स्त्री बुद्धिप्रधान झाली तर संसार कसा होईल हेंच दाखविण्याचा लेखकाचा उद्देश असला तर ? " मी क्षणभर विचार करून म्हटलें.

" मी हीच गोष्ट निराळ्या कल्पनेनं लिहीत आहें. पुरी झाली म्हणजे दाखवीन तुला."

वाङ्मयाबद्दल थोडीफार चर्चा झाल्यानंतर तिनें एक नुकताच विणलेला रंगीत रुमाल पेटींतून काढला व तो माझ्या हातीं देत म्हटलें, " हा पाहिलास का नमुना ? कसा काय साधला आहे हा ! "

मीं तिजकडे कुतूहलानें पाहत विचारलें, " दिलरुबा कधीं वाजवतेस, गोष्टी कधीं लिहितेस आणि रुमाल कधीं विणतेस ? स्वैंपाक करूनहि हीं कामं करायला तुला वेळ तरी कसा मिळतो ? "

" वेळ मिळवतें मी. 'इच्छा असली कीं वेळ मिळतो' असं बाबांचं सांगणं असे; आणि माझाहि तोच अनुभव आहे."

थोड्या वेळानें तिनें चहा व फराळाचें आणलें.

" रमाकान्त, हे जिन्नस कधीं चाखले आहेस का ? सांग पाहूं यांचीं नांवं." असें म्हणून तिनें फराळाची बशी माझ्यापुढें केली.

त्यांत दोनचार जिन्नस नवीन होते. ते पाहून मीं म्हटलें, " तुझी प्रतिभा स्वैंपाकघरांतूनहि आपला प्रभाव दाखवूं लागली का ? ठीक!"

इतक्यांत मामी दरवाजांत येऊन म्हणाल्या, " रमाकान्त, तुला कळलं ? आमच्या सुधेचं लग्न ठरलं हो. सुधा आतां डॉक्टरीणबाई होणार."

" खरं कीं काय ? Congratulations Mrs. Doctor ! " मीं एकदम उठून म्हटलें.

सुधा या वेळीं मला मेघाच्छादित उषेप्रमाणें भासली. वैवाहिक जीवनाच्या सुखाची अपेक्षा आणि दुःखाची आशंका यांच्या संमिश्रणाची छटा तिच्या चेहऱ्यावर दृश्यमान झाली. तथापि बाह्यात्कारीं सलज्ज हास्य करून तिनें माझ्या थट्टेचें स्वागत केलें.

सुधेच्या घरून मी निघालों तो तिच्या भवितव्यतेचा विचार करीतच निघालों. सुधा आपल्या पतीचा संसार सुखाचा करील. त्यासाठीं केवळ तिचा जन्म होता. परंतु तो तिचा संसार सुखाचा करील का ? मनासारखें संसारसौख्य मिळालें नाहीं तर सुधेची काय स्थिति होईल याची मला कल्पनाहि करवेना. तिजविषयींचा विचार करीत शून्य दृष्टीनें चालतां चालतां समोरून येणाऱ्या एका मनुष्याला माझा धक्का लागला.

" कोण, मिस्टर रमाकांत ? भले ! अहो बघतां कुठं—चालतां कुठं—एवढा कसला विचार—"

डॉक्टर सुधीरांच्या शब्दानें मी भानावर आलों.

" ओहो ! डॉक्टर, कुणीकडे चाललां ? " मीं विचारलें.

" समोरचा मनुष्यहि दिसूं नये एवढा कसला विचार चालला होता तुमचा ? संसार थाटण्याचे मुहूर्त जवळ येत चालले आहेत. त्याचीच तर ही चिंता नाहीं लागली ? "

" संसाराची चिंता लागली आहे यांत शंका नाहीं; पण ती माझ्या संसाराची मात्र नव्हे. एका मानलेल्या भगिनीच्या संसाराचा विचार करीत होतों मी. स्वतःच्या संसाराची चिंता करीत बसण्याइतका मी मनाचा कमकुवत नाहीं."

" म्हणजे ! आधींच कुठं 'लव्ह' जमलेली आहे कीं काय ? त्याशिवाय मनुष्य इतका बेडर असूं शकणार नाहीं. हो, तुम्हां लेखकांचा भरंवसा कुणी द्यावा ! लेखनांतले प्रसंग सत्यसृष्टींत तुम्ही कधीं आणाल हें ब्रह्मदेवालाहि सांगतां येणार नाहीं."

" माझं राहूं दे तूर्त. तुमच्या संसाराचं कुठपर्यंत आलं ? "

" तुम्हांला स्पेशल आमंत्रण बरं का, स्पेशल ! आमचं ठरलं."

" ठरलं ? कुणाशीं ! आणि कधीं !! "

" नुकतंच. झालंच नक्की तें आतां. आणि मुलगीहि तुमच्या माहितींतलीच आहे."

" माझ्या माहितींतली ? खरं, Shake hands ! "

मीं डॉक्टरांशीं हस्तान्दोलन केलें. त्यांनीं आपल्या भावी वधूचा निर्देश केला.

" मुलगी--ती आपल्या कर्णिकांची भाची. माहितींतलीच आहे ती. तीच आमची सहधर्मचारिणी ! "

" कर्णिकांची भाची ? "

डॉक्टरांच्या हातांतला माझा हात गळून पडला. सुधा या सुधीर डॉक्टरांची सहधर्मचारिणी होणार ? सुधेचा धर्म मला माहीत होता. डॉक्टरांचाहि धर्म मी जाणत होतों. सुधा डॉक्टरांची सहधर्मचारिणी होणार म्हणजे काय ? म्हणजे काय दुसरें ? सुधेचें धर्मान्तर होणार. डॉक्टरांचें नांव सुधेच्या नांवाला जोडलें जातांच सुधा आपल्या धर्मांतून उठणार. माझें सर्वांग थरारले! सुधेची सोज्ज्वल मूर्ति माझ्या नजरेसमोर उभी राही—

" कां हो, विचारांतसे पडला ? आश्चर्य वाटलं का तुम्हांला ? "

" कां वाटूं नये ? ही बातमी मला कशी कळली नाहीं अजून ? "

" तें मुद्दामच Secret ठेवलं होतं. उगाच ठरल्याशिवाय Out कशाला करा ? खरं कीं नाहीं ? मीं पहिल्यानं नाहींच म्हणून सांगितलं होतं; पण मग असा विचार केला, सुधेला आईबाप नाहींत. मुलगी Accomplished आहे असं लोक सांगतात. तेव्हां मीं असा विचार केला, कीं कुणा गाढवाच्या गळ्यांत हें रत्न पडलं--कां, हसतांसे ? खरं आहे कीं नाही बोला ? "

" तुमचं म्हणणं बरोबर आहे."

" तेव्हां मी असा विचार केला, आपण थोडासा स्वार्थत्याग केलाच पाहिजे. तसं हसून थट्टेवारी घालवूं नका; स्वार्थत्याग आहे कीं नाहीं बोला ?"

" लग्न हाच एक गोड स्वार्थत्याग आहे."

" अहो पण हें मानतो कोण ? लग्न म्हणजे चैन, अशीच सर्वसाधारण लोकांची समजूत असते."

डॉक्टर स्वतःला असाधारण कल्पीत असल्याचें पाहून मला हसूं आलें.

" कां ? पुन्हा हसतां ? कमाल आहे बुवा ! "

" मला हसूंच येत आहे ही बातमी ऐकून. तें असो, तुमची प्रॅक्टिस कशी काय चालली आहे सध्यां ? "

" कोण पर्वा करतो या प्रॅक्टिसची ? अहो, हल्लीं भाराभर विद्यार्थी पास होऊं लागल्यामुळं हिंदुस्थानांतल्या डिग्र्यांचा भाव भलताच उतरला आहे."

" पण आतां तुम्हांला डिग्री विलायती मिळणार कशी ? "

" कशी ? आहे—तसा माझ्या पत्रिकेंतच योग आहे. जलाचा स्वामी असलेला कुठलासा ग्रह माझ्या पत्रिकेंत महाप्रबळ आहे असं ते हरेश्वरशास्त्री म्हणतात. आणि मौज पहा कशी ती, त्यामुळं तर ज्योतिषशास्त्रावर माझा विश्वास भयंकर बसला आहे. त्या दिवशीं हरेश्वरशास्त्र्यांनीं ही गोष्ट सांगितली आणि दुसऱ्याच दिवशीं नानासाहेब कर्णिक म्हणाले—धंद्याच्याच गोष्टी चालल्या होत्या आमच्या— ते म्हणाले, तुम्ही विलायतेला जाऊन तेथील एकादी परीक्षा कां देत नाहीं ? सुधेच्या वडिलांनीं तिच्या नांवावर म्हणे बरीचशी रक्कम ठेवलेली आहे. तेव्हां--अशी अनुकूलता असतांना तुम्हीं विलायतेची सफर कां करीत नाहीं असा त्यांनीं मला प्रश्न केला. तेव्हां--"

डॉक्टरांच्या स्वार्थत्यागाचें मर्म आतां माझ्या लक्षांत आलें. लग्न म्हणजे स्वार्थत्याग हें तत्त्व मीं त्यांना सागितलें होतें. लग्न म्हणजे चैन ही कल्पना त्यांनीं बोलून दाखविली होती. पण लग्न म्हणजे धंदा हा व्यवहार मला आतां कळून आला.

डॉक्टरांचा निरोप घेऊन मी मार्गस्थ झालों. घरीं येतांच आरामखुर्चीवर अंग टाकलें तों सुधेची मूर्ति माझ्या नजरेसमोर उभी राहिली. मनाला विरंगुळा पडावा म्हणून मी जवळच पडलेल्या मासिकांतील तिच्या प्रकाशित झालेल्या गोष्टी वाचूं लागलों. समान आवडीच्या वधूवरांचें आयुष्य सुधेनें आपल्या कल्पनेनें भिन्न भिन्न प्रसंगांतून रेखाटलें होतें. विषम आवडीच्या पतिपत्नींचें जीवन कसें होईल हें तिला समजावयाचे होतें.

श्रीयुत सुधीर हे सतत पांच-सात मोहिमा करून एल्. सी. पी. एस्. डिग्री हस्तगत केलेले एक डॉक्टर असून त्यांचा स्वभाव घडवतांनाच परमेश्वरानें असा घडवला होता, कीं कोणत्याहि सुसंस्कृत स्त्रीला तो दुःसह व्हावा. साहित्याचा त्यांना मनापासून तिटकारा होता. संगीतांत ते औरंगजेबाच्याहि पुढले होते. कोणाचेंहि अंतःकरण हालविणारें गायन त्यांचें डोकें भडकविण्यास कारण होई. साहित्य आणि संगीत म्हणजे एक नाद आहे असें ते अट्टाहासानें आपल्या दवाखान्यांत प्रतिपादन करीत. धूम्रपानाचे ते मार्मिक शौकिन होते. 'सीझर', 'एलिफंट', 'सिल्व्हर क्लाउड्स' यांमधील सूक्ष्म भेद ते दवाखान्यांत येणाऱ्या तुरळक रोग्यांना

समजावून सांगत. धूम्रपान हा विषय त्यांच्या अत्यंत आवडीचा. या विषयावर ते तासचे तास बोलत राहत. त्या वेळी त्यांना हातांतल्या प्रिस्क्रिप्शनचें आणि अर्थातच औषधांच्या प्रमाणाचें बिलकुल भान राहत नसे. कित्येकाची प्रकृतीच अशी असते, कीं धूम्रपान त्यांना पोषक होतें—नव्हे अत्यंत आवश्यक असतें, असा शोधहि त्यांनीं आपल्या डॉक्टरी ज्ञानांतून लावला होता.

सिगारेट दृष्टीस पडली कीं सुधेचें डोकें गरगरूं लागे, हें मला माहीत होतें. डॉक्टरांसाठीं सुधा आपलें साहित्य-संगीत विसरून जाईल याविषयीं मला संशय नव्हता. सुधेसाठीं डॉक्टर आपलें धूम्रपान सोडतील का? हा विचार मनांत येतांच मला हसूं आलें. सुधेसाठीं डॉक्टर आपलें धूम्रपानाचें व्यसन सोडणार? तसें झालें तर ते डॉक्टर कसले!

*　　　　*　　　　*

क्षणाचा अवकाश. समोरून येणाऱ्या मोटारखालीं सुधीरांचा चेंदा-मेंदाच व्हायचा. मीं खसूकन त्यांना बाजूला ओढलें म्हणून निभावलें!

"काय हें डॉक्टर? आकाशांत पाहून चालायची पद्धत तरी काय ही? वर जायचा रस्ता पाहत होतां वाटतं?" मीं त्यांना बाजूला ओढून विचारलें.

"तें तुम्हांला नाहीं इतक्यांत कळायचं." डॉक्टर मनसोक्त हसून म्हणाले, "तें कळायला चतुर्भुज व्हावं लागतं. तुमची अजून प्रेमाशीं ओळख झाली नाहीं. ती ओळख झाली म्हणजे या गोष्टी कोणी न सांगतां समजूं लागतात."

"म्हणजे?"

मीं वर पाहिलें. डॉक्टरांच्या खिडकींत मला कोणींच दिसलें नाहीं.

"आमच्या राणीसरकारांची स्वारी आंत गेली. काय करावं? अझून हिची लाज कांहीं कमी होत नाहीं. तुम्हांला पाहिल्याबरोबर आंत गेली. आतां काय सांगणार? तशी आहे मोठी हुशार; परंतु प्रेम कसं करावं हें कांहीं अझून तिला कळत नाहीं. त्या बाबतींत मठ्ठ आहे डोकं. आमचं असं ठरलं आहे, कीं मी जाण्याच्या आणि येण्याच्या वेळीं तिनं खिडकींत उभं राहिलं पाहिजे. बस्स्, तिच्याकडे पाहत जायचं, तिच्याकडे पाहत यायचं—खूऽऽष!"

मी चकितच झालों. डॉक्टरसाहेब सरळ दवाखान्यांतून आले, कीं ठाण्याला जाऊन आले याचा मला उमज पडेना. मीं विचारलें, "त्या-साठीं वर पाहत येत होतां वाटतं? आणि मोटारखालीं सापडलां असतां म्हणजे मग? सुधाताई तुम्हांला वरती गेल्यावर दिसली नसती का?"

"ती दिसली असती हो, पण प्रेम कसं दिसलं असतं? आतां कसं सांगूं तुम्हांला? अहो हें प्रेम आहे."

आतां मात्र मला हसूं आवरेना. डॉक्टरांना एक अद्वितीय, रूक्ष मनो-वृत्तीचा मनुष्य समजतां समजतां या वठलेल्या वृक्षालाहि पालवी फुटल्याचें पाहून मला चमत्कार वाटला. डॉक्टर आणि प्रेम! या उभयतांचा संयोग झाला तरी कधीं याचा मी विचार करूं लागलों.

"अहो, विचार कसला करतां? चला, वर येतां ना?" असें म्हणून डॉक्टर मला ओढूं लागले.

इतक्यांत एक भिकाऱ्याचा मुलगा सारंगी वाजवीत आपल्या लहानग्या बहिणीसह आमच्यापाशीं येऊन थबकला. ती मुलगी गात होती, आणि तो मुलगा आपल्या सारंगीची तिच्या कर्णमधुर गायनाला साथ देत होता. त्या मुलीचा मंजुळ आवाज त्या सारंगीच्या सुराशीं इतका एकजीव होऊन जात होता, कीं तो ऐकून माझें लक्ष तिकडे वेधलें. परंतु ते मंजुळ स्वर कानीं पडतांच डॉक्टरांचा पित्तप्रकोप प्रकट झाला. ते वसूकन त्या भिकाऱ्याच्या अंगावर जाऊन ओरडले, "अरे ए, काय गोंगाट लावला आहेस! चल हट येथून— हट, नाहीं तर गटारांत फेकून देईन तें तुणतुणं."

डॉक्टर बोलल्याप्रमाणें करण्यास चुकावयाचे नाहींत या भीतीनें तें पोर आपल्या बहिणीला हाताशीं धरून लगबगीनें निघून जाऊं लागलें. मी आपले खिसे चांचपले आणि हाताला मिळालें तें—अधेलीचें—नाणें घेऊन त्याच्याकडे त्वरेने फेकले.

"अहो कशाला घालतां या भिकाऱ्यांना? या पैशांवर तो आणखी पांचपन्नास माणसांचं डोकं उठवणार. या ऐदी लोकांना काम करायला नको आणि फुकटची भीक पाहिजे. चला." असें म्हणून डॉक्टरांनीं मला मी नाखुषी दर्शवीत असतांहि जिन्याकडे ओढलें.

आम्ही वर जातों तों सुधाताई स्वैंपाकाच्या खोलीच्या दरवाजाशीं उभी

असलेली दिसली. मला पाहतांच तिनें सहास्य मुद्रेनें म्हटलें, "काय रमाकान्त, इथं यायला आज फावलं वाटतं तुला ? कसल्या कामांत गुंतला आहेस सध्यां ? कादंबरी लिहीत आहेस, कीं एखादं नाटक लिहायला घेतलं आहेस ?"

इतक्यांत डॉक्टरांची नजर पलंगावर निजलेल्या त्यांच्या पांच वर्षांच्या भावाकडे गेली. त्याबरोबर डॉक्टर संतापले.

"कोण—कोण निजला आहे हा इकडे ? किती वेळां सांगितलं आहे, कीं इकडे बसूंदेखील नको म्हणून. चल ऊठ." असें म्हणत डॉक्टरांनीं त्या मुलाला दंडाला धरून वर उचललें व खालीं जमिनीवर आपटलें.

जोराचा मार लागल्यामुळें तें मूल कळवळून रडूं लागलें. सुधेनें चट्कन त्याला कटिखांदीं घेतलें व विचारले, "झालं काय अंमळ त्याच्यावर झोंपला तर ? लोखंडाचाच आहे पलंग तो. सोन्याचा नव्हे कांहीं."

"बरं-बरं ! शहाणपणा नको तुझा. त्याचे पाय पहा ना. सारखा दिवसभर खेळत असतो. पायदेखील धूत नाहीं. सगळा कचरा पलंगावर. गलिच्छ कुठला !"

सुधा मुकाट्यानें त्या मुलाला घेऊन आंत गेली.

"मी स्वच्छतेचा फार भोक्ता आहें." डॉक्टर म्हणाले, "आणि मला जरा कांहीं अव्यवस्थित झालेलं खपायचं नाहीं. स्वच्छता आणि शिस्त हें माझं Ideal आहे."

डॉक्टर आपल्या घराला एखादा मिलिटरी कॅंप समजत असावे असा मला जबर संशय आला. मी तसें त्यांना विचारणार, तों त्यांनीं सुधेला हांक मारली. सुधा दरवाजांत येऊन उभी राहतांच त्यांनीं आपला कोट तिच्याकडे दिला व ते पायांतील बूट काढूं लागले. सुधेनें तो कोट घेऊन 'हॅंगर'ला व्यवस्थित लावला व डॉक्टराचे बूट घेऊन ब्रशानें त्यांवरची धूळ झटकली.

"हें काय ?" मीं स्तिमित होऊन विचारलें.

"हें प्रेम आहे, समजलांत रमाकान्त, हें प्रेम आहे ! हें प्रेम नंबर दोन." असें म्हणून डॉक्टर सुधेकडे पाहून हसूं लागले. सुधेनें ते बूट पुसून शेल्फवरील कागदाच्या पेटींत ठेवून दिले, व ती टेबलाला टेकून उभी राहिली. तिची हालचाल व तिच्या चेहऱ्यावरील फेरफार मी लक्षपूर्वक पाहत होतों. सुधेच्या चपला जवळच असून त्यांच्यावर बरीचशी धूळ पडलेली दिसत होती.

त्या चपला या डॉक्टरांनीं 'शिरोभूषणासारख्या मस्तकीं धारण कराव्या अशी जिची योग्यता त्या सुधेला त्यांनीं आपले बूट पुसण्यास सांगावें हें विधि-लिखित विलक्षण होतें ! परंतु डॉक्टर आपल्या मतें हें सर्व प्रेमानें करीत होते हें मात्र मी विसरलों नाहीं. त्याच जाणिवेनें मीं त्यांना विचारलें,

" डॉक्टर, प्रेमानं तुम्ही कधीं सुधेच्या चपला पुसतां का ? "

" काय प्रश्न केलास हा ? आणि म्हणे लेखक. स्त्रियांनीं पतिसेवा करायची असते, हा आर्यस्त्रीधर्म तुला अवगत नाहीं का रमाकान्त ? "

सुधेनें या सूचक प्रश्नानें माझ्या प्रश्नाबद्दल आपली नापसंती व्यक्त केली; परंतु तेवढे भान न राहून मीं उत्तर दिलें, " आर्यस्त्रीधर्माचा आतां-पर्यंत इतका बेसुमार गवगवा झाला आहे, कीं आर्यपुरुषधर्म कोणता तो त्यामुळें अज्ञातच राहिलेला आहे."

" मी सांगतों कोणता तो," डॉक्टर सुधीर बोलते झाले, " आर्य-स्त्रीधर्माच्या सेवेनं जो संतुष्ट होतो तो आर्यपुरुषधर्म."

असें म्हणून डॉक्टर खो-खो हसूं लागले. सुधेला हा विषय अप्रिय होत असावा हें मीं तिच्या चर्येवरून जाणले. ती तेथून जाऊं लागली.

" कुठं चाललीस ? " डॉक्टरांनीं विचारलें.

" चहा ठेवायला."

" चहा सावकाश ठेवला तर नाहीं चालणार ? त्यापूर्वी किती कामं आहेत ? रोजचीं कामंदेखील तूं विसरत चाललीस. असं तुला आज झालं आहे तरी काय ? का रमाकान्त आल्यामुळं बावरलीस ?"

सुधेनें कांहीं न बोलतां लटकेंच हास्य करून दांडीवर वाळत असलेलें धोतर खालीं ओढलें व त्याच्या निऱ्या काढण्यास सुरवात केली. डॉक्टरांचे दोन्ही हात शाबूत असतांना त्यांनीं सुधेला हें काम देण्याचें कारण माझ्या ताबडतोब लक्षांत आलें. मीं विचारलें, " हें प्रेम नंबर तीन वाटतं ? "

" हाः हाः हाः हाः हाः ! " डॉक्टर केवढ्या तरी मोठ्यानें हसले. मीं सुधेकडे पाहिलें आणि दचकलों. कोठून हा प्रश्न विचारला असें झालें मला. तितक्यांत डॉक्टर म्हणाले, " तुम्ही शिकून घ्या हें एक एक. समजलेत का ? बाकी त्यांत शिकायचं काय आहे म्हणा. दोन हातांचे चार हात झाले कीं आपोआप समजतं तें. एकदां 'ती' दिसली कीं पटापट सुचत जातं असं हें शास्त्र आहे. अहो, तो कांहीं आमच्या मेडिकलसारखा ठराविक

मुदतीचा कोर्स नाहीं. काय समजलांत ? आणि तशांत तुम्ही लेखक. तुमची कल्पना आधींच तयार असते. तुम्ही आमच्यावर ताण करणार. खरं कीं नाहीं ? "

उत्तर दिलें तर डॉक्टरांचें प्रेमशास्त्र आणखी वाढेल या भीतीनें मी स्तब्ध राहिलों. इतक्यांत त्यांना आठवले,

" अरे हो ! विसरलोंच तें अगदीं. ऐकलंत रमाकान्त, आमच्या राणीसरकारसुद्धा लेखिका आहेत, समजलांत ? तुमचा एवढा डौल नको. अहो, लग्न झाल्या दिवसापासून लेखन वर्ज्य केलं होतं. पण मला ही बातमी समजल्यानंतर मी स्वस्थ कसा राहीन ? एकसारखी चार दिवस कानींकपाळीं ओरड केली, तेव्हां कुठं एक गोष्ट लिहिली आहे. जा ग, दाखव ती यांना. मला माहीत नव्हता इतके दिवस हा गुण ! ! "

" तुम्हांला काय माहीत आहे डॉक्टर ? चौदा विद्या आणि चौसष्ट कला तिच्या सेवेला दक्ष आहेत. ती लेखिका आहे हें तुम्हांला माहीत नसेल, परंतु महाराष्ट्रीय वाचकांना ही गोष्ट अज्ञात नाहीं. सुधाताईच्या गोष्टींमुळं कित्येक मासिकं अमर झालीं आहेत ही मुद्द्याची गोष्ट तुम्हांला माहीत नसली तरी महाराष्ट्रांतले संपादक आणि प्रकाशक अंतर्यामीं जाणून आहेत."

" मला हा तोंडपुजेपणा आवडत नाहीं बरं का रमाकांत." सुधा रागाचा आविर्भाव दाखवून म्हणाली.

" पाहिलंत डॉक्टर ? स्तुतिदेखील हिला आवडत नाहीं. विद्यावंतांचंच लक्षण आहे हें."

" मी आतां अगदीं भांबावून गेलें आहें."

" सुधाताई ज्याच्या ज्याच्या सहवासांत येईल त्याला त्याला भांबावून सोडील; आहेच तशी ती."

" तिला दिलरुबा वाजवितां येतो हें तुम्हांला माहीत आहे का ? "

" काय म्हणतां ! वा ? हें नव्हतं मला माहीत." मी त्याविषयीं अज्ञान दाखवून म्हणालों.

" घे ग तो दिलरुबा, रमाकान्तांना तुझी कला तरी दिसून येऊं दे."

" त्याचं काय ऐकायचं तें ? मुलखाचा लबाड आहे तो. सगळं माहीत आहे त्याला."

" छे-छे-छे ! सगळं माहीत असलं तरी ही दिलरुब्याची भानगड आतांच कळते आहे मला." मी उभयतांकडे आळीपाळीनें पाहत म्हणालों, " डॉक्टर, तुम्हांलाहि दिलरुब्याची आवड आहे ? "

" आहे म्हणजे ? त्यांत एवढं आश्चर्य कसलं वाटलं तुम्हांला ? अहो, मला एकहि कला येत नसली तरी साऱ्या कलांची आवड भरपूर आहे. तसा मार्मिक आहें हं मी. अगदीं कांहीं हा नाहीं. हं, चल घे तो दिलरुबा."

" अशी आल्यागेल्याकडे माझी जाहिरात करणं बरं दिसतं का ? अशानं जग थट्टा नाहीं का करणार ? "

" जगाचा संबंध काय यांत ? चल ऊठ."

" डॉक्टरांचा संगीताशीं असलेला उभा दावा मला माहीत असल्यामुळें त्यांची आजची कृति पाहून साहजिकच विस्मय वाटला. हें वळचणीचें पाणी आढ्याला कसें गेलें याचा मी शोध घेऊं लागलो तों मला हें कोडें उलगडलें. आतां मी समजून चुकलों, कीं हें प्रेम नंबर चार आहे ! आपली सहधर्मिणी अशी सर्वगुणसंपन्न आहे हे जगापुढें प्रदर्शित करण्याचा डॉक्टरांचा अट्टाहास होता. स्वतःचा मोठेपणा अंगीं नसल्यामुळें पत्नीपासून मोठेपणा मिळविण्यांत त्यांच्या शौर्याची सीमा होत होती. सुधेच्या आवडीप्रमाणें ते साऱ्या गोष्टी तिच्याकडून करवून घेत होते. परंतु त्यांत उद्देश मात्र निराळा होता. त्यापासून सुधेला सुख होण्याचें दूरच राहिलें, उलट त्रासच होत असल्याचें मला दिसून आलें. तिच्या कृतींत जिव्हाळा मुळींच नव्हता. एखाद्या यान्त्रिक बाहुलीप्रमाणें मला तिची हालचाल वाटली. डॉक्टरांनीं फारच आग्रह केल्यामुळें तिनें दिलरुबा घेतला व त्यावर गज फिरविण्यास प्रारंभ केला.

हाय ! करुण--अत्यंत करुण स्वर घेतले तिनें. मी खुर्चीवर मागें टेकून तिच्याकडे पाहत राहिलों. इतक्यांत माझी नजर वर गेली. वीणा घेतलेली सरस्वतीची तसबीर सुधेच्या मागें भिंतीवर लटकत होती.

" कां, कसं आहे वादन ? "

किती कर्कश स्वरांत प्रश्न आला हा ? डॉक्टरांनीं उतावीळपणें प्रश्न करून माझ्या तंद्रीचा भंग केला. वादन कोणत्या दर्जाचें आहे तें समजण्याविषयीं ते फारच अधीर झालेले दिसले. मी त्यांना हातानें गप्प

राहण्याबद्दल खूण केली व ऐकूं लागलों. सुधा माझ्याकडे किंवा डॉक्टरांकडे मुळींच पाहत नव्हती. तिची दृष्टि अंतर्मुख होती. तिची मुद्रा गंभीर दिसत असली तरी तिच्या हृदयांत निराशेचें किती भयंकर तुफान चाललें आहे याची कल्पना मला त्या वाद्यांतील सूर देऊं लागले. हृदयांत खोल दडपून टाकलेल्या इच्छा, भावना, आकांक्षा त्या तंतुवाद्याच्या सुरांतून स्वयंस्फूर्तीनें उचंबळून येऊं लागल्या. आतांसारखें तिचें वादन मीं पूर्वी कधींच ऐकलें नव्हतें. निव्वळ वाद्यांत इतका करुण रस निर्माण करण्याचें सामर्थ्य असेल अशी कल्पना नव्हती. परंतु आज सुधेनें आपलें अंतःकरणच त्यांत ओतून माझ्या डोळ्यांत अश्रु उभे केले. तिची नजर नाहींसें पाहून मीं हातरुमालानें डोळे पुसले; पण तें तिला समजलें असावें. कारण त्याच वेळीं तिचेहि डोळे आर्द्र झाल्याचा मला संशय आला. डॉक्टरांवर या वादनाचा काय परिणाम होत असावा तें जाणण्यासाठीं मीं त्यांच्याकडे पाहिलें तों त्यांनीं भुवया चढवून प्रश्न केला, " कां ? झाली खात्री ? अहो, बसण्याची ढबच पाहून घ्या. और आहे, नाहीं ? बोटं पहा कशीं फिरताहेत तीं. वा वा ! झकास ! ! "

डॉक्टरांचे नेहमींप्रमाणें तारे तुटले. माझ्यापुढें प्रश्न उभा राहिला, हें दुर्दैव डॉक्टरांचें कीं सुधेचें ? पण विचार करावयास अवकाश कुठला ? लागलीच प्रश्नाची दुसरी फैर झडली.

" एकंदरींत कसं आहे वादन ? नामांकित वादनपटूंच्या तोंडांत मारील कीं नाहीं ? "

डॉक्टरांनीं आपल्या दोन-तीन वेंचक प्रश्नांनीं सुधेच्या करुण रसाचेंहि हसें केलें. बिचारी सुधाताई ! भरधाव चाललेल्या गाडीला मध्येंच ब्रेक लावावा त्याप्रमाणें तिनें आपलें वादन थांबविलें. तरीहि डॉक्टरांनीं तिला हातानें इशारा करून म्हटलें, " ब ऽ स ! पुरे आतां."

सुधेनें दिलरुबा ठेवून दिला व माझ्याकडे पाहिलें. मी पुन्हा दचकलों. आतां ती मला अत्यंत आनंदी दिसली. दिलरुबा वाजवतांना चेहऱ्यावर उमटत असलेले उदासीनतेचे भाव तिनें सफाईनें पालटले होते. माझी बावरलेली स्थिति पाहतांच ती अधिकच हसूं लागली.

" का रमाकान्त, कसं काय झालं आमचं वादन ? " टेबलावर आपले दोन्ही हात टेकून व किंचित् वांकून तिनें हसतच आतां स्वतः प्रश्न केला.

" का हो, उत्तर द्या कीं." डॉक्टर बोलले, " फर्स्ट क्लासमध्यें येईल कीं नाहीं ? "

" सुधाताईला क्लासच नाहीं." असें उत्तर देऊन मीं डॉक्टरांकडे पाहिलें. मला मोठा धक्का बसला. सुधेच्या कलानैपुण्याचें डॉक्टरांच्या घरीं चीज होणें अशक्य आहे याची मला खात्री पटली.

" मला सर्वगुणसंपन्न सहचारिणी मिळेल असा पत्रिकेंतच योग होता." डॉक्टर म्हणाले, " हिचं नशीब असं थोर म्हणून माझ्या पत्रिकेंत तसा योग आला; आणि म्हणूनच हिला आमच्या घरीं घेऊन आलों. म्हटलं चल ये– हो, कारण मला माहीतच ना, दुसऱ्या कोणाच्या घरीं हा मुखचंद्र तेजोहीन झाला असता."

ज्योतिषशास्त्रांत रंगूं लागलेले डॉक्टर मला राहूसारखे भासूं लागले. सुधेचा स्वीकार करण्यांत आपण तिच्यावर डोंगराएवढे उपकार केले आहेत असें डॉक्टर पुनः पुन्हा इतकें ठांसून सांगूं लागले, कीं त्यांची ती बडबड मुकाट्यानें ऐकून घेतांना व त्यांच्या होस हो देतांना माझ्या अंतःकरणाला यातना होऊं लागल्या. मोठी परीक्षा देण्यासाठीं विलायतेची सफर करणार होतां त्याचें काय झालें, असा प्रश्न करून स्वार्थत्यागाच्या आवरणाखालीं ते झाकीत असलेलें लोभी मन उघडें करावें असा विचार माझ्या मनांत आला; पण सुधेकडे पाहून मीं आत्मसंयमन केलें. वरून आनंदी दिसण्याचा ती जिवापाड प्रयत्न करीत असली तरी मधूनमधून तिच्या चेहऱ्यावर अंमल गाजविणारी विषण्णतेची छाया माझ्या नजरेंतून निसटूं शकली नाहीं. मीं आवेगानें म्हटलें, " डॉक्टर, तुम्ही सुधाताईच्या आयुष्यनौकेचे कर्णधार आहांत. तिच्या गुणांचा विकास करणं आतां सर्वस्वीं तुमच्या आधीन आहे."

" अहो, म्हणून तर तिला या घरांत आणली. तिचं नशीब थोर म्हणून या घराची मालकी मिळाली. विचारा तिला तिच्या मनाप्रमाणं इथं साऱ्या गोष्टी होताहेत कीं नाहींत तें."

खरेंच ! सुधेच्या आवडीप्रमाणें साऱ्या गोष्टी चालल्या होत्या. पण त्या आचरतांना तिला पूर्वीसारखा आनंद न होतां वीट येत असल्याचें मला दिसून आलें. तिच्या अंतरीचा भाव जाणण्याचें सामर्थ्य डॉक्टरांच्या

वैद्यकीय ज्ञानांत नव्हतें. डॉक्टरांचा थोडासा सहवास माझ्यासारख्या त्रयस्थालासुद्धां असह्य होत असे. त्यांच्या सतत सहवासांत सुधेची काय स्थिति होत असेल, सुधा ही स्थिति कशी सहन करीत असेल याची मला कल्पनाहि करवेना. असलें स्वारस्यहीन आयुष्य वेंचण्याकरितांच जर तिचा जन्म होता, तर तिला अशी गुणसंपन्न करण्यांत परमेश्वराचा काय हेतु असेल बरें? मला आतां जास्त वेळ तेथें बसवेना. मी घरीं जावयास उठलों.

"कां हो चाललां?" डॉक्टरांनीं विचारलें, "बसा, चहा घेऊन जा कीं."

"चहा घेण्यासाठीं पुन्हा कधीं तरी येईन. आतां मला काम आहे. जातों मी."

"या बरं लेखक!—या!" सुधा मला नमस्कार करून म्हणाली, "रमाकान्त, तुझ्यासारखे सरस्वतीभक्त जवळ आहेत म्हणूनच या जगांत जगण्यांत स्वारस्य आहे."

मी दिङ्मूढ झालों. हृदयाची संवेदना ती इतकी हसत कशी सांगूं शकते याचा मला अचंबा वाटला. तिची ती विलक्षण चित्तशान्ती पाहून माझ्या डोळ्यांत पाणी तरंगूं लागलें. माझ्या मनांत कसले विचार चालले असावेत हें तिनें जाणलें व ती हसूं लागली.

आतां मला तिच्या हास्याचा अर्थ पटला. तो अर्थ पटतांच मलाहि हसूं आलें. मी स्वतःशींच हसून म्हणालों, "लिखितमपि ललाटे प्रोज्झितुं कः समर्थः!!"



## लक्ष्मी : : ५२

किसनरावाजवळ चांगला पैसा होता. त्याचा उद्योगधंदा चांगला चालत होता. पण सज्जनपणा कसा तो ठाऊक नव्हता. पैशाची मस्ती जबरदस्त. त्याच्या जिभेला तर हाडच नव्हतें. कोणाला, कुठें, काय बोलेल त्याचा नेम नाहीं. खऱ्याखोट्याची किंवा नीति-अनीतीची पर्वा करणारा मनुष्य तो नव्हता. लोकांच्या मनाची किंवा मानाची प्रतिष्ठा त्याच्याजवळ

नसे. त्यांतून जो थोड्याफारानें त्याचा मिंधा झाला त्याचेवर किती लाचारी लादावी याला सीमाच नसे. म्हणेल तें हट्टानें करणार, मग तें कांहीं असो. शिवीगाळीचा त्याचेपाशीं हिशेबच नसे. त्यांतच त्याला निशापाण्याची खोड होती.

श्रीपतीला किसनरावाचें कांहीं देणें होतें. कामधंदा नीट नसल्यामुळें श्रीपतीला बरेच दिवसांत कांहीं देतां आलें नाहीं. त्यामुळें तो बिचारा किसनरावाच्या तावडींत चांगलाच सांपडला होता. त्यांतच श्रीपतीनें दोन-तीन वेळां केलेले वायदे चुकले होते.

काल संध्याकाळीं किसनराव काठण पेरलेल्या आपल्या शेतावर गेले होते. तेथें जातात तों जवळच्या महारांचीं गुरें त्यांच्या शेतांत घुसलीं असल्याचें त्यांनीं पाहिलें. ताबडतोब तीं गुरें धरलीं. तसें पाहिलें तर शेताचें म्हणण्यासारखें कांहीं नुकसान झालें नव्हतें. पण गुरांचे मालकांना किसन-रावांनीं शिव्यांची लाखोली वाहिली असेल. त्या बिचाऱ्यांनीं किती विनवणी केली, किती वेळां पायां पडले, अगदीं रडकुंडीला आले; पण किसनरावाला त्यांची दया आली नाहीं. त्यांनीं त्या 'चोरांना' चांगली अद्दल घडावी म्हणून तीं सर्व गुरें सरकारी कोंडवाड्यांत घातलीं.

नंतर सूर्यास्तानंतर कांहीं वेळानें निशापाणी करून घरीं जातां जातां सहज श्रीपतीचें घर लागलें, तेव्हां किसनराव त्याचे घरांत गेले. श्रीपती घरीं नव्हता. लक्ष्मीनें अजून घरीं न आल्याचें सांगितलें. किसनरावाच्या तोंडाला फाटा फुटण्यास वेळ लागत नसे. धुंदींत चीड येण्यासारख्या शब्दांचा त्यांनीं नुसता भडिमार केला. लक्ष्मीला तें सहन झालें नाहीं. तिनें तें गप्प राहून ऐकून न घेतां 'पैसे द्यायचे असले म्हणून वाटेल तें बोलाल काय ?' इत्यादि प्रत्युत्तरें दिलीं. त्यांत शब्दानें शब्द वाढला आणि शेवटीं श्रीपती, देणें, वायदे हें सर्व बाजूस राहून किसनराव तोंडास आले ते अपशब्द लक्ष्मीला बोलले. शेजारीपाजारी जमा झाले. त्यांनीं मोठ्या मुष्किलीनें किसनरावांना तेथून काढलें म्हणून बरें झालें. नाहीं तर काय झालें असतें कांहीं सांगतां येत नाहीं.

किसनरावाची व लक्ष्मीची खूपच खडाजंगी झाली. लक्ष्मीसारखें तोंडावर निर्भयपणानें फटकावून बोलणारें किसनरावांना अजून कोणी भेटलें नव्हतें. 'अरे जा मेल्या'—अशा आरंभानें उत्तर देऊन किसनरावांच्या

सर्व धमक्यांचा तिनें नुसता धुव्वा उडवून दिला. 'कांहीं असो, पण आज लक्ष्मीनें किसनरावाची भली खोड मोडली. वाघीण आहे !' असें जो तो आपल्या मनांत म्हणाला.

रात्रीं घरीं आल्यावर श्रीपतीला सर्व प्रकार समजला. लक्ष्मीची संतप्त स्थिति पाहून तिच्या समाधानाचें तेव्हां काय बोलावें हें त्याला कळेना; काय करावें हें सुचेना. ही आतां माझें कांहीं ऐकणार नाहीं, उलट अधिक संतापेल म्हणून तो गप्प बसला. बिचारा आपले मनाशीं अगदीं चूर होऊन गेला होता. लक्ष्मीची बडबड चाललीच होती. तिला वाटत होतें, कीं याला कांहींच चीड आली नाहीं.

त्या रात्रीं कोणालाच्च झोप लागली नाहीं. दुसरा दिवस उजाडला, तरी त्या नवराबायकोपैकीं दोघांच्याहि मनांतला अंधार अजून तसाच होता. आगहि अजून विझाली नव्हती.

* * *

सकाळची शान्त वेळ, पण लक्ष्मी अत्यंत संतप्त होती. सकाळच्या वेळीं घरांतलीं कामें करण्यांत ती नेहमीं गर्क असायची; पण आज तिला त्या कामांची कांहीं फिकीर नव्हती. कामांची म्लान व मलिन स्थिति पाहून तिला त्यांची जरासुद्धा दया आली नाहीं. लहान मूल रडत होतें त्याला तेवढें कसें तरी तिनें घेतलें होतें. कोणाला आश्चर्य वाटेल, पण त्या मुलाला, आई असून कांहीं आईच्या मायेनें आज तिनें घेतलें नव्हतें.

दारापुढे उन्हें आलीं होतीं. त्या उन्हांत ती मुलाला घेऊन उभी होती. थंडीच्या दिवसांत दारापुढल्या उन्हाचा जो आनंद व जें सुख असतें, तें आज तिला मुळींच वाटत नव्हतें. त्या उन्हाकडे तिचें लक्षच्च नव्हतें. बिचारें लहान मूल गारठलें आहे, त्याला कोवळया ऊबदार उन्हांत चौघडींत गुरगुटून बसवावें, तेंहि तिनें केलें नाहीं.

थांबून थांबून पण सारखें तिचें तोंड चाललें होतें. पेटलेल्या अग्नींतून जशा ज्वाळा निघाव्या त्याप्रमाणें तिच्या संतप्त मनांतून जळजळीत शब्द तोंडावाटे बाहेर येत होते. 'मेल्याचं वाटोळं होईल......पैशाचा लई माज आला आहे...मला असं म्हणतो—जीभ झडेल......' लक्ष्मीचें बोलणें अक्षरशः येथें लिहिणें अयोग्य होईल. लिहिण्याला पांढऱ्यावर काळें म्हणतात; पण तें काळेंसुद्धां पुनः पांढरें असावें लागतेंच.

तें कांहीं असो, पण लक्ष्मीचें बोलणें जर कोणीं ऐकलें असतें तर तिच्या अश्लील शब्दांचें त्याला कांहीं वाटलें नसतें. तिचा सर्व संताप कि[ती] सात्त्विक आहे हे तेव्हांच कळून आलें असतें; आणि लक्ष्मी-विषयी अत्यंत आदर वाटला असता.

लक्ष्मी आज शुद्धीवर नव्हती हेंच खरें; एरवीं नेहमीं सर्वांशीं गोड बोलणारी लक्ष्मी आज सगळयांना वसावसा करीत होती. लक्ष्मी उन्हांत उभी होती तेव्हां लांबच्या गांवाहून डोक्यावर लांकडांचा भारा घेऊन एक बाई रस्त्यावरून चालली होती. तिची दहा-बारा वर्षांची मुलगी भारा घेऊन पुढें गेली होती, म्हणून तिनें सहज लक्ष्मीला विचारलें 'पोरगी गेली का व मोऱ्हं ? पाहिलीव का ? ' लक्ष्मीनें मोठ्या झटक्यानें उत्तर दिलें, 'कुणाला ठावं गेली कीं नाय ! ' त्या बाईला तें त्रासिक उत्तर कसेंसेंच वाटलें. 'का व लक्सुमबया असं' इतकेंच बोलून ती बिचारी पुढें निघून गेली.

श्रीपती अजून घरींच होता. दाराबाहेरच्या अरुंदशा ओट्यावर भिंतीला टेकून थोडेंसें ऊन खात तो बसला होता. जुना विटका जरीकांठी रुमाल त्यानें कानांवरून बांधला होता. शिवाय वरून उपरणें घेऊन तें गळयाशीं गुंडाळलें होतें. अंगांत कोट घातला होता, त्याच्या गुंडया लावल्या नव्हत्या. कोटाची पुढली एक बाजू आंतून आणि दुसरी वरून दाबून बसवून दोन्ही हातांना तिढा घालून पंजे बगलेंत धरले होते. पायांनाहि गच्च तिढा घालून फार उंच नसलेल्या ओट्याखालीं त्यानें आपले पाय अर्धवट लांबविले होते.

शेजारींच उन्हांत मुलाला घेऊन लक्ष्मी उभी होती. आणि तिची राहून राहून सारखी बडबड चालली होती. श्रीपती अगदीं गप्प बसला होता. जणुं कांहीं त्याला कांहीं ऐकूंच येत नव्हतें. आपण कांहीं बोललों तरी तिचा राग शान्त होणार नाहीं, उलट अधिकच भडकेल, असा विचार करून त्यानें निश्चय केला होता, कीं ऐकलें न ऐकलें करायचें. पण त्याचाहि परिणाम अनिष्टच होत होता. लक्ष्मी अधिकाधिक खवळूनच बोलत होती. नाहीं म्हटलें तरी, त्या बोलण्यानें श्रीपतीच्या मनाची खळबळ होत होती; आणि ती खळबळ जेव्हां तो तोंडांतल्या विडीची अंगावर कोठें पडली न पडलेली राख झाडण्याची बतावणी करी तेव्हां स्पष्ट दिसत होती. आणि त्यामुळेंच कीं काय न कळे, पण लक्ष्मीचा संतापाग्नि अधिक झगझगीत मात्र होत होता.

अशा स्थितींत फार वेळ बसून राहणें श्रीपतीला अशक्य होतें. तो उठला, घरांत गेला; आंत किंचित् घोटाळला, आणि दारापासचें पायतण पायांत घालून थोडासा दाराचे पुढें येऊन डावा हात कोटाच्या बाहेरच्या खिशांत आणि उजव्या हातानें दांतांत एक काडी धरून पुनः उभा राहिला. कोठें जायचें, काय करायचें याचा कांहींहि निश्चय केलेला नाहीं हें त्याच्या स्तब्धतेवरून स्पष्ट दिसत होतें.

इतक्यांत मध्यंतरीं लक्ष्मी घरांत जाऊन दाराचे आंत उभी राहून त्याची एकंदर हालचाल पाहत होती.

श्रीपतीचा बाहेर जायचा बेत ओळखून लक्ष्मी एकदम वाघिणीसारखी चवताळून म्हणाली,—'रात्रीधरून मी बोलतें आहें. तुम्ही पुरुष, पण एक शब्द बी बोलत नाहीं—' एक क्षणभरच आपणांस कांहीं उत्तर मिळतें कीं नाहीं हें पाहून ती पुढें म्हणाली, 'माझं डोकं लई फिरून गेलं आहे बघा. तुम्हांला त्याचं कांहीं नाहीं.'— तरीसुद्धां श्रीपती कांहीं बोलला नाहीं. त्याला न कळत तो दोनतीन पावलें पुढें सरला. गर्हिवरून आलेली लक्ष्मी एकदम अधिकच संतापून म्हणाली,

"बायकोला वाईट शब्द बोलल्याचं ऐकून तुमच्या जिवाला कांहीं वाटत नाहीं ?"

लक्ष्मी थोडी अडखळली तसा श्रीपतीहि अडखळला. पुढें लक्ष्मी बोलून गेली, "जा बाहेर—जातां ना, जा—माझं मी पाहून घेईन !"

दिङ्मूढ झालेला श्रीपती कोठल्या तरी दिशेनें बाहेर निघून गेला.

* * *

श्रीपतीला कुठें जावयाचें होतें हे त्याचें त्यालाच माहीत नव्हतें. तो चालत होता इतकेंच. रात्रीच्या प्रकाराचा जाब विचारण्यासाठीं किसन-रावाकडे जाण्याचें त्याचे मनांतहि आलें नाहीं. फार काय, किसनरावाच्या घराकडील रस्त्यानेंसुद्धां तो जात नव्हता. गांवाच्या एका टोंकाला 'मोठी बाव' नांवाची विहीर होती, तिच्याकडील रस्त्यानें तो चालला होता; पण योगायोग विचित्र होता. त्याच्या पाठलागावर असल्याप्रमाणें किसनराव त्याच रस्त्यानें समोरून आला आणि श्रीपतीची व त्याची अचानक गांठ पडली. श्रीपतीला पाहतांच भडकून जाण्यास किसनरावास वेळ लागला नाहीं.

किसनरावानें एक शिवी हासडून 'शिरप्या' म्हणून हांक मारली,

आणि त्याला ओ देण्यासहि अवसर न देतां त्याची त्यानें मानगुटी धरली. आणि " काय रे, तुझी बायको फार माजली आहे ! " असे शब्द उच्चारले.

त्या शब्दांनीं श्रीपती एकदम शुद्धीवर आला; आणि तितक्याच जोरानें म्हणाला, " किसनराव, तोंड संभाळून बोला हां."

" काय करशील रे ? " असें बोलून किसनरावाचा दुसरा हात पुढल्या बाजूनें गळा धरायला वळला.

तेवढ्यांत श्रीपतीनें त्या हातावर आपल्या हाताने जोराचा फटकारा मारून किसनरावाला ढकलून मानेला असा हिसडा दिला कीं, किसनरावाचा मानगुटीचा हात सुटला व उतरणीवरून पाय घसरून किसनराव मागच्या बाजूनें उंचवट्यावरून खालीं पडला. आणि खालच्या बाजूस असलेल्या सर्वे नंबराच्या उंच धोंड्यावर डोके आपटून मोठी खोक पडली व रक्त वाहूं लागलें.

तरी किसनराव श्रीपतीवर पुनः धावलाच. पण विहिरीवरच्या माणसांनीं मध्यें पडून दोघांना कसेंबसें आवरलें. किसनरावाला त्याच्या घरीं नेऊन पोंचविलें.

* * *

पुढें काय होतें पहावें, म्हणून श्रीपती आपल्या घरीं जाऊन स्वस्थ बसला. किसनराव स्वस्थ बसणारा मनुष्य नव्हता.

दुसऱ्या दिवशीं तालुक्याहून फौजदार शिपायांसह आले. श्रीपती कोठे पळाला नव्हता, तो त्यांना घरींच सांपडला. किसनरावाचा खून करण्याचा प्रयत्न केला, अशा आरोपाखालीं फौजदारांनीं श्रीपतीला पकडून नेलें.

* * *

न्यायकचेरींत श्रीपतीचा खटला सुरू झाला.

'देवाशपथ खरं सांगेन, खोटं सांगणार नाहीं' अशी श्रीपतीनें विठोबाची शपथ घेतली, आणि 'मीं किसनरावांच्या खुनाचा प्रयत्न केला नाहीं,' असें स्वच्छ सांगितलें.

'तुला आणखी काय सांगायचं असेल तें सांग' न्यायाधिशांनीं विचारलं.

श्रीपती म्हणाला, " काय सांगूं साहेब, किसनरावाचं व माझं मुळींच

वांकडं नाहीं. मी त्याचं देणं लागतों. पैसे देण्याचे केलेले वायदे माझे-कडून चुकलं आहेत. परवांचे दिवशीं रात्रीं मी घरीं नसतां किसनराव माझे घरीं आले. माझी बायको लक्ष्मी—

इतक्यांत लक्ष्मी बेभानपणें पुढें येऊन ओरडली—

" साहेब, माझ्यासाठीं माझ्या नवऱ्यानं—"

पण पुढें तिला कोणीं बोलूं दिलें नाहीं. शिपाई पुढें सरून तिला दटावूं लागले. तिकडून शिरस्तेदार ओरडले, 'बाई तूं मधें कां आलीस ? तूं आपल्या जाग्यावर बस. शिपाई, या बाईला तिकडे न्या.'

न्यायाधीश कांही बोलले नाहींत. ते स्तब्धपणें सर्व पाहत होते. इतरांचीं अंतःकरणें गहिंवरून गेलीं.

शिपायांनीं लक्ष्मीला मागें नेऊन बसविली. शान्तता झाली. न्याया-धीश श्रीपतीला शान्तपणें म्हणाले, " पुढं काय तें सांग."

श्रीपतीच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहत होत्या. तो म्हणाला,

" साहेब, मला कांहीं सांगायचं नाहीं ! "



# लांब लांब सावल्या ! : : ५३

उन्हाळ्याचे दिवस होते. दादाच्या आणि माझ्या कॉलेजला सुटी असल्या-मुळें आम्ही आष्ट्याला आमच्या घरीं आलों होतों. वर्षांतून जेमतेम दोनदां किंवा तीनदां आम्हांला घरीं जायला सवड सांपडायची; आणि त्यांतल्या त्यांत उन्हाळ्याच्या सुट्यांतच काय तें खूप खूप रहायला मिळत असे !

नेहमींप्रमाणे उन्हाळ्याच्या सुटींत आम्ही आष्ट्याला आलों होतों. आष्टयाला आलों, कीं दररोज सायंकाळीं नदीच्या कांठून खूप लांबवर फिरायला जाण्याचा आमचा नित्याचा परिपाठ !

संध्याकाळ झाली होती. आमचा चहा झाला तेव्हां साडेपांच वाजून गेले होते. चहा घेतल्यानंतर दादानें आपला मलमलीचा अंगरखा अंगांत घातला, हातांत बारीकशी छडी घेतली आणि " नीरे, चलतेस ना ? आज

निखिलला नाहीं घ्यायचं सोबत. चल, आटोप लवकर ! " असें म्हणत तो दारांत माझी वाट पाहत उभा राहिला. कधींपासून बाहेर जाण्यासाठीं हपापलेली मी, आईचा निरोप घेऊन बाहेर पडलें.

आम्ही आमच्या घरासमोरचा टेकडीवजा भाग उतरून नदीच्या कांठानें झपाझप चालूं लागलों. सायंकाळच्या वेळीं नदीकांठीं खूप लांब लांब दिसणाऱ्या आमच्या सावल्या दररोज आमच्याबरोबर असत. त्या लांब सावल्या पाहिल्या, कीं मला किती तरी हसूं येई !

थोड्याच वेळानें आम्ही स्मशानभूमीच्या बाजूनें चालूं लागलों. समोर एका चिंचेच्या झाडाखालीं आज एक नवीनच थडगें दिसलें. तें थडगें एका शुभ्र वस्त्रानें आच्छादिलेलें असून, त्यावर जाईचीं सुंदर पांढरीं फुलें ओतलेलीं होतीं. किती भकास दिसत होतीं तीं थडग्यावरचीं फुलें !

——माझ्या मनांत चर्र झालें !

त्या दिवशीं सकाळीं निखिलला खेळवीत असतां, 'निखिलच्या ओठांवर हसतांना कशा जाई-जुई फुलल्यासारखं वाटतं !' म्हणून कौतुकानें मीं जे शब्द आईजवळ बोलून गेले, तेच शब्द त्या थडग्यावरचीं फुलें पाहतांच माझ्यासमोर उभे राहिले ! वास्तविक थडग्यावरचीं तीं जाईचीं फुलें आणि बाळाच्या ओठांवरील तीं काल्पनिक फुलें यांचा अर्थाअर्थी काय संबंध होता ?

मी थांबलें. माझे डोळे पाण्यानें भरून आले होते. " दादा, जाऊं आपण आतां घरीं परत ?" असें म्हणत मी मागेंसुद्धां वळलें.

सर्व प्रकार दादाच्या ध्यानांत आला. माझ्या परत फिरण्याला मोडता घालण्यांत कांहीं हंशील नाहीं, असें वाटून कीं काय " तुम्ही बायका बुवा भारी हळव्या ! " असें म्हणत व कांहींसें हंसत तोहि परत फिरला.

आम्ही परत येत होतों. परत येत असतां मी दादाशीं एक शब्दहि बोललें नाहीं. फिरायला जातेवेळीं आमची सोबत करणाऱ्या त्या लांब लांब सावल्या आतां अंधार पडल्यामुळें दिसत नव्हत्या !

— २ —

वरील गोष्टीला जवळ जवळ एक वर्ष होत आलें असेल. आम्ही नागपुरास होतों. उन्हाळ्याच्या सुट्या आतां फक्त पंधरा दिवसांवर होत्या.

एका पंधरवड्यानंतर आपण आपल्या घरीं जाऊं, आणि निखिलशीं खूप खूप बोबड्या बोलांनीं बोलूं, अशा विचारांत मी दंग होऊन गेलें होतें.

एक दिवस सकाळीं दादा तांतडीनें माझ्या खोलींत आला आणि म्हणाला, " कांहीं झालं तरी आज आपण आष्ट्याला गेलंच पाहिजे."

मी तर अगदीं भांबावून गेलें. दादा येतो काय अन् सांगतो काय ? दादानें माझ्या हातांत एक पत्र दिलें. निखिल अत्यवस्थ असून मला आणि दादाला ताबडतोब निघून येण्याविषयीं बाबांनीं लिहिलें होतें !

त्याच दिवशीं दुपारच्या गाडीनें आम्ही आष्ट्याला जायला निघालों. आष्ट्याला संध्याकाळीं आम्ही जाऊन पोंचलों. पण—

पण काय !—

आष्ट्याचें घर म्हणजे शोकसागरच झालेलें होतें ! आम्हां दोघांना पाहून आई आणि बाबा दुःखातिरेकानें ओरडलीं, " आपला निखिल गेला ! "

माझ्या पायांखालील जमीन दुभंगून मी पाताळांत जात आहे कीं काय, असें मला वाटलें ! निखिलचें प्रेत जमिनीवर पडलेलें होतें. ज्या तापानें त्याचा बळी घेतला त्याच तापानें त्याच्या ओठांवर डंवरलेलीं जाईचीं फुलें आतां शीर्ण करून टाकलीं होतीं !

निखिलच्या प्रेतयात्रेसोबत मीसुद्धां स्मशानभूमींत गेलें होतें. दादाच्या हातांवर निखिलचें शव होतें. दादा मंद मंद पावलें टाकीत चालत होता. सायंकाळच्या वेळीं लांबवर पडणाऱ्या आमच्या सावल्या आमच्या सारख्याच मंदगतीनें आमची साथ करीत होत्या !

—सायंकाळ संपून रात्र झाली होती.

निखिलच्या प्रेतावर शेवटचा दगड ठेवला, आणि त्याला कल्पान्तापर्यंत तेथेंच झोपत टेवून आम्ही खिन्न मनःस्थितींत परत फिरलों.

आम्ही परत फिरलों त्या वेळीं आमच्या त्या लांब लांब सावल्या आम्हांला परत दिसल्या नाहींत. अंधाराच्या पोटांत त्या गडप झाल्या होत्या; आणि काळाच्या पोटांत आमचा निखिलहि गडप झालेला होता !

— २ —

उन्हाळ्याची सुटी असल्यामुळें अद्याप आम्हांला आष्ट्यालाच दोन महिने काढावयाचे होते. बाबांच्या मागें लागून मी निखिलला पुरलेल्या

ठिकाणीं एक लहानसें थडगें बांधून घेतलें होतें. आष्ट्याला असतें त्या वेळीं दादासोबत दररोज निखिलच्या थडग्याकडे फिरावयाला जायचा माझा नेम असतो. निखिलच्या बाललीला आठवून मी दर दिवशीं त्याच्या थडग्यावर अश्रु ढाळतें. थडग्यावर अश्रु ढाळीत असतां विचार येतो, कीं थडग्याच्या आंत अक्षय्य निद्रा घेणाऱ्या माझ्या निखिलच्या ओठांवरील तीं शीर्ण जाई-चीं फुलें माझ्या अश्रूंच्या सिंचनानें पुन्हा कधीं फुलतील का ?––पण किती वेडी आहें मी !—किती वेडा विचार आहे हा ! शीर्ण—करपलेलीं फुलें पुन्हा कधीं फुलतात का—?

––बाळच्या थडग्याकडे जातांना आम्हांला आमच्या त्या लांब लांब सावल्या दररोज सायंकाळीं दिसतात. आम्हाला गंमत वाटते––पण परत येतांना अंधाराच्या पोटीं त्या सावल्या विलीन झालेल्या पाहिल्या कीं कसेंसेंच होऊन जातें ! !



## विमला : : ५४

त्या वेळीं माझ्या सुखानें अगदीं परासीमा गांठली होती. अवीट आनंदाच्या सरोवरांत माझें मन अगदीं स्वैर विहार करीत होतें. सर्जरी-मधली सर्वांत मोठी एम्. एस्. ची परीक्षा मी पास झालों होतों. धंदा उत्कृष्ट चालेल अशी खात्री असल्यामुळें पुढचीहि काळजी विशेष नव्हतीच. आणि त्याहिपेक्षां विशेष म्हणजे येत्या मार्गशीर्षांत माझें विमलशीं लग्न व्हावयाचें होतें. माझ्या सुखाला खरी उत्कटता तिनेंच आणली होती. दिवाळीच्या सुटींत ती आपल्या मामाकडे गेली होती. तेथून ती आतां परत पुण्यास आली असेल अशी खात्री असल्यामुळें तिला भेटण्यासाठीं अत्यंत उत्सुक झालेलें माझें मन आगगाडीला तिच्या चेंगटपणाबद्दल शिव्या देत होतें. पण आपल्या अंतःकोशांत प्रेमपिपासेनें तडफडणारा एक जीव आहे याची त्या लोहगामिनीला जाणीवहि नव्हती. तिचे कार्यक्रम संथपणें चालू होते.

विमलचें व माझें लग्न फारच मजेदार रीतीनें ठरलें. एम्. बी., बी. एस्. झाल्यावर त्याच लडफेनें मीं एम्. एस्.ला बसून टाकण्याचा प्रयत्न केला; पण नापास झालों. त्यामुळें वेळ जावयास कांहीं उद्योग हवा म्हणून शेजाऱ्यापाजाऱ्यांत मीं लहानशी प्रॅक्टिस सुरू केली होती. त्याच वेळीं विमलच्या घरून एकदां मला बोलावणें आलें. आमची आधीं ओळख होती असें नाहीं; तिची आई आजारी होती. कोणा तरी डॉक्टरला बोलवावयाचें म्हणून त्यांनीं मला बोलाविलें होतें. तिच्या आईचा आजार दोनतीन महिने लांबल्यामुळें माझी त्या घरांत बरीच ओळख झाली. विमल, तिची आई व तिची धाकटी बहीण सिंधू एवढींच त्यांच्या घरीं माणसें होतीं. विमलच्या वडिलांच्या विम्याच्या पैशांतून त्यांचा संसार कसाबसा चालला होता.

पहिल्यानें विमलला पाहिल्यापासूनच मला ती आवडूं लागली होती. दोन महिन्यांच्या परिचयानें तर ती आवड जास्तच दृढावली. पण आपल्याकडे प्रेम करणें हा फाजीलपणा समजत असल्यामुळें मला तसें बोलण्याची मुळींच सोय नव्हती. परंतु एक दिवस निराळयाच दिशेनें या प्रश्नास चालना मिळाली. विमलची आई बहुतेक बरी होत आली होती. तिची प्रकृति तपासून, औषध सांगून मी शेजारींच खुर्चीवर बसून बोलत होतों. इतक्यांत कांहींहि प्रस्तावना न करतां यमुनाबाईंनीं मला विचारलें, " मग डॉक्टर, आमची विमा पसंत आहे ना तुम्हांला ? "

हा प्रश्न त्यांनीं विचारण्यास व दुधाचा पेला घेऊन विमल बाहेर येण्यास एकच गांठ पडली. तिच्या वृत्ती एकदम थरारल्या, रक्त गालांकडे उसळलें, दृष्टि व जीव बावरून गेला आणि तिच्या थरथरत्या हातांतून निसटून, जमिनीवर पडून पेला खळ्कन् फुटला. तरुण पुरुषाला यापेक्षां जास्त रम्य दृश्य कोणतें असणार ! त्या चंचल सकंप मूर्तीवर माझे डोळे अगदीं खिळून गेले.

" काय केलंस पोरी ? " असें म्हणत यमुनाबाई एकदम उठून बसल्या. आपण किती शुभ प्रश्न विचारला, आणि त्याच प्रसंगीं विमलच्याच हातून पेला फुटावा याचें त्यांना फार वाईट वाटलें. मला मात्र फारच मौज वाटली. तिची ती अवस्था माझ्यावरच्या प्रेमाचीच द्योतक असल्यामुळें त्या दुधाच्या शुभ्र ओघानें तें प्रेमच वाहत आहे असें मला वाटलें. विमलनें त्या

वेळीं जें वर्तन केलें त्यामुळें तर माझें मन जास्त मोहून गेलें. आपल्या गोंधळलेल्या वृत्ती तिनें एकदम सावरल्या, चट्कन् घरांत जाऊन दुसरा पेला भरून आणला व जणुं काय कांहींच झालें नाहीं अशा आविर्भावानें “ ती पुडी जेवल्यावर एक तासानं घ्यायची ना ? ” असें मला विचारलें. त्यामुळें मला तिचें फारच कौतुक वाटलें व त्या प्रश्नाला सरळ उत्तर न देतां मीं मुद्दाम मिस्किलपणें हसून म्हटलें, “ असं काय ! ” या माझ्या उद्गारांनीं व विशेषतः त्या वेळच्या मुद्रेनें तिचा सावरलेला तोल अगदीं गेला, व लज्जेनें जीव अर्धा होऊन तिनें जी मान खालीं घातली ती फिरून मी जाईपर्यंत वर केलीच नाहीं.

एम्. एस्. झाल्यावांचून लग्न करावयाचें नाहीं असें मीं ठरविलें होतें. विमल अर्थातच याला एकदम कबूल झाली. तिच्या आईला मात्र तें मुळींच पसंत नव्हतें. पण विमलनें तिची कशीबशी समजूत घातली.

त्यानंतर पांच-सहा महिन्यांनीं मी फिरून परीक्षेस बसलों व सुदैवानें पासहि झालों. विमल आतां माझी होणार या कल्पनेनें आनंद रक्तांत नुसता थयथयूं लागला. पास झाल्याबरोबर विमलनें तार करण्यास सांगितलें होतें. पण तिच्या मामांचा पत्ता देण्यास ती गडबडींत विसरली होती, म्हणून तें शक्य नव्हतें. तेथें गेल्यावर ती पत्ता कळवील अशी अपेक्षा होती; पण गेल्या दहा-पंधरा दिवसांत तिच्याकडून पत्रच आलें नव्हतें. त्यामुळें एकदम आपणच पुण्यास जाऊन तिला ही बातमी कळवावी असें ठरवून मी निघालों.

गाडींत बसलों असतांना किती तरी गोड कल्पना माझ्या मनांतून संचरत होत्या. घरीं जावयाच्या आधीं वाटेंतच तांगा त्या बाजूनें घेऊन विमलकडे जावयाचें असें मीं ठरविलें. विमल, तिची आई, बहीण माझें स्वागत कसें करतील, मी पास झाल्याच्या बातमीचा हळूहळू कसा स्फोट करीन, त्या वेळीं तें लहानसें घर हर्ष-रोमांचानें कसें पुलकित होऊन जाईल याचें रम्य दृश्य पुनः पुन्हा डोळयांपुढें आणून अनिमिष नयनांनीं मी पाहत होतों. आजच्या भेटींत त्यांतल्या त्यांत प्रसंग साधून फडक्यांच्या ‘दौलत’ कादंबरींतल्याप्रमाणें सीमोल्लंघन करावयाचें, किंवा तें नच जमलें तर विमलचा तो नाजुक हात अगदीं चुरगळून टाकावयाचा असें मीं अगदीं नक्की ठरवून टाकलें !

असल्या क्षोभक विचारानें मी पुण्याच्या स्टेशनवर उतरलों व ठरल्या-

प्रमाणें तांगा विमलच्या घराकडे नेला. पण खालीं उतरून मी आंत गेलों तों काय! विमलच्या घराला कुलूप!! मी अगदीं चिडून गेलों. तें कुलूप फोडून टाकावें असें मला वाटले! याचा अर्थ काय? विमलचें कॉलेज सुरू व्हावयास अजून दोन दिवस अवकाश होता; पण म्हणून काय झालें, एक-दोन दिवससुद्धां आधीं पुण्यास यावयाचें नाहीं म्हणजे काय? नाहीं तर तिच्या मामाने तिला रहावयाचा आग्रह केला असेल. ही कल्पना मनांत येतांच मी अगदीं संतापून गेलो. त्या वेळीं कोणाचाहि मामा मला भेटला असता तर मीं त्यास ठेंचूनच काढला असता. मी मुकाट्यानें तांग्यांत बसलों व घरीं आलो! आणखी चार-पांच दिवस गेले. मी रोज विमलच्या घराकडे जाऊन येत असे; पण ती आली नव्हती. तिचें कॉलेज सुरू होऊनहि चार-पांच दिवस झाले, तरी ती आली नाहीं. तिचें पत्रहि नाहीं तेव्हां मला फार चमत्कारिक वाटूं लागलें. तिच्या मामांच्या गांवची मुळींच माहिती नसल्या-मुळें मला कांहींच करतां येईना.

आणखी सात-आठ दिवस गेले. एक दिवस त्यांच्या घरावरून मी सायकलवरून जात होतों. बराच पुढे गेल्यावर विमलच्या बिऱ्हाडाचें दार आपण आज उघडें बघितले असावे असें मला वाटलें. तसेंच परतून खात्री करून घ्यावी असें एकदां मला वाटूं लागलें; पण लगेच मन फिरलें. विमलनें पुण्यास यावयास उशीर केल्यामुळें व विशेषतः पत्र मुळींच न धाडल्यामुळें मी जरा रागावलों होतों. त्यांत याची भर पडली. मी इतकी काळजी करीत असतांना तिनें पुण्यास आल्यावरहि मला कळवूं नये हें मला चमत्कारिक वाटलें. तितक्यांत मनांत आलें कीं, आजच आली असेल तेव्हां उद्यां सकाळपर्यंत कळवीलहि कदाचित्; नाहीं तर स्वतः येईल. या विचारानें जरा बरें वाटून मी तसाच पुढें गेलों.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं नऊ वाजेपर्यंत अगदीं तीव्र उत्कंठेनें मीं तिच्याकडून निरोप येण्याची वाट पाहिली; पण माझी निराशा झाली. तेव्हां आपणच जावें असें ठरवून त्याप्रमाणें मी विमलकडे गेलों. दारांतच सिंधूला पाहून मला फार आनंद झाला व रागवावयाचें मी पार विसरून गेलों!

"काय सिंधू, केव्हां आलां तुम्ही?" आंत शिरतां शिरतां मीं विचारलें.

" झाले दोन-तीन दिवस." माजघरच्या दारांत उभी राहून सिंधूनें उत्तर दिलें.

" दोन-तीन दिवस झाले ! अन् आम्हांला अगदीं पत्ता नाहीं लागूं दिला ! " किंचित् हसून मी म्हणालों. पण माझ्या हास्याचा पडसाद तिच्या चेहऱ्यावर मुळींच दिसेना. कांहींच न बोलतां ती जमिनीकडे पाहूं लागली. कांहीं वेळ तसाच गेला. ती कांहीं म्हणेल म्हणून मी वाट पाहिली पण तसें चिन्ह दिसेना म्हणून मग मींच विचारलें, " ताई आहे ना घरांत ? "

" ती मघांशींच बाहेर गेली. झाला, मला वाटतं अर्धा तास."

" बाहेर गेली ? आतां सकाळींच कुठं गेली बाहेर ? "

" कांहीं सांगून नाहीं बाई गेली."

मी सिंधूकडे जरा रोंखूनच पाहूं लागलों. मी तिच्याकडे पहावयाच्या आधीं माझ्याकडे ती फार बारकाईनें पाहत असावी असा मला संशय आला. ती बेपर्वाईनें बोलत असावी असें मला वाटलें; पण तो समज मीं मनांतून चट्कन् घालवून दिला. मला काल राग आला होता, म्हणूनच तिचें बोलणें बेपर्वाईचें वाटत असावें असें मीं ठरविलें व लगेच फिरून म्हणालों, " अन् आई कुठं दिसत नाहीं ? "

" आई तिकडेच मामाकडे राहिली आहे. आम्ही दोघीच आलों."

" कां, प्रकृति चांगली आहे ना तिची ? "

" हो, प्रकृति चांगली आहे."

" मग कां तिकडे राहिली ? "

" एरवींच ! "

गुंतागुंत सोडवावी म्हणून मी जों जों प्रयत्न करूं लागलों, तों तों ती जास्तच होऊं लागली. सिंधूच्या तुटकपणाचा संशय पुन्हा बळकट होऊं लागला. पण प्रयत्न करून मीं मन शान्त केलें व "बरं आहे, मी संध्याकाळीं येईन" असें सांगून घरीं आलों. पण घरीं आल्यावर मन फिरून अस्वस्थ झालें. विमलचें बाहेर जाणें म्हणजे अगदीं विलक्षण होतें असें नव्हे; पण पत्र न धाडणें, पुण्याला आल्यावरहि दोन-तीन दिवस न कळविणें, सिंधूचीं तुटक उत्तरें यांच्या भरतीला ती गोष्ट येऊन मला अगदीं त्रासल्यासारखें झालें. दिवसभर त्या विचारांनीं मी अस्वस्थच होतों. संध्याकाळीं तिला विचारून खुलासा करून घेऊं असें ठरवून मीं दिवस कसा तरी काढला;

पण संध्याकाळीं गेल्यावरहि 'ताई घरांत नाहीं' म्हणून सिंधूनें थेट सकाळच्याच पद्धतीनें सांगितलें तेव्हां मात्र माझें मन बिथरलें. कांहींच न बोलतां मी तेथून निघालों; पण दारापर्यंत जाऊन फिरून परतलों व " सिंधू " म्हणून जरा कठोर स्वरानेंच हांक मारली. सिंधू धांवतच बाहेर आली.

" काय ? " जरा भिऊनच तिनें विचारलें.

" तुझ्या ताईला सांग " मी जरा निक्षून म्हणालों, " तिला म्हणावं, उद्यां सकाळीं दहा वाजतां मी येणार आहें, तेव्हां कुठं बाहेर जाऊं नकोस. समजलं ना ? काय सांगशील ? "

'सकाळीं बाहेर जाऊं नको म्हणून' खालीं पाहतच सिंधूनें उत्तर दिलें.

" हं. दहा वाजतां, बरं का ? "

" बरं. "

रात्रीं अंथरुणावर पडल्यावर माझ्या चित्तांत अगदीं काहूर उसळलें. विमलच्या या वागणुकीचा अर्थ तरी काय ? कीं तसें कांहींच नसून सहजासहजीं या गोष्टी घडून आल्या ? पण तसें दिसेना. जवळ जवळ महिनाभर पत्र न पाठविणें, पुण्यास आल्यावरहि न कळविणें व संध्याकाळीं येईन म्हणून सांगितल्यावरहि घरीं न राहणें ! याचेंहि मला एवढें वाटले नसतें, पण सिंधूची बोलण्याची पद्धत मला नीट वाटेना. त्यामुळें मनाला जास्त त्रास होऊं लागला. पण मोठ्या प्रयत्नानें या सर्व गोष्टी मीं मनांतून काढून टाकल्या. उगीच पराचा कावळा आपण करीत आहों असें मला वाटलें. त्यांत विमलची रम्य मूर्ति डोळ्यांपुढें उभी राहतांच माझें मन अगदीं ऋजु बनून गेलें, व संध्याकाळीं सिंधूला सांगतांना आपण उगाच स्वर कठोर केला असें वाटूं लागलें. नुसते दोन हेलपाटे फुकट गेले तेवढ्यावरून मी रागावलों, असें विमलला कळलें तर तिला काय वाटेल ? अशी कल्पना येऊन मला वाईट वाटलें.

दुसऱ्या दिवशीं दहा वाजतां मी गेलों तेव्हांहि विमल घरीं नव्हती !

मला आलेला पाहतांच सिंधू एकदम बाहेर आली व " अगबाई, अजून कशी नाहीं आली ही ! " असें म्हणून वाटेकडे पाहूं लागली.

" म्हणजे ! " मी जरा रागानेंच म्हणालों, " आत्तांहि बाहेर गेली आहे ? "

" बाहेर कसची ! आत्तां जाऊन येतें म्हणाली ! "

" पण गेली आहे कुठं ? "

" तसं म्हणजे गेली आहे असं नाहीं. एक मैत्रीण आली होती तिची, तिच्याबरोबर जाऊन येतें म्हणाली, अन् अजून आली नाहीं ! "

" तूं माझा निरोप तिला सांगितला होतास ना ? "

" हो. कालच आल्याबरोबर सांगितला; अन् आत्तांसुद्धां आठवण केली मीं तिला."

" बरं, तूं जा आंत हवी तर. मी वाट पाहत बसतों इथं." असें तिला सांगून मी तेथेंच सतरंजीवर एका गादीला टेकून आढ्याकडे दृष्टि लावून पडलों. माझें डोकें भ्रमूं लागलें होतें. अर्धा तास झाला, तरी विमलचा पत्ता नाहीं ! तेव्हां या सहज घडणाऱ्या गोष्टी नसून याच्या बुडाशीं कांहीं तरी हेतु असला पाहिजे, अशी माझी खात्री झाली. मात्र माझी कल्पना अगदीं चालेना. सिंधू मधूनमधून 'अजून कशी बाई येत नाहीं ही ! ' असें म्हणून वाटेकडे पाहत होती. केव्हां केव्हां दरवाजापर्यंतहि जाऊन येत होती.

साडेअकरा वाजले, तेव्हां सिंधू म्हणते, " जेवूनहि गेली नाहीं. मग काय जेवायबिवायला राहिली कीं काय तरी तिच्याकडे ! काल म्हणत होती, 'मला एका मैत्रिणीकडे उद्यां जेवायला जायचं आहे' म्हणून."

" मग तूं हें मला मघांशींच कां सांगितलं नाहींस ? " मीं अगदीं संतापून सिंधूला विचारलें.

" मला काय माहीत तीच ही मैत्रीण म्हणून ! अन् येतें म्हणाली आत्तां ! " सिंधूनें उत्तर दिलें.

काय करावें हें मला सुचेना. संताप तर अनावर झाला होता. तरी या प्रकरणाचा आजच्या आज निकाल लावून टाकावयाचा असें ठरवून " तीन-साडेतीन वाजतां मी पुन्हा येईन, ताईची लहर असली तर तिला थांबायला सांग." असें सिंधूला सांगून मीं घरीं गेलों.

तीन वाजतां मीं गेलों तेव्हां बाहेरच्या खोलींत कोणीच नव्हतें. मधलें दार लोटलेलें होतें. तें जरा लोटून मी आंत डोकावलों. सिंधू आंत निजली होती. तिला उठविणें बरें नाहीं असें वाटल्यावरून मी सकाळच्यासारखाच गादीशीं टेकून बसलों, व विमल येण्याची किंवा सिंधू जागी होण्याची वाट

पाहूं लागलों. मन एक क्षणभरहि स्वस्थ नव्हतें; अनेक तर्कवितर्क चालू होते. इतक्यांत कोपऱ्यांत पडलेल्या एका लिफाफ्याकडे माझी दृष्टि गेली. तो फोडलेलाच होता. मीं तो उचलून घेतला. वर विमलचें नांव होतें. एकदां वाटलें वाचूं नये; पण विमलचें पत्र वाचण्यास आपणास हरकत नाहीं असें ठरवून मीं आंतला कागद काढून वाचूं लागलों.

" प्रिय विमलाताई,

जन्माचा जोडीदार ठरवितांना तुम्ही फिरून एकदां शान्तपणें विचार करावा असें मला वाटतें. मीं हें लिहिणें चांगलें नव्हे, पण प्रेम मला भाग पाडीत आहे. प्रभाकरपंत एम्. एस्. झाले असले तरी त्यांची प्रॅक्टिस अजून बसावयाची आहे. त्यांच्या वडिलांनीं ठेवलेला सर्व पैसा आतां संपून गेला आहे. आतां ते मिळवतील तोच त्यांचा पैसा. सध्यां नव्या डॉक्टरांची काय स्थिति असते हें मीं तुम्हांस सांगावयास पाहिजे असें नाहीं. उलट माझी अफाट संपत्ति तुम्ही प्रत्यक्षच पाहिली आहे. तेव्हां हें सर्व लक्षांत घेऊनच काय तें ठरवावें अशी माझी विनंति आहे......

आपला

**राजाराम."**

पत्र वाचून माझ्या डोळ्यांपुढें लख्ख प्रकाश पडला. या पत्रान्वयें 'सर्व लक्षांत घेऊनच' विमलनें संपत्तीशीं लग्न लावावयाचें ठरविलें असलें पाहिजे, व म्हणूनच ती मला टाळीत असावी हें माझ्या ध्यानांत आलें.

पत्र पलीकडे सतरंजीवर टाकून मागें भिंतीला डोकें टेकून मीं कांहीं वेळ डोळे मिटून स्वस्थ पडून राहिलों. संताप व तिरस्कार यांनीं माझें मन अगदीं भरून गेलें. विमल अशा प्रकारची मुलगी आहे याच्यावर विश्वास ठेवावासा वाटेना; पण कांहीं इलाजच नव्हता. समोर पडलेलें पत्र व आज दोन दिवस—नव्हे, जवळ जवळ दोन महिने—विमलनें चालविलेली टाळाटाळ यांनीं संशयाला जागाच उरूं दिली नाहीं.

आतां इथें थांबण्यांत अर्थ नाहीं, यांचें तोंडहि बघावयाचें नाहीं, असा निश्चय करून मी निघणार इतक्यांत सिंधू बाहेर आल्याबरोबर पहिल्या प्रथम तिची दृष्टि त्या पत्रावर गेली. त्याबरोबर " अगबाई ! हें कसं इथं आलं ? " असें म्हणून तिनें त्याच्यावर जणुं काय झडपच घातली.

माझ्या काळजावर झडप घातल्यावरहि मला इतक्या वेदना झाल्या नसत्या !

"तें पत्र मीं वाचलं आहे." मी शान्तपणें सिंधूला म्हणालों, "आणि काय समजायचं तेंहि समजलों आहें."

सिंधू भिंतीला टेकून खालीं पाहत होती. संतापानें व सूडाच्या भावनेनें मी तिला व तिच्या ताईला अनेक प्रकारानें टोंचून बोललों, तरी एका शब्दानेंहि तिनें उत्तर दिलें नाहीं. शेवटीं मी म्हणालों, "सिंधू, तुझी ताई इतकी नी...इतकी ही असेल असं मला वाटलं नव्हतं !" त्या-सरशीं तिच्या डोळ्यांतून अश्रुधारा सुरू झाल्या, त्यामुळें मी एकदम चमकलों; मला थोडी आशा वाटूं लागली.

पण ती फारच थोडा वेळ. कारण ती रडत होती तरी मी त्यांच्यावर करीत असलेल्या आरोपाला काडीइतकाहि विरोध करीत नव्हती, हें माझ्या चट्कन् लक्षांत आलें. त्यामुळें हें रडणें मानभावीपणाचें आहे असेंच मला वाटलें. मी इतक्या वेळां आलों तरी माझी प्रकृति लांबच—पण मी पास झालों कीं नाहीं याचीसुद्धां चौकशी तिनें केली नव्हती. या व असल्या गोष्टी एकदम पुढें आल्या व माझें मन अगदीं विटून गेलें; आणि "तुझ्या ताईला म्हणावं, त्या श्रीमंत राजारामाशीं खुशाल संसार कर. मी तुझं तोंडहि पहायला फिरून येणार नाहीं !" असें सिंधूला सांगून मी निघालों. तेव्हां सिंधू जास्तच हुंदके देऊन रडूं लागली, पण मी तिकडे लक्ष न देतां तसाच बाहेर पडलों !

*          *          *

त्या गोष्टीला आज पंधरा वर्षें झालीं असतील. विमलच्या त्या प्रकरणानंतर पुण्यास रहाणें मला बरें वाटेना, म्हणून मी मुंबईसच प्रॅक्टिस सुरू केली. पहिल्या एक-दोन वर्षांतच कुशल शस्त्र-वैद्य म्हणून माझी प्रशंसा होऊं लागली. अर्थात् कीर्तीबरोबर लक्ष्मी व गृहलक्ष्मी याहि आल्याच. चिमुकल्या माधवानें आमच्या सुखावर अगदीं कळस चढविला. अशा आनंदांत मीं दहा-बारा वर्षें घालविलीं. कोणतेंहि सुख मला कमी नव्हतें. अशा स्थितींत असतांना एके दिवशीं मध्यरात्रीं एक अनोळखी तरुण गृहस्थ मला उठवावयास आले.

"तुम्हांला सिंधूताईनीं बोलावलं आहे." ते म्हणाले.

" कोण सिंधूताई ? " कांहींच ध्यानांत न येऊन मीं विचारलें.

" त्यांची थोरली बहीण फार आजारी आहे. त्या म्हणाल्या, 'सिंधूताई म्हणून सांगा म्हणजे आपल्याला समजेल'."

" हां-हां ! थोरली बहीण म्हणजे विमल......विमलाताई ! "

" हो."

" बरं मग ? मला कशासाठीं बोलावलं आहे ? "

" त्या अतिशय आजारी आहेत...म्हणजे—विमलाताई...तेव्हां..."

" म्हणून मला बोलावलं आहे होय ?" माझा पूर्वीचा सर्व तिरस्कार जागृत झाला व त्याबरोबरच स्वरहि बेपर्वा झाला.

" मग......आपण......" तो तरुण गृहस्थ विचारूं लागला.

" आपण कोण त्यांचे ? " मीं अगदीं तिरस्कारानें विचारलें.

" मी त्यांचा कुणी नाहीं. शेजारीं राहतात आमच्या त्या. त्यांच्या इथं एवढ्या रात्रीं यायला नाहीं कुणी, म्हणून मी आलों."

" अस्सं !"

'मुंबईत दुसरे डॉक्टर पुष्कळ आहेत.' असें त्यांस सांगावें असें माझ्या मनांत आलें. पण त्या परक्या गृहस्थाबरोबर असला निरोप धाडणें बरें वाटेना म्हणून " त्यांना सांगा मला येतां येणं शक्य नाहीं म्हणून." असें त्यास सांगून मी एकदम आंत गेलों.

विमलेची मला अगदीं कींव आली ! या स्त्रीला इतकासुद्धां स्वाभिमान नसावा ! ज्याला आपण एकदां झिडकारला त्याच्याचपुढें फिरून तोंड वेंगाडण्यास यांना कांहींच कसें वाटत नाहीं ! आणि जिथें गल्लोगल्लीं पन्नास डॉक्टर भेटतील अशा या मुंबईत ? कोण हा अधःपात !

त्यानंतर त्या रात्रीं मला झोप आली नाहीं. गत आयुष्यांतल्या त्या आठवणी मनाला बऱ्याच सलत होत्या. पहाटे साडेपांच वाजतां उठून मी बाहेरच्या दालनांत आलों, तों सिंधू तेथें आधींच येऊन बसली होती. त्या लोचटपणाचा मला फार संताप आला.

" काय पाहिजे तुम्हांला ?" मीं विचारलें. सिंधू चट्कन् उभी राहिली.

" आमच्या घरीं एकदां......"

"आज मुंबईत दुसरे डॉक्टर नाहींत वाटतं?" मघांचें वाक्य मीं बोलून घेतलें.

सिंधूच्या डोळ्यांना खळ्कन् पाणी आलें. पदरानें डोळे पुशीत ती म्हणाली, "डॉक्टर, ताई पहांटे चार वाजतांच गेली! पण तिची शेवटची इच्छा म्हणून मी आपल्याला बोलवायला आलें आहें......"

मी एकदम चरकलों. विमल वारल्यानंतरहि ही मला बोलवावयास येते तेव्हां हें कांहीं निराळेंच आहे, हें माझ्या ध्यानांत आलें.

"आपण रात्रींच याल म्हणून फार वाट पाहिलीन् तिनं." सिंधू सांगूं लागली, "पण शेवटीं निराशा झाली तिची! तेव्हां 'मला न्यायच्या आधीं तरी त्यांना घेऊन ये' म्हणून जातांना मला सांगितलं, म्हणून आलें मी..." सिंधूला अश्रु अनावर झाले.

मीं तोंडहि धुतलें नव्हतें. तरी कोट-टोपी घालून तसाच निघालों. फणसवाडींतल्या एका चाळींत तिसऱ्या मजल्यावरच्या खोलींत त्या बहिणी राहत होत्या. मी आंत गेलों. कोपऱ्यांत एका कॉटवर एक स्त्री निजली होती. तिच्या तोंडावर एक वस्त्र टाकलेलें होतें. मीं तें दूर केलें तों हृदयाला एकदम धक्का बसून मी मागेंच सरलों. इतकी भयंकर कुरूप व हिडीस मुद्रा मीं साऱ्या जन्मांत पाहिली नव्हती. ही विमल असेल असें मला मुळींच वाटेना, आणि म्हणून खरोखर मीं "विमल कुठं आहे?" म्हणून सिंधूला विचारलें.

"तीच!" त्या देहाकडे बोट करून सिंधू म्हणाली; आणि मीं आणखी कांहीं विचारण्यापूर्वींच तिनें विमलच्या उशाखालून एक पत्र काढून मला दिलें—

'प्रभाकरपंतांचे चरणीं शिरसाष्टांग नमस्कार, विज्ञापना वि.—

आपला मीं फार मोठा अपराध केला आहे. मला क्षमा मागायलाहि तोंड नाहीं, पण मला तसं कां करावं लागलं हें आपल्याला एकदां समजावं म्हणून हें पत्र लिहिलं आहे.

त्या दिवाळीच्या सुटींत मी मामांच्याकडे गेलें होतें तिथंच मला देवी आल्या. त्यांतून मी बरी झालें, पण माझा चेहरा इतका कुरूप झाला, कीं आरशांत पाहून माझी मलाच भीति वाटे. तोंडावर देवीचे वण फार राहिले व डाव्या डोळ्यांत फूल पडलं!

आपलं माझ्यावरचं प्रेम किती उत्कट होतं याची मला जाणीव होती. प्राणांच्याहि पलीकडे मी तुम्हांला आवडत होतें. अशा स्थितींत माझी ही अवस्था कळल्यानंतरहि माझ्याबद्दल यत्किंचितहि अनादर न दाखवितां माझ्याशींच लग्न करून आपण आपल्या भावी आयुष्यांतल्या सर्व सुखाला तिलांजलि दिली असतीत. मला ही कल्पनाच सहन होईना. पुण्याला येऊन आपल्याला खरी हकीकत सांगून 'आपण दुसऱ्या मुलीशीं लग्न करून संसार करा' असं सांगावं असं एकदां मनांत आलं; पण आपल्या उदात्त हृदयाला तें रुचलं नसतं. प्राण गेला तरी या गोष्टीला आपण कबूल होणार नाहीं व माझ्यासाठीं सर्व सुखाची होळी करून घ्याल, हें मला नक्की माहीत होतं. म्हणून मग मीं दुसरी युक्ति केली. माझ्याबद्दल पूर्ण तिटकारा आला तरच आपण दुसऱ्या मुलीशीं लग्न करूं शकाल, हें जाणून सिंधूकडून तें नाटक मीं करवलं. त्या वेळीं मी पुण्याला आलेंच नव्हतें. 'बाहेर गेली' म्हणून सिंधू सांगे तें सगळं खोटं. तें पत्रहि खोटं; तें तिनंच लिहिलं होतं. आपण पत्र वाचून रागावून बोलूं लागलां म्हणजे 'तूं थोडी हसूं लाग' असं मीं तिला सांगितलं होतं; पण तें तिला जमलं नाहीं. तें नाटक तिला त्यापुढं सहन होईना व तिला खरोखरीच रडूं येऊं लागलं. पण आपलं मन तोंपर्यंत अगदीं पुरं बिघडलं होतं, त्यामुळं त्याचा उलट परिणाम झाला नाहीं.

आपण गेल्यानंतर आज पंधरा वर्षं आपल्याकडे मन ठेवून मीं काढलीं. आपण संसार करून सुखी झालां हें ऐकून मला फार बरं वाटलं. त्यांतच मला खरं सुख आहे. आपला चिमणा माधव सात-आठ वर्षांमार्गं कुठंसा दिसला होता. त्याला जवळ घेऊन आपल्या अप्रत्यक्ष भेटीचं सुख मीं घेतलं. गेल्या सात-आठ वर्षांत मात्र कांहीं नाहीं!

आज मी जगांतून चाललें. आपल्या बाहूंत येऊन सुखानं प्राण सोडावे अशी इच्छा होती—पण आपला राग अजून गेला नाहीं असं वाटतं. हें पत्र वाचून तरी तो जावा व आपल्या या अभागी विमाला आपण क्षमा करावी एवढीच शेवटची विनवणी आहे!

—विमल'

पत्र माझ्या हातांतून गळून पडलें. जेवढ्या भयानें मी मघांशीं मागें सरलों होतों; तेवढ्याच भक्तीनें आतां पुढें होऊन कॉटवर ओणवा झालों.

डोळ्यांतल्या बाहुल्यांवर अश्रूंचें पटल आलें. त्यांतून माझी पूर्वीचीच विमल मला दिसूं लागली. तिच्या देहाला स्पर्श करण्याची माझी योग्यता आहे असें मला वाटेना; तरी पण मला राहवेना. तिला उचलून मीं हृदयाशीं धरलें व मूक आक्रंदन करूं लागलों.



## विरोध : : ५५

श्रीमत् परमहंस स्वामी अद्वैतानंदमहाराजांनीं आपल्या शिष्यांच्या अत्याग्रहावरून मुंबापुरीस पांच-सहा आठवडे मुक्काम केला होता. स्वामीजींची तीर्थयात्रेला जाण्याची उत्कंठा एके बाजूला एकसारखी वाढत होती, तर शिष्यवृंदाचा त्यांना राहवून घेण्याचा आग्रह दुसरे बाजूला वाढत होता. मध्येंच सालाबादचा गणपत्युत्सव उद्भवला नसता तर स्वामीजी त्यानंतर फारसे राहतेच ना. पण गणपत्युत्सवानें स्वामिजींना आणखी राहणें भाग पाडलें आणि प्रवचनेंहि करावीं लागलीं.

हिंदु-मुसलमानांचा दंगा नुकताच होऊन गेला होता.

गणपत्युत्सव संपला. स्वामिजींची रसाळ, उद्बोधक प्रवचनमाला खलास झाली आणि स्वामिजी प्रयागला जावयास निघाले.

गाडी सुटावयाला अजून बराच अवधि होता. स्वामिजींच्या शिष्यगणांनीं स्वामिजींकरितां आगाऊच सेकंड क्लासांतील लोअर बर्थची जागा मुद्दाम रिझर्व केली होती. स्वामिजींना तेथपर्यंत आणण्यांत आलें. त्यांचें सामान विशेष कांहींच नव्हतें. मृगाजिन, लोटा, छाट्याकुट्यांची काखोटींत सहज राहील एवढी वळकटी व भस्माची पुरचुंडी! त्यांना कल्पना नव्हती, कीं आपली योजना सेकंड क्लासांत केली गेली असेल. स्वामिजींचें सामान एकानें ठरलेल्या जागीं एका बाजूस ठेवून दिलें आणि मग स्वामिजींना स्थानापन्न होण्यास विनंति करण्यांत आली. स्वामिजींनीं आंत डोकावून पाहिलें आणि त्यांना कसेंसेंच झालें. आपल्यासारख्या सर्वसंगपरित्याग्याला या ऐहिक वैभवाच्या सुखसोहाळ्याची उपाधि कशाला ?

स्वामींनीं मनांत ठरविलें, कीं लोक एकदां परत गेले, कीं आपण चटूदिशीं उठावें, या वैभवाचा त्याग करावा आणि ज्या ठिकाणीं गरीब, दुबळे, अकिंचन लोक बसलेले असतात त्यांत जाऊन मिसळावें, त्यांतील लोकांचीं सुखःदुखें बाजूस बसून ऐकावींत आणि त्यांच्याकरितां परमेश्वराकडे प्रार्थना करीत असावें. परंतु गाडी स्टेशनामधून सुटल्याशिवाय शिष्यवृंद परतणार कसा ?

गाडी सुटण्यापूर्वींची दुसरी घंटा वाजली. तोंच दूरवर बाहेरून 'अल्ला हो अकबर! पैगंबर झिंदाबाद!' वगैरे आरोळया कानांवर आल्या. स्वामिजीसुद्धां सर्व शिष्यांचें लक्ष व डोळे आरोळयांच्या बाजूस वेधलें. तेव्हां तिकडून उंची, भरजरी, आपापल्या चालींचे पोषाख केलेल्या कच्छी, बोहरी, खोजे, पठाण, इराणी वगैरे लोकांचा घोळका आंत घुसत आहे, असें दिसलें. क्षणभर, 'हा काय प्रकार आहे ? हें कुणालाच कळेना! पुष्कळांना वाटलें, कीं आपल्यावरच ते चाल करून येत असून क्षणभरांत तेथेंच रणधुमाळी माजते कीं काय ? कित्येक हिंदूच्या डोळयांपुढें त्या कल्पनेबरोबर काजवे चमकले! पुढें चार-दोन मंडळी-बरोबर रेल्वे कामगारांपैकीं एक-दोघेजण अदबीनें बोलत येत असल्याचें पाहून खात्री झाली, कीं सदरील मंडळी दंगा करण्याच्या उद्देशानें आली नसावींत. तो घोळका स्वामिजी बसले होते त्या डब्यापर्यंत आला. रेल्वेचा माणूस तेथेंच थबकला. त्याबरोबर त्याच्या बरोबरचे सभ्य खान-साहेबहि थांबले. त्यांच्याच किंचित् मागून एक उतारवयाचे भरगच्च दाढी असलेले अंगावर भरजरी पायघोळ अंगरखा घातलेले आणि हातांत जाड जाड मण्यांची माळ सावकाश ओढीत, बाजूच्या लोकांकडे कांहीं एका अधिकार दृष्टीनें पाहत असलेले एक धिप्पाड मुल्ला येत असलेले दिसले. ते अमीर होते का फकीर होते हें प्रथम कोणासच कळेना. अमीर म्हणावें तर फकिरी बाणा दिसला; पण फकीर म्हणून कल्पना करावी तर ऐश्वर्य अमिराचें होतें. पण ते त्या लोकांचे धर्मगुरु होते, हें पुढील थोडक्या काळांत झालेल्या परस्परांच्या हालचालींवरून कळण्यास वेळ लागला नाहीं.

रेल्वेचा माणूस त्यांची जागा दाखवून त्या गर्दीत चटकन् नाहींसा झाला. त्या धर्मगुरूंचें डोंगराएवढें सामान मागील कांहीं माणसांनीं भरा-भर आंत टाकण्यास सुरुवात केली. त्यांतील कांहीं सामान स्वामिजींच्या

अंगावरसुद्धां धाड्दिशीं पडलें. पण स्वामिजींनीं तें शांतपणें बाजूला सारलें एकेक मुल्ला त्या मौलवीच्या गळ्यांत भले जाडजूड हार घालून त्याला कडकडून भेटूं लागला व त्याच्या कपाळाचे, गालाचे, दोन्ही खांद्यांचे व दाढीचेंहि मुके घेऊं लागला.

" अल्लाहु अकबर ! " " पैगंबर झिंदाबाद ! "

या आणि असल्याच आणखी कांहीं प्रकारच्या शब्दसमुच्चयांच्या आरोळ्या त्यांच्यांत एकसारख्या चालूंच होत्या ! असा प्रकार आणखी किती वेळ चालला असता कोण जाणे ! पण झाला हा प्रकारच मुळीं अतिशय थोड्या वेळांत झाला. गाडीची तिसरी घंटा झाली. गार्डाच्या हातचें हिरवें निशाण फडकलें. त्याच्या तोंडची जाड शिटी कर्कश किंचाळली म्हणून मौलवीसाहेब पट्दिशीं डब्यांत शिरले आणि गाडी चालू झाली.

अजूनपर्यंत आलेल्या लोकांस, डोकें खिडकीबाहेर काढून मौलवीसाहेब मानेनें निरोप देत होतेच व तेहि हवेंत हातरुमाल उडवीत होते. तोंडानें आरोळ्या ठोकीत होते.

त्या गर्दींत स्वामिजींनीं एकदांच बाहेर पाहिलें. त्यांच्या शिष्यांपैकीं त्याना कोणी पाहिलें; कोणी नाहीं. लौकरच प्रत्येकानें आपापला मार्ग सुधारला.

— २ —

मौलवीसाहेबांनीं आंत डोकें घेतलें. डब्यांत चोहोंकडे न्याहाळून पाहिलें. स्वामिजी कसलें तरी पुस्तक वाचण्यांत स्वस्थपणानें गढले होते. हिंदु—काफिर—आपला कट्टा दुष्मन् आणि तो आपण ज्या डब्यांत त्याच डब्यांत ! मौलवीसाहेबांच्या कपाळाची शीर उठली. तळपायाची आग मस्तकाला पोंचली. त्यांचें सर्वांग कंपायमान झालें. त्यांची सारी मिजास बिघडली. त्यांच्या अगोदर हें ध्यानांत आलें नाहीं. त्यांनीं पाहिलेंच नव्हतें. पाहिलें असतें, ध्यानांत आलें असतें, तर त्यांनीं—त्यांच्या अनुयायांनीं स्टेशनवरच, फलाटावरच्या फलाटावरच त्या काफिराला हाकून लावलें असतें. त्याचें चंबूगवाळें भिरकावून दिलें असतें, असें मौलवीसाहेबांच्या मनांत खास आलें असावें. तें आपल्या जागेवर बसण्याचें किंवा आपलें सामान नीटनेटकें लावण्याचेंसुद्धां विसरले, त्या तेवढ्याच जागेंत ते येरझारा घालूं लागले. मधून मधून क्रुद्ध मुद्रेनें स्वामिजींकडे पाहूं लागले, मौलवींचा

आतां एकच विचार चालू झाला. या काफिराला आपल्या डब्यांतून कसा हाकून लावावा, आपल्या डब्यात आपलीच अनियंत्रित सत्ता कशी स्थापन करावी ? त्याकरितां चालत्या गाडींतून त्या काफिरास भिरकावून द्यावें, कीं तेथल्या तेथेंच जबरदस्तीनें त्या काफिरास इस्लामी धर्माची दीक्षा देऊन आपल्यासमोर कल्मा पढावयाला त्याला भाग पाडावें ? काय करावें आणि काय न करावें ?

असें आणि असल्यासारखेंच लाखों विचार मौलवीसाहेबांच्या— इस्लामी धर्माच्या कडव्या प्रचारकाच्या— मस्तकांत धिंगाणा घालीत नसतील असें छातीठोकपणें कोण सांगूं शकेल ?

मौलवीसाहेब याप्रमाणें जागच्याजागींच पाय आपटीत, हात चोळीत दाढीवरून वरचेवर हात फिरवीत स्वामिजींकडे पाहत जळफळत होते.

इकडे स्वामिजींच्या मनांत त्याच वेळीं कोणते विचार चालू असावेत— " आपण हिंदु धर्मगुरु. हे इस्लाम धर्मगुरु. आपले आणि त्यांचे धर्मानुयायी स्टेशनच्या फलाटावर होते. अप्रबुद्धपणानें आपल्या अनुयायांनीं त्यांची आगळिक करून अधिकप्रसंगाची वेळ आणली असती तर!– पण उलट त्यांच्याच अनुयायांनीं आततायीपणानें तोच प्रसंग घडविला असता तर ? घडला नाहीं ही खैर ! पण तसें झालें असतें तर ! आपण थांबवितांच आपले अनुयायी जागच्याजागीं स्तब्ध राहिले असते !

आणि या मौलवीसाहेबांच्या अनुयायांनीं तसा अधिक प्रसंग केला असता तर ? सदर मौलवीसाहेबांनीं काय केलें असतें ? आपल्या अनुयायांना समंजसपणानें थांबविलें असतें काय ? यांची अनुज्ञा त्यांच्या अनुयायांनीं निमूट पाळिली असती काय ?

कलागती बहुधा अनुयायांकडूनच होत असतात. त्याला जबाबदार लोकांचा, ज्ञात्यांचा पाठिंबा सहसा असत नाहीं. ज्ञानी– सुबुद्ध, जबाबदार लोक समक्ष असतील तर तंट्याची पाळी यावयाचीच नाहीं. आलीच तर फार काळ टिकणार नाहीं. गैरसमज ताबडतोब दूर होतील. ते आमचे— आम्ही त्यांचे विश्वबंधु—पण खरेंच का आम्हीं तसें समजतों. पण मौलवीसाहेब तरी खरेंच आमच्यासारखेंच समजत असतील काय ? पण हिंदु-मुसलमानांचा विरोध अनेक पिढ्यांपासून त्यांच्या त्यांच्या पांचवीला जेथें पूजला आहे, तेथें ऐक्याची भावना त्यांच्या मस्तकांत येणार कुठून ?

दोघांत नडतें कोठें ? जमतें किती ? फिसकटतें किती ? कां ? याची चर्चा दोन्ही धर्मांतील प्रबुद्ध पुरुष एकत्र येऊन कधीं करीत असतील काय ?"

अद्वैतानंद स्वामिजींच्या डोळ्यांपुढें त्यांच्या हातांनीं पुस्तक धरलें होतें, परंतु तें ते वाचीत नसून वरीलसारख्या अनेक विचारांशीं त्यांचें मन विचारविनिमय करीत होतें. स्वामिजींना वाटलें, पूर्वीं कधीं कोणी असला मोका उभयपक्षीं आणलाच नसेल. पण आज या ठिकाणीं तसा मोका अनायासेंच आला आहे तर अशा वेळीं उभयतांत एकट्यानें विचारविनिमय करावयाला काय हरकत आहे ? सुरुवात कोणी करावी ? आपणच करावी; त्याला काय हरकत आहे ? दोन धर्मानुयायांच्या सांप्रत परिस्थितींत सलोख्यासाठीं बोलावयाला--प्रेमाचा हात पुढें करावयाला आपल्याला काय कमीपणा आहे ?

या विचाराबरोबर स्वामिजींचा लगेच निश्चय झाला. त्यांनीं पुस्तक बाजूला केलें. मुखावर किंचित् स्मित आणीत ते मौलवीसाहेबांना आतां कांहीं प्रश्न करणार, तोंच क्रुद्धमूर्ति मौलवीसाहेब गर्जना करीत ओरडले—

"किधर जानेवाला है ?"

"बनारसला !" स्वामिजी लगेच उत्तरले. पण त्याच क्षणीं स्वामिजीं-च्या क्षणापूर्वींच ठरविलेल्या कल्पना एकेक विरघळूं लागल्या. तरीहि आपण तसाच उलट प्रश्न– सौम्यपणानेंच– त्या मौलवींना करून भाषणाला ओघ आणावा, या कल्पनेनें स्वामिजी प्रश्नाकरितां फिरून तोंड उघडणार होते; पण मौलवीसाहेब आतां स्वामिजींकडे पाहतच होते कोठें ? आणि जेव्हां पाहिलें तेव्हां स्वामिजींना आपलेंच पुढील फर्मान सोडण्याकरितां—

"पुढच्या स्टेशनावर गाडी थांबतांच या डब्यांतून खालीं उतरलें पाहिजे."

"कां ?"

"तूं कोण उलट पुसणार ?" मौलवी एकदम कडाडले. अहो-जाहोचा साधा शिष्टाचारहि त्यांनीं पाळला नाहीं. "काफिर ! जागा आमच्या-करितां रिझर्व आहे समजत नाहीं ?"

"पण जागा म्हणजे बर्थ का डबा ?" स्वामिजींनीं मुद्दाम खोचून विचारलें.

"त्याच्याशीं तुला काय करावयाचें आहे? आमचं फर्मान आहे तुला. पुढें खालीं उतरलेंच पाहिजे." मौलवी गरजले.

"तें होणार नाहीं!" स्वामिजींनीं संथपणानें पण ठासून सांगितलें. ते कांहीं कच्च्या गुरूचे चेले नव्हते. येथें शठाशीं शठ झालेंच पाहिजे हें ते ओळखून होते.

"तें होणार नाहीं?"

"होय."

"कुणाच्या जिवावर या गमजा चालल्या आहेत?" मौलवींचा प्रत्येक शब्द चढा येऊं लागला. "आम्ही तुला उतरावयाला भाग पाडूं"

"अशक्य आहे!" स्वामिजी निश्चयात्मक उत्तरले.

"अशक्य?"

"तुमच्याप्रमाणेंच या बर्थचें माझेंहि रिझर्व्ह तिकीटच आहे!"

"तें आम्ही जाणत नाहीं!"

"तुमच्या जाणण्याशीं मला कांहींच कर्तव्य नाहीं." इतकें म्हणून लगतचें वर्तमानपत्र स्वामिजींनीं घेतलें व फिरून तें आपल्या डोळ्यांपुढें धरलें. आतां त्यांचें पहिलें विचार पार बदलून गेले. असल्या उर्मटाशीं आणि अविचाऱ्याशीं धर्मासंबंधीं काय विचारविनिमय करावयाचा आहे? सलोख्याच्या हस्तांदोलनासाठीं एकच हात पुढें येऊन भागत नसतें. ज्यांच्या हाडीं-मांसीं विरोधच विरोध खिळला आहे, त्यांस आपणच बंधु समजून भेटण्याची उत्सुकता धरण्यांत काय अर्थ आहे? निदान त्यांच्याकडून तशी तयारी दिसेपर्यंत आपण आपल्याच चालीनें चाललें पाहिजे.

आतां मात्र स्वामिजी इतके खास समजून चुकले, कीं हे मौलवी—काजीसाहेब येनकेन प्रकारेण आपल्याला अखेरपर्यंत सताविल्याशिवाय सोडीत नाहींत. तेव्हां आपण किंवा ते गाडींतून उतरेपर्यंत डोळ्यांत तेल घालून सावध राहिलें पाहिजे.

आणि त्याप्रमाणें स्वामिजींनीं बाह्यतः बेफिकिरी आणि दुर्लक्ष दाखविण्यास आरंभ केला खरा, पण ते अत्यंत सावधानतेनें मात्र राहिले. डोळ्यांसमोर वाचनाच्या निमित्तानें वर्तमानपत्र त्यांनीं धरलें होतें खरें परंतु वाचनाऐवजीं त्याला भोंकें पाडून मौलवींच्या हालचाली ते गंभीरपणानें पाहूं लागले होते.

मौलवीसाहेबांचा क्रोधाग्नि त्यांच्या मस्तकांत ज्वालामुखीप्रमाणें धुमसत होता. हें स्वामिजींना वर्तमानपत्राला पाडलेल्या भोंकांतून स्पष्ट दिसत होतें.

— ३ —

इतकें होईपर्यंत गाडीनें कल्याण स्टेशन केव्हांच मागें टाकून आतां कसारा घाट गांठला होता. इगतपुरी केव्हां गाठीन असें गाडीला झालें होतें. जी गोष्ट कल्याण स्टेशनला साधली नाहीं, ती इगतपुरीला घडवून आणूंच आणूं या विचारानें मौलवीसाहेबांस इगतपुरी गांठण्याची त्वरा जास्त होती.

मौलवीसाहेबांचा कांहीं एक निश्चय झाला असावा असें दिसलें. कारण वेळ नसतां व वाटेंत कसारा घाटांतील सौंदर्य आकर्षक असतांहि मौलवीसाहेब आडवे झाले व त्यांनीं आपादमस्तक अंगावर पांघरूण घेतलें. परंतु ते केव्हां, काय करतील आणि काय नाहीं, याचा नेम स्वामिजींना वाटेनासा झाला होता म्हणून ते त्याच धोरणानें त्यांच्यावर सूक्ष्म दृष्टि ठेवून होते.

कांहीं काल तसाच गेला. मध्येंच स्वामिजी बहिर्दिशेकरितां उठून दार उघडून त्या जागेकडे गेले. त्या वेळांत गाडी कसारा स्टेशनवर आली. थोडी थांबली आणि पुढें चालूंहि लागली. स्वामिजी बाहेर आले. मौलवींच्या पहिल्या पवित्र्यांत बदल दिसला व चुळबूळ वाटली. स्वामिजींचें मन किंचित् साशंक झालें. ते आपल्या जागेजवळ आले. आपण अंथरलेलें मृगाजिन कांहींसें चाळविलें असावें, उशाचें छाटीकुंच्याचें गांठोडें कांहींसें हललें असावें असें त्यांना वाटलें. त्यांनीं एकदां मौलवीकडे व फिरून आपल्या जागेकडे पाहिलें. स्वारीनें कांहीं तरी गडबडगुंडा केला असावा; काय तो मात्र मुळींच लक्षांत येईना. त्याचा छडा लावावयाचा हें त्यांनीं ठरविलें. त्यांनींहि युक्ति केली. छोटें गांठोडें सोडलें. त्यांतून भगवें काढलें आणि अंगावर घेऊन त्यांनींहि आपल्या बर्थवर तणावून दिलीं. पडल्या पडल्याच विचारांच्या निमित्तानें अंग घुसळल्यासारखें केलें. एक हात उशीकरितां मस्तकाखालीं घेतला तोंच बोटाला मागील बाजूस कांहीं कठीण लागलें. किंचित् मान वर उचलली—टिकटिक् आवाज ऐकूं आला. हलकेंच काढून पांघरुणांतल्या पांघरुणांतच पाहिलें. मौलवीसाहेबांच्या

मनगटावरील सोन्याचें मौल्यवान घड्याळ होतें तें! स्वामिजींच्या लक्षांत मौलवींची कारवाई आली. आपल्यावर– या डब्यांतून उतरण्याचा क्षुद्र हेतु साधावा म्हणून—केवढें बालंट आणण्याची मौलवीमजकुरांची नीच तयारी ही! आतां काय? जशास तसें! त्याशिवाय सुटका कुठून? आतां मात्र हयगय केली तर आपल्याच अब्रूची अकारण खराबी व्हावयाची! आणि हा मौलवी मग उजळ माथ्यानें आपल्या तोंडावर थुंकावयाचा!

त्यांनीं एकदम विचार ठरविला. किलकिले डोळे करून हलकेंच त्यांनीं एकदां मौलवीकडे पाहिलें. ते पलीकडे तोंड करून खुशाल पडले होते. ते आतां निश्चिंत होते. पुढें बार उडविण्याची जय्यत तयारी करून ठेवल्यावर त्यांना निश्चिंतपणा कां येऊं नये? स्वामिजींनीं त्या परिस्थितीचा फायदा तत्काल घेतला. त्यांच्या अब्रूचा नाश करावयाला आलेलें तें विष–तें सोन्याचें घड्याळ त्यांनीं पांघरुणांतून हात काढून खिडकींतून बाहेर—धावत्या गाडींतून फेंकून दिलें! आतां स्वामिजी निश्चिंत–निर्घोर झाले.

इगतपुरी स्टेशनवर येऊन गाडी थडकली. गाडी थांबतांच निजून राहिलेले मौलवी ताड्कन् उठले. पायांतील दिल्लीशाही चढाव करकर वाजवीत ते तडक उतरून स्टेशनवर गेले. इकडे स्वामिजी खुशाल पडून होते. गाडीचें डबल इंजिन तेथें सुटावयाचें असतें, म्हणून जरा वेळ लागतो. मौलवीसाहेब स्टेशनफौजदार, दोन पोलीस, स्टेशनमास्तर यांना घेऊन आपल्या डब्याजवळ आले. आणि मुकाट्यानें त्यांनीं स्वामिजींकडे बोट दाखविलें. पोलिसांनीं स्वामिजींना उठविलें. स्वामिजी उठले. त्यांनीं सर्वांकडे पाहिलें. आश्चर्याची मुद्रा केली. "काय?" पृच्छा केली.

"आपण आणि हे मुंबईपासून दोघेच डब्यांत आहांत ना?" स्वामिजींस विचारलें गेलें.

"होय!"

"यांच्या मनगटांतील उशास काढून ठेवलेलें सोन्याचें घड्याळ नाहींसें झालें आहे अशी त्यांची तक्रार आहे."

"बरं मग?—"

"आणि आपल्याशिवाय येथें दुसरें कोणी नाहीं; कोणी आलें-गेलें नाहीं. म्हणून आपली झडती घेणें आहे. तेव्हां कृपा करून आपली झडती

आम्हांला घेऊं द्या ! ” झडती घेणारा अधिकारी दयाळू दिसला. सौम्य-पणानेंच तो स्वामिजींशीं बोलला.

“ माझी कांहीं हरकत नाहीं.” असें हसत हसत स्वामिजींनीं म्हटलें व ते जागेवरून बाजूस झाले. आपलें सामान त्यांनीं अधिकाऱ्यांस दाखविलें. खांका वर करून ते त्यांच्यासमोर उभे राहिले. मौलवी बाह्यतः शांत होते. पण त्यांचा चेहरा चांगला खुलून आला होता.

मुद्देमाल सांपडणार, गुन्हा काफिरावर शेकणार, आपला माल आपल्याला मिळून काफिराच्या हातांत आपल्या देखत हातकड्या पडणार, ही मौलवींची बालंबाल खात्रीच. आणि हें सर्व व्हावयाला अवकाश तरी किती होता ? एक दोन मिनिटांचाच !

अधिकाऱ्यांनीं अल्प काळांतच स्वामिजींचें सामान शोधलें. गाद्या वर-खालीं केल्या. स्वामिजी खांका वर करून समोरच उभे होते, त्यांची झडती काय घेणार ? झडतींत कांहीं सांपडलें नाहीं. अधिकारी मौलवींकडे वळले. त्यांनीं दिलगिरी प्रदर्शित केली. “ आपणच विस्मरणानें मुक्कामींच घड्याळ ठेविलें असेल, तार करून चौकशी करा ” अशी सल्ला दिली. निष्कारण त्रास द्यावा लागल्याबद्दल सदर अधिकाऱ्यांनीं स्वामिजींची अंतःकरणपूर्वक क्षमा मागितली आणि ते निघून गेले.

— ४ —

शिटी झाली. गाडी चालू झाली. स्वामिजी शांतपणें जाग्यावर बसले. वाचनाकरितां बाजूचें पुस्तक त्यांनीं हातीं घेतलें. जणुं काय कांहींच झालें नाहीं अशाच तऱ्हेनें ते वागत होते. पण या प्रकारानें मौलवीसाहेबांचा चेहरा काळाठिक्कर पडला होता. त्यांची वाचाच बंद व्हावयाची पाळी आली. त्यांचा डाव त्यांच्याच गळ्यांत आला. त्या काफिर जादुगारानें काय जादू केली हें त्यांना कळेना. क्रोध, मत्सर, संताप, दुःख, निराशा या सर्वांनीं मौलवीसाहेबांना पुरें भंडावलें. आतां त्यांना स्वामिजींची मूर्ति निराळीच दिसूं लागली. त्यांशीं उगाचच विरोध केला असेंसुद्धां त्यांना वाटूं लागलें असावें. अखेर त्यांच्यानें राहवेना, ते जागेवरून उठले, स्वामिजींच्या जवळ गेले. गद्गद् हलवून त्यांना म्हणाले, “ बिलंदर भल्या ! बडा वस्ताद आहेस, हुषार आहेस, सावध आहेस ! माझ्यावर उलटी कुर-घोडी करून पुन्हा वर शांत बसतोस ? मी तुला शांत बसूं देणार नाहीं.

बोल. माझें घड्याळ कुठें लपविलें आहेस ? माझी पांचशें रुपयांची नुकसानी केलीस, माझ्यावर मात केलीस, त्याचे तुला कांहींच वाटत नाहीं ? माझ्या अंगाचा भडका झाला आहे."

"पण मौलवीसाहेब," स्वामिजी निर्धास्तपणानें त्यांकडे पाहत बोलूं लागले, "माझी ही जागा आणि माझी अमोल अब्रू मला वांचवितां आली म्हणून माझ्या अंगाला आणि मनाला वसंत ऋतूंतील गार वाऱ्याची झुळूक किती आराम देते आहे म्हणतां ! अहो, तुमच्या घड्याळाचे पांचशें रुपये तुम्हींच घालविलेत. त्याची मला काय पर्वा ? आणि तुम्ही तरी कां इतके तळमळतां ? माझी हकनाक अब्रू गेली असती तर मी किती तळमळलों असतों याची कल्पना आहे काय ? घड्याळ काय, जसें आलें तसें गेलें. त्याची आशा आतां सोडा. कसारा-इगतपुरीच्या दरम्यान कुठें तरी चुरडून गेलें असेल; नाहीं तर कुणाला सांपडलें असेल. विरोधकांशीं असा विरोध साधल्याशिवाय गत्यंतर काय सांगा ? "

मौलवीसाहेबांनीं निमूटपणें स्वामिजींचे पाय धरले. "आपल्यांतला विरोध संपला. आपण मला क्षमा करावी. घड्याळ घालवून आपण शहाणपण आणि सलोखा मिळविला. यापुढें आपण एक होऊन हिंदुमुसलमानांची एकी घडवून आणूं--" वगैरे वगैरे म्हटलें.



# शेवटीं पुरुषच ! : : ५६

"कायं प्रभाकर ! अरे प्रभाकर— आहेत का घरांत प्रभाकरपंत—" मी दरवाजांतूनच मोठ्यानें ओरडलों.

"होय-होय. आहेंच मी घरीं, बापू." प्रभाकरानें माडीवरूनच मला 'ओ' दिली. मी लगेच प्रभाकराकडे जाण्याकरितां जिन्याकडे धूम ठोकली.

प्रभाकराची व माझी अगदीं बाळपणापासूनची मैत्री. ती झाली कशी हें मला आतां मुळींच आठवत नाहीं. अन् ती वाढली कशी याचें सर्व लोकांना

मला सुद्धां—आश्चर्यच वाटतें. प्रभाकर गर्भश्रीमंत, तर मी साऱ्या मुलखाचा दरिद्री! प्रभाकराच्या वडिलांनीं मला जर अडल्या वेळीं मदत केली नसती तर माझ्याच्यानें झाला इतका विद्याभ्यास झालाच नसता. सुरवातीला मी प्रभाकराच्या बराच पुढें होतों. पण मी बी. ए.च्या वर्गांत २-३ वर्षें मुक्काम केला व त्या वेळीं प्रभाकर माझ्या पुढें गेला. बी. ए. होतांच मीं सरकारी शाळाखात्यांत शिक्षकाची नोकरी धरली. प्रभाकर पुढें एम्. ए., एल्एल्. बी. झाला व स्वतःच्याच गांवीं वकिली करूं लागला. अशा रीतीनें मी व प्रभाकर पुन्हा एकाच गांवीं राहूं लागलों.

होय; एक गोष्ट सांगावयाचीच राहिली. एम्. ए.च्या वर्गांत असतांनाच प्रभाकराची व त्या वेळच्या कुमारी सुशीलाबाई देशमुख यांची ओळख झाली. प्रभाकर हा एक हुषार विद्यार्थी व उत्कृष्ट खेळाडू म्हणून त्याची कॉलेजमध्यें ख्याति होतीच आणि त्यामुळें कॉलेजमधील विद्यार्थि-वर्गांतहि तो फारच आवडता असे. कुमारी देशमुख ह्या त्या वेळीं बी. ए.-च्या वर्गांत होत्या. कॉलेजमधील वक्तृत्वोत्तेजक सभेच्या कु. सुशीलाबाई ह्या चिटणीस होत्या. मुलांच्या सभेंत वाटेल त्या विषयावर सडेतोडपणानें बोलायला त्या भीत नसत. सुशीलाबाईची वाणी गोड असे; भाषा जोर-दार असे. प्रतिपक्षावर त्या कधींहि तोंडसुख घेत नसत, पण आपल्या विचारसरणीनें त्या प्रतिपक्षाला अगदीं निरुत्तर करीत. कु. सुशीलाबाई जितक्या हुशार होत्या, तितक्याच सुंदर होत्या. शिवाय, त्यांचे वडीलहि पूर्वीच्या पिढींतील सुधारकांपैकीं एक होते. त्यांना आपल्या मुलीचें फार कौतुक वाटत असे. सुशीलाबाई बी. ए. होतांच वक्तृत्वकलेचा अभ्यास करण्याकरितां त्यांना विलायतेस पाठवावयाचें त्यांच्या वडिलांनीं ठरविलेंहि होतें. असे बेत केले होते, पण परमेश्वराची मात्र तशी इच्छा नव्हती; त्या-मुळें सुशीलाबाई विलायतेस कांहीं जाऊं शकल्या नाहींत. मध्यंतरींच प्रभा-कराची व सुशीलाबाईची ओळख झाली; नंतर पुढें त्यांचा परिचय दाट होत गेला व शेवटीं त्यांच्या मैत्रीचें पर्यवसान विवाहबद्ध होण्यांत झालें. प्रभाकरा-च्या वडिलांना हें लग्न फारसें पसंत पडलें नाहीं. पण त्यांनीं त्यांत फारसा मोडताहि घातला नाहीं. प्रभाकरानें आपली इच्छा वडिलांच्या जवळ जेव्हां सांगितली, त्या वेळीं ते प्रभाकराला इतकें मात्र म्हणाले, कीं तूं या लग्नाच्या भानगडींत पडूं नयेस, कारण तें तुला सुखकर होणार नाहीं. कोणत्याहि

संकटाला न जुमानतां प्रभाकरानें सुशीलाबाईशीं लग्न केलें व कु. सुशीलाबाई देशमुख ह्या सौ. प्रभावतीबाई देशपांडे झाल्या.

प्रभाकराचें लग्न होऊन थोडे दिवस झाले होते. प्रभाकरानें आपली वकिली नुकतीच सुरू केलेली असल्यामुळें त्याला वेळहि बराच मिळत असे. पूर्वी प्रभाकर क्लबाचा फारच शौकी असे; पण आतां तो पुरा घरकोंबडा झाला होता. एकदोन दिवसांआड, संध्याकाळीं शाळा सुटल्यावर, मी प्रभाकराकडे जात असे व त्या वेळीं बहुतकरून प्रभाकर व वहिनी माडी-वरील गच्चीवर गप्पा मारीत बसलेलीं असत. आजहि मी असाच त्यांचेकडे गेलों होतों.

जिना चढून मी वर गेलों. वहिनी टेबलाशीं कांहींतरी लिहीत बसल्या होत्या व प्रभाकर त्यांच्या खुर्चीच्या पाठीवर हात ठेवून उभा होता, माझ्या पावलांचा आवाज होतांच दोघांनीं माझ्याकडे मागें वळून पाहिलें. प्रभाकर हसला; वहिनी लाजल्या.

" खरंच प्रभाकर," मी म्हणालों, " आज अम्मांना ( प्रभाकराच्या आईला ) तुम्हा दोघांची दृष्ट काढायला सांगितलं पाहिजे. नाहींतर एखादे वेळेला तुमच्या सुखाला माझीच दृष्ट लागायची ! "

" पुरे-पुरे, तुझें ब्रह्मज्ञान " प्रभाकर मध्येच म्हणाला. " हा बापू म्हणजे अगदीं Il Penseroso आहे. प्रभा, मोठा Pessimist बुवा हा अगदीं. अन् तूं ध्यानांत ठेव बापू, कीं आमचें सुख हें नुसत्या दृष्टीनें कोमेजण्याइतकें नाजूक नाहीं. अरे बाबा, प्रभा मला मिळावी म्हणून मला किती प्रयत्न करावे लागले; व अप्पा देखील त्या वेळीं थोडेसे माझ्यावर नाखूष झाले. इतक्या आटापिटीनें प्राप्त करून घेतलेलें हें सुख तुझ्या काल्पनिक दृष्टीनें रे कसें कमी होईल ? मूर्खच आहेस झालें ! "

" बाकी इतकें खरें बापूराव, कीं आमच्या सुखाला एखाद वेळीं कुणाची तरी दृष्टच लागायची ! अप्पासाहेबांना आमचें लग्न पाहिल्याप्रथम पसंत नव्हतें खरें, पण आतां ते अन् अम्मा मला अगदीं जीवप्राण करतात. मला इतकीहि तकलीफ होऊं नये म्हणून ते किती काळजी वाहतात म्हणून सांगूं ! अन् आतांशा अप्पासाहेब तर मी म्हणेन तें पुस्तक आणून द्यायला केव्हांहि तयार असतात. आतांशा आम्ही दर महिन्याला जवळजवळ शंभर रुपयांचीं पुस्तकं घेतों."

" खरंच, नशीबवान आहांत बुवा तुम्ही दोघेंहि." मी अगदीं सहज म्हणालों, "पण वहिनी, आज मुद्दाम कसची तयारी करीत आहांत तुम्ही ?" मीं विचारलें.

" अरे, कसची म्हणून काय विचारतोस बापू ?" प्रभाकर मध्येंच म्हणाला. " परवांचे दिवशीं येथील सार्वजानिक गणपतीपुढें सौ. प्रभावतीबाई देशपांडे यांचें 'सद्यःस्थिति' या विषयावर व्याख्यान होणार आहे. आहे बुवा ! मी एम्. ए., एल्एल्. बी. झालों आहे खरा; पण आम्हांला कांहीं अजून कोणी म्हणत नाहीं, कीं तुम्ही व्याख्यान द्या. आणि या आमच्या विदुषी ! नुसत्या बी. ए.च आहेत तरी त्यांनीं व्याख्यान द्यावें म्हणून कोण निमंत्रणें त्यांना येत आहेत. आहे बुवा ! चैन आहे एका माणसाची."

मला या प्रेमळ नवरा बायकोचें किती तरी कौतुक वाटलें, पण लगेच मनांत एक चमत्कारिक विचार आला. हें त्यांचें प्रेम असेंच टिकेल का ?

इतक्यांत मोतीरामनें तीन पेले कोको आणला, व त्या गडबडींत मी माझ्या मनांतील दुष्ट विचार लगेच विसरूनहि गेलों..

गणेश-उत्सवांतील सौ. वहिनींच्या व्याख्यानाला मी गेलों होतों. व्याख्यानाला खूप गर्दी जमली होती. व्याख्यानाला कधींहि न जाणारे कित्येक गृहस्थहि व्याख्यानाला आले होते. आणि खरोखरच सौ. वहिनींचें व्याख्यान फारच उत्तम झालें. आपले विचार त्या अत्यंत कळकळीनें व मुद्देसूदपणानें सभेपुढें मांडीत होत्या. व्याख्यानानंतर अध्यक्षांनीं अगदीं मोकळया मनानें व्याख्यात्रींची स्तुति केली. इतकें चांगलें व्याख्यान बरेंच दिवसांत ऐकावयाला मिळालें नव्हतें, असें म्हणत सर्व लोक आपआपल्या घरीं गेले.

दुसऱ्या दिवशीं मी प्रभाकराकडे गेलों. प्रभाकर व वहिनी यांच्या नेहमींप्रमाणें गप्पाच चालल्या होत्या.

" या बापूराव, या. तुमच्या वहिनी आतां आपल्या प्रांताच्या ॲनी बिझंटबाई होणार बुवा. पाहिलेंस का बापू, आपल्या खास अंकाकरतां हिनें कांहींतरी लिहावें म्हणून, दोन तीन मासिकांच्या संपादकांचीं हिला पत्रें आलेलीं आहेत. 'गृहलक्ष्मीनें' तर आमच्या गृहलक्ष्मीचा फोटोहि मागितला आहे. आतां हिला 'प्रभाकरपंत देशपांडे यांची बायको' असें लोक

ओळखण्याऐवजीं, मलाच 'प्रभावतीबाई देशपांडे' यांचा नवरा असें लोक ओळखायला लागणार. आम्ही सर्व दिवस कोर्टांत जातों, व ही सारा दिवस वाचीत बसते. आम्हांला धड स्मॉल कॉज कोर्टांतल्यासुद्धां भानगडीचे मुकदमे मिळत नाहींत व हिला मात्र राष्ट्रसंघाच्या आर्थिक परिस्थितीसबंधानें अभ्यास करावयाला वेळ मिळतो. एकेकाचें नशीब असें असतें." प्रभाकर म्हणाला.

मी मनांत थोडासा चरकलों. बाहेर एक घुबड ओरडत होतें !

वहिनींना मिळणाऱ्या मानाबद्दल मीं वहिनीचें अभिनंदन केलें.

"पण या मानाला कारण कोण, बापूराव ?" वहिनी म्हणाल्या.

"कोण बुवा ?" मीं मुद्दाम विचारलें.

"हा वेडा मुलगा !" वहिनी प्रभाकराच्या केसांशीं खेळत म्हणाल्या.

'परमेशा ! या प्रेमळ जोडप्याला निरंतर सुखांत ठेव.' मीं परमेश्वराची अनन्यभावानें प्रार्थना केली.

असेच आणखी कांहीं दिवस लोटले. सौ. वहिनींचे लेख बहुतेक सर्व मराठी मासिकांतून प्रसिद्ध होत; आणि त्यांचा Indian Womanhood हा लेख विलायतेंतील एका स्त्रियांच्या मासिकांतहि प्रसिद्ध झाला होता. डिसेंबर महिन्यांत आमच्या जिल्ह्यांतील स्त्रियांची परिषद भरली होती व तिचें अध्यक्ष्यस्थानहि सौ. वहिनींनाच मिळालें होतें. वहिनींच्या, त्या सभेंतील, भाषणाची सर्व लोकांनीं मुक्तकंठानें स्तुति केली होती.

अप्पासाहेबांचेकडे लखनौ विश्वविद्यालयाचे प्रोफेसर रॉय आले होते. प्रोफेसर रॉय हे लंडन विश्वविद्यालयाचे अर्थशास्त्र व राजकारणशास्त्र या विषयांचे Ph. D. होते. प्रोफेसरसाहेबांचें आमच्या गांवीं एक व्याख्यानहि झालें. प्रोफेसर रॉय यांना अप्पासाहेबाचे घरीं जी एक पार्टी झाली, तिला मी हजर होतों. 'अल्पसंख्याक लोकांची भवितव्यता' या विषयावर प्रोफेसरांचें व प्रभाकर व सौ. वहिनी यांचें पुष्कळ भाषण झालें.

"खरेंच सांगतों मी आपल्याला, रावबहादुर देशपांडे, आपल्या सूनबाईचें वाचन बरेंच आहे; अन् विचारसरणीहि अगदीं सरळ आहे. She is a jewel in your family." रॉय म्हणाले.

अप्पासाहेबांनींच अत्यंत कौतुकानें सौ. वहिनींच्याकडे पाहिलें.

"माझी सून आहेच तशी गुणांची." अम्मा म्हणाल्या.

प्रभाकर खिडकीवाटे बाहेर पाहत होता, " काय या घुबडाचा भलत्याच वेळीं ओरडण्याचा त्रास आहे हा ! " तो म्हणाला.

वहिनींनीं एक सुस्कारा सोडला.

असाच एक दिवस मी प्रभाकराकडे गेलों होतों. आतांशा पुष्कळ वेळां प्रभाकर एकटाच बसलेला माझ्या दृष्टीला पडे.

" काय प्रभा," मीं विचारलें. " एकटाच बसला आहेस ? वहिनी काय करीत आहेत ? "

" बसली असेल एखादा लेख लिहीत. नाहींतर कोणी तरी प्रोफेसर रॉयसारखे एखादे विद्वान आले असतील भेटीला. आतांशा तिला माझ्याशीं बोलायला वेळ मिळतो आहे कुठें ? "

" काय म्हणालास प्रभा ? " वहिनी हॉलमध्यें येतां येतां म्हणाल्या. "हे तुझेच का विचार? तुझे असे विचार असतील, असें मला वाटलें नव्हतें."

" आणि तूंहि अशी वागशील असेंहि मला वाटत नव्हतें." प्रभाकर चिडून म्हणाला.

" कशी रे वागलें मी ? " वहिनी म्हणाल्या. त्यांच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले होते. " तुला बरें वाटावें म्हणून मी लेख लिहूं लागलें, व व्याख्यानें देऊं लागलें. तुला बरें वाटावें म्हणून मीं कांहीं कांहीं विषयांचा मुद्दाम अभ्यास केला. तुला बरें वाटावें म्हणून मी...... "

" प्रोफेसर रॉयसारख्या मनुष्याबरोबर वादविवाद केला." प्रभाकरानें वहिनींचें वाक्य पुरें केलें.

" हं–पुरे कर." वहिनी संतापानें म्हणाल्या. " तूं काय बोलतो आहेस याची तुला कल्पना तरी आहे का ? प्रोफेसर रॉय हे अप्पासाहेबांचे पाहुणे होते. मला ते अप्पासाहेबांच्या इतकेच पूज्य होते. तुझ्या डोक्यांत मात्र इतकी घाण असेल अशी मला कल्पनाहि नव्हती. पुरुष हे शेवटीं पुरुषच ! " वहिनी संतापानें आंत गेल्या.

मी आश्चर्यमूढ झालों. गोष्टी या थराला गेल्या असतील अशी माझी कल्पनाहि नव्हती.

वहिनींनीं आपल्या लेखांचें पुडकें बाहेर आणलें, व शांतपणानें एक एक लेख त्या फाडूं लागल्या. सर्व कागद फाडल्यावर त्यांनीं ते कागद

वेस्टपेपर बास्केटमध्यें टाकून त्यांना काडी लावली. नंतर त्यांनीं लायब्ररींतील कपाटांच्या किल्ल्या प्रभाकरापुढें टाकल्या.

" प्रभा," वहिनी म्हणाल्या, " माझें तुझ्यावर किती प्रेम आहे याची तुला कल्पनाहि नाहीं. तुझ्याकरतां मी लेखिका बनलें व आतां तुझ्याचकरतां मी लिहिणें सोडून देत आहें; तुझें हें वागणें गैर आहे असें माझें ठाम मत आहे. पण आपल्या घरांत शांतता व सुख नांदावें व मुख्यतः तूं सुखी व्हावेंस म्हणून मला आतां या नवीन परिस्थितीचा अंगीकार केला पाहिजे ! "

प्रभाकर शून्य दृष्टीनें बाहेर पाहत होता.

सौ. वहिनी टेबलावर डोकें ठेवून अश्रुमोचन करीत होत्या.

पतिपत्नीच्या या अशा भांडणांच्या वेळीं आपण तेथें नसावें म्हणून मी तेथून उठून हळूच बाहेर आलों.

* * *

असेच आणखी कांहीं दिवस गेले. विदर्भ साहित्य सम्मेलनाला सौ. वहिनींना आग्रहाचें बोलावणें आलें. सूनबाईनीं सम्मेलनाला जावें म्हणून अप्पासाहेबांनीं व अम्मानींसुद्धां सौ. वहिनींना पुष्कळ सांगितलें. पण सौ. वहिनींनीं एकदां नाहीं म्हटलें तें म्हटलें. प्रभाकरानेंहि त्यांना तसा आग्रह केला नाहीं.

मनोरंजनाच्या खास अंकांतील लेखिकांत सौ० प्रभावतीबाई देशपांडे यांचें नांव यंदा चमकलें नाहीं.

त्यानंतर लवकरच माझी बदली परगांवीं झाली. देशपांडे मंडळींचा मीं जड अंतःकरणानें निरोप घेतला.

मीं जातांना ती. अप्पासाहेब व अम्मा यांना विचारावयाला गेलों. " बापू, तूं पाहिलेंसच आतांशा आमचें घर कसें झालें आहे तें. सूनबाई इतकी सद्गुणी, पण आमच्या प्रभाचें तिच्याशीं पटलें नाहीं."

" पण असें कसें झालें, अप्पासाहेब ? " मीं विचारलें.

" अरे बाबा, प्रभाकर किती झाला तरी पुरुषच. शेवटीं पुरुषच ! तो आपल्या जातीवर गेला." अम्मा म्हणाल्या. अप्पासाहेब खिन्नपणानें हसले !

* * *

मी माझ्या नोकरीच्या गांवीं रुजू झालों. पण मधून मधून सौ. प्रभावती वहिनींचे ते शब्द माझ्या कानांत कोणी तरी गुणगुणत आहे, असें मला वाटतें. " शेवटीं पुरुषच ! " होय शेवटीं पुरुषच !



# सिंधु देशाची राजकन्या : : ५७

**सत्यानें कौमार्यभंग; का असत्यानें कौमार्यरक्षण ?**

असा प्रश्न सुमारें बाराशें वर्षांपूर्वीं एका कुमारिकेच्या पुढें येऊन पडला होता. सन ७११ तील ही गोष्ट. मुसलमानी धर्माची स्थापना होऊन सुमारें दीडशें वर्षें होत आलीं होतीं. महंमद पैगंबराच्या जन्म सन ५७० सालीं होऊन त्याचा अंत सन ६३२ सालीं झाला. त्यास साक्षात्कार होऊन त्यानें जेव्हां नवीन धर्म स्थापण्यास प्रारंभ केला, तेव्हां त्यास एकंदर परिस्थिति अत्यंत अनुकूल होती. त्या वेळच्या प्रचलित असलेल्या धर्मास अत्यंत बिकट स्वरूप प्राप्त होऊन धार्मिक बाबतींत पूर्ण अनवस्था माजलेली होती. येशु ख्रिस्ताच्या धर्माचा प्रसार पश्चिमेकडे झपाट्यानें होत होता, परंतु एशिया खंडांत त्याची विशेषशी भरभराट झालेली किंवा होत नव्हती. यामुळें एखाद्या नूतन, परंतु उज्ज्वल व उपयुक्त धर्माची स्थापना होण्याविषयीं सर्वसाधारण लोकांचीं मनें अत्यंत आतुर झालेलीं होतीं. या इच्छेस अनुसरून महंमद पैगंबरानें अशींच धार्मिक मतें प्रतिपादिलीं, कीं त्यामुळें जनतेंत एकदम नवीन चैतन्य संचारून तिच्या ठायीं विलक्षण उत्साह, उग्रपणा व आत्मविश्वास उत्पन्न झाला.

महंमदानें आपल्या धर्मास इस्लाम (म्हणजे तारणमार्ग) असें नांव दिलें. या धर्मातील तत्त्वें इतकीं अमूल्य व व्यवहारोपयोगी आहेत कीं, त्यांच्या जोरावर इस्लामी संस्कृतीनें गेल्या बाराशें वर्षें ख्रिश्चन संस्कृतीशीं यशस्वीपणें टक्कर दिलेली आहे. या धर्मातील अत्यंत महत्त्वाचें तत्त्व असें आहे कीं, " आजपर्यंत शान्ततेनें व नम्रतेनें धर्मोपदेश करण्यांत आला; परंतु लोक अतिशय दुराग्रही, ते त्या उपदेशाप्रमाणें मुळींच वागत नाहींत. हा धर्म जे ऐकणार नाहींत त्यांना तरवारीनें जिंकावें. लढाईत यश

आल्यास शत्रूची धनदौलत आपणास मिळेल; व मृत्यु आल्यास महत्पुण्य लागून स्वर्गाची प्राप्ती होईल." गीतेंतील भगवंतांचा जो उपदेश, कीं 'हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।' यांत व वरील तत्त्वांत किती तरी साम्य ! फरक इतकाच, कीं आमचे इस्लामी बंधु या उपदेशास जागले आहेत, आणि आम्ही तो पार विसरून गेलों आहोंत. हा उपदेश मध्य एशियांतील लोकांना अमृततुल्य वाटून सर्व जनता खडबडून जागी झाली व तिच्यांत अश्रुतपूर्व असें चैतन्य खळाळलें. याचा परिणाम असा झाला, कीं इस्लामी धर्माच्या अनुयायांचा प्रचंड लोंढा पश्चिमेकडे जोरानें वाहत जाऊन व आपल्या मार्गांत येणाऱ्या प्रान्तांना व प्रत्यवायांना पादाक्रान्त करून तो फ्रान्स देशावर जाऊन आदळला; व सन ७३२ सालीं फ्रान्सचा बादशहा चार्लस मार्टेल यानें टूर्स व पायटियर्स या रणांगणांवर जर तो थोपवून धरला नसता, तर आजमितीस ख्रिश्चन संस्कृतीची काय दुर्दशा झाली असती, याची कल्पनाहि करवत नाहीं.

मुसलमानी लोकांची दृष्टि पश्चिमेप्रमाणें पूर्वेकडेहि वळण्यास चुकली नाहीं. हिंदुस्थानचा अवाढव्य व्यापार, अलोट संपत्ति, आपापसांतील आत्मघातकी अंतःकलह वगैरे स्थितींचीं वर्णनें त्यांच्या कानांवर गेलेलीं होतीं, व कित्येकांनीं तर ती स्थिति प्रत्यक्ष अवलोकिलीहि होती. यामुळें हिंदुस्थानांतहि आपल्या धर्माचा प्रसार करण्याची इच्छा त्यांच्या मनांत साहजिकपणेंच उद्भवली.

वर सांगितल्याप्रमाणें तो सन ७११ होता. दमास्कसच्या गादीवर वलीद खलिफा राज्य करीत होता. त्याच वेळेस दाहिर हा सिंध देशाचा राजा होता. त्याच्या राजधानीचें शहर आरोड होतें. सिंध देशावर स्वारी करण्यास कांहीं तरी सबब वलिद यास पाहिजे होती, व त्याच्या सुदैवानें ती त्यास लवकरच मिळाली. देवल नामक बंदरांत कांहीं रजपुतांनीं मुसलमानांचें एक जहाज पकडून ठेविलें. मुसलमानांनीं राजा दाहिर याजजवळ तें परत मागितलें. परंतु देवल बंदर दाहिरच्या राज्यांत नसल्यामुळें त्याला ती मागणी कबूल करतां येईना. लगेच खलिफा वलिद यानें दाहिरवर प्रचंड सैन्य पाठवून दिलें. त्या सेनेचा मुख्य महंमद कासिम नांवाचा एक तरुण शूर सरदार होता. कासिमनें मजल दर मजल करीत येऊन पहिल्या धडाक्यासरशीं अपराध्यांस शासन करण्याच्या ऐवजीं देवल येथील हिंदूंच्या

देवालयांवर हल्ला केला, आणि ज्यांनीं ज्यांनीं इस्लामी धर्माचा स्वीकार केला त्यांना जीवदान देऊन बाकीच्यांची सरास कत्तल केली. देवालयांचा विध्वंस केल्यानंतर त्यानें आपला मोर्चा राजा दाहिर याजकडे वळविला. दाहिरनें आसपासच्या सर्व राजांकडे आपल्या मदतीस येण्याविषयीं जासूद पाठविलें; परंतु ते बिचारे जसे गेले तसेच हात हालवीत परत आले. दाहिर-वर स्वारी करण्यांत कासिमचा व त्याचा मालक वलिद यांचा हेतु धर्मप्रसार करण्यापलीकडे नाहीं, व इस्लामी धर्माचा पाया आर्यभूमींत रोंवला गेला तर आगेंमागें आर्यसंस्कृतीस जबरदस्त धक्का बसल्याशिवाय राहणार नाहीं, तेव्हां आपआपसांतील सर्व भेदभाव विसरून जाऊन दाहिरास यथामति व यथाशक्ति सहाय करणें प्रत्येक हिंदूचें पवित्र कर्तव्य होय, आज दाहिराचा शत्रु जो कासिम तोच उद्यां आपलाहि शत्रु बनण्यास चुकणार नाहीं, असा सरळ विचार त्या वेळेच्या एकाहि हिंदु राजाच्या मनांत आला नाहीं, व पुढेंहि आल्याचीं उदाहरणें हिंदुस्थानच्या इतिहासांत सांपडलींच, तर तीं हाताच्या बोटांवर मोजण्याइतकींच सांपडतील. आमच्या आर्यसंस्कृतींत हा राष्ट्रघातकी दोष कशानें शिरला असेल तो असो; परंतु तो घालविण्याचा आम्हीं कसोशीनें प्रयत्न न केल्यास एक विशिष्ट धर्मीय समाज या दृष्टीनें आमची कधींहि ऊर्जितावस्था होणें शक्य नाहीं, व कदाचित् योग्याहि होणार नाहीं.

अशा प्रकारें निराशा झाल्यावर दाहिरचें मन चिंताग्रस्त झालें, परंतु त्याचा धीर मात्र सुटला नाहीं. त्यानें आपल्या प्रजाजनांस सर्व हकीकत कळवून त्यांना मदत करण्याविषयीं विनंति केली, व त्यांनींहि ती राजनिष्ठा-पूर्वक मान्य केली. युद्धाची सिद्धता झाल्यावर दोन्ही सैन्यें रणांगणावर सन्मुख उभीं राहिलीं. कासिमचा चेहरा नूतनलब्ध जीवनानें उल्हसित झालेला दिसत होता, तर दाहिरची मुद्रा निराशाजन्य निश्चयानें उग्र झालेली होती. लढाईस तोंड लागलें. एकच रणधुमाळी उसळली. दोन्ही सैन्यांनीं पराक्रमाची शिकस्त केली. दाहिरचें उतारवय झालेलें असतांनाहि त्याच्या समशेरीनें अनेक शत्रूंना कंठस्नान घातलें. परंतु शेवटीं त्यास वीरास उचित असें समरांगणावर मरण आले. ही बातमी त्याच्या सैन्यास समजतांच त्याची पळापळ सुरू झाली, व विजयश्रीनें कासिमच्या गळ्यांत माळ घातली. दाहिरच्या सैन्याबरोबर त्याचा मुलगा पळून आलेला

पाहतांच दाहिरच्या पत्नीच्या अंगाचा संतापानें भडका उडून तिनें त्याची निर्भर्त्सना केली. इतकेंच नव्हे, तर सैन्याचें आधिपत्य स्वतः आपणाकडे घेऊन व सर्व जमवाजमव करून तिनें पुन्हा कासिमशीं निकरानें लढाई सुरू केली. परंतु कासिमच्या सेनेपुढें तिचा इलाज न चालून तिचे सर्व लोक मारले गेले, व दाहिरचें राज्य कासिमच्या हस्तगत झालें.

राज्य हातीं आल्याबरोबर कासिमनें सर्वत्र लुटालूट व जाळपोळ आरंभिली, व त्यामुळें सर्वांस त्राहि त्राहि होऊन गेलें. कासिमनें अगणित संपत्ति मिळविली; परंतु त्याहिपेक्षां लक्षपट–अनंतपट किमतीची अशी चीज त्याच्या स्वाधीन झाली व ती चीज म्हणजे दाहिरची मुलगी होय. कासिम-सारख्या सडेसोटाच्या हातीं लागल्यावर त्या मुलीच्या अंतःकरणाची काय स्थिति झाली असेल याची कल्पना प्रत्येकानें आपल्या स्वतःशींच करावी. आपला मालक खलिफा वलिद याची मर्जी सुप्रसन्न करण्यासाठीं कासिमनें तिला त्याच्याकडे नजर म्हणून पाठविली. ती अत्यंत मोहक व लावण्यवती होती. तिचें सौंदर्य अवलोकन करून वलिद तिच्यावर अनुरक्त झाला, व तो आपणाशीं बेहोषपणाचें वर्तन करणार अशी तिची खात्री झाली. या संकटांतून निभावून जाण्याचा मार्ग कोणता, याविषयीं विचार करतां करतां तिला एक युक्ति सुचली. जर खलिफा आपणाशीं असत्यपणाचें वर्तन करूं पाहत आहे, तर आपणहि त्याच्याशीं कपटाचें वर्तन केल्याविना आपली धडगत नाहीं, असा तिच्या मनाचा निर्धार होऊन, तिनें तावडतोब आचरणांत फरक घडवून आणला. सत्याचा आग्रह हाच सत्य-आग्रह होय, असा तिच्या बुद्धीचा कयास झाला. जी नेहमीं दुर्मुखलेली असावयाची तीच खलिफाची भेट झाल्याबरोबर आनंदित दिसूं लागली. शेवटीं ती आपणांवर आषक झाली अशी खलिफाची समजूत होऊन तोहि आनंद-सागरांत गटांगळ्या खाऊं लागला. स्वारी रंगांत आल्यावर ती अतिशय दीनवाणीनें खलिफास म्हणाली, "खाविंद, आपलें सौंदर्य व वैभव अव-लोकन केल्यावर स्वर्गीच्या देवांगनाहि आपणावर मोहून जातील, मग माझ्या-सारखीची ती कथा काय? परंतु कासिमनें मजवर बलात्कार केला असल्या-मुळें मी भ्रष्ट झालेली आहें व खाविंदांच्या उपभोगास पात्र नाहीं."

वरील वाक्यांतील प्रत्येक शब्द तिच्या अंतःकरणाच्या चिरफळ्या करीत बाहेर पडत होता. पण करते काय बिचारी? तिच्या कौमार्याचें

रक्षण होण्यास तिला याशिवाय दुसरा मार्गच मोकळा नव्हता. तिचे शब्द कानीं पडतांच खलिफाचा संताप अनावर होऊन त्यानें कासिमचें शिर आणण्याविषयीं आज्ञा केली. आज्ञेप्रमाणें कासिमचें शीर खफिलापुढें सादर करण्यांत आलें. तें पाहून त्या मुलीला पराकाष्ठेचा आनंद झाला, व ती खलिफास म्हणाली, " माझ्या वडिलांचें राज्य घेणाऱ्या दुष्ट कासिमचा सूड घ्यावा ह्याच हेतूनें मीं त्याच्याविरुद्ध मला भ्रष्ट केल्याचें असत्य भाषण केलें, माझी मनीषा आतां तृप्त झाली आहे. खलिफा करतील ती शिक्षा भोगण्यास मी तयार आहें ! "

एका अल्पवयस्क तरुणीनें आपणांस हातोहात फसविलेलें पाहून खलिफा वलिद अत्यंत क्रोधायमान झाला, व त्यानें तिचा शिरच्छेद करण्याविषयीं आज्ञा केली. शिक्षेची अंमलबजावणी होतांना ती कुमारी म्हणाली, " माझ्या कौमार्याचा भंग होण्यापेक्षां मला मरण कितीतरी प्रिय व आनंदकारक वाटत आहे ! " त्या कुमारीनें असत्य भाषण केलें खरें, परंतु त्यामुळें तिनें आपल्या कौमार्याचें रक्षण व कासिमवर सूड, अशा दोन गोष्टी साधून घेतल्या !

तिनें जर सत्याची कांस धरली असती, तर तिला कासिमवर सूड घेतां आला नसता, किंवा तिचें कौमार्य खलिफाच्या विषयवासनेस बळी पडल्यावांचून राहतें ना. सत्यासत्य नेहमीं सापेक्ष असतें. असत्य भाषण व वर्तन करणाऱ्या इसमाशीं सत्यानें वागणें कधींहि हितप्रद होत नाहीं, व सत्याचरणी इसमाशीं असत्याचा अवलंब करणें यासारखें दुसरें घोर पातक नाहीं. म्हटलेंच आहे कीं, " व्रजंति ते मूढधियः पराभवम् । भवंति मायाविषु ये न मायिनः ॥ " स्वप्नांत दिलेल्या वचनाप्रमाणें वागण्याविषयीं आग्रह धरून बसणाऱ्या, किंवा अतिथि म्हणून घरांत घुसून शेवटीं यजमानाच्या मुलाचें मांस मागणाऱ्या इसमाशीं, मग तो एखादा महान् तेजस्वी ऋषि असो किंवा प्रत्यक्ष परमेश्वर असो, सत्यानें वागणें यासारखा आत्मघातकी असमंजसपणा दुसरा कोणताहि नसेल. तथापि, असलींच घातुक उदाहरणें आम्ही आपल्या तरुण-तरुणींपुढें ठेवून त्यांच्या माणुसकीचा सत्यनाश करीत आहोंत. हीच जिथें आमच्या सामाजिक नीतीची कसोटी, तिथें सामाजिक दृष्ट्या आम्ही अधोगतीस जात असलों, तर त्यांत नवल तें कोणतें ? सत्यासत्य, सद्गुणदुर्गुण हे नेहमीं सापेक्ष असतात. सद्गुणांचा

अतिरेक केव्हांहि दुर्गुण म्हणूनच ठरत असतो, आणि दुर्गुणाच्या अतिरेकां-तूनच सद्गुणांचे अंकुर बाहेर पडूं लागतात, हीं साधीं नीतितत्त्वें आम्हांस समजूं लागणार तरी केव्हां ?



## समाधान ! : : ५८

एकटा मगध देशच काय तो जिंकायचा राहिला होता. तरुण सेनापति वीरसिंह यानें कोसल सम्राटाच्या ध्वजपताका प्रत्येक नगरीवर फडफडत ठेविल्या होत्या !—

पण मगध देश--?

कोसल सम्राट्सुद्धां, वारंवार वीरसिंहाची स्तुति करून, त्याचें लक्ष मगध देशाकडे वेधण्याचा प्रयत्न करीत.

पण प्रत्येक वेळीं तो विषय टाळण्याच्या उद्देशानें वीरसिंह म्हणे, " पाहूं-पाहूं. "

सर्वांना विलक्षण आश्चर्य वाटत होतें !—

पण वीरसिंहाला विचारायचें कोणी ? प्रत्यक्ष कोसल सम्राट्हि जाणून होते कीं, साऱ्या आर्यावर्ताला मांडलिक करणारा कोसलांचा राजा नसून कोसलांचा सेनापति वीरसिंह होता !—

कोणी म्हणत--

मगधाच्या राजाकडून त्याला खाजगी देणग्या मिळत असतील.

तर कित्येकांना वाटे–मगधांची त्याला भीति वाटत असावी—

पण एके दिवशीं, सेनापतीच्या एका विश्वासू सेवकाकडून सम्राटांनीं गुणगुण ऐकली, कीं मगधराजाला मृगाक्षी म्हणून एक लावण्यवती राज-कन्या आहे, आणि तिच्या प्राप्तीसाठींच सेनापति मगधाला दुखवूं इच्छित नाहींत !--

पण या कल्पनेवर सम्राटांचा विश्वास बसेना ! ते मनांत म्हणाले—

" कोसल सिंहासनाशीं राजनिष्ठ असलेल्या वीरसिंहाच्या मनांत असल्या क्षुद्र गोष्टी येणें सर्वस्वीं अशक्य आहे !--"

पण त्यांनासुद्धां वीरसिंहाला आज्ञा करतां येईना. कारण—कारण उघडच होतें!—

त्यांनीं पुष्कळ दिवस वाट पाहिली. वीरसिंह तिकडे जाणून-बुजून दुर्लक्ष करीत आहे असें त्यांनादेखील वाटूं लागलें.

वीरसिंहाचा हेवा करणाऱ्या सहसेनापतीनें सम्राटांना उत्तेजन दिलें.

* * *

एके दिवशीं राजसभेत सम्राट् कोसलांनीं वीरसिंहाला सांगितलें—

" उद्यां पहांटे मगधनगरीवर चाल करून तुमच्या यशोधनाची पूर्तता करा!—"

वीरसिंहानें नम्रपणें अभिवादन केलें आणि तो म्हणाला—

" राजन्, क्षमा असावी. माझ्याकरितां, आपल्या या सेनापतीकरितां, कांहीं दिवस या अपराधाची क्षमा करा—"

सम्राट् विचारांत पडले.

त्यांनीं सहज बाजूला पाहिलें. सहसेनापतीनें आपली मान खालीं लवविली.

सम्राटांनीं आपला चेहरा क्रुद्ध केला व ते म्हणाले—

" सम्राटांची आज्ञा सेनापतीच्या इच्छेची वाट पाहत नसते!"

वीरसिंहानें दोन क्षण विचार केला. अधिक कांहीं न बोलतां त्यानें आपली सेनापतीची तरवार सम्राटांच्या पायांवर ठेवली व तो म्हणाला—

" सम्राट् क्षमा असावी!—"

सम्राट् गोंधळले. पण स्वतःची आज्ञा परत घेण्याची ती वेळ राहिली नव्हती!

वीरसिंहानें पुनः एकवार अभिवादन केलें व खालीं मान घालून तो राजसभेच्या बाहेर पडला!

सहसेनापतीकडे पाहत सम्राटांनीं आज्ञा दिली—

" प्रातःकालीं मगधनगरविर कोसलांची ध्वजपताका चढली पाहिजे!—"

* * *

पौर्णिमेचा पूर्णचंद्र निद्रिस्त मगधनगरीवर चंद्ररसाचा वर्षाव करीत होता. वृद्ध मगधराज झोपीं गेल्यानंतर मृगाक्षी आपल्या शयनगृहांत

नुकतीच गेली होती. इतक्यांत द्वारपालानें धावत येऊन वर्दी दिली, कीं कोसल सेनापति वीरसिंह तिच्या भेटीची तांतडीनें अपेक्षा करीत आहेत!

वीरसिंह ?—

मृगाक्षीला द्वारपालाचा बुद्धिभ्रंश झाल्यासारखें वाटलें.

"राजकुमारी, खरंच सांगतों. प्रत्यक्ष वीरसिंह घोड्यावरून एकटे आले असून आपलीच भेट मागतात—"

मृगाक्षी बाहेर आली.

तिला वाटलें जणुं काय मूर्तिमंत विजयच घोड्यावरून खालीं उतरत आहे.

चंद्रप्रकाशांत त्याची तरवार चमकली आणि त्याच्या डोळयांतील एक तऱ्हेचें विलोभनीय तेज तिचें अंतःकरण ओढून घेत आहे असा तिला भास झाला.

वीरसिंहानें गंभीरपणें सांगितलें—

"प्रातःकालीं कोसल सम्राट् मगधनगरीवर चाल करून येत आहेत."

मृगाक्षी आश्चर्यानें त्याच्याकडे पाहूं लागली. वीरसिंह पुढें म्हणाला—

"आज मी कोसलांचें सैनापत्य सोडून आपल्या- आपल्या मगधनगरीच्या सेवेसाठीं आलों आहें—"

चंद्रप्रकाशांत शोभिवंत दिसणाऱ्या मृगाक्षीनें आपली नजर त्याच्यावर स्थिर केली व ती म्हणाली—

"विश्वासघातानं आमच्यासारख्यांचा निःपात करूं इच्छिणाऱ्या सेनापतीचा मी धिक्कार करतें!—"

वीरसिंहानें आपली मान खालीं घातली व तो म्हणाला—

"आपली इच्छा! प्रातःकालच्या लढयाची वार्ता मगधराजांच्या कानांवर घातल्यास मी स्वतःला धन्य समजेन."

त्यानें घोड्याचें तोंड वळविलें. तो राजद्वाराबाहेर पडला.

आपल्या शयनगृहांत जाऊन मृगाक्षीनें खिडकी उघडली.

शांत चंद्रप्रकाशांत अधोवदन केलेला एक घोडेस्वार अत्यंत मंदगतीनें जात होता.

किती तरी वेळ ती तशीच निश्चल नजरेनें पाहत उभी होती. पौर्णिमेचा चंद्र एका ढगाच्या आड जात होता.

* * *

प्रातःकालच्या सोनेरी किरणांनीं मगधनगरीकडे नेहमींप्रमाणें पाहिलें तों भयानक आक्रोश, आणि रक्ताचीं कारंजीं त्यांना दिसलीं.

* * *

मध्यान्ह झाली. कोसलसम्राट् मगध देशाकडून येणाऱ्या दूतांची उत्कंठेनें वाट पाहत प्रासादाच्या गच्चीवर येरझाऱ्या घालीत होते.

बऱ्याच वेळानें, रक्तानें भरलेला एक दूत धांपा टाकीत आला आणि म्हणाला—

"सम्राट् दया असावी. मगधांचा पाडाव होणार इतक्यांत सेनापति वीरसिंहच मगधांच्या बाजूनें चढाई करून आले आणि त्यांनीं साऱ्या कोसलसेनेची धूळदाण उडवली!"

सम्राटांनीं प्रासादाखालीं पाहिलें,

जखमी सहसेनापतींना घेऊन सारे पराजित सैनिक परत येत होते—

* * *

सायंकाळची सोनेरी किरणें वेलींवरच्या मुग्ध कलिकांचा निरोप घेत होतीं.

जंगलांतून वाहणाऱ्या एका ओढयाजवळच बेशुद्ध स्थितींत घोड्यावरून पडलेल्या वीरसिंहानें डोळे उघडून पाहिलें.

त्याचा वृद्ध सेवक वीरभद्र त्याला सावध करीत होता.

वीरसिंहाच्या जिव्हारी झालेल्या जखमेकडे पाहत वीरभद्र कळवळून म्हणाला—

"महाराज, विनाकारण केवढी आपत्ति ओढवून घेतलीत ही? सेनापत्याचा त्याग केला नसता, तर सारा मगध देश जिंकून आज आपण सम्राट् कोसलांचें राजराजेश्वर झाला असतां!— मगधांच्या बाजूनें लढण्यांत आपण कीर्ति किंवा संपत्ति काय साधलेंत?——"

खोल जखमेमुळें झालेल्या तीव्र वेदनांवर मंद हास्याचें आवरण घालीत वीरसिंह म्हणाला—

"वीरभद्रा, मी कीर्तीकरितां, संपत्तीकरितां, किंवा कोणत्याहि

स्वार्थाकरितां कोसलांना सोडून मगधांच्या साहाय्याला आलों नाहीं. मी केवळ माझ्या मनाच्या समाधानासाठीं लढलों--"

आणि वीरसिंहानें चहूंबाजूंना पाहिलें. अस्ताला जाणाऱ्या सूर्याचे मावळते किरण जवळच्या जलप्रवाहावरून नाहींसे होत होते—

कां कोणास ठाऊक ?

त्याचे डोळे व अंतःकरण भरून आलें होतें. दूरवर दिसणाऱ्या मगध-प्रासादाकडे पाहत त्यानें डोळे मिटले ते कायमचेच !

* * *

रातकिड्यांनीं सायंकाळचें ओरडणें सुरू केलें.

वीरसिंहाच्या शोधार्थ गेलेल्या पित्याची मृगाक्षी मोठ्या अधीर अंतःकरणानें वाट पाहत होती.



# सासरा आणि जांवई : : ५९

"कां ? बोलत कां नाहींस ? तूं तर अगदीं कालपासून आमच्याशीं अबोलाच धरला आहेस. नेहमींचंच आहे म्हणा हें ! तोंडांतून कधीं एखादासुद्धां गोड शब्द नाहीं, कीं चेहऱ्यावर कधीं प्रसन्नतेची सदाफुली खुललेली नाहीं ! पण असंच किती दिवस चालायचं हें ?"

नारायणराव बाहेरून येऊन कपडे काढीत काढीत आपल्या पत्नीशीं—शालिनीशीं बोलत होते. शालिनी त्यांच्याकडे पाहतहि नव्हती. ती मौनव्रत धरून स्वस्थ बसली होती. नारायणराव पुनः त्रासिक स्वरांतच बोलूं लागले,

"उदासीनता हा एक संसर्गजन्य रोग आहे. तूं अशा खिन्नवृत्तीनं वागून घरांत उदासीनतेचं ढगाळ वातावरण निर्माण केलंस तर माझ्या मनाला तरी उत्साह कसा वाटावा ? प्रपंच थाटला तो कुणासाठीं ? काम-धंद्यांत मरे-मरेतों राबायचं तें कशासाठीं ? तुझ्या सुखासाठींच ना ? माझं असं मायेचं माणूस तुझ्याशिवाय जगांत दुसरं आहे कोण ? बाहेर कामानं थकून-भागून वैतागानं घरीं पाऊल टाकावं—तर घरांत काय ? सगळाच

आनंद ! यापेक्षां बाहेर मित्रमंडळींतच माझा वेळ आनंदांत जातो. काय और योग आहे !—"

शेवटचे शब्द स्वतःशींच पुटपुटत नारायणरावांनीं एका दीर्घ निःश्वासाबरोबरच आपलें अंग 'हुश्श्' म्हणून आरामखुर्चीवर टाकलें.

शालिनी जमिनीवर निर्विकार नजर खिळवून दांतांनीं नखें कुरतडत राहिली. नारायणराव, शालिनीचा हा मुखस्तंभपणा पाहून, पुनः किंचित् रागानेच बोलूं लागले.

"एखाद्या धरून आणलेल्या चोराप्रमाणं गप्प कां उभी आहेस ? तुझ्या प्रकृतीला तर कांहीं होत नाहीं ना ? काय ?"

शालिनीनें मानेनेंच नकार दिला.

"मग अशी अष्टौप्रहर रडक्या मुद्रेनं, आजारल्यासारखी, मंदपणानं कां वावरतेस घरांत ? फुकट आयुष्य चाललं आहे अशा आविर्भावानं कां वागतेस ? या तुझ्या वैराग्यवृत्तीचा अर्थ तरी काय ? तुझ्या सुखांत इथं कोणता उणेपणा आहे ? हें तुझं वैतागल्यासारखं विचित्र वर्तन एखाद्या तिऱ्हाइतानं पाहिलं, तर तुझी कींव करून उलट मलाच तो दोषी धरायचा ! बिचारीला नवरा हाणमार करीत असेल—चटकीप्रमाणं वागवीत असेल—नवऱ्यापासून सुखाचा शब्दसुद्धां नाहीं, म्हणूनच ही दुर्दैवी स्त्री अशी आपल्या आयुष्याला कंटाळली असेल—एक ना दोन. ज्यांना तुझ्या व माझ्या विषम स्वभाव-रचनेची खरी व पुरी माहिती नाहीं त्यांचे असेच तर्कवितर्क चालणार ! संसाराची घडी यापुढं सुधारणार, कीं आपल्या या तुसड्या, हेकेखोर, एककल्ली स्वभाववर्तनानं ती कायमची बिघडवून टाकणार ? तुला या मुंबईत करमत नसेल तर तसं सांग. तुला करमत का नाहीं इथं ?"

'होय' असें पुटपुटत शालिनीनें एकवार नारायणरावांकडे भेदरलेली चुकार नजर फेकली. त्या नजरेंत दुराग्रह तर होताच पण तापट तिरस्कारहि होता.

"पण मी म्हणतों, न करमायला झालं काय ? या मुंबईत करमत नाहीं, मग काय त्या चार घरांच्या खेड्यांत, माहेरीं करमतं वाटतं ? इतकीं पुस्तकं आहेत– रोजचीं ताजीं वर्तमानपत्रं सांजसकाळीं घरीं येऊन पडतात. लिहावं–वाचावं, शेजारच्या माईंच्याकडून रुमाल विणायला, काशिदा काढायला, भरतकाम करायला शिकावं– हजारदां सांगितलं; पण ही हौस

मला एकट्यालाच ! कांहीं कलाकुसरीची विद्या शिकावी, माणूसघाण्या स्वभाव टाकून शेजारणी-पाजारणींशीं मिळून-मिसळून वागावं, सर्वांशीं हसत-खेळत गोडीगुलाबीनं वागून सर्वांकडून चांगलं म्हणवून घ्यावं– तुला ही कोणतीच महत्त्वाकांक्षा नाहीं. तुझं कुणाशीं पटायचं नाहीं. तुला सोबत म्हणून मुद्दाम चार दिवस सुरवातीला आक्काला इथं मुंबईला आणविली; तिनं सारा संसार तुला ठाकठिकीनं थाटून दिला; पण सदा दुर्मुखलेली तूं ! आपल्या गांवढळ, तापट नि हेकट स्वभावानं तिला नको-नकोसं केलंस. बिचारी कंटाळून कांहीं तरी निमित्तानं लौकर परत गेली. मुळांत स्वच्छतेचा, कामाचा कंटाळा ! सारा गबाळा कारभार ! घरीं कामं तरी अशीं काय करायचीं असतात ? नोकरचाकर आहेत; पण त्यांच्यावर देखरेख ठेवून त्यांच्याकडून वेळच्यावेळीं सारीं कामं नीटपणं नकोत कां करून घ्यायला ? एवढं सुद्धां साधं काम तुझ्याकडून होत नाहीं. तुला येऊन-जाऊन मुख्य काम पडतं तें फक्त स्वयंपाकाचं ! फक्त दोन वेळेला–दोन माणसांचं अन्न शिजवायचं. एवढंच ना ? तेवढंहि हातून होत नसेल तर तसं सांग. उद्यां स्वयंपाकाला एखादा ब्राह्मण, नाहींतर बाई ठेवतों. काय इच्छा असेल ती मोकळ्या मनानं स्पष्ट बोल. अशी मनांतल्या मनांत कुढत राहूं नकोस. त्यापासून मला तर नाहींच नाहीं; पण तुलाहि सुख नाहीं."

नारायणराव समजुतीच्या स्वरांत कळवळूनच बोलत होते; पण त्यावर शालिनी अवाक्षरहि बोलली नाहीं. बऱ्याच वेळानंतर कांहीं तरी बोलण्यासाठीं तिचे ओठ हलूं लागले.

" बाबांचीं दोन पत्रं आलीं. दिवाळीला—"

एवढेंच अर्धवट बोलून शालिनीनें नारायणरावांकडे एक ओझरता दृष्टिक्षेप फेकला.

" माहेरीं जायचं मनांत आहे एवढंच ना ? माझी कुठं ना आहे ?" शालिनीकडे क्षणभर रोखल्या नजरेनें पाहून नारायणराव पुढें बोलूं लागले.

" परंतु दिवाळीसाठीं म्हणूनच मी तुला इथं ठेवून घेणार होतों. कारण मुंबईचीं दिवाळी पहायला परगांवचे लोक मुद्दाम येतात. तुला सहजासहजीं तो योग— पण असो. तुझी इच्छाच असेल तर दिवाळीला माहेरीं जा—आज जातेस का ?"

नारायणरावांच्या या शब्दांनीं शालिनीची कळी जराशी खुलली.

" पण येऊन कांहीं पुरते दोन महिनेसुद्धां झाले नाहींत. आतां या वयांत ही माहेरची ओढ बायकांच्या जातीला शोभत नाहीं. शिवाय, दुसरं असं, दिवाळीला तूं मात्र आपल्या मंडळींत माहेरीं जाणार आणि मी--खाणावळींत जेवून तो वरसाचा सण साजरा करणार! स्वतःच्या सुखापुढं नवऱ्याची पर्वा तुला आहे कुठं म्हणा ! "

पतिपत्नींचें संभाषण तेवढ्यावरच थांबलें. माहेरीं जाण्याबद्दल शालिनीच्या दुराग्रहाचा नारायणरावांना राग आला. जरा वाईटहि वाटलें. पण थोडक्यासाठीं बायकोचें मन मोडण्यांत अर्थ नाहीं अशा विचारानें शालिनीला माहेरीं पाठविण्याचा बेत मुक्रर करून त्यांनीं तो लगेच अंमलांत-सुद्धां आणला. माहेरीं पाठवितांना मात्र दिवाळीनंतर आठ दिवसांच्या आंत मुंबईला परतण्याची कबुली त्यांनीं तिच्याकडून घेतली.

— २ —

पण—

दिवाळी संपून आज तीन आठवडे लोटले तरी शालिनीची माहेराहून परतण्याची गंधवार्ताहि नव्हती. शालिनी गेल्यापासून श्वशुरांकडून नारायणरावांना क्षेमसमाचाराचें एक सुद्धां पत्र आलें नाहीं. त्यांनीं तीन पत्रें पाठविलीं; इतकेंच काय पण तारहि केली, तरी उत्तर नाहीं! शालिनीच्या पत्राची आशा तर सर्वथा अनाठायींच होती. नारायणराव मनांतून खूप चिडले– संतापले, पण उपयोग काय ?

जांवई-सासऱ्यांचे हितसंबंध मनांतून चांगले नव्हतेच. एकमेकांविषयीं उभयतांच्या मनांत प्रेमादराचा पूर्ण अभाव होता. मात्र त्याबाबतींत दोष ठेवण्याला नारायणरावांचे बाजूनें कांहींच जागा नव्हती. लोकव्यवहाराच्या आणि सभ्य शिष्टाचाराच्या बाबतींत त्यांची वागणूक कित्ता घेण्यासारखीच होती. पण त्यांच्या श्वशुरांच्या अंगीं माणुसकीला साजेशा सज्जनवृत्तीचा, व्यवहारदक्षतेचा लोप होता. पण गंमत अशी, नारायणरावांचे श्वशुर उलट नारायणरावांनाच 'व्यवहारशून्य, हेकेखोर, उर्मट' अशीं शेलकीं विशेषणें लावीत.

आबासाहेब—नारायणरावांचे श्वशुर--बेळगांव जिल्ह्यांतील एका खेडेंवजा गांवांतले 'जमीनदार'--बडे प्रस्थ होते. वडिलार्जित शेतीवाडी, जमीनजुमला भरपूर. थोडीफार पिढ्यान्‌पिढ्या चालत आलेली साव-

सावकारी. आबासाहेबांनीं वडिलार्जित इस्टेटींत आपल्या 'कर्तबगारीनें' भर घालून, कांहीं नाहीं तरी दीड-दोन लाखांची माया जमा केली होती. चार-चौघांत खोटी मानमान्यता—लब्धप्रतिष्ठितपणा मिरविण्याची त्यांना मोठी हौस! वागणूक पोषाखी—डामडौलाची, वृत्ति श्रीमंतीला साजेल अशी हेकेखोर आणि कमालीची उद्धट! संपत्तीचा दांडगा अभिमान! पैशाच्या जोरावर प्रत्येकाला आपल्या मर्जीप्रमाणें नंदीबैल करून नाचविण्याची त्यांना जबर महत्त्वाकांक्षा! खुद्द जांवयानें—नारायणरावांनींसुद्धां घरजांवई बनून भणंग आश्रिताप्रमाणें सारा जन्म आपल्या घरीं पडून रहावें, ही त्यांची उत्कट इच्छा! पुढेंमागें लौकरच आपण त्यांना घरीं खेचून आणूं अशी त्यांना उमेदहि होती. दोन-तीन वेळां पत्रोपत्रीं—समक्षसुद्धां—या बाबतींत जांवईसासऱ्यांची वाटाघाट झाली; पण नारायणरावासारखा एक ध्येयवादी, महत्त्वाकांक्षी, स्वतःच्या कर्तृत्वानें नांवलौकिकाला चढलेला, स्वावलंबी तरुण आपल्या सासऱ्याच्या दारांत कुत्र्याप्रमाणें मेलेलें अन्न खात पडायला कसा तयार होणार? गचाळ खेडेगांवात, सासुरवाडीला गांवढळांच्या संगतींत फुकाफुकी आयुष्य कंठून स्वतःच्या हातांनीं स्वतःच्या आकांक्षांवर माती पसरायला कोणता स्वाभिमानी पुरुष तयार होणार?

नारायणराव सासुरवाडीला जाऊन घरजांवई होण्याला कबूल होईनात. अर्थात् नारायणरावांच्या या वर्तनाचा आबासाहेबांना संताप आला, तो त्यांना अपमान वाटला. "आमचा जांवई व्यवहारशून्य गाढव आहे. त्याला स्वतःचें हिताहित कळत नाहीं. खुशाल माझ्या घरीं राहून श्रीमंतींत लोळायचं सोडून नोकरीपाठीं मुंबईत भीक मागतो आहे. काय तर म्हणे नांवलौकिक! गडगंज पैसा असल्यावर, बिशाद काय नांवलौकिकाची! पैशानं अब्रूच काय स्वर्गसुद्धां खरेदी करतां येईल!" वगैरे ठराविक ठशाचें व्याख्यान आपल्या अडाणी मित्रमंडळींत आढ्यतेनें बडबडून आबासाहेब नारायणरावांची मनसोक्त निंदा करीत. नारायणराव हें सर्व जाणून होते.

नारायणराव प्रथमपासूनच महत्त्वाकांक्षी आणि स्वावलंबी! वडिलांना शिक्षणखर्चाची पैचीहि तोशीस न पडूं देतां केवळ स्कॉलरशिप्सच्या जोरावर त्यांनी डॉक्टरीचा कोर्स पुरा केला. एल्. एम्. ॲन्ड एस्.चा पदवीलाभ झाला; त्याच वर्षीं त्यांना पत्नी-लाभ झाला. केवळ वडिलांच्या इच्छेला मान देण्यासाठीं म्हणूनच त्यांनीं शालिनीसारख्या अशिक्षित, अजागळ,

वेंधळया, पण गर्भ श्रीमंतीमुळें पोकळ ताठा अंगीं असलेल्या मुलीशीं लग्न करून घेतलें. वडिलांनीं रोख अडीच हजार हुंड्याची व करणी, मानपान मिळून इतर पांच हजारांची आपली राक्षसी द्रव्य-तृष्णा शमन करून घेतली. नारायणरावांच्या आकांक्षेकडे बिलकुल लक्ष्य दिलें नाहीं. वडिलांच्या विश्वासावर विसंबून आपल्या आयुष्यांत निराशेचा निखारा कसा पसरला हें नारायण-रावांच्या मागाहून ध्यानांत आलें. वडिलांच्या स्वार्थी इच्छेपुढें निमूटपणें मान तुकवून संसारांतल्या सोबतिणीची चुकीची निवड पदरीं पाडून पवित्र करून घेतल्याबद्दल नारायणरावांच्या मित्रमंडळींनाहि सखेद आश्चर्य वाटलें. नारायणरावांना पश्चात्ताप झाला होता तरी त्यांचा आशावाद दांडगा होता. शालिनीला शिक्षण देऊन तिला आपल्या आचारा विचाराशीं समरस करून घेऊं असें त्यांना फार वाटे. त्याप्रमाणें तिला उच्च शिक्षणसंस्कृतीचें योग्य वळण लावण्याची ते आपल्याकडून शिकस्त करीत. पण मुळांतच उभयतांच्या मनोरचनेंत जमीनअस्मानचें अंतर! त्याला उपाय काय?

पुढें वडील वारले. संसाराची जबाबदारी सर्वस्वीं नारायणरावांच्याच अंगावर पडली. लौकरच मातृ-वियोगहि त्यांच्या नशिबीं आला. आई-बापांचें छत्र गेलें– पत्नी तर अशी मिळालेली, परंतु न डगमगता नारायण-रावांनीं पुढचा मार्ग काढला.

— ३ —

शालिनी अद्यापि लहानच होती. तिला माहेरीं ठेवून आपल्या ध्येयपूर्तीसाठीं नारायणराव उच्च वैद्यकीय ज्ञान संपादन करण्यासाठीं अमे-रिकेस गेले. दोन वर्षांनीं तिकडून परत येतांच त्यांना तावडतोब असिस्टंट सिव्हिल सर्जनची सरकारी नोकरी मिळाली. मुंबईलाच संसार थाटणें प्राप्त झालें. मुंबईला संसार थाटला खरा; पण नारायणरावांनीं आपल्या गांवीं येऊन रहावें, असें शालिनीला तिच्या बापाप्रमाणेंच मनांतून वाटत अस-ल्यानें, मुंबईस राहायला ती नाराजच होती. कांहीं तरी निमित्तानें वरचेवर माहेरीं जाण्याची तिच्या मूर्ख मनाची ओढ फार! बापाचीच तशी शिकवण, पण यामुळें नारायणरावांच्या मनावर मात्र वैतागाची छाया पसरली आणि सुखाचा संसार साजरा होऊन आयुष्यांतील उच्च आकांक्षा सफल होण्याची त्यांची आशा वांझोटी ठरूं लागली.

नारायणरावांच्या इतर आसेष्टांच्या लक्ष्यांत ही निराशाजनक परिस्थिति

येण्यास वेळ लागला नाहीं. त्यांच्या सासऱ्याचा कावेबाज, स्वार्थी हेका ओळखून आणि शालिनीच्याहि मुर्दाड मनाचा कल जाणून नारायणरावांना दुसरें लग्न करण्याचा सर्वांनीं सल्ला दिला. " तुमच्या शिक्षण संस्कृतीशीं, उच्च ध्येयाशीं, समरस होईल अशा एखाद्या सुशिक्षित प्रौढ मुलीशीं विवाहबद्ध होऊन सुखाचा संसार थाटा. वडिलांची चूक दुरुस्त करा. संसारांतला जोडीदार सर्वस्वीं अनुरूप, समान आचारविचारांचा असला तरच संसारांत गोडी !" असें नारायणरावांच्या मित्रमंडळींनींहि अनेकदां त्यांना सांगितलें. पण नारायणरावांचें नेहमींचें एकच उत्तर असे—

" देवाची आणि दैवाची जशी इच्छा होती तसेंच घडून आलें आहे. जोंपर्यंत चांगली, मनाप्रमाणें वागण्यास तयार आहे तोंपर्यंत बायकोला नांदविणें हें माझें पतीच्या नात्यानें पहिलें कर्तव्य आहे. तिच्याकडून अगर तिच्या बापाकडून माझ्या या कर्तव्यपूर्तींत अडथळा येऊन कांहीं आगळीक झाली, किंवा आपल्याच कर्मांनीं तिनं आपलं आयुष्य मातीमोल करून घेतलं, तर मात्र माझा निरुपाय आहे. पण असं जोंपर्यंत कांहीं घडणार नाहीं तोंपर्यंत तिला माहेरीं टाकून दुसरं लग्न करणं माझ्या विवेकबुद्धीला पटत नाहीं. शिवाय असं पहा, माझ्यासारख्यानं अशा विषम स्वभावाच्या निर्बुद्ध बायकोला गोडीगुलाबीनं वागवून घेण्यांतच खरा मोठेपणा नाहीं का ? "

नारायणरावांच्या या बिनतोड युक्तिवादाला कोण काय उत्तर देणार ? त्यांचे हे उदात्त उद्गार निःसंशय त्यांच्या थोर, समंजस वृत्तीचेच द्योतक होते. पण त्यांच्या दुर्दैवानें त्यांचा आशावाद फळाला येण्याची वेळ पार निघून गेली होती. तरीहि अद्यापि ते आपल्या कर्तव्यबुद्धीला आग्रहानें चिकटून राहिले होते. शालिनीला सुखी करण्याचा परोपरीनें प्रयत्न करून, आहे त्या परिस्थितींत समाधान मानून घेण्याची त्यांच्या मनानें तयारी केली होती. पण परमेश्वरी संकेत निराळाच होता !

— ४ —

कार्तिक तर संपलाच, पण मार्गशीर्ष जाऊन पौष महिनाहि उजाडला आज संक्रांतीचा सण ! माधवाश्रमांतून जेवून येऊन नारायणराव नुकतेच मेडिकल जर्नलचा ताजा अंक चाळीत बसले होते. तोंच कुणी आल्याची वर्दी नोकरानें दिली. नारायणराव उठून पाहतात तों त्यांचे श्वशुर—आबासाहेब— दत्त म्हणून त्यांचेपुढे उभे ! शिष्टाचाराप्रमाणें नारायणरावांनीं

अदबीनें नमस्कार केला. पण तो नमस्कार स्वीकारण्याइतकेंसुद्धां साधें शिष्टाचार-सौजन्य आबासाहेबांनीं दाखविलें नाहीं. नारायणरावांच्या मानी मनाला वाईट वाटलें. थोडावेळ औपचारिक कुशल प्रश्नोत्तरें झाल्यावर नारायणरावांनीं विचारलें,

" तुम्ही आलांत केव्हां ? उतरलांत कुठं ? "

" इथं मुंबईत उतरायला ठिकाणं काय थोडीं आहेत ? माझे एक स्नेही बाळासाहेब चिकोडी—बेळगांवचेच ते—त्यांची इथं जंगी पेढी आहे मांडवींत—त्यांचेकडे माझं कांहीं महत्त्वाचं-जरूरीचं काम होतं. त्यांच्याकडेच उतरलों—उद्यां सकाळीं परत जाणार. म्हटलं, जाण्यापूर्वी तुमची भेट घ्यावी. म्हणून हा असा उभ्याउभ्या आलों आहे. "

आबासाहेब निर्विकार चेहऱ्यानें पण तुसडेपणानेंच बोलत होते. नारायणरावांनीं मधेंच एकदम जराशा रागीट स्वरानेंच विचारलें—

" शालिनीला इकडं पाठवून देण्याचा तुमचा मानस नाहीं वाटतं ? आठ दिवसांसाठीं गेली—तीन महिने झाले—"

" आम्ही तुम्हांलाच दिवाळीला तिकडे येण्याबद्दल आग्रहाचं पत्र धाडलं होतं. पण—"

आबासाहेबांनीं साळसूद थाप दिली हें त्यांचा चेहराच सांगत होता.

"पण तें पत्र मला मिळालंच नाहीं. पोस्टानं गहाळ केलं असावं किंवा तुम्हींच तें लिहिलेलं नसावं."

" असं कसं होईल ? तें जाऊं दे. मी आतां आलोंच आहें. आतां माझ्याबरोबरच चला. मी तुम्हांला बरोबर गांवीं घेऊन गेल्याखेरीज राहणार नाहीं. संकल्पच करून आलों आहें मी."

" कां ? जांवयाला शिमग्यांत दिवाळसण करण्याचं योजिलं आहे वाटतं ?

" थट्टा राहूं दे, शेंकडों वेळां सांगितलं. पुनः पुन्हा तेंच काय सांगायचं ? तुम्ही ही नोकरी द्या सोडून आणि माझ्या घरींच रहा येऊन कायमचे. माझ्या घरीं काय कमी आहे ? अहो, वाटल्यास तिथंच आमच्या गांवीं दवाखाना उघडा कीं. माझं आतां म्हातारपण झालं. शेवटचे दिवस मोजतों आहें मी. मला तरी आसरा कुणाचा ? तुम्ही आलांत—जवळ राहिलांत, तर

तुम्हांला सुख, माझ्या पोरीलाहि सुख! हाच करार मी तुमच्या वडिलांशीं केला होता. इतक्या लांब मुंबईला येऊन माझ्या लाडक्या पोरीनं नांदणं मला पसंत नाहीं."

"असं! एकूण मीच तुमच्या घरीं येऊन नांदूं म्हणतां? लग्न झाल्या-दिवसापासून हें तुमचं टुमणं आहेच; पण आज तुम्हांला निर्वाणीचं स्पष्टच सांगून टाकतों. तुमच्या अन्नावर माझा पिंड पोसला जावा– तुमच्या घरीं ऐतखाऊपणानं ऐषआरामांत लोळत राहून माझ्या शिक्षणसंस्कृतीची, कर्तृत्वाची होळी पेटवावी, अशी माझी इच्छा नाहीं. तुम्हां मुलींच्या बापांचे विचार स्वतःच्या लेकीच्या सुखापलीकडे धांवत नसतात. मुलगी देऊन जांवयाचं हित चिंतायचं, ही लोकरूढि तुम्ही निराळयाच अर्थानें अमलांत आणूं पाहतां. मी कुणाचाहि मिंधा नाहीं. अमेरिकेला जातांना तुमची दहा हजारांची थैली लाथाडली, ती कां? तर तुमच्यासारख्यांच्या उपकारानं बांधला जाऊन आजन्म तुमच्या सत्तेचं दास्य पत्करणं मला नको होतं म्हणूनच ना? सासऱ्याच्या पैशावर जगणारा मी नाहीं. पण नको— पुनः पुन्हा तोच किळसवाणा अप्रिय विषय नको. तुम्हीच काय, पण सर्वच स्वार्थसाधु जग मला मूर्ख म्हणेल. पण पर्वा नाहीं. माझी विचाराची दिशा आहे ही अशी आहे. शालिनीला पाठवून द्यायची असेल तर द्या, नाहींतर जन्मभर माहेरीं ठेवून घ्या."

नारायणराव संतापले होते. आबासाहेबांचाहि रागाचा पारा चढला होता, "अहो नारायणराव, कुणापुढं बढाई मिरवितां ही? माझ्यापुढं? मी ओळखून आहें प्रथमपासूनच तुमचं हें वरपांगी ध्येयवादाचं इंगित! ठाऊक आहे तुमचं कर्तृत्व! तुम्हांला माझी मुलगी आवडते आहे कुठं? तुम्ही पडलांत रोमँटिक! विलायतेहून जाऊन आलेले! तुम्हांला हवी एखादी शहरांतली शिकलेली सोनसळी—छचोर, फॅशनेबल, नटवी पुतळी! माझी मुलगी शिकलेली नाहीं नि भकलेली पण नाहीं. सरळ, सालस स्वभावाची भाबडी पोर ती! तिला का तुम्ही नांदवणार? कांहींतरी निमित्तानं तिला माहेरीं टाकून दुसरी मनाजोगी छबकडी—गुलाबछडी—"

"बस्स—तोंड अटपा. भलतंच बडबडूं नका. तुम्ही आणि तुमची मुलगी कशी आहे, हें साऱ्यांना ठाऊक आहे. तरी पण तिला मीं वागवून घेण्याचा, सुखी करण्याचा यत्न केला आहे, करीत आहें, हें तुम्ही कबूल

न करतां, मुद्दामच आडवाटेला शिरतां आहांत. ठीक आहे. तुमच्या अशाच समजुती माझ्याविषयीं असतील तर नाइलाजानं तुमचा संबंध तोडून—"

"काय कराल हो? दुसरं लग्न? कुणाला धाक घालतां हा? मला? या आबासाहेबाला? तुमच्यासारखे कितीक खेळवले आहेत बोटावर! आपली शहाणपणाची, पदवीची, लठ्ठ पगाराची घमेंड माझ्यापुढं मिरवूं नका. करा–खुशाल दुसरं लग्न करा. तोंडच्या गप्पा नाहींत या—"

"व्यवहारपंडित म्हणून मिरविणारे तुम्ही! त्यांतून द्रव्याची धुंदी डोळ्यांवर चढल्यामुळं सारं जग तुम्हांला तुच्छ वाटतं. कांहीं असो, माझा मार्ग मला आतां मोकळा झाला. लक्षांत ठेवा, तुम्ही होऊन तुमच्या मुलीच्या जन्माचं मातेरं करतां आहांत! स्वतःच्या हातांनीं तिच्या संसार-सुखांत माती कालवताहांत!"

"बरं-बरं, माझी मुलगी जन्मभर माहेरीं राहिली तरी बेहेत्तर! पण तुमचा हट्ट मी चालूं द्यायचा नाहीं. साफ सांगतों, माझी मुलगी तुमच्या घरीं नांदायला येणार नाहीं. गरज असेल तर तुम्हीच माझ्या घरीं येऊन रहा."

— ५ —

जांवईसासऱ्यांची वरीलप्रमाणें खडाजंगी होऊन आज चार महिने झाले होते. एवढ्या अवधींत नारायणरावांनीं दोन पत्रें पाठविलीं, उत्तर नाहीं. सर्व उपाय केले, पण आबासाहेबांचा दुराग्रह कायम! शेवटीं ते एकदां सासुरवाडीला समक्ष जाऊन आले; पण 'खुशाल दुसरं लग्न करा' असें अगदीं मुलुखावेगळ्या, शहाणपणाच्या मूर्ख घमेंडीनें आबासाहेबांनीं सांगितलें. बापापुढें शालिनी काय बोलणार? पण नारायणरावांनीं तिलाहि विचारतांच ती एवढेंच म्हणाली,

"तुमचा तरी हट्ट कां? बाबा सांगतात तर रहा ना इथं येऊन."

"एकूण तूं सुद्धां आपल्या मूर्ख बापाच्याच तंत्रानं वागून आपला हेका चालवितेस? मुलुखावेगळीं बापलेक भेटलांत खरीं! तुला सुद्धां माझी गरज नाहीं? ठीक–पण लक्षांत ठेव–तुला आणि तुझ्या बापाला या तुमच्या मूर्ख-पणाबद्दल पश्चात्ताप करून जन्मभर रडत बसावं लागेल. ईश्वरसाक्ष माझं कर्तव्य मीं अखेरपर्यंत केलं. रहा–माहेरीं रहा, कुठंहि रहा–आनंदांत रहा म्हणजे झालं."

सासुरवाडीला पाणीसुद्धां न पितां नारायणराव गेले तसेच परत आले.

दिवसामागून दिवस गेले. एके दिवशीं अकल्पितपणें आबासाहेबांच्या व शालिनीच्या कानांवर खात्रीलायक बातमी आदळली, कीं नारायणरावांनीं नुकताच एका सुशील, सुशिक्षित, गतभर्तृकेशीं पुनर्विवाह लावून सुखाचा प्रेमसंसार थाटला आहे !

शालिनीला तर डोक्यावर आभाळ कोसळल्यासारखें झालें. आबा-साहेबांच्या गाढवपणाला दोष देत उभा गांव त्यांच्या करणीला तुच्छतेनें हसून हिणवूं लागला.

खरा प्रकार पाहण्यासाठीं एके दिवशीं आबासाहेब शालिनीला घेऊन मुंबईला आले.

"मी अजूनहि शालिनीला नांदवायला तयार आहें."

नारायणरावांनीं सांगितलें.

"आम्ही दोघीजणी बहिणीप्रमाणें राहूं."

नारायणरावांच्या पुनर्विवाहित सुशील साध्वीनें कळवळून सांगितलें.

शालिनी रहावयास तयार होती; पण नारायणरावांचा तो नवा संसार पाहतांच आबासाहेबांची तळव्याची आग टाळूला भिडली होती. ते शालिनीला घेऊन गांवीं परत गेले !

केवळ कर्तव्य म्हणून नारायणराव दरमहा पंचवीस रुपये आणि दर-साल दोन रेशमी लुगडीं शालिनीला पाठवूं लागले.

आबासाहेबांनीं तीनशें रुपये व दोन लुगडीं, ही वार्षिक पोटगी आनंदानें स्वीकारली !

पण शालिनी !—दिवसेंदिवस खंगत चालली.

"बाबा, तुम्ही माझे शत्रु होऊन माझा गळा कापलांत ! त्यांचा दोष नाहीं—"असें अखेरपर्यंत बडबडत एक दिवस तिनें इहलोक सोडला !



# हक्क कीं कर्तव्य ? : : ६०

ख्रिस्तजयन्तीची पूर्वसंध्या ती ! विनायकरावांच्या घरीं त्या वेळीं बाल-गोपालांच्या आनंदाला पारावार नव्हता. त्यांची धांदल तर कांहीं विचारायलाच नको. विनायकराव मात्र अगदीं शांत मुद्रेनें कोणाशीं कांहीं न बोलतां स्वस्थपणें ओसरीवर खुर्ची टाकून बसले होते. ते आपल्या विचारांत व काळजींत इतके कांहीं गुंग होऊन गेले होते, कीं मुलांच्या धुड-गुमानें किंवा सुशीलाबाईच्या आंत-बाहेर करण्यानें त्यांच्या विचारतंद्रीवर कांहींहि परिणाम केला नाहीं. एकदां मात्र सुशीलाबाई बाहेर येतांच त्यांनीं आपल्या खिशांतून चट्कन एक पत्र काढलें. पण तेवढेंच. लागलेच त्यांनीं पुन्हा तें आंत टाकून दिलें. इतक्यांत पोस्टमन आला व त्यानें पत्रांचा एक जुडगा त्यांच्या हातीं दिला. तो हातीं येतांच त्यांना एक युक्ति सुचली. त्यांनीं आपल्या खिशांतील पत्रहि त्या नवीन पत्रांत मिसळून दिलें व जसें कांहीं तें आतांच आलें आहे, अशी स्वतःची समजूत करून जवळच आंब्याच्या पानांचें तोरण बांधीत असलेल्या आपल्या मुलांना त्यांनीं म्हटलें, 'अरे, हीं पहा नाताळाचीं पत्रें आलीं. जा—तुमच्या आईला घेऊन या.' मुलें आंत पळालीं व विनायकरावांनीं आपलीं पत्रें उघडण्यास सुरवात केली. सुशीलाबाई बाहेर येण्याच्या आधींच त्यांनीं तीं सारीं पत्रें पाहून संपविलीं होतीं. त्या आल्याबरोबर त्यांनीं तो जुडगा त्यांच्या हातीं दिला व आपण त्यांच्या मुद्रेकडे पाहत स्वस्थ बसले. सुशीलाबाईच्या मुद्रेचें निरीक्षण करणें होतेंच तसें महत्त्वाचें. विनायकरावांच्या तोंडांत जी बातमी घुटमळत होती ती प्रत्यक्ष न सांगतां, त्यांना समजली तर त्या काय म्हणाल्या असत्या हें त्या मुद्रेवरून समजणार होतें. चार-पांच दिवस विनायकरावांच्या खिशांत घुटमळत असलेलें तें पत्र वाचतांच सुशीलाबाईच्या कपाळाला सतरा आठ्या पडल्या व रागारागानें तीं सारींच पत्रें आपल्या पतीच्या हातीं देऊन त्या घरांत चालत्या झाल्या. सहसा नाटकांतल्या स्वगत भाषणांखेरीज दुसरीं स्वगत भाषणें तोंडाबाहेर नीटपणें उमटत नाहींत, पण विनायकरावांच्या तोंडून खालील दोन शब्द अगदीं मोठ्यानें स्पष्टपणें बाहेर पडले—'सुशीला दुःशीला !' त्यांना फारच संताप आल्यासारखें दिसलें. नंतर त्यांचें तोंड

अगदीं उतरून गेलें. अंधारामुळें त्यांच्या डोळयांतून वाहणारा अश्रुप्रवाह कोणाच्या नजेरस पडणें शक्य नसलें तरी त्यांना आलेला हुंदका मात्र जवळ कोणी असतें तर त्याला खात्रीनें ऐकूं आला असता.

रात्रीं जेवणाच्या वेळींहि विनायकराव कोणाशीं कांहीं बोलले नाहींत. त्याचा परिणाम मुलांवरहि झाला. म्हणजे त्यांच्या बडबडीला थोडासा आळा बसला. सुशीलाबाई तर आपल्या कपाळावरील एकहि आठी कमी करण्यास कबूल नव्हत्या. रात्रींचें जेवण झाल्यानंतर त्याच टेबलाभोंवतीं ( त्या घरीं टेबलावर जेवीत ) बसून एक लहानशी उपासना करण्याचा त्या कुटुंबांत प्रघात होता. टेबलावरील भांडींकुंडीं उचलल्यावर मुलांनीं धावत जाऊन बायबल व उपासनासंगीताचीं पुस्तकें आणलीं. विनायकरावांनीं बायबल घेतलें व मात्थीच्या पुस्तकांतील डोंगरावरील उपदेश सबंध वाचून काढला. मुलांना झोपा येऊं लागल्या होत्या व सुशीलाबाईंच्या कपाळावर एक आठी अधिक पडली होती. अशा रीतीनें खिस्तजयन्तीची पूर्वसंध्या संपली व सगळी मंडळी आपापल्या बिछान्यावर जाऊन पडली. मुलें तेव्हांच झोपीं गेलीं परंतु विनायकराव व सुशीलाबाई मध्यरात्र उलटून गेली तरी आपापल्यापरी योग्य कारणामुळें तळमळत होतीं. दोघांच्याहि डोळयाला डोळा लागला नाहीं. विनायकरावांच्या डोळयांपुढें आपलें सुखदायी बाळपण उभें राहिलें. विनायकराव अगदीं गरिबींत वाढलेले. ते व त्यांचे एक बंधु हींच काय ती त्यांच्या घरांतील लाडाची हक्कदार मंडळी. घरची गरिबी होती तरी त्यांच्या घरांत अदृश्यरूपानें साक्षात् आनंद वावरत होता.

**सर्व माझेंपण एकवटे जेथें ।**
**जिथें प्रेमाचें राज्य सदाचें तें, ॥**
**स्वार्थकपटाचा लेश नसे जेथें ।**
**जगीं उपमा कोणती त्या गृहातें ! ॥**

सुशीलाबाईंच्याहि घरीं त्यांच्या लहानपणीं आनंद नांदत होता. त्यांच्या सोबतीला त्यांची वडील बहीण होती. ती वडील म्हणून व ही धाकटी म्हणून दोघींचेंहि सारखेंच कोडकौतुक होत असे. घरची चांगली श्रीमंती, आईबाप हौशी, मुली तरतरीत व बुद्धिवान, शिवाय साऱ्यांचीं मनें एक; मग तेथें आनंद नसायाला काय झालें ? विनायकरावांच्या घरीं साऱ्या सुखाची उभारणी धार्मिकतेवर होती. विनायकरावांच्या आईबापांच्या

गरिबींत आणखी एकदोन गरीब सहज संपादून जात. विनायकरावांचे वडील जेवण्याच्या पूर्वीं दहा-पंधरा मिनिटें घराबाहेर येऊन उभे राहत व कोणी भुकेला दिसला तर त्याला सन्मानानें आणून आपल्या पंक्तीला बसवीत. सुशीलाबाईच्या माहेरींहि धार्मिकता अशीच जाज्वल्य होती. एका रविवारीं प्रभुभोजन होतें. बाहेर पाऊस पडत होता, व सुशीलाबाईचे वडील तापानें फणफणलेले होते; तरी तो गृहस्थ तसल्या तापांत व पावसांत गाडी करून देवळाला गेला. घरीं आल्यावर त्यांचें दुखणें विकोपाला गेलें तरी त्यांना त्याबद्दल कांहीं वाटलें नाहीं.

असो; आपल्यापरीनें आपापलें बालपण भडक रंगांनीं रंगवून त्यांची तुलना सध्यांच्या आयुष्याशीं करीत तीं दोघेंहि अगदीं हताश होऊन पडलीं होतीं.

दोघांचाहि स्वभाव मानी. दोघांनाहि आपलेंच म्हणणें नेहमीं खरें वाटणें, दोघांनाहि आपल्याच आवडत्या विषयांचें, व तत्त्वांचें महत्त्व दुसऱ्याच्या आवडत्या विषयापेक्षां किंवा तत्त्वापेक्षां अधिक वाटणें वगैरे स्वभावसादृश्य बालपणच्या परिस्थितीच्या सारखेपणामध्यें भर घालीत होतें. नाहींतर वर्षांतून एकदां एक दिवसापुरती भेट देणाऱ्या आनंददायी सणाच्या दिवशीं इतका वेळ रुसवाफुगवा चालूंच राहिला नसता. पतिपत्नींत प्रेमभाव राहण्यास हवा असेल तर त्यांच्यापैकीं जें कोणी—मग तो पति असो किंवा पत्नी असो– अप्रधान असेल त्यानें आपलेपणा पूर्णपणें विसरून जाऊन दुसऱ्याशीं एकरूप होऊन गेलें पाहिजे.

ख्रिस्ती धर्माचें व हिंदुस्थानचेंहि शिक्षण 'कर्तव्य' ह्या शब्दांत सांठविलेलें आहे. पाश्चात्यांचें शिक्षण 'जन्मसिद्ध हक्क' ह्या शब्दांत सांठविलेलें आहे. आपल्या धर्मानें आपल्याला आपल्या हाडींमांसीं खिळलेला 'कर्तव्य' शब्द घोकायला शिकविला तर हा शब्द इकडे आणून देणाऱ्या पाश्चात्यांचा खुद्द व्यवहारांतील आवडता शब्द 'हक्क' हा आपण आपल्या हाडींमांसीं खिळवून घेतला. एकाच मालाच्या डब्यांत कोंबून एखादें लठ्ठ पोसलेलें डुकर व हत्तीचें पिलूं चट्‌कन् पाहणाराला भावंडें वाटावींत त्याप्रमाणेंच पाश्चात्यांनीं आणलेला ख्रिस्ताचा 'कर्तव्य' हा शब्द व स्वतःचा 'हक्क' हा शब्द यांचा गोंधळ आमच्या लोकांनीं केला. एकंदरींत ख्रिस्ताच्या

ऐरावताबरोबरच हें पोसलेलें विलायती डुकराचें पिलूं आमच्या डोळ्यांपुढें नाचूं लागल्यामुळें आम्ही त्याच्याच मागें लागलों. कारण हत्तीपेक्षां डुकर लहानसें, गुजगुजीत व आमच्या आकलनशक्तीच्या आटोक्यांतील आहे. म्हणजे ह्या 'हक्का'च्या कैफानें खिस्ती समाजांतील कित्येक स्त्रीपुरुषांना इतकें बेफाम करून टाकलें आहे, कीं ह्याच्यामुळें पदोपदीं जरी ठेंचा खाव्या लागल्या तरी त्याहि आपल्या हक्कसंरक्षणांत मिळविलेल्या बहादुरक्याच आहेत असें त्यांना वाटूं लागतें. व ह्याच खिस्तानें शिकविलेला धर्म आहे असें चापून सांगण्यासहि ते केव्हां केव्हां कमी करीत नाहींत. खिस्ती धर्म वेगळा व पाश्चात्यांचा खरा प्रचारांतील हा निनांवी धर्म वेगळा हें एकदां आम्हीं ओळखलें व खिस्ती धर्माचें केंद्र 'कर्तव्य' आहे तर हा पाश्चात्यांचा व्यावहारिक धर्म 'हक्का'भोंवतीं प्रदक्षिणा करीत आहे हें एकदां आमच्या ध्यानांत आलें, म्हणजे आमच्यांतील पुष्कळसे आगंतुक दोष नाहींसे होतील. आपल्या पत्नीला हें चांगल्या रीतीनें समजून सांगावें अशी विनायकरावांची कितीतरी दिवसांची इच्छा होती. खिस्ती म्हणून साऱ्या जगासंबंधीं आपलीं कांहीं कर्तव्यें आहेत व खिस्ताप्रमाणें आपलेपणा विसरून आपण तीं बजाविलीं पाहिजेत, एवढ्यासाठींच आपला जन्म आहे हा विनायकरावांच्या खिस्ती जीविताचा अर्थ होता. उलट आपला संसार उत्तम रीतीनें चालून आपण सुखासमाधानानें रहावें, आपलीं मुलेंबाळें, आपण व आपले पति ह्यांच्या-बाहेरच्या जगाचा व आपला कांहीं संबंध नाहीं व असलाच तर तो त्या जगानें आपल्या संसारांत कांहीं लुडबूड करूं नये व ती केल्यास आपणास प्रतिकार करण्याचा हक्क आहे व तो आपण बजावला पाहिजे असें सुशीला-बाईंना वाटे. 'चॅरिटी बिगिन्स ॲट होम' हें त्यांचें आवडतें तत्त्व होतें. विनायकरावांनाहि हें तत्त्व मान्य होतें; पण त्या तत्त्वाला 'हें विश्वच माझें घर' ह्या आणखी एका तत्त्वाची त्यांनीं जोड दिल्यामुळें विश्वच त्यांना आपलें 'होम' वाटे.

परंतु दोन माणसें अगदीं विरुद्ध दिशेनें निघून दूर दूर जाऊं लागलीं म्हणजे अगदींच दूर गेल्यावर कोठें तरी अगदीं जवळ येतील, इतकेंच नाहीं तर एकमेकांची पुढील प्रगतीहि थांबवितील त्याचप्रमाणें विवाहग्रंथीनें ह्या दोन, अगदीं विरुद्ध माणसांना एकमेकांची गति आपापल्या दृष्टीनें थांबवि-ण्यास एकत्र जखडून टाकलें होतें. विनायकराव व सुशीलाबाई ह्या दोन

अगदीं भिन्न प्रकृतीच्या माणसांना विवाहानें एकत्र बांधून वरती मुलाबाळां-च्या वेष्टणानें त्यांना अगदींच जखडून टाकलें होतें.

दोघेंहि आपापल्या बिछान्यांवर तळमळत पडलीं होतीं. बोलावेंसें वाटत होतें; पण आधीं आरंभ कोणी करायचा? सुशीलाबाई मानी, विनायकराव मानी. म्हणजे कर्तव्यापेक्षां हक्काचा पगडा दोघांवरहि अधिक बसलेला. बारा वाजून गेले तरी दोघांचींहि तोंडें उघडलीं नाहींत. शेवटीं विनायकरावांनीं कधीं न केलेलें केलें. त्यांनीं उठून दिवा लावला. कागद घेतला व आपल्या पत्नीला एक पत्र लिहिलें. तें तिच्या हातांत ठेवून त्यांनीं बाहेरचा दरवाजा उघडून आलेल्या 'खिलाऱ्यांचें' स्वागत केलें. विनायकरावांनीं हार खाल्ली! खिस्तजयंतीच्या आगमनाची द्वाही फिरवि-णारा बालचमू खिस्तजयंतीचीं मधुर गीतें बाहेर म्हणत आहे तों इकडे सुशीलाबाईनीं आपल्या पतीनें लिहिलेलें पत्र वाचून काढलें. पत्रांत खालील कवितेखेरीज दुसरा कांहीं मजकूर नव्हता. ती कविता ही:—

कल्पना कर कीं। दिन अपुला हा शेवटला ॥ ध्रु० ॥
आजच मम वा तव गे इथला।
प्रवास सरला, रवि मावळला।
पुनरपि दिसणें नाहिं उदेला।
पुढें जागिं नाहीं। मधुवसंत एकहि अपुला! ॥ १ ॥
समज आपणां आलें कळुनी।
कीं एकाला जाणें इथुनी।
कवणाला हें न कळे अजुनी।
कशीं मग वागूं?। सखि सांग बघूं हें मजला; ॥ २ ॥
'कलहा रोषा, हे पुरुषोक्ता,।
करा मुखें जा काळीं आतां!।
दिव्यत्वाची येथें सत्ता'।
म्हणूं ना ऐसें। जें होऊन गेलें त्याला? ॥ ३ ॥
परलोकाचा प्रवास माझा।
सुखकर व्हावा अथवा तूझा।
म्हणुनी करणें सोई ज्या ज्या।
करूं ना त्या त्या। सखि पुसुनी अपुल्या प्रभुला? ॥ ४ ॥

प्रेमरसानें थबथबलेलें, ।
साद्गुशतांहीं रंगुन गेलें ।
होइल ना मग पळ उरलेलें ? ।
बधूं ना सारा । त्या पळीं स्वर्ग सांठविला ॥ ५ ॥

मुलांचे मधुरालाप ऐकत असतां विनायकराव थोड्या वेळापुरते आपली मनःस्थिति विसरले पण तीं जातांच त्यांनीं मागें आपल्या पत्नीकडे वळून पाहिलें. त्यांची दृष्टादृष्ट होतांच सुशीलाबाई म्हणाल्या—

"मग काय म्हणणं आहे ?"

विनायकरावांनीं 'कांहीं नाहीं' एवढें म्हणून पांघरुणांत तोंड खुपसलें.

* * *

ज्यामुळें विनायकरावांच्या घरीं एवढा रुसवाफुगवा सुरू झाला तें कारण—म्हणजे विनायकरावांच्या धाकट्या भावाचें पत्र खालीं दिलें आहे—

'दादा, आपल्या घरची परंपरा कायम ठेवण्यासाठीं देवानें मला जन्मास घातलें असें अलीकडे मला खात्रीनें वाटूं लागलें आहे. तुझें व नंतर माझेंहि लग्न झालें, त्यामुळें आपण लहानपणीं करीत असलेले सारे बेत जागच्या जागीं राहिले. बाबांना जन्मभर जें करण्यास हवें होतें तें आपण पुरें करूं असें आपण नेहमीं म्हणत असूं. त्यांना आपल्या संसारांत जगाचा संसार करण्यास अवसर मिळाला नाहीं. तो आपण करणार होतों; पण कांहींतरी जादू होऊन आपण दोघेहि एकामागून एक विवाहबद्ध होऊन गेलों. पूर्वी आपण एक विचाराचे होतों. आतांहि दोन विचाराचे आहोंत असें नाहीं; पण आतां परिस्थिती-मुळें भिन्न आहोंत हें मात्र खरें. तुझें लग्न झाल्यानंतर तुझ्याशीं दोन शब्द अगदीं पहिल्यासारखे बोलण्याचा एकदांहि सुयोग आला नाहीं. पण असो; आपलीं मनें एकमेकांशीं बोलत आहेत. माझी पत्नी मला सोडून गेल्याला आतां बरोबर पांच वर्षे झालीं. ह्या पांच वर्षांत पुढें काय करायचें हा विचार सारखा करतों आहे. द्वितीयसंबंधाच्या पुष्कळ प्रत्यक्ष-अप्रत्यक्ष सूचना आल्या पण त्यांच्याकडे मीं लक्षच दिलें नाहीं. एक तर मला 'विक्षिप्ताला' असें पक्कें वाटतें, कीं स्त्रियांना पुनः लग्न करण्याची कायद्यानें परवानगी दिलेली असली तरी समाजानें दिलेली नाहीं व पुरुषांनाच तेवढा हा सामाजिक कायदा लागूं नसावा हा अन्याय आहे. तेव्हां मीं माझ्यापुरता

तो स्वतःला लागूं करण्याचें ठरविलें आहे. दुसरें असें कीं, आपण करीत असलेल्या बेतांत आतां यश येणें केवळ मलाच शक्य आहे. मी आतां देवाच्या राज्यासाठीं फकीर बनणार.

मला माझ्यामागें एकच काळजी होती आणि तीहि निवारण करण्याची योजना देवानें मला सुचविली आहे. ती म्हणजे माझ्या मुलीची काय व्यवस्था करायची. तिला आजपर्यंत माझ्या आपल्या ideals प्रमाणें मीं शिक्षण दिलेलें आहे. ह्यापुढें तिला जगांत तुझ्या घरावांचून दुसरें कोठें टाकलें तर तिचे हाल होतील व दिलेलें एक प्रकारचें विशेष वळण सर्व फुकट जाईल. म्हणून मीं तिची तुझ्याकडे रवानगी करून द्यायचें ठरविलें आहे. शारदा अतिशय बुद्धिवान आहे; परंतु तिजमध्यें वास करीत असलेल्या धार्मिकतेपुढें मला त्या बुद्धीची किंमत वाटत नाहीं. बुद्धि आपलें तेज माणूस जिवंत असेपर्यंतच दाखवूं शकेल पण धार्मिकवृत्ति अमर आहेत. त्यांची वाढ शारदा तुझ्या घरीं राहिल्यास खात्रीनें होईल.

ख्रिस्तजयंतीला भिन्न मित्रांना बक्षिसें वाटतात. मी माझ्या मित्राला म्हणजे श्री ख्रिस्ताला स्वार्पण करणार आहें. २५ तारखेला शारदेला तुझ्या घरीं पाठवून देईन व मी इकडेच परस्पर बाहेर पडेन. माझ्या सर्व सामान-सुमानाची व्यवस्था मी मागेंच लावून टाकली आहे. मजजवळ जे कांहीं थोडे पैसे होते ते तुला पाठवीत आहे. ह्याच्यांतून शारदेचा होईल तितका खर्च भागीव. पुढें पैसे संपल्यावर माझ्यावरील तुझें प्रेम तिचा सांभाळ करील.

वहिनीस नमस्कार व लहान मंडळीस आशीर्वाद.

—तुझा भाऊ.'

नाताळ झाल्यावर दोन-तीन दिवसांत शारदा येऊन पोंचली. ह्या तीन दिवसांत विनायकरावांच्या घरीं केवढा गोंधळ चालला असेल ह्याचें अनुमान वाचकांनींच मागल्या प्रकरणावरून काढावें. शारदा आली ती अगदीं सहज भावानें प्रथम जें माणूस दिसलें त्याच्याकडे म्हणजे आपल्या चुलत्याकडे गेली व तेवढ्यावरच सुशीलाबाईंचा पहिल्या प्रथम जळफळाट झाला. 'पहा कशी तोंडपुजी आहे!' ह्या प्रतीकानें सुरुवात करून त्यांनीं एक 'सर्मनच' झोडलें. आतांपर्यंतचीं त्या दोघांमधलीं भांडणें बहुतकरून कांहीं काल्पनिक कारणामुळें असत; परंतु शारदा आल्यापासून तीच मुळीं

एक मोठें भांडणाचें कारण होऊन बसली. शारदेचें प्रत्येक वर्तन सुशीलाबाई मॅग्निफाइंग ग्लासमधून पाहूं लागल्या. तिची कोणतीहि कृति—मग ती कितीहि चांगली असली तरी ती सुशीलाबाईंना वाईट दिसे व एखादे वेळेस विनायकरावांनीं जर तिची समजूत घालण्याचा प्रयत्न केलाच, तर मी काय आपल्या रक्तामांसाची थोडीच आहें. किती केलें तरी ती भावाची मुलगी! तिचा कैवार घेऊन तुम्ही माझ्याशीं भांडणार; ह्यांत कांहीं तुम्हालांच दोष द्यायला नको, हा सृष्टिनियमच आहे. विनायकरावांना ह्याच्यापुढें कांहीं बोलतां येत नसे. सर्व गोष्टींचा निःपक्षपातपणें विचार करण्याची संवय ही एक मोठी ईश्वरी देणगी आहे. त्या लहान अर्भकानें सुशीलाबाईंचें कांहींच कधीं वाईट केलें नाहीं किंवा चिंतिलेंहि नाहीं. तरी ती आपल्या पंचकडीच्या बाहेरची एवढाच तिचा दोष होता व असें असून तिनें अगदीं त्या पंचकडींत येऊन रहावें हा तिचा गुन्हा. घर स्वच्छ ठेवावें, मुलाबाळांची सेवा करावी, पतीला चांगलें खायला करून घालावें, ड्रॉइंगरूम नटवावी, शिवण करावें, काटकसर करून इन्शुअरन्स भरावें व ह्या साऱ्या गोष्टी अगदीं नीट व्यवस्थित यंत्राप्रमाणें व्हाव्या हा त्यांचा धर्म होता. जुन्या करारांत सांगितलेल्या Negative आज्ञा पाळल्या म्हणजे झालें. नव्या करारांतील Positive आज्ञा, ज्या ख्रिस्तानें आपल्या चरित्रांत ध्वनित केल्या आहेत, त्यांच्याकडे अगदीं दुर्लक्ष केलें तरी हरकत नाहीं असें त्यांचें वर्तन होतें. त्यामुळे शारदा आल्यापासून तिच्या हातून घडणाऱ्या प्रत्येक कृतीमुळें त्यांचा संताप होत असे. एक दिवस मंडळी जेवण्यास बसली होती. प्रार्थना झाल्यावर आतां जेऊं लागणार इतक्यांत एक भिकारी दाराशीं येऊन उभा राहिला. शारदेनें चट्कन उठून आपल्या पुढचें ताट त्याच्या हातीं दिलें व तो जातांच विनायकरावांना विचारलें, 'काका तो येशु तर नसेल? मला तो अगदीं येशूसारखा दिसला. त्यानें नाहीं का सांगितलें, कीं मी तुमच्याकडे आलों होतों त्या वेळेस तुम्ही मला खाऊं घातलें.' ह्या एका गोष्टीनें शारदेचा पुढें पंधरा दिवस सुशीलाबाईंनीं छळ केला.

अशा रीतीनें हक्क आणि कर्तव्य ह्यांच्या कैचींत ती बिचारी पोर सांपडली, व दोन वर्षांत तिच्या साऱ्या बाल्याचे त्या कैचीनें तुकडे तुकडे उडविले. शारदा आतां पहिल्यासारखीच सद्गुणी होती पण तिला शहाणपण आलें होतें. ती आपला प्रत्येक शब्द विचार करून बोलूं लागल्यामुळें त्या

शब्दांतील पूर्वीचें सौंदर्य कायम असलें तरी माधुर्य नाहींसें झालें होतें. तिला आतां एक मात्र ध्यास लागून राहिला होता. दोन वर्षांपूर्वी आपण आपल्या पुढचें ताट खरोखर येशूला उचलून दिलें व तो आपणास पुनः लौकरच कधींतरी भेटणार, असें तिला वाटे. तें ती कधीं कोणाला बोलून दाखवीत नसे. कारण त्यामुळें तिची थट्टा उडणार हें तिला पक्कें माहीत होतें. एकदां· दोनदां विनायकरावांना मात्र तिनें आपकें तें गुपीत सांगितलें होतें. विनायकराव तें ऐकून कांहीं बोलले नाहींत. त्यांचा कंठ दाटून आला व त्यांनीं नुसता तिच्या डोक्यावरून हात फिरविला.

एक दिवस सारीं मुलें अंगणांत खेळत होतीं. शारदा मूलच, परन्तु एका बाजूला एकटीच टाकून दिल्यासारखी बसली होती. कारण आतां तिच्या साऱ्या वागण्याचें व बोलण्याचें त्या घरांत हसूं होऊं लागलें होतें. कधीं कोणी प्रेमाचा शब्द बोलूं नये, होतां होईल तों तिची कुचेष्टा करावी व जमेल तितका, निरनिराळया तऱ्हेने तिचा छळ करावा असा सुशीलाबाईंनीं व त्यांच्या तीन लाडक्या कुकुल्यांनीं विडाच उचलला होता. सुशीलाबाईंचा जन्मस्वभावच तसा होता म्हणून असें हें वर्तन त्यांच्या हातून घडत होतें.

शारदा एकसारखी रस्त्याकडे पाहत होती. दोन वर्षांपूर्वी आपण येशूला आपल्या पुढचें ताट उचलून दिलें होतें. तो केव्हां तरी पुनः येऊन आपणास भेट देणार अशी तिला पक्की खात्री वाटत होती व त्यामुळें पुष्कळदां खेळण्याचेंहि भान विसरून ती वाटेकडे डोळे लावून बसे. तिची नेहमीं निराशा होत असे; पण आजचा दिवस कांहीं निराळाच उगवला होता. आज तिला सारखें वाटत होतें, कीं त्याची भेट होणार आणि एकदोनदां तर तो त्या समोरच्या सडकेनें येतोच आहे असेंहि तिला वाटलें.

विनायकराव आपल्या ईझीचेअरवर पडून वर्तमानपत्र वाचण्याचें केवळ ढोंग करीत होते. त्यांचें सारें लक्ष आपल्या पुतणीकडे लागलें होतें. तिच्यामध्यें दिसून येणाऱ्या फरकामुळें त्यांना हुरहुर लागून राहिली होती. तेहि आंतल्याआंत कुढत. कारण बायकोपाशीं आपली मनःस्थिति बोलून दाखविण्याची सोय नव्हती. लागलेच सुशीलाबाईंनीं टोमणा लगावला असता, कीं स्वतःच्या पोरांची कांहीं फिकीर तरी आहे का म्हणून. विनायकरावांनीं एक सुस्कारा टाकला व त्यांच्या हातांतील पत्र खालीं गळून पडलें. सूर्य मावळत होता व त्या सूर्यबिंबाला झांकून टाकणारी एक उंच आकृति

आपल्याकडे येत आहे असा त्यांना भास झाला. ते लक्ष लावून पाहूं लागले. शारदा तर इतक्या वेळांत त्या आकृतीकडे धावत धावत जाऊन तिनें तिच्य' पायांना मिठीहि मारली होती.

मोठ्या माणसांचे क्रूस (†) कांहीं वेगळे असतील पण लहान मुलांचे क्रूस सुशीलाबाईसारखीं स्वतःचे हक्क संरक्षण करणारीं माणसेंच तयार करीत असतात. मुलांचा जन्मस्वभाव त्यांना मधल्या सरळ खांबाप्रमाणें नीट नेत असतो तर सुशीलाबाईसारखे पिलात त्यावर आपल्या हक्काचे आडवे दांडे ठोकून त्या अर्भकांनाहि वर खिळून टाकतात. आज शारदेला खिस्त भेटला असें खात्रीनें वाटलें. तिच्या सरळ आयुष्याचा सुशीलाबाईनीं क्रूस तयार करून ठेवला होता. दोन वर्षेंपर्यंत पदोपदीं तिच्या कोमल मनाला तिच्या चुलतीनें अप्रेमाच्या खिळयांनीं, त्या दोघींनीं मिळून बनविलेल्या क्रूसावर पुरें खिळून टाकलें होतें. कांहींहि आजार न होतां तें जग सोडून जाण्यास तिला कांहीं वेळ लागणार नव्हता; पण ती येशूची वाट पाहत होती. तो आज तिला भेटला. ती धावत धावत जाऊन पायांवर पडली.

भिक्षेकऱ्यानें तिला उचलून घेतलें. तिला चक्कर आली होती. इतक्यांत विनायकरावहि धांवत तेथें येऊन पोंचले. मुलांनींहि आपला खेळ थांबविला व सुशीलाबाईहि दाराशीं येऊन उभ्या राहिल्या. सूर्याचीं मावळतीं किरणें आधीं सुशीलाबाईंच्या पायांवर लोळण घेत होतीं, पण मग त्याच दिशेकडून येणाऱ्या विनायकरावांच्या, भिक्षेकऱ्याच्या व शारदेच्या सावलीनें त्या सूर्य मावळेपर्यंत अंधारांतच राहिल्या.

विनायकरावांनीं शारदेला आपल्या बिछान्यावर नेऊन निजविलें. भिक्षेकरीहि न बोलावतां खोलींत गेला व त्यानें विनायकरावांना साह्य करण्यास सुरुवात केली. सुशीलाबाई खोलींत डोकावल्या व 'नाटकी भेली' असले शब्द पुटपुटत बाहेर येऊन आपलें विणणें घेऊन विणकाम करीत बसल्या.

अगदीं संध्याकाळ झाल्यावर सगळी मंडळी जेवण्याच्या खोलींत जमली. विनायकरावांनाहि अगदीं आपल्या मनाविरुद्ध शारदेला त्या भिक्षेकऱ्याच्या देखरेखीखालीं ठेवून जेवण्यास जावें लागलें! बाहेरच्या माणसासाठीं कुटुंबस्वास्थ्य कसें मोडायाचें! पण जेवतांना त्यांना घास गिळेना

ते म्हणाले, " सुशीला, शारदा तापानें फणफणली आहे, तिला थोडें दूध तरी नेऊन देतों."

हें खरें म्हटलें तर सुशीलाबाईंच्याच ध्यानांत यावयास पाहिजे होतें पण नाहीं आलें. विनायकरावांनीं असें म्हटल्यावरहि सुशीलाबाई जागच्या हालल्या नाहींत, कीं कांहीं बोलल्या नाहींत. विनायकराव स्वतांच उठले व त्यांनीं एका कपांत दूध ओतलें—त्यांचे हात थरथर कांपत होते, पोरगी एवढी तापाने फणफणलेली, तरी अजून आपल्या बायकोचा तिच्या-वरील राग उतरत नाहीं हें पाहून त्यांना अत्यंत दुःख झालें. एका हातानें डोळे पुसीत ते शारदेकडे आले. भिक्षेकऱ्यानें तिला उचलून आपल्या मांडीवर घेतलें होतें. तिनें आपले दोन्ही हात त्याच्या गळ्यांत टाकले होते. त्याच्या एका हातांत शास्त्र होतें व तो मत्तयाचा २५ वा अध्याय वाचीत होता. विनायकराव आंत येत होते तेव्हां भिक्षेकरी खालील भाग वाचण्यांत गुंग होऊन गेला होता. एकीकडे तो आपला हात शारदेच्या डोक्यावरून फिरवीत होता. विनायकराव हें सारें पाहून स्तब्धच झाले. ते थोडा वेळ दारांतच उभे राहिले. भिक्षेकरी वाचीत होताः—

'तेव्हां राजा आपल्या उजवी कडल्यांस म्हणेल, अहा माझ्या बापाचे आशीर्वादित, या' जें राज्य जगाचा पाया घातला तेव्हांपासून तुम्हांकरितां तयार केलें तें वतन करून घ्या. कारण मी भुकेला होतों, तेव्हां तुम्ही मला खायास दिले; मी तान्हेला होतों, तेव्हां तुम्हीं मला प्यायास दिलें; मी परका होतों तेव्हां तुम्हीं मला घरांत घेतलें; उघडा होतों तेव्हां तुम्हीं मला वस्त्र नेसविलें; मी दुखणाईत होतों, तेव्हां तुम्ही माझा सांभाळ केला; मी बंदीशाळेंत होतों, तेव्हां तुम्ही मजकडे आला. त्या वेळेस न्यायी त्याला म्हणतील, हे प्रभु आम्ही केव्हां तुला भुकेलें पाहून खायास दिलें ? आणि केव्हां तान्हेलें पाहून प्यायास दिलें ? आणि केव्हां आम्ही तुला परकें पाहून घरांत घेतले ? आणि केव्हां उघडें पाहून वस्त्र नेसविलें; आणि केव्हां आम्हीं तुला दुखणाईत अथवा बंदिशाळेंत पाहून तुजकडे आलों ? मग राजा त्यांस उत्तर देईल आणि म्हणेल, कीं मी तुम्हांस खचित सांगतों, या माझ्या भावांतील एकाला—यांतल्या सगळ्याहून लहानाला तरी जितकें जें तुम्हीं केलें तितकें तें तुम्हीं मलाच केलें. बाळ समजलीस ? तुझें म्हणणें एकढ्या दृष्टीनें खरें आहे. त्या दिवशीं तूं मला आपल्या पुढचें ताट उचलून

दिलें—आणि तें वरच्या म्हणण्याप्रमाणें येशूलाच दिलेंस. पण मी येशू नाहीं. मीहि तुझ्यासारखाच—छे पण तुझ्यासारखा मुळींच नाहीं—मीहि एक माणूस आहे; आणि फार वाईट माणूस आहे. मला सुधारण्याचे प्रयत्न लहान· पणीं माझ्या आईबापांनीं केले, नंतर मास्तरांनीं केले व शेवटीं तुरुंगावरील अधिकाऱ्यांनीं केले. प्रत्येक खेपेस तुरुंगांतून सुटून आल्यावर मी अधिकाधिक बेरड बनत चाललों. बाळ दोन वर्षांपूर्वी मी नुकताच तुरुंगांतून सुटून आलों होतों आणि तुरुंगांतून सुटून आल्यानंतरचा पहिला अन्नाचा घास माझ्या तोंडांत पडला तो तुझ्या हातचा. त्या वेळपासून मला कांहीं तरी निराळेंच वाटूं लागलें. मी निराळा बनूं लागलों. पुष्कळ वेळेस तुजकडे यावें असें वाटे; पण मग मी म्हणे छे; त्या कोमल अर्भकाला माझा एका क्षणाचाहि सहवास नको. मी पापी अधम आहें. पण अलीकडे अलीकडे मला अगदीं राहवेना व मीं इकडे येण्याचा निश्चय केला. आणखी आलों. बाळ, झोंप लागली ?' त्यानें शारदेला बरेंच हालविलें; पण ती हालेना. हें पाहून विनायकराव पुढें आले. तिला पुन्हा मूर्च्छा आली होती. दोघांनीं तिला बिछान्यावर निजविलें. विनायकरावांच्या लक्षांत आलें, कीं आतां डॉक्टरला आणलेंच पाहिजे. भिक्षेकऱ्याच्या हातांत दूध देऊन घरांत न जातां परस्पर ते बाहेर डॉक्टरला आणण्यास निघून गेले.

डॉक्टर आले. त्यांनीं शारदेची प्रकृति तपासून अभिप्राय दिला, कीं तिला क्षय झाला असून तो अशा तऱ्हेचा आहे, कीं ती फारच थोड्या दिवसांची सोबतीण आहे. औषध कांहीं नाहीं. मृत्यु लांबवावयाचा असेल तर तिचें मन प्रसन्न राहील असें करा. इतकें सांगून डॉक्टर फी घेऊन निघून गेले.

शारदेला उरलेले दिवस आनंदांत ठेवण्याचें असें विनायकरावांनीं ठरविलें. आधीं घरांत जाऊन त्यांनीं भिक्षेकऱ्याच्या जेवण्याची व्यवस्था केली. ती वादविवादावांचून झाली नाहीं हें सांगणें नको. एक तर भिकाऱ्यांना भीक घालून भिकार वाढविणें हें एक देशाच्या दृष्टीनें फारच हानिकारक कृत्य आहे! इंग्लंडसारखे इकडे पुअर लॉ नाहींत हें आपलें मोठें दुर्दैव! दुसरें ह्याला पाहुणा म्हणावा तर आगाऊ सूचना तरी द्यायची. हें घर आहे का खाणावळ आहे? खरा संसारीपणा म्हणजे ठरलेल्या माणसापुरतेंच अन्न शिजणें! त्यांना पुरून एक शीत अधिक उरतां उपयोगी

नाहीं. पण विनायकरावांच्या मनावर त्याचा कांहीं परिणाम झाला नाहीं, व ह्यापुढें तो होणें शक्यहि नव्हतें. ह्या मुलीच्या मृत्यूचें एकटें कारण म्हणजे आपल्या मनाचा दुर्बळपणा असें विनायकरावांच्या मनानें पुरें घेतलें होतें. वाघ म्हटलें तरी खातो व वाघोबा म्हटलें तरी खातो. तेव्हां आतां ह्यापुढें दुर्बलपणा अगदीं करावयाचा नाहीं असें त्यांनीं ठरविलें. त्यांनीं त्या वेळेस कांहीं म्हटलें नाहीं. त्यांनीं आपल्यासाठीं झांकून ठेवलेलें ताट उचलून त्या भिक्षेकऱ्याला जेवूं घातलें व ते उपाशी राहिले. दुसऱ्या दिवसापासून मात्र त्यांनीं आपल्या पत्नीला ताकीद दिली, कीं शारदा जिवंत असेपर्यंत त्या भिक्षेकऱ्याला जेवण्यास वाढलें पाहिजे व तें अगदीं आपल्या पंक्तीला. सुशीलाबाईंचा ह्यावर बराच जळफळाट झाला; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. सुशीलाबाईंनीं आपलीं ताटें घेऊन नंतर जेवण्याचा परिपाठ सुरू केला. भिक्षेकरी व विनायकराव आधीं जेवूं लागले.

शारदा अगदीं अंथरुणाला खिळून गेली. तिच्या उशापायथ्याशीं विनायकराव व भिक्षेकरी नेहमीं असत. अशा रीतीनें तीन चार महिने गेले. एक दिवस आपण फारच क्षीण झालों आहोंत असें पाहून शारदेनें विनायकरावांना म्हटलें काका, काकू येत नाहींत मजकडे. त्यांना म्हणावें मला भेटा. आतां ह्यापुढें मी तुम्हांला मुळींच त्रास देणार नाहीं. विनायकरावांच्या डोळ्यांना खळ्कन् पाणी आलें. ते तसेच उठून सुशीलाबाईकडे गेले. त्यांनीं त्यांची परोपरींनीं विनवणी केली, कीं एकदां तरी शारदेला भेटून दोन प्रेमाचे शब्द बोल. पण सुशीलाबाईंचा आवडता 'प्रेस्टिज' आडवा आला. त्या मानी होत्या ! तो मानीपणा कसा बाजूला ठेवायचा ! विनायकरावांनीं शेवटीं त्यांच्या पायांवर डोकेंहि ठेवलें पण धन्य त्या मानी स्त्रीची, कीं ती मुळींच शारदेला जाऊन भेटली नाहीं !

शारदेनें 'काकू, काकू' म्हणत प्राण सोडला !

विनायकराव त्या वेळीं काकूंच्या पायांवर डोकें ठेवून बसले होते, व त्या भिक्षेकऱ्याचा हात शारदेच्या डोक्यावर होता.

भिक्षेकऱ्यानें मोठा टाहो फोडला.



# "?" : : ६१

"चल्; इथं प्राण जायला झालाय्...अन् तुझी खायूखाय्...निघ इथून नाहीं तर..." असें कांहींसें बोलून रागाच्या भरांत तिनें जयंताच्या पाठींत खाऊ दिला. जयंत रडत रडत आपल्या खोलींत गेला.

आज जयंताला वीरश्री चढली होती. वर्गांत कदम नांवाच्या मुलाबरोबर भांडण झाल्यावर "देवा, कदमला मारून टाक" असें लिहिलेली चिठ्ठी त्यानें आकाशांत कधींच भिरकावली होती. त्या गोष्टीला आठ दिवस झाले नाहींत, तोंच कदम साप चावून मेल्याची हकीकत आज शाळेंत आली होती. नऊ वर्षांचा बालिश जयंत! तें ऐकून त्याला आपल्या सामर्थ्याचा अभिमान वाटूं लागला होता. त्याच्या भरांत आज स्वारी आईला त्रास देत होती.

जयंत खूप रडला. रडणें थांबतांच त्याचा अभिमान जागृत झाला. एक भेसूर कल्पना बालिश मनांत आली!

'देवा, आईला मारून टाक,' अशी चिठ्ठी त्यानें लिहिली, तिचे तुकडे केले व खिडकीबाहेर वर उधळले...नीच भावनांचे ते संदेशवाहक हवेच्या झोतानें खालीं येत होते. इतक्यांत जयंताच्या आईनें त्याच्या खोलींत प्रवेश केला. खालीं येणाऱ्या कागदांच्या कपट्यांकडे बघणाऱ्या जयंतानें रागानें मागें पाहिलें. आई त्याच्याजवळ गेली व खालीं बसून त्याच्या पाठीवरून हात फिरवीत म्हणाली, "जया, हें घे माझ्यांतलं दूध!"

"आतां मला नकोय् जा!" जयंत दूर सरत रागानें म्हणाला.

मातेचे डोळे पाण्यानें भरून आले. जयंताला जवळ ओढून ती म्हणाली, "आजारी माणसाला फार त्रास देऊं नये जया, तुला अजून कसं समजत नाहीं? चल, घे एवढं दूध! खरंच मला तुझी भारी काळजी वाटते."

आईच्या डोळ्यांतील अश्रूंनीं जयंताचा राग निवाला. जयंत दूध प्याला. आईनें त्याचें मस्तक एकदम आपल्या हृदयाशीं दाबलें व ती म्हणाली, "जया, खरंच माझ्यासाठीं एक करशील का?"

जयंतानें अडखळत विचारलें, "काय आई?"

" तुझ्या नव्या आईला असा त्रास नाहीं ना देणार ? " आईनें विचारलें. बिचारा जयंत! नुकत्याच लिहिलेल्या चिठ्ठीची त्याला आठवण झाली. 'नवी आई' म्हणजे ती चांगली नसतेच असें शेजारच्या गणूच्या स्थितीवरून त्याला कळलें होतें. तो ओक्साबोक्शीं रडूं लागला व आई-च्या खांद्यावर हात टाकून म्हणाला,

" नव्या आईजवळ मी राहणारच नाहीं मुळीं."

* * *

" अरे जया, हें काय चालवलें आहेस? तापाचा मुलगा...पडून राहायचें सोडून कसले कागद लिहितो आहेस अन् फाडून टाकतो आहेस ?" जयंताची ताई खोलींत येऊन त्याला म्हणाली. जयंत बावरला. खिडकी-बाहेर उडणाऱ्या चिठोऱ्यांकडे न बघतां तो बिछान्यावर येऊन बसला व म्हणाला, " पण ताई, तें गाणें म्हण ना ? " ताईनें सुरवात केली—

" शाळेंतुनी घराला । येतां धरील पोटीं ।
काढूनि ठेविलेला । घालील घास ओठीं । "

या ओळी ऐकतांच जयंताच्या चित्तवृत्ती थरारल्या. ताईच्या गळयाला मिठी मारून तो खूप रडला...व मग बिछान्यावर अंग टाकून हळुवार स्वरानें म्हणाला, " ताई, तुझ्या घरीं तूं मला नेशील का ? "

ताई म्हणाली, " हो, न न्यायला काय झालं ? पण दादांनीं धाडायला हवं ना ? "

जयंत ताईच्या उलट दिशेकडे बघत म्हणाला, " तसं नकोच. मी आपला आईकडेच जाईन."

ताई म्हणाली, " चल्, असं बोलूं नये."

जयंताला पुष्कळ उपचार केले, पण त्याला कांहीं मानसिक व्यथा असावी असें बरेंच उशिरां कळलें. या व्यथेचा त्याच्या शरिरावर इतका परिणाम झाला होता, कीं यापुढें जयंत जगणें शक्य नव्हतें. या मानसिक व्यथेचा छडा लावण्याचें ताईनें ठरविलें. एके दिवशीं जयंताच्या उशाशीं ती हळूच गेली. जयंत रडत होता. हें पाहून तिला फार वाईट वाटलें. आपल्या पदरानें तिनें जयंताचें डोळे पुसले व विचारलें,

" जया, तुला काय वाटतं ? "

" कशाबद्दल ? "

“ तूं आत्तां कां रडत होतास ? ”

“ मला आईची आठवण झाली होती. खरंच आईला कोणी मारलं ? ” हा प्रश्न न कळत त्याच्या तोंडून निघून गेला.

“ म्हणजे ! ” ताई उद्गारली.

जयंतानें सारी हकीगत ताईला सांगितली. जयंताच्या बालिश कल्पनांची तिला कींव आली. त्याची समजूत घालीत ती म्हणाली, “ चल्, असें तुझ्याच्यानें काय होणार ? ती तर क्षयानें मेली.”

जयंत वरील बहालाकडे बघत म्हणाला, “ अन् कदम, अन् मी...?”

“ तूं काय ?”

“ मी पण...माझ्याबद्दल...तशी चिठ्ठी—” रडण्याच्या कंपांत पुढील शब्द उमटलेच नाहींत.

* * *

जयंताचा आजार वाढत चालला. सायंकाळीं चारचा सुमार असेल, ताईला जयंत म्हणाला, “ ताई, एकदा तें गाणें म्हण ना.”

ताईनें सुरुवात केली,

> “ हे गुंतले जिवाचे । पायीं तुझ्याच धागे ।
> रुसणार मी न आतां । जरि बोलशील रागें ।
> ये रागवावयाही । परि येइ येइ वेगें ।

या ओळी पुऱ्या होतात न होतात तोंच जयंताला गुचकी लागली... जयंताचें प्राणोत्क्रमण झालें !

